# माझी भूमिका

लेखक

गणेश गोविंद बोडस

मार्च, १९४०

किंमत तीन रुपये

# —' माझी भूमिका '—

## प्रकाशन-मित्र-मंडळ.

१ श्री. वा. श्री. पुरोहित
२ ,, चं. वि. बावडेकर
३ ,, र. य. वेलदे
४ डॉ. अ. ना. भालेराव
५ श्री. ना. वि. कुलकर्णी
६ ,, बा. मो. कानिटकर
७ श्री. प्र. कृ. महाबळ
८ डॉ. एम्. आर्. दातार
९ श्री. चिं. नि. पाटणकर
१० ,, व्यं. ना. मांडवगणे
११ ,, प्र. ब. औरंगाबादकर
१२ ,, म. वि. काळे

# —' माझी भूमिका '—

## प्रकाशन-सहाय्यक-मंडळ.

१ श्री. मं. प. नाबर
२ ,, र. गो. सरदेसाई
३ ,, वि. मा. दि. पटवर्धन
४ ,, चं. ग. दीक्षित
५ ,, घाणेकर
६ ,, थत्ते
७ ,, य. ल. ठकार
८ ,, आर्. जी. पोतनीस
९ डॉ. रा. ह. भडकमकर
१० श्री. गोपाळराव भोंडे
११ डॉ. आर्. व्ही. आजगांवकर
१२ श्रीमंत सरदार रास्तेसाहेब
१३ श्री. स. ग. रानडे
१४ ,, बाबूराव पेंढारकर
१५ ,, गणेश कोंडो गोडबोले वकील
१६ संगीतचूडामणि विनायकबोवा पटवर्धन
१७ संगीतकलानिधि मास्तर कृष्णराव फुलंब्रीकर
१८ श्री. वि. रा. खाडिलकर

# तिसरी घंटा



अभिनयकुशल नट, उत्कृष्ट नाट्यशिक्षक, गंधर्व नाटक मंडळीच्या स्थापकांपैकीं एक अत्यंत व्यवहारज्ञ घटक, दुसऱ्याला यथायोग्य रंगविणारे व स्वतःही यथातथ्य रंगाची सजावट करणारे, मराठी नाट्यसृष्टींतील अधिकारी 'रंगाचार्य' असेंच ज्यांना सार्थपणें निःशंक म्हणतां येईल, असे श्री. गणपतराव बोडस, यांनीं आपलें "**माझी भूमिका**" म्हणून आत्मचरित्र लिहिलें, तें प्रसिद्ध करण्याचा मान आज आम्हांला मिळाला, याबद्दल आम्हांला अतिशय आनंद होत आहे.

श्री. गणपतराव बोडस यांनीं आपलें आत्मचरित्र म्हणून लिहिलें आहे, तेव्हां त्यांत त्यांचें खासगी वैयक्तिक जीवन चित्रित झालें आहेच; हा एक मोठा लाभच म्हणतां येईल. परंतु त्याहिपेक्षां मोठा लाभ म्हणजे या आत्मचरित्रांत श्री. गणपतराव बोडस यांच्या वैयक्तिक जीवनापेक्षां, गेल्या चाळीस पन्नास वर्षांतील सर्वश्रेष्ठ गणल्या गेलेल्या "किर्लोस्कर संगीत नाटक मंडळी" व "गंधर्व नाटक मंडळी" या दोन प्रमुख नाट्यसंस्थांतील अनेक लहानमोठ्या महत्त्वाच्या घडामोडी विशेष प्रामुख्यानें व विस्तारानें आलेल्या आहेत, त्या महाराष्ट्र रंगभूमीच्या सर्वांगीण इतिहासाला महत्त्वाचीं खरीं साधनें म्हणून अत्यंत उपयुक्त आहेत. आमच्या दृष्टीनें "**माझी भूमिका**" या ग्रंथाचा सर्वांत मोठा लाभ हाच होय !

महाराष्ट्र रंगभूमीचा समग्र इतिहास अजून लिहिला जाणार आहे. त्याची तयारी ठिकठिकाणीं होत आहे. कोठें कांहीं अर्धवट छापून पडलें आहे, कोठें छापलें जात आहे, तर कोठें लिहिलें जात आहे, हें आम्हांला माहित आहे. त्या तयारींत श्री. गणपतराव बोडस यांच्या प्रस्तुत "**माझी भूमिका**" या आत्मचरित्रानें चांगली भरदार भर पडणार आहे हें निश्चित. या दृष्टीनेंच या ग्रंथाला फार मोठें महत्त्व आहे.

नाशिकच्या 'महाराष्ट्र—नाट्यमंदिरानें' १९४० मध्यें नाट्य-संमेलन बोलावलें. त्यासंबंधीं आम्हीं कांहीं मित्र मंडळी जुलै १९३९ च्या २० तारखेस सहज वाटाघाटी करीत बसलों असतां, नाट्यसंमेलनामध्यें एकादी विशेष महत्त्वाची गोष्ट करितां येईल काय? असा प्रश्न निघाला. त्या वेळीं आमच्यापैकींच एक श्री. रमाकांत यशवंत वेलदे यांनीं श्री. गणपतराव बोडस यांच्या आत्मचरित्राबद्दल असलेली माहिती आम्हांला देऊन तें प्रसिद्ध करतां आल्यास नाट्यसंमेलनानें नाट्याच्या इतिहासाच्या दृष्टीनें एक भरीव कामगिरी केली असें होईल, असें सुचविलें.

ही कल्पना आम्हां सर्वांसच एकदम मान्य करण्यासारखी वाटली व आम्ही त्या उद्योगास लागलों. प्रथम श्री. गणपतराव बोडस यांना लिहून त्यांच्याकडून प्रसिद्धीची परवानगी मिळविली. ती त्यांनीं मोठ्या आनंदानें देऊन आम्हांला प्रोत्साहन दिलें.

त्यापुढें ग्रंथप्रसिद्धीला लागणाऱ्या खर्चाचा विचार करणें प्राप्तच होतें. महाराष्ट्र—नाट्यमंदिर सांपत्तिक दृष्ट्या अगोदरच गरीब; त्याला सहजगत्या तो भार झेंपणें अशक्यच होतें. परंतु मार्ग काढण्याशिवाय गत्यंतर काय?

त्याकरितां आम्हीं आमच्यापैकीं बारा मित्रांचें एक 'मित्रमंडळ' तयार करून, अगोदर प्रत्येकानें शक्य तेवढें आपल्या पदरचें घालावयाचें व नंतर श्री. गणपतराव बोडस यांच्या चहात्या मंडळीपर्यंत पोंचून त्यांच्याकडून मिळेल तें मिळवावयाचें, असें ठरविलें. कोणाकडून देणगी तर कोणाकडून परतीच्या बोलीवर, रक्कम जमविण्याचा उद्योग आरंभिला.

संकेताप्रमाणें, आमच्या उद्योगाला—आत्मचरित्राचें हस्तलिखित छापखान्याकडे देण्याच्या वेळीं सर्व जरी नाहीं तरी बरीच रक्कम जमा झाली आणि तेवढ्यावर—सुरवात झाली. त्यामुळें आम्हांला खूपच धीर आला.

नंतरही एक पंचाईत पुढें आलीच. महायुद्धामुळें कागदाची महागाई आणि पुणें-मुंबईस पुस्तक छपाईला खर्च जास्त येणार, त्यांतून कसें पार पडावें हा बिकट प्रश्न आला.

तोही प्रश्न कोल्हापूर येथील आमच्या मित्रमंडळीनीं सोडविला व आम्हांला निर्धास्त केलें. कोल्हापुरास छपाई चांगली होऊन इतर ठिकाणापेक्षां स्वस्तही पडते असें कळवून, छपाईकडे लक्ष पुरविण्याचें काम कोल्हापुरच्या आमच्या मित्रमंडळीनीं मोठ्या आनंदानें आपल्याकडे घेऊन आम्हांस दुसऱ्या चिंतेतूनही निर्धास्त केलें. "**माझी भूमिका**" ग्रंथाची, छापखान्यांत देतां येण्यासारखी हस्तलिखित प्रत कोल्हापूर येथील 'होम बुक सर्व्हिस'चे श्री. विश्वनाथ बाळाजी मोडक या आमच्या स्नेह्यांनीं हौसेनें आणि आस्थेनें तयार केली.

मुद्रितें तपासण्याचें जिकिरीच किचकट काम आमचे मित्र श्री. धोंडो रघुनाथ तेंडुलकर, यांनीं स्वीकारून ग्रंथ शक्य तों शुद्ध करण्यांत कमालीचें आमच्यावरील प्रेम व्यक्त केलें.

'कलाभुवन प्रेस'चे श्री. यशवंतराव फडके व त्यांचे बंधु, यांनीं तर "**माझी भूमिका**" छापली जात असतां सर्व प्रकारची काळजी वाहून आम्हांला अत्यंत उपकृत करून 'निर्हेतुक प्रेमा'चा नमुना आजच्या कालांतही आम्हांला दाखवून दिला.

"ज्ञानेश्वर प्रेस"चे मालक, 'ज्ञानेश्वरीभक्त,' वेदांतव्यासंगी, रावसाहेब कृ. ह. ऊर्फ दादासाहेब सहस्रबुद्धे व त्याचे उत्साही तरुण चिरंजीव भाऊसाहेब सहस्रबुद्धे यानीं "**माझी भूमिका**" हा ग्रंथ आपल्या दूरवर पसरलेल्या लौकिकाला साजेल असाच उत्तम रीतीनें छापून दिला, इतकेंच नव्हे, तर आम्हांसारख्या अपरिचित दूरस्थ उत्साही मंडळींना; व्यावहारिक शक्य तों योग्य अशाच सवलती देण्याचा थोरपणा मोठ्या आनंदानें दाखवून आमच्या प्रकाशनकार्याच्या सत्कार्यास हातभार लावला, याबद्दल आम्हीं त्यांचे कृतज्ञतापूर्वक आभार मानतों.

वरील सर्व सहाय्यकांचें आमच्यावर प्रेम तर खरेंच; परंतु त्याहीपेक्षां श्री. गणपतराव बोडस यांच्या नाट्यगुणांवर आणि नाट्यदेवतेवर जास्त प्रेम हेंच खरें, असें म्हटलें पाहिजे. त्यामुळें आम्ही पांचशें मैलांच्या दूर अंतरावरून '**माझी भूमिका**'बद्दल नुसती काळजी वाहिली; परंतु

वरील मित्रमंडळींनीं सक्रिय काळजी करून आजच्या स्वरूपांत "**माझी भूमिका**" सजविली यांत शंकाच नाहीं.

आजचें ३१ वें नाट्यसंमेलन अवघ्या अंगांनीं महत्वपूर्ण आहे. त्यांत या ग्रंथाच्या प्रकाशनानें अधिकच महत्वाचें ठरेल याबद्दल मतभेद होणार नाहीं. आजपर्यंतच्या झालेल्या नाट्यसंमेलनांनीं, मोठमोठ्या नाटककारांकडून, समाजांतील फार मोठ्या वजनदार विभूतींकडून व्याख्यानादिकांनीं नाट्यसंस्थांना, नटांना व नाटककारांना उपयुक्त होणारे विचार प्रगट केले. आजच्या नाट्यसंमेलनप्रसंगीं, एका प्रख्यात नटानें आपले नाट्याच्या जगांतील जवळ जवळ ४० वर्षांतील अनेकविध विचारणीय अनुभव लिहिलेले पुढें आणले आहेत.

'**माझी भूमिका**' प्रकाशनाचा आजचा योग व आजच्या संमेलनाचें अध्यक्षपद "**माझी भूमिका**"चे श्री. गणपतराव बोडस यांनींच भूषविलें आहे, हा योग, या दोन अपूर्व सुयोगांची युति आनंददायक तशी कल्याणप्रदही आहे यांत शंका नाहीं!

प्रिय गणपतराव! आपण आपली '**माझी भूमिका**' तयार ठेविली आहे. आमच्या पाल्हाळाची अधिक लांबण लावून आपणांला जास्त तिष्ठत ठेवणें योग्य नाहीं. आपली ही लेखी '**भूमिका**' वाचक अवलोकन करण्यास उत्सुक आहेत; तेव्हां तिच्यापुढील पडदा बाजूला करण्याकरितां आम्हीं रंगभूमीच्या नियमाप्रमाणें एक, दोन घंटा देऊन आतां ही तिसरी घंटा वाजवितों. रंगाचार्य गणपतराव! नमस्ते!

नाशिक
महाराष्ट्र–नाट्य–मंदिर
ता. २३ माहे मार्च सन १९४०

आपले नम्र,
**वा. श्री. पुरोहित**
**च. वि. बावडेकर.**
**बा. मो. कानिटकर**

# पडदा उघडण्यापूर्वीं

नाट्य-सृष्टींत प्रत्यक्ष रीतीनें वावरत होतों त्या वेळीं माझी भूमिका करतांना पडदा उघडण्यापूर्वीं भीतीचा लवलेशदेखील माझ्या मनांत उत्पन्न होत नसे. तेव्हां मला आत्मविश्वास वाटत होता. परंतु चरित्ररूपानें "**माझी भूमिका**" वाचकांसमोर ठेवतांना आज मला बरीच भीति वाटत आहे.

वास्तविक आत्मचरित्र मी लिहावें असा मी विशेष कोणीहि नाहीं, याची जाणीव जशी मला आहे, तशीच "आपुली आपण करी स्तुती। तो एक पढतमूर्ख ॥" ही समर्थउक्तीहि माझ्या डोळ्यासमोर ठसठसीत मला दिसते आहे. असें असूनहि मी **माझी भूमिका** लेखनरूपानें आपल्यापुढें मांडीत आहें. या माझ्या धाडसाबद्दल मी सर्वांची क्षमा मागतों.

मी माझें चरित्र लिहावयास कां प्रवृत्त झालों? असा प्रश्न जर माझ्याचसमोर उभा राहतो, तर तो जगालाहि कां पडणार नाहीं? त्यासंबंधीं थोड्या शब्दांत खुलासा करतों.

मित्रमंडळींत बसून अष्टौप्रहर अनेक तऱ्हेच्या गोष्टी सांगण्याचा नाद मला पहिल्यापासूनच आहे. अर्थात् मी ज्या गोष्टी रसाळपणानें सांगत असेन, त्या मी, भोगलेल्या, मिळवलेल्या, ऐकलेल्या नाट्यसृष्टींतीलच असतात. अशा गोष्टी सांगण्याचा योग सन १९२२ सालीं मी गंधर्व नाटक मंडळीचा संबंध तोडून मिरज मुक्कामीं रहात असतां आला. मिरजेचे त्या वेळचे कारभारी श्री. दादासाहेब आगाशे, वे. शा. सं. वासुदेवशास्त्री खरे, व श्री. गोविंदराव सोरटे, यांच्यापुढें हकीकती सांगत असतां त्यांनीं त्या ऐकून मी माझें चरित्र लिहावें असें मला सुचविलें. त्या वेळीं मला आनंद वाटला व चमत्कारिकहि वाटलें. लिहावें असें मनांत आलें. पण कल्पना आली आणि गेली.

त्या कल्पनेला पुन्हां १९३५ सालीं गति मिळाली. याचें कारण, मला स्पष्ट सांगतां येणार नाहीं. नाट्यव्यवसायाचा वगैरे संबंध सुटल्या-

मुळें घरीं मला पुष्कळ निवांत वेळ मिळं लागला. तेव्हां आत्मचरित्राचीं टांचणें करूं लागलों. कर्मधर्मसंयोगानें त्याच वेळीं माझे एक नटशिष्य श्री. **यशवंत लक्ष्मण ठकार** हे भेटले. त्यांच्याकडून " आपलें आत्मचरित्र **महाराष्ट्र-कुटुंबमालेस** प्रसिद्ध करण्यास मिळावें अशी मालेचे संपादक श्री. **ना. वि. कुलकर्णी** यांची इच्छा आहे, " असें मला अनाहूत कळवलें. त्याहिपुढें मुंबईचे श्री. **चं. वि. बावडेकर** यांनाहि माझें चरित्र विविध-वृत्ताकरितां मिळविण्याची उत्कट इच्छा असल्याचें कळलें. वरील दोन्ही प्रसिद्धीच्या मागण्यांचा माझ्या मनावर थोडा अनुकूल परिणाम झाला. पण लिहिण्याची कधींच संवय नसल्यानें, आत्मचरित्र प्रसिद्ध करण्याइतक्या योग्यतेचें होईलच ही खात्री वाटेना. पण लिहावयास प्रोत्साहन मात्र मिळालें. लिहित असतांच माझ्या बरोबरीच्या समव्यवसायी मित्रांना, तसेंच तरुण पिढींतील लेखक व नट अशा सुहृदांनाहि कांहीं भाग वाचून दाखविला. माझ्या गोष्टीवेल्हाळपणाप्रमाणेंच प्रस्तुतचें लेखनगुऱ्हाळहि तितकेंच पसंत आहे असें सर्वांचेंच मत पडलें. प्रसिद्धीसाठीं चरित्र कोणास द्यावें याचा विचार येतो न येतो तोंच **कर्नाटक प्रिंटिंग प्रेसकडे** तें प्रसिद्धीस जावें अशी वाटाघाट सुरू झाली. त्या विचारांत असताच नाशिकचे **महाराष्ट्र-नाट्य-मंदिराचे** एक प्रमुख सदस्य श्री. **वामन श्रीधर पुरोहित** यांच्याकडून मला प्रेमाचा व हक्काचा अनपेक्षित असा खलिता आला कीं " आपलें आत्मचरित्र प्रसिद्ध करण्याचा मान आमच्या **महाराष्ट्र-नाट्य-मंदिरास** मिळावा अशी आमची उत्कट इच्छा आहे. " औचित्य या दृष्टीनें माझें चरित्र इतर कोणाहिपेक्षां **महाराष्ट्र-नाट्य-मंदिरास** प्रसिद्धीस द्यावें असें माझ्या मनानें घेतलें. त्याप्रमाणें आज ही ' **माझी भूमिका**' **महाराष्ट्र-नाट्य-मंदिर** पडदा उघडून दाखवीत आहे.

मी साहित्यिक नाहीं हें वर सांगितलेंच आहे. माझा अनेकांशीं अनेक तऱ्हेचा आयुष्यभर भला व बुरा संबंध आलेला आहे. या चरित्रांत वर्णित व्यक्तींतील अनेक दिवंगत आहेत, अनेक आपआपल्या ठिकाणीं परिस्थित्य नुरूप वर्तत आहेत. माझ्या लिहिण्यानें कोणाला सुख होईल तर कोणाला दुःखहि होईल. परंतु मी धर्मराजा नाहीं, तसाच दुर्योधनहि नाहीं. त्यामुळें अवघें जग मला चांगलें दिसलें, किंवा वाईटच दिसलें, असें झालेलें नाहीं. जेथें

चांगला अनुभव आला तो तसाच लिहिला आहे आणि ज्यांचा जेवढ्या-पुरता कटु अनुभव मिळाला तोहि तसाच चित्रित केला आहे. मात्र मला वैयक्तिक द्वेष कोणाचाहि नव्हता व नाहीं; हें येथेंच कबूल करून टाकतों.

माझ्या लिहिण्याचा उपयोग, नाट्य–सृष्टींत जीवित कंठूं इच्छि-णाऱ्या आजच्या व पुढच्या पिढीला अत्यंत अल्प जरी झाला तरी मी माझ्या या गोष्टीवेल्हाळपणाचें सर्वतोपरी चीज झालें असें समजेन.

**श्री. वा. श्री. पुरोहीत** व **श्री. र. य. वेलदे** यांच्यामुळें नाशिकच्या **महाराष्ट्र–नाट्य–मंदिराशीं** माझा ऋणानुबंध जडला. मंदिरानें माझें आत्मचरित्र प्रसिद्ध करण्यांत प्रेम, उत्साह दाखवून अत्यंत श्रम केले, याबद्दल मी **श्री. वामनराव पुरोहित** व त्यांच्या **महाराष्ट्र–नाट्य–मंदिरांतील** सहकारी यांचें अंतःकरणपूर्वक आभार न मानल्यास कृतघ्नतेचा दोष माझ्या पदरीं येईल. मी सर्वांचा अत्यंत अत्यंत आभारी आहें.

सांगली
ता. २३।३।१९४० इ.

**गणेश गोविंद बोडस.**

॥ ॐ नमो भगवते वासुदेवाय ॥

# १

# पूर्वजांची थोडी हकीगत

माझे पूर्वज रत्नागिरी जिल्ह्यांत देवगड तालुक्यांत मौजे पडेल या गांवीं सुमारें दोनशें वर्षांपूर्वी वस्ती करायला आले असावे असें वंशवृक्षावरून व माझ्या पणजोबांनीं आपल्या वडिलांची मनीषा पूर्ण करण्याकरितां पडेल गांवीं एक श्रीशंकरेश्वराचें देऊळ बांधण्यासाठीं द्रव्य संपादन केलें; आणि तेथें देऊळ बांधून राहिलेल्या मालमसाल्यांतून घर बांधलें; या वरून कळतें. सुमारें २५ वर्षांपूर्वी देवळाच्या मालकीचा गांवांत तंटा उद्भवला असतां जे देवळासंबंधीं जुने कागदपत्र होते ते कोर्टांत पुरावा म्हणून हजर केले. त्या कागदपत्रांवरून देऊळ व आमचें घर बांधून १७५ वर्षांवर काळ होऊन गेला असावा. देऊळ बांधण्याचा निर्धार केलेले माझे निपणजोबा अनंत नारायण बोडस व पणजोबा चिंतो अनंत बोडस. त्यांचे मधले चिरंजीव विनायकपंत हे चिंतो अनंताचे सख्खे बंधु विठ्ठल अनंत यास, पुत्रसंतान नसल्यामुळें दत्तक दिलें व त्यांचे चिरंजीव गोविंद विनायक बोडस हे माझे वडील होत.

माझे वडील त्यांच्या लहानपणीं आपल्या आतेच्या घरीं सातारा जिल्ह्यांतील तासगांव येथें विद्याभ्यासासाठीं होते. त्यांच्या लहानपणीं पौराणिक नाटक कंपन्या चालू होऊन १५।२० वर्षें झालीं होतीं. त्यांपैकींच कवटेकर म्हणून एक पौराणिक नाटक कंपनी होती. त्या कंपनींत माझे वडील आपल्या आतेच्या घरून पळून गेले. त्या वेळीं टपालमार्गाचीं व वाहतुकीचीं साधनें हल्लींसारखीं नसल्यानें माझ्या आजोबांना ही गोष्ट फार उशीरानें कळली. वडिलांच्या आतेच्या घरचीं माणसेंहि हवालदील झालींच होतीं. परंतु आपला भाचा कोठें गेला हें त्यांस कळलें नाहीं.

कवठेकर कंपनींत तो आहे असा पुढें शोध लागला. माझी आजी त्याच सुमारास स्वर्गवासी झाल्यानंतर माझे आजोबा ( विनायकपंत ) व चुलत-आजोबा ( रामाजीपंत ) हे देशावर येऊन त्यांनीं शोध काढून वडिलांना त्यांची मातुश्री वारल्याचें कळवून कंपनींतून कोंकणांत नेलें. तासगांवास वडिलांचा प्राथमिक अभ्यास ५ इयत्तेपर्यंत झालेला होता. व्हॅक्सिनेशन खात्यांत त्या वेळीं माणसें अजीजी करून नोकरीस बोलावीत असत. वडिलांनीं उमेदवारी करून व्हॅक्सिनेटर होऊन जावळी, श्रीगोंदें वगैरे गांवीं नोकरी करून ते अहमदनर जिल्ह्यांतील शेवगांव येथें कायम झाले. तेथें गेल्यावर माझ्या वडिलांचें लग्न झालें. माझी आई कोंकणांत खारेपाटणास विजयदुर्गाहून जी खाडी जाते त्या खाडींतील मार्गावर तारळ म्हणून गांव आहे तेथील निळंभट दामले यांची मुलगी. माझ्या आईचे एक चुलते मोरभट दामले हे उत्तम पढीक भिक्षुक होते. ते देशावर येऊन इचलकरंजी येथें स्थायिक झाले. त्याचे वंशज येथें अजून नांदत आहेत. माझी आई तिच्या भावंडांत सर्वांत लहान. आईच्या वडील बहिणींचीं लग्नें होऊन एक विल्हे गांवीं रानडे यांच्या घरीं, दुसरी कोर्लें येथें परांजपे यांच्याकडे, अणसुऱ्यास एक व हुरशास एक अशा दिल्या होत्या. माझ्या आईची एक मावशी त्या वेळचे इंदूरचे राजे तुकोजीराव होळकर यांच्या पदरीं रावजी गोरे म्हणून एक गृहस्थ होते त्यांची भावजय होय. म्हणून त्याच्याकडे माझे मामा केशवराव व बाळकृष्णपंत हे विद्यार्जनासाटीं इंदुरास राहिले होते. माझे एक चुलत चुलते सदाशिव गणेश बोडस हेही मुंबईस जगदीश्वर छापखान्यांत नोकरीस होते. माझी एक आते देवाचें गोठणें येथें आपटे यांच्या येथें दिलेली होती.

## माझा जन्म

माझ्या प. पू. मातुश्रीचें माहेरचें नांव काशीबाई असून सासरचें सगुणा असें होतें. माझ्या आईबापांना माझे आधीं एक मुलगा सन १८७८ सालीं झाला व तो सहा महिन्यांचा होऊन वारला. सन १८८० सालीं ता. २ जुलै शुक्रवार रोजीं दुपारीं १ वाजून ५१।५२ मिनिटांनीं माझा जन्म झाला.

## निरयन जन्मलग्न कुंडली

शके १८०२ ज्येष्ठ वद्य १० रोज शुक्रवार.




## कोंवळया वयांतील संस्कार

सन १८८६।८७ सालच्या सुमारास माझ्या दुर्गामावशीचे दीर रा. सा. पांडुरंग धोंडदेव गाडगीळ हे येवलें येथें सबजज्ज होते. त्यांच्या येथें माझी मावशी मला आपल्याबरोबर घेऊन गेली. तेथें प्रथम मी पौराणिक नाटक पाहिलें. त्याच्या अगोदर शेवगांव मुक्कामीं सरकारी नोकर मंडळींनीं दर शिमग्यांत एक नाटक करण्याचा उपक्रम केला होता. त्याप्रमाणें लक्ष्मण आणि बाणासुर-वध वगैरे नाटकें झालीं. त्या नाटकांत माझे वडीलही कामें करीत. तीं नाटकें शेवगांवीं श्री. भाऊसाहेब देशपांडे याच्या वाड्याच्या चौकांत होत असत. त्यांपैकीं एका नाटकाचा कांहीं भाग वयाच्या पाचव्या वर्षी मी पाहिला अशी मला पुसट पुसट कल्पना आहे. येवलें येथें विक्रमशशिकला, नारायणराव पेशव्यांच्या वधाचा फार्स व रावण-वध हीं नाटकें पाहिलीं. त्या कपनीचे मालक परशरामपंत साठे नांवाचे गृहस्थ होते. त्या कंपनींत कामें करणाऱ्या कांहीं स्त्रियाही होत्या. कंपनीचें नांव " विबुध जन-चित्त-चालक-स्वातिवर्ष-पुणेकर-हिंदु-स्त्री-नाटक मंडळी " असें होतें.

१८८७ सालीं माझा व्रतबंध झाला. या वेळीं मी मराठी दुसऱ्या इयत्तेंत असेन. माझ्या पाठीवर दोन बहिणी अनुक्रमें मैना सन १८८३ सालीं व कृष्णी माझी मुंज झाल्यावर १८८७ सालीं झाली.

माझे वडील स्वभावानें अतिशय शांत होते. त्यांना राग क्वचितच येई. रागावल्यावर मात्र जमदग्नि. त्यांचा बांधा ठेंगणा, स्थूल, रंग काळासांवळा, डोळे मोठे व पाणीदार व डोक्यास टक्कल होतें. माझी

आई गोरीपान, नाकीडोळीं नीटस, स्वभावानें तापट, करारी व निरलस अशी होती. वडिलांच्या हातचा मार मी फारच थोडा खाल्ला असेल; परंतु आईच्या हातची शेवटची श्रीमुखांत सन १९१५ सालीं मी गंधर्व कंपनीचा एक भागीदार असतांना वयाच्या ३६ वर्षी खाल्ली ! यावरून आईच्या तापटपणाची कल्पना येईल. मला माझे आईबाप "बाबू" या नांवानें हांक मारीत असत. आईनें "बाबू" अशी हांक मारली कीं हांकेवरून आईचा राग व लोभ समजत असे. ती जशी तापट होती तशीच अतिशय मनाची हळवी होती. थोड्याशा कारणांनीं अश्रुपात करूं लागे. ती मोठी कर्तबगार होती. वयाच्या १२ वर्षांपासून ती देशावर माझ्या वडिलांबरोबर कोंकणांतून आली. त्यामुळें प्रापंचिक कामें तेवढ्या लहान वयापासून करण्याची संवय लागल्यामुळें स्वच्छता, टापटीप वगैरे गोष्टींवर तिचा मरेपर्यंत कटाक्ष असे. त्यामुळें तिच्या सुनांना (माझ्या दोन पत्नींना) भारीच त्रास झाला. आमच्या आईनें एकदां एक गोष्ट नाहीं म्हटली कीं नाहीं. या स्वभावाप्रमाणेंच तिच्या गुणांचेहि माझ्या आयुष्यक्रमावर परिणाम झाले.

माझी मुंज झाल्यावर शेवगांवाहून नगर जिल्ह्यांतील कर्जत या तालुक्याच्या गांवीं माझ्या वडिलांची बदली झाली. शेवगावहून आम्ही निघालो त्या वेळीं माझी लहान बहीण कृष्णाबाई सुमारें चार महिन्यांची होती. एक भाड्याची बैलगाडी करून आमचा प्रवास ऐन पावसाळ्यांत सुरूं झाला. पाऊस लागूं लागला म्हणजे झाडाखालीं गाडी उभी करावी; थांबला म्हणजे प्रवास सुरूं रहावा. अशा हालअपेष्टेंत आम्ही कर्जत येथें पोंचलों. तेथें वडिलांना तीनच महिने रहावें लागलें. कर्जतची हवा व पाणी अतिशय खराब. माझे वडील घरीं आलेल्या पाहुण्याची जेवण वगैरे सरबराई उत्तम करीत; परंतु इतर खंडणी कधींच देत नसत. त्यामुळें माझ्या वडिलांना इन्स्पेक्टर सर्व तऱ्हेचा त्रास देत असत. वडिलांना त्यामुळें प्रमोशन १४ वर्षांत मिळालें नव्हतें व तेही असे करारी कीं लाचारीनें प्रमोशन मिळवायचेंच नाहीं हा निश्चय त्यांनीं आमरण पाळला. त्या वेळीं गोस्तनदेवी काढणें खेड्यापाड्यांत इतकें भीतिप्रद वाटे कीं व्हॅक्सि-

नेटर गांवांत आला कीं लेकुरवाळ्या बाया तान्हीं मुलें घेऊन रानोमाळ पळून जात. ' त्यामुळें लांच घेऊन मूल आजारी म्हणून टोंचायचें नाहीं असें म्हणून पुष्कळ व्हॅक्सिनेटर पैसे मिळवीत असत. परंतु वडील मात्र त्याला अगदीं अपवाद होते. त्यांनीं एकहि पैसा कोणाकडून घेतला नाहीं आणि स्वभाव प्रेमळ असल्यामुळें इतर व्हॅक्सिनेटरपेक्षां लोकहि त्यांच्यावर विश्वास ठेवून त्यांनीं मागितल्याबरोबर मुलें आणित असत.

तीन महिन्यांनीं वडिलांची बदली कर्जतहून श्रीगोंदें येथें झाली. तेथें सुमार एक वर्ष सव्वा वर्ष वडील राहिले व त्यांच्या सुदैवानें पहिले इन्स्पेक्टर सेवानिवृत्त होऊन वडिलाबरोबर नोकरीस लागलेले एक दळवी नावाचे गृहस्थ इन्स्पेक्टर होऊन आले. ते श्रीगोंदें येथें आल्यावर उभयतांच्या स्नेहामुळें वडिलांनीं त्यांच्याजवळ गोष्ट काढिली, " तो महार ( पहिल्या इन्स्पेक्टरला वडील याच नांवाने संबोधित असत ) जाऊन आमच्या सुदैवानें तुम्ही आला आहांत. पहा. " परंतु त्यांनीं तें लक्षांत ठेवून वडिलांना प्रमोशन देऊन सांगोलें ( सोलापूर जिल्हा ) येथे बदली करविली व वडिलांना २४ रुपये पगार मिळू लागला. श्रीगोंद्याहून सन १८८९ सालीं आम्हीं सांगोल्यास आलों.

आम्ही सांगोल्यास व्यंकोबाच्या देवळजवळ एका घरात बिऱ्हाडानें राहिलो. त्या वेळीं घरांत दोन गाई व एक घोडें अशीं जनावरें असत. वडिलाना आठवड्यांतून तीन चार दिवस तालुक्यात फिरतीवर रहावे लागत असल्यामुळें घोडें बाळगावेंच लागे. घोड्याचा खर्च निम्मा अगावर पडे व निम्मा खेड्यांत गेल्यावर पाटीलकुलकर्णी भागवित असत. तशी त्या वेळीं प्रचलित वहिवाटहि होती. त्या वेळीं मी मराटी चौथ्या इयत्तेत होतों. आमची शाळा त्या वेळीं सांगोल्यास किल्ला आहे त्या किल्ल्याच्या एका बुरुजावर होती. आमच्या शाळेंत गोविंद गणेश रास्ते या नांवाचे हेडमास्तर होते. त्यांच्या हाताखालीं खंडेराव ठोंबरे, गोमेवाडीकर, पोतनीस वगैरे असिस्टंट होते. मराटी पांच व सहा या दोन इयत्ता हेडमास्तरच शिकवीत. आमचे रास्ते मास्तर उत्तमपैकीं शिक्षक परंतु भयंकर मारके असत. त्यांच्या मारानें शेवटीं मला पोटांत दुखण्याचें

ढोंग करावें लागलें. सुमारें पंधरा दिवस मी पोटांत दुखण्याचा अभिनय (माझ्या भावी व्यवसायाचें प्रसादचिन्ह!) उत्तम रीतीनें वठविला. पण माझ्या आईला शंका येऊन तिनें मला विचारलें, "नेमकें शाळेंत जातांनाच कसें तुझ्या पोटांत दुखतें?" माझा अभिनय चालूच होता. परंतु तिनें मला विश्वास उत्पन्न करून खरें कारण सांगावयास भाग पाडल्यानंतर 'पोटदुखी म्हणजे रास्ते मास्तरांच्या माराची धास्ती.' असें आईस सांगितलें. माझ्या वडिलांस मी एकुलता एक, विशेष बुद्धिवान (असें त्यांना वाटे) म्हणून व मी लहानपणीं फाटक्या अंगाचा होतों (आतां हें कोणास खरेंही वाटणार नाहीं) म्हणून मास्तरांना त्यांनीं प्रेमानें सूचना केली. 'बाबू अशक्त आहे, लहान आहे (त्या वेळीं मराठी सहाव्या इयत्तेंत माझ्या इतका लहान मुलगाच नव्हता. मला बारावें वर्ष होतें) त्याला तुमच्या माराची धास्ती बसली आहे वगैरे वगैरे! मास्तरांनीं आठ पंधरा दिवस माझ्याकडे पाहिलेंसुद्धां नाहीं. परंतु एका दृष्टीनें माझ्यावर त्यांचें विशेष प्रेम होतें. ते उत्तम रीतीनें शारीरिक मेहेनत करून घेत. नवनीतांतील पदें वगैरे भाविकपणानें म्हणायला शिकवीत. शारिरीक मेहेनत करणाऱ्या मुलांच्या घरोघर जाऊन त्यांच्या आईबापांना "मुलांना दूधदुभतें खायला घाला; त्यांची आबाळ करूं नका" असें सांगत. माझ्यावर तर त्यांचें फारच प्रेम होतें आणि गुप्त रीतीनें त्यांनीं माझ्या वडिलांजवळ मला जांवई करून घेण्याची इच्छा प्रकट केली! दोघांनीं जवळ जवळ नक्कीहि केलें होतें. मी जर चौदा पंधरा वर्षांच्या वयाला नाट्याच्या व्यवसायांत पडलों नसतों तर तो प्रसंग घडूनहि आला असता.

## नाट्याची आवड

सांगोलें मुक्कामीं असतांना तेथें एक पौराणिक नाटकें करणारी कोल्हापूरकर नाटक मंडळी आली होती. त्या कंपनींत आमच्या वडिलांच्या पूर्वाश्रमांतले-जुन्या नाटक कंपनीपैकीं-एक परिचित गृहस्थ होते. त्यांच्या ओळखीनें मी पुष्कळ नाटकें पाहिलीं व नंतर ती कंपनी गेल्यावर सांगोल्यास त्या कंपनीचें नाट्यदर्शन दाखविण्यास आम्हीं सुरवात केली. त्या वेळीं

माझा घेरा व शेंडी लांब असल्यामुळें शेंडीच्या दोन बटा करून दोन्ही बाजूंनीं दोन बटा नाकाच्या व ओंठाच्या मधल्या पोंकळींत विरुद्ध दिशेनें आणून एक सुरगांठ मारून राक्षसाच्या मिशा करायच्या, राळेच्या ऐवजीं किडलेल्या लांकडाच्या भुशाची खंडणी गोळा करून देवालयांतील नंदा-दीपाच्या दिव्यांतील तेलांत एक कांकडा भिजवून, तो पेटवून त्या काक-ड्यावर तो भुसा फेंकला कीं राळ उडाल्याचा भास व्हायचा. एक दिवस त्या काकड्यानें अंगांतले कपडे पेटलेच होते; परंतु दैवाची खैर कीं पचनामा वांचला !

मी लहानपणीं हाडकुळा होतों. आमच्या घरांत नेहमीं गाईचें दुभतें असे, त्यामुळें मी अंगानें भरावें म्हणून धारोष्ण मला रोज देण्यांत येत असे. शाळेंत मल्लखांब वगैरे कसरत करायची, दंड बैटका काढायच्या व धारोष्णाचा खुराक घ्यायचा. वडिलांची इच्छा मी धष्टपुष्ट व्हावें ही होती, परंतु त्यांना मात्र मी धष्टपुष्ट दिसत नसे. त्यांच्या मृत्यूनंतर वयाच्या सोळाव्या वर्षापासून माझ्या शरीराला जी गोलाई आली ती आज नितीपर्यंत कायम आहे.

## पितृसुखाची समाप्ति

सन १८९१ सालच्या आक्टोबर महिन्याच्या अखेर वडिलांनीं रजेचा अर्ज केला. तीन महिन्यांची हक्काची रजा मिळून आम्हा सर्व मुलाबाळांना घेऊन बैलगाडीच्या रस्त्यानें वडील सांगोलें, पंढरपूर, मिरज रस्त्यानें जायगवाणवरून तासगांवास आपल्या आतेच्या घरीं आले. कोंक-णांत माझे आजोबा विनायकपंत हे बरेच वृद्ध झाले होते. वृद्धापकाळीं वडिलांना जवळ आणून ठेवावें या विचारानें त्यांना आणायला वडील पायरस्त्यानें घोड्यावरून कोंकणांत गेले. आम्ही तासगावीं राहिलों. माझी सर्वांत वडील मावशी जुन्या सांगलींत खाडिलकरांच्या वाड्यांत होती. तिचे यजमान वारल्याची बातमी तासगांवीं आम्हांस कळली. आम्हा मुलांना घेऊन बैलगाडीनें आई सांगलीस आली. तेथें आम्ही महिना दीड महिना होतों.

इतक्या अवधींत वडीलही आजोबांना घेऊन सांगलीस आले. वडिलांची रजा संपली नव्हती तरीही तेथून आम्ही पायरस्त्यानेंच सांगोल्यास परत आलों. कारण वडिलांची प्रकृति या दीड महिन्यांत अतिशयच खालावली होती; तेव्हां सांगोल्यास जाऊन महिना दीड महिना औषध-पाणी करून विश्रांती घ्यावी आणि मग नोकरीवर रुजू व्हावें हा त्यांचा हेतु. परंतु दिवसेंदिवस प्रकृति खंगत जाऊन ता. १० एप्रिल सन १८९२ सालीं वडील जलोदराच्या विकारानें स्वर्गवासी झाले !!

वडील वारल्याच्या दुःखात माझी आई त्याच दिवशीं रूढीप्रमाणें सोंवळी झाली. आईचें तें विद्रूप पाहून मला घरीं आल्यावर घेरीच आली. आमच्यावर प्रसंग गुदरलेला पाहून दुर्गामावशी धांवतच आली. माझ्या आजोबाचें वय या वेळीं सुमारें ८३ वर्षांचें होतें. त्यांनाही वृद्धाप-काळीं पुत्रशोक असह्य झाला. कोणी समाचाराला आले कीं त्यांना कोंकणी भाषेंत म्हणत " आलों काय नी झालें काय ? "

## आजोबांचें कोंकणांत प्रयाण

वडिलांचें और्ध्वदेहिक संपल्यावर माझ्या आतेचा नवरा कोंकणातून आला होता, त्याच्याबरोबर आजोबांनीं कोंकणांत जाण्याचें ठरविलें. ते आईला म्हणाले "सगुणा, कोंकणांत चल. मीटभात मिळेल त्याच्यावर निर्वाह करूं." आईला माझ्याबद्दल मोठी आशा वाटे. 'माझा मुलगा हुषार आहे. शिकून विद्वान होईल आणि पांग फेडील.' या हिंमतीवर तिनें आजोबांना सांगितलें, "मुलाला घेऊन कोंकणांत गेल्यावर त्याचें शिक्षण कसें होईल ?" आजोबा म्हणाले, " तूं काय करायचें आणि कुठें जायचें ठरविलें आहेस ? " आईनें मग आपले पुढील बेत सांगितले. "माझी बहीण आली आहे तिच्याबरोबर पुण्यास जाणार, तिचे दीर मुन्सफ आहेत त्याचीही थोडीशी सावली मिळेल, मुलगा वारानें जेवील. पुण्यांत काहीं तरी सोय होईल. कोंकणांत काय होणार ? त्याचें शिक्षण व्हावें ही एक गोष्ट माझ्या डोळ्यासमोर आहे." माझ्या मावशीनेंही आजोबाना आश्वासन देऊन खातरजमा केली. तेव्हां ते कोंकणांत निघून गेले. आपल्या वंशाचा एकच एक अंकुर दृष्टीआड करून जातांना त्यांच्या मनाला अतिशय कष्ट झाले. डोळ्यांतून घळघळ अश्रु वहात होते.

## आईची ध्येयनिष्ठा

नंतर मातुश्रीनीं दुभती गाय दान केली. घोडें २५।३० रुपयांस विकलें. घरांतलीं भांडींकुंडीं विकून वाणी वगैरेंचें देणें देण्याच्या तयारींत होती. त्याची गुणगुण वाण्यास कळली. वाणी फार सज्जन होता. तो म्हणाला "बाई, माझे पैसे देण्याची तुमची तीव्र इच्छा आहे हें मी जाणतों. तुमची दानत मी ओळखतों. मातीमोलानें भांडींकुंडीं विकूं नका. साव-काश पुढें मागें पैसे पाठवा." तरी सामानसुमान न्यायला, भाड्यालासुद्धां पैसे नव्हते. वडिलांचा साडेतीन महिन्यांचा पगार सरकारांत येणें होता. सबब कांहीं मोठालीं भांडीं, पेट्या वगैरे विकून भाड्यापुरते पैसे तयार केले. वाण्याच्या आग्रहावरून पगाराच्या येणाऱ्या पैशातून त्याच्या पैशाची फेड करायची असें ठरवून सांगोल्यास रामराम ठोकला व रास्ते मास्तराच्या समवेत १८९२ च्या मे महिन्यात आम्ही पुण्यास आलों.

## पुण्यास प्रस्थान

आम्ही पुण्यास रात्रीं येऊन पोंचलों. माझ्या मावशीचे दीर गाडगीळ मुनसफ हे श्री. ग. स. मराठ्यांचे साडू. गाडगीळ मे महिन्याच्या सुट्टींत पुण्यास त्याच्याच घरीं आले होते. तेथेंच आम्ही जाऊन उतरलों. दुसरे दिवशीं सकाळीं पुणे शहराचा भव्यपणा पाहून आनंद वाटला. कारण मी लहानपणापासून तालुक्याच्या गांवीं होतों व तालु-क्याचा गाव म्हणजे खेडेगांवाची सुधारलेली मोठी आवृत्ति. दुसरे दिवसापासून गांवांत भटकून छापखानाच पहा; बुधवार चौकांत लोकांची गर्दीच पहा असा कार्यक्रम सुरू होता. मे महिन्याची सुट्टी संपल्यावर गाडगीळांकडून कांहीं मदत मिळण्याची सोय झाली. सांगोलें मुक्कामीं वडील वारले त्या वेळीं तेथें रा. सा. गोविंद वासुदेव कानीटकर हे सबजज्ज होते, त्यांच्या येथें माझा व मातुश्रींचा जाण्याचा परिपाठ होता. त्यांच्या पत्नी श्री. सौ. काशीताई कानीटकर या फारच प्रेमळ. आमच्यावर प्रसंग गुदरला तेव्हां त्यांनीं आईला धीर देऊन पुण्यास आल्यावर भेटण्यास सांगितलें होतें. त्याप्रमाणें त्यांच्याकडे जाऊन त्यांना भेटलों. नूतन मराठी विद्यालयाचे त्या वेळचे लाईफ मेंबर दामुअण्णा

कुलकर्णी यांस त्यांनीं पत्र दिलें. त्यांनीं त्या पत्राला मान देऊन नादार विद्यार्थी म्हणून नूतन मराठींत प्रायमरच्या वर्गात माझा समावेश केला. वडिलांचा सरकारांतील पगारही मिळाला. देणें भागविलें. कांहीं रुपये राहिले होते त्यांतून निर्वाह चालला होता. गाडगीळ यांच्याकडून कधीं पांच, कधीं चार, कधीं सहा असे रुपये दर महिना मिळत. मराठे यांच्या वाड्यांत आठ आणे भाड्यानें खोली घेतली. शाळेचा कार्यक्रम सुरू झाला. वारानें जेवण्याचाही कार्यक्रम चालू झाला. प्रथम अवघड वाटलें. परंतु प्रसंगाकडे नजर देऊन तें अंगवळणीं पाडावेंच लागलें.

त्या वाड्यांत एक गृहस्थ बिऱ्हाडानें रहात होते. त्यांच्याकडे संगीत कंपन्यांचीं हंगामी माणसें जमत असत व किर्लोस्करांचीं, डोंगऱ्यांचीं वगैरे संगीत पदें म्हणत. "मोरोबा असें काम करतो" "भावड्या असा गातो," "बाळकोबा फार मजा करतो" वगैरे गप्पा चालत. त्या गप्पा ऐकायला मी नेहमीं हजर राहीं. त्यामुळें संगीत नाटक ही काय गंमत आहे ती पहाण्याची उत्कंठा वाढत गेली. मी फक्त पौराणिक नाटकें आणि तींही वाड्याच्या चौकांत पाहिलेलीं. तेव्हां थेटर बोर्ड (हा त्या वेळचा शब्द) म्हणजे काय? संगीत नाटक म्हणजे काय? हा माझ्या मनात एकच गोंधळ माजून राहिला होता.

१८९२ च्या आक्टोबरमध्यें प्रायमरची परीक्षा होऊन मी इंग्रजी पहिल्या इयत्तेंत गेलों. त्या वर्गावर कै० प्रो. घाटे यांचे वडील हे मास्तर होते. ते कीर्तनही करीत असत. त्या वर्गात गेल्यावर कै. श्री. अण्णासाहेब गोळे यांचा नातू—हरि केशव गोळे—याचा व माझा स्नेह झाला. माझ्या गरीब स्थितीची जाणीव ठेवून आपल्या आजोबाना विचारून त्यानें मला आपल्या घरीं कायम रहावयास बोलावलें. तेथें आतांचे रिटायर्ड सिव्हिल सर्जन रा. ब. व्ही. बी. गोखले हेही आपल्या आतेकडे म्हणजे अण्णासाहेब गोळे यांच्या कुटुंबाकडे अभ्यासास राहिले होते.

मला क्रिकेटची आवड याच वेळीं उत्पन्न झाली. १८९२ सालीं इंग्लंडहून लॉर्ड हॉकची क्रिकेट टीम आली होती; तिची व पुणें जिमखान्याची मॅच पाहिली. हेंच क्रिकेटचें पहिलें दर्शन. नंतर गोळे यांच्या

ओसरीवर आमचा क्रिकेटचा खेळ सुरू झाला. शाळेंत असतांना पुण्यास एक यंग मेन्स क्रिकेट क्लब ( याचेंच आतां डेक्कन जिमखान्यांत रूपांतर झालें आहे ) होता. त्याची प्रॅक्टिसची जागा कबुतरखान्यांत असे. तेथें प्रॅक्टिस पहाण्यास मी जात असें. सीझनमध्यें दर रविवारीं ज्या ठिकाणीं त्यांची मॅच असेल तेथपर्यंत ऊन पाऊस किंवा अंतर यांची पर्वा न करतां मी जात असें. माझा मराठी सहा इयत्तेचा अभ्यास पुरा झाल्यामुळें मला फक्त इंग्रजी अभ्यासच करावा लागत असे. त्यामुळें खेळायला मुबलक वेळ मिळे. पहिली इयत्ता पास होऊन इंग्रजी दुसऱ्या इयत्तेंत कै. कृष्णाजी बल्लाळ डोंगरे यांच्या वर्गांत गेलों. सुप्रसिद्ध नकलाकार गोपाळराव भोंडे हे सी तुकडींत व मी ए तुकडींत होतों. दोन्ही वर्ग शेजारीं शेजारीं असल्यामुळें त्यांच्याशींही दृढ परिचय झाला. त्या वेळीं त्यांनीं नकला करण्यास आरंभ केला होता. शाळेंतील बहुतेक मास्तरांच्या ते नकला वरचेवर करीत असत. १८९३ सालीं पुण्यास मोठ्या प्रमाणावर गणपती उत्सव सुरू झाला. १८९४ सालच्या पावसाळयांत माझ्या आयुष्याला निराळें वळण लागण्याचा प्रसंग घडून आला.



# २

## हव्यास

त्या वेळीं मोजणीदारांचें ऑफिस कांहीं वर्षें दर पावसाळ्यांत पुण्यास असे. सर्व मोजणीदार पुण्यास असत. त्या मोजणीदार मंडळींनीं दर वर्षी पावसाळ्यांत एक नाटक बसवून तें रंगभूमीवर करावें, काय पैसे मिळतील त्याची एक टोलेजंग मेजवानी करावी, नंतर पावसाळा संपतांच फिरतीवर जावें असा क्रम असे. त्या मोजणीदार मंडळींत माझ्या मावसबहिणीचे दीर सदाशिव लक्ष्मण मराठे म्हणून होते. त्यांचा आवाज चांगला असून शोकाखातर गाण्याचा अभ्यास त्यांनीं ठेविला होता. ते देखणेही होते. एक दिवस आपल्या क्लबमध्यें मला त्यांनीं नेलें. स्त्रीपात्राच्या दृष्टीनें मी योग्य आहे असें तेथील मंडळींना वाटलें. एका नाटकांत काम करतोस का ? असें त्यांनीं मला विचारलें. काम करायची हौस होती. पण मी नादार विद्यार्थी, वारानें जेवणारा, असें असतां मी जर नाटकांत काम केलें तर वार देणारे मला जेवायला येऊं नकोस असें म्हणतील, शाळेंतील नादारी जाऊन फी द्यावी लागेल वगैरे विचार येऊं लागले व ते विचार तेथील मंडळीस मी बोलूनही दाखविले. त्या वेळीं या क्लबांत मोजणीदारांशिवाय जे स्थानिक सुखवस्तु शिष्ट होते त्यांनीं मला खालीलप्रमाणें आश्वासनें दिलीं.

**मी**–मी फ्री विद्यार्थी आहें. मला शाळेंतून काढून टाकतील.

**शिष्ट**–शाळेचे सुपरिंटेंडंट दामुअण्णा आहेत. त्यांना आम्ही सांगूं. शिवाय आम्ही धंदेवाईक नाटकवाले नव्हेत. कॉलेजमध्येंसुद्धां नाटकें होतात.

**मी**–मला वार देणारे सद्गृहस्थ मला जेवायला घालणार नाहींत.

**शिष्ट**–आम्ही तुझ्या जेवणाची, फीची सोय करूं. तुला कॉलेज-पर्यंत मदत करूं. मग काय हरकत आहे ?

त्या दिवशीं मी पावसांतून बारा आण्याची मेणकापडी छत्री घेऊन गेलों होतों, ती घरीं ठेवायला सांगून त्यांनीं मला लगेच हरण छापाची लोखंडी काड्यांची छत्री घेऊन दिली.

ही गोष्ट घडली त्याच्या अगोदर आमच्याजवळची पुंजी संपल्यामुळें माझ्या आईला लोकाच्या येथें स्वयंपाकाची नोकरी करणें भाग पडलें. माझी पाठची बहीण मैना इचें १८९३ सालीं लग्न झालें. आम्ही गरीब, खटपटीला कोणी नाहीं, बायका बायकांची माहिती; त्यामुळें तिला अगदीं सामान्य स्थितीचें स्थळ मिळालें होतें. तिचा नवरा आनंदाश्रम छापखान्यांत कंपाझिटर होता. आतां आईवर फक्त धाकटी बहीण कृष्णाबाई इचाच भार राहिला. मुलीला जेवायला घातलें पाहिजे या अटीवर तिनें नोकरी पत्करली. ज्या दिवशीं नोकरीवर आई प्रथम गेली त्या दिवशीं आम्हां मुलांना पोटाशीं धरून आई आल्या प्रसंगाबद्दल रात्रभर रडत होती. परंतु आईची कर्तव्यनिष्ठा प्रखर, त्यामुळें तिनें मन घट्ट करून नोकरी करण्यास आरंभ केला. शाळेंत जावें, अभ्यास करावा, क्रिकेट खेळावा असा माझा कार्यक्रम चालला होता.

वर लिहिल्याप्रमाणें सत्यपक्षीय नाटक क्लबांत मी रोज सायंकाळीं शाळा सुटल्यावर जाऊं लागलों. त्या वेळीं क्लबानें पूर्वी केलेल्या "सवाई माधवराव राज्यारोहण" व "चंपा" या नाटकांच्या तालमी सुरू असत. मंडळी बहुतेक कोंकणीच असल्यामुळें अस्सल कोंकणी मंडळींचे पुष्कळसे कोंकणी अनुनासिक उच्चार येत असत. मला ती गंमत वाटे. "माधव राज्यारोहण" नाटक गद्य होतें. फक्त त्यात करमणुकीसाठीं नटी-सूत्रधाराचा प्रवेश घातला होता. ज्यांनीं मला क्लबमध्यें नेलें ते सदाशिवराव मराठे सूत्रधार व मी नटी. नटीला दोन पदें होतीं. साध्या तालमींत माझ्याकडून भाषणें, पदें, म्हणून बसवून घेतलीं; तोंपर्यंत मला कांहीं वाटलें नाहीं. परंतु ज्या दिवशीं क्लबच्या जागेंत माझ्याच प्रवेशापुरती रंगी तालमीची तयारी केली होती त्याच दिवशीं टोप घालतांना अगोदर तक्रार झाली. नंतर, लुगडें नेसवायला लागल्याबरोबर माझें मन बिथरलें. मी लुगडें नेसणार नाहीं. मी काम करीत नाहीं म्हणून अडून बसलों. लुगडें

नेसायचें म्हणजे? पुरुष असून लुगडें कसें नेसूं? परंतु भवितव्यता हंसत असली पाहिजे. माझी समजूत करून त्यांनीं कसें तरी मला लुगडें गुंडाळलें; कशीबशी तालीम झाली. नाटकाच्या वेळीं मी असा बिथरून जाऊं नये म्हणून सर्व मंडळींनीं माझी तारीफ करायला सुरवात केली. कोणी म्हणावें "हा बाबू फार बहार करणार," कोणी म्हणावें "हा किर्लो-स्करांच्या भावड्याच्या नजरेस पडला तर आम्हांस पचायचा नाहीं." पदांत सहज एकादा नैसर्गिक खटका आला तरी सर्वांनीं एकदम वाहवा करावी. तात्पर्य काय कीं नाटकाच्या वेळेपर्यंत मीं स्थिर रहावें म्हणून सर्व उपाय सुरू झाले.

आगष्ट महिन्याच्या सुमारास त्या नाटकाचा प्रयोग झाला. आमच्या वर्गावरचे डोंगरे मास्तर नाटकें, गाणीं वगैरेंचे अत्यंत शोकी होते. तेही नाटकाला आले होते. दुसऱ्या दिवशीं जेव्हां वर्गात त्यांनीं मला खरपूस समज दिली त्या वेळीं मला जें झालें तें सांगतां येत नाहीं. वर्गातीलही कांहीं मुलांनीं "ऐ: हे: नटी" म्हणून हिणवायला सुरवात केली. ही वार्ता मातुश्रींच्याही कानावर गेली. ही बातमी तिच्यापासून मी गुप्तच ठेविली होती. मातुश्रींनीं विचारल्यावर गंभीरपणें तिची समजूत केली. "ते लोक चांगले आहेत. मला शिक्षणाला मदत करणार आहेत आणि त्या आश्वासनामुळेंच मी काम केलें. यांत कमीपणा कांहींच नाहीं. कॉलेज-मधूनसुद्धां विद्यार्थी नाटकें करितात. मग मी एखाद्या नाटकांत काम केलें म्हणून काय झालें?" माझ्या या प्रवचनानें आईचे समाधान झालें नाहींच. ती सारखी "बघ बाबा, आपण गरीब. आपल्याला कशाला हवेत हे ढंग? आपला अभ्यास बरा कीं आपण बरें, असेंच पाहिजे." वगैरे कुरकुरत तिनेंही ही गोष्ट तितक्यावरच सोडली. पेटीच्या सुरावर पदें म्हणायची सुरवात त्या नाटकापासूनच झाली. पुण्यास गणपतीचे मेळे त्या वर्षी जोरांत सुरू झाले. मेळ्यांतील पदें मीही म्हणूं लागलों. वयाच्या मानानें बाल आवाज आणि तोही सहज सुरेल होता. त्यांत एखादा खटका अगर मुरकी सहज येई. आवाज खडा व गोड असल्यामुळें "गरीब मुलगा" म्हणून कोणीही बोलवावें, पदें म्हणून घ्यावीं, तारीफ

करावी. " मुलगा नाटकांत जाईल तर नांव काढील. " बाल मनावर नाटकाचे हे संस्कार घडूं लागले. इंग्रजी दुसरी इयत्ता संपायच्या अगोदर सत्यपक्षीय क्लबानें ना. बा. कानीटकरांचें " तरुणी शिक्षण " बसविण्यास सुरवात केली. त्यांत मला चिमणीचें काम दिलें होतें. त्या नाटकाची रंगी तालीम आनंदोद्भव थिएटरांत झाली. इतक्यांत मोजणीदारांनीं आपल्या कामावर रुजू होण्याची वेळ आली. त्यामुळें त्या नाटकाचा प्रयोग झाला नाहीं.

इंग्रजी दुसऱ्या इयत्तेची परीक्षा मी उत्तम मार्क मिळवून पास झालों. नंतर वर्गाची बदली होईपर्यंत एका महिन्याच्या काळांत विद्यार्थ्यांना कांहीं काम नसतें. या काळांत सदाशिव पेठेंत कांहीं शाळेंतल्या विद्यार्थ्यांनीं "पेशवे नगरवासी" म्हणून "शाहू नगरवासीस" तोडीस तोड देण्यासाठीं एक नाटक मंडळी काढण्याचें ठरविलें. "नाटक्याचे तारे" या पुस्तकाचे कर्ते कै. काशिनाथ नारायण पटवर्धन यानीं "हंबीरराव" नांवाचें स्वकृत नाटक करण्यास दिलें. सदर नाटक म्हणजे शंकर मोरो रानडेकृत "दौलतराव" नाटकच. फक्त पात्रांचीं नांवें बदललेलीं. या नाटकाशिवाय "दुर्गा" व "बाजीराव मस्तानी" या नाटकांच्याही तालमी सुरूं झाल्या. सर्व नटवर्ग विद्यार्थीदर्शेतला होता. कोणी सुखवस्तु आईबापाचे चिरंजीव, कोणी वार लावून जेवणारे, कोणी माधुकरी मागून शाळेस जाणारे असेच होते. खजिन्याच्या विहिरीजवळ गांवाच्या अगदीं एका टोंकाला हगवणे यांची माडी होती, त्या अप्रसिद्ध जागेंत रात्रौ मंडळी जमूं लागली. नाटकाच्या नादानें नवीनच भारला गेलेला मी सहजच तिकडे आकर्षिला गेलों. सोबत्याकडे अभ्यासास जातों असें आईला सांगून व पांघरायला पासोडीही घेऊन क्लबांत जाऊं लागलों. सुमारें पंधरा दिवसाअंतीं बारीक तपासानें आईला सगळें कळलें. शाळेंतले अभ्यास अजून चालू नाहींत, तेव्हां कांहीं मुलें नाटकाच्या तालमी करतात तिकडे बाबू जातो असा तिला सुगावा लागला. तिनें माझ्यावर पाळत ठेवली. सदाशिवपंत मराठे यांना आई लागण्यासारखी बोलली, "तुमच्या क्लबमध्यें बाबूला घेऊन नाटकाचा नाद त्याला लावलात, माझें नुकसान केलेंत."

आमच्या भावी नाटकाची एक दिवस रात्रौ रंगी तालीम चालू असतां मी "बाजीराव मस्तानी" नाटकांत समशेरबहाद्दरचें सोंग घेतलें होतें. माझाच प्रवेश चालू होता. इतक्यांत माडीखालीं एकदम "बाबू, काय चाललें आहे?" असे दरडावणीचे शद्ब कानीं आले. मी आवाज ओळखला. मी रंगलेला असतांच मला मंडळींनीं माडीपाठीमागें असलेल्या क्षेत्रांत पळविलें. अखेर तशा स्थितींतच पकडला गेलों. घरीं नेण्यांत आलें. सर्वांनीं अत्यंत निर्भर्त्सना केली व हा असाच भटक्या होणार असा सर्वांचा समज होऊन आमच्या दुर्गामावशीबरोबर कोंकणात माझी रवानगी करण्यांत आली.

* * *

कोंकणांत जातांना क्लबमधल्या मंडळींनीं पत्ते लिहून मला कार्डें दिलीं होतीं व पत्रव्यवहार करण्यास सुचविलें होतें. दुर्गामावशी मला घेऊन कोंकणांत गेल्या. राजापूर तालुक्यांतील अणसुरें गांवीं मावशीची इस्टेट होती. अणसुऱ्याशेजारचें हर्शी हें माझ्या दुसऱ्या मावशीचें गाव. मी मधून मधून तिकडे जाई. तसेच माझ्या आतेच्या गांवीं कोलें येथें दुसऱ्या मावशीकडे, आजोळीं म्हणजे तारळला, नंतर माझ्या पडेल गावीं असा मी मनमुराद प्रवास केला.

१८९५ च्या फेब्रुआरींत आई आणि मावशी यांनीं मला ठाणें येथें माधवराव दामले यांच्याकडे ठेवायचें असें ठरविलें. पुण्यास पाठविल्यास मी पुन्हां नाटकाच्या फंदांत पडेन ही त्यांना भीति होती. अणसुऱ्याहून माझी रवानगी झाली. पडावानें रात्रौ विजयदुर्गास आलों. बंदरावरच मावशींचे आप्त दुकानदार होते त्यांना सकाळींच गांठलें. खोटें रडूं आणून त्यांस सांगितलें कीं मावशीनें भाड्याकरितां दिलेले पैसे पडा-वांत पडले. माझें सांगणें खरें वाटून त्या भल्या माणसानें मला बोटीच्या भाड्याकरितां ठाण्यास पोंचतां येईल इतके पैसे दिले. पुण्यापर्यंत पोंचण्याची सोय अशा रीतीनें जमवितांच मी ठाण्यास न उतरतां एकदम पुण्यांत पाय ठेवून आईसमोर उभा राहिलों. आई आश्चर्यचकित झाली! "तूं इथं कसा आलास?" या आईच्या प्रश्नाला "आई, मला

आतां पश्चात्ताप झाला आहे. यापुढें मी नाटकाचा नाद सोडला. " असें उत्तर गयावया करून दिलें. तिची खातरी होण्याजोगें सर्व केलें. तिनेंहि म्हटलें " बरें आहे; चांगला अभ्यास कर म्हणजे झालें. "

पुढें आईला विचारून नूतन मराठींतून नांव काढून भावे स्कूलमध्यें दाखल केलें. तेथें कसबा पेठेंतील काहीं मंडळी स्नेही बनली. नाटकांत जाऊन भटक्या झाला असा माझा बोभाटा झाल्यानें कोठें तरी जेवावें, भावे स्कूलमध्यें जावें असा क्रम सुरू झाला. कसबा पेठेंतही एक नाटकाचा क्लब निर्माण झाला. कसब्याच्या गणपतीच्या माडीवर आमच्या बैठकी भरूं लागल्या. याच वेळीं आईलाही कोंकणांत जावें लागलें. जाताना तिनें पुनः पुनः बजाविलें. एक महिन्याची डाळ तांदूळ वगैरे सामुग्री ठेवून दिली. वार नसेल त्या दिवशीं भात घरांत करून खायचा. मला भात करतां येत असे.

ज्या वाड्यांत आम्ही रहात होतों तेथें आमच्या शेजारीं एक बिऱ्हाड होतें. त्या बिऱ्हाडांत एक सुस्वभावी अशी सासुरवाशीण मुलगी होती. तिचें वय अकरा बारा वर्षांचें असेल. आम्ही वयानें सारखीं, शेजारपणामुळें दाट ओळख झालेली, त्यामुळें आम्ही खेळीमेळीनें अगदीं बहीण–भावंडांसारखीं वागत असूं. मी स्वयंपाक करीत असतांना तिनें दरवाजांत येऊन डोकावून विचारावें " बाबू, काय चाललें आहे रे ? " माझ्या स्वयंपाकाची तिनें थट्टा करावी. मीही तिची थट्टा करावी. असें चाललें होतें. एखाद्या वेळीं घरांत तिची सासू तिला रागें भरली म्हणजे मी तिची समजूत करीत असें. असें चालू असतां एके दिवशीं मी बाजरीची भाकरी करित होतों. पुष्कळ प्रयत्न केला पण ती मला करितां येईना. त्या शेजाऱ्या मुलीनें तें पाहिलें आणि तिनें मला दोन भाकरी करून दिल्या. माझें जेवण झालें. ती मुलगीहि मोकळीच होती. आम्ही सोप्यांत बोलत बसलों होतों. इतक्यांत तेथें त्या मुलीचा सासरा एकदम कडाडत आला व त्यानें तिच्या पाठींत एक रट्टा लगावला आणि माझ्याकडे वळून म्हणाला " काय रे हलकटा, पोरी‌बरोबर काय म्हणून बोलत होतास ? चांगलें तुझें लक्षण आहे. तुरंगांत

जाशील. गरीबाचें कारटें पण ढंग पहा हरामखोराचे." त्या म्हाताऱ्याची एकसारखी सरबत्ती ऐकून मी दिङ्मूढच झालों. माझ्या डोळयांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. त्या म्हाताऱ्याचे आणखी कांहीं अपशब्द ऐकायला नकोत म्हणून मी तावातावानें बिऱ्हाडाला कुलूप ठोकून तसाच एकदम बाहेर पडलों. आतां निष्कारण शरमिंधें झालेलें हें तोंड त्या भागांत कोणालाही दाखवावयाचें नाहीं असें ठरवून कसब्यांत गेलों.

त्या सुमारास कसबा येथील क्लबच्या मित्रमंडळीनीं 'विक्रमशशिकला' नाटक चाकण येथील रामनवमीचे उत्सवांत करावयाचें ठरविलें होतें. त्या नाटकांत मला शशिकलेची भूमिका मिळाली होती.

## नाटकाची नांदी.

पुण्याजवळचे चाकण गांवीं रामनवमीचा उत्सव होतो. त्या उत्सवांत नाटक करून दाखविण्याचें आमच्या कसबा पेठेंतील क्लबानें ठरविलें. विक्रमशशिकला हें पाटणकरांचें नाटक करायचें होतें. त्याच्या तालमीसाठीं जागा अगदीं गुप्त अशीच पाहिजे होती. म्हणून रविवार पेठेंत एका तिमजल्यावर (खपरेल वजा) जागा घेऊन तालमी सुरू झाल्या. राजा विक्रमाचें काम करणाऱ्यानें मेळयाकरितां आपल्या खर्चानें पोषाख केला होता, तोच त्यानें विक्रमाचें काम करतांना वापरायचा; इंद्राच्या पोशाखाकरितां व चित्ररथाच्या पोषाखाकरितां अशीच वर्गणीची योजना केली. स्त्रीपात्रासाठीं कोणी आपल्या बायकोची पैठणी, कोणी उंची लुगडें, कुणी चोळया, असें आणावें असें ठरलें. स्त्रीपात्राकरितां टोप, दागिने, पुण्यास भाड्यानें मिळत असत ते आणायचे. राहता राहिला पेटी तबला. त्याची योजना अशी केली. एक शाई उडालेला तबला, तसाच पेनशनींत आलेला डग्गाही पैदा केला. तबल्याचा व डग्याचा आवाज साधारण बदसुरी आला तरी चालवून घेण्याइतकी संयमशक्ति सर्वांच्या अंगीं होतीच. कारण सुरेलपणा म्हणजे पेटीच्या सुरावर पदें म्हणणें इतका सुरेलपणाचा अर्थ सर्वांच्या अंगीं बाणलेला होता.

याप्रमाणें सर्व तयारी झाली. चैत्र शुद्ध ७ मीला रात्रौ एक बैलगाडी करून कसबा पेठेंतून मंडळी गुप्तपणें मार्गस्थ होण्याच्या वेळीं

मोठ्या हिकमतीनें सदाशिव पेठेंतील एका न्हाव्याची पेटी घेऊन त्याला पेटीवाला बनविला व गुपचुप त्याच्याच डोक्यावर देऊन त्याला बाहेर काढला. पुढें गाडी उभी आहे, असें म्हणत म्हणत चाकणच्या रस्त्यानें दोन मैलपर्यंत त्याला रखडत नेला. त्याला भाड्यापैकीं आगाऊ एक रुपाया दिला असल्यामुळें तोहि कुरकुरत " किती लांब आहे गाडी? कुठें आहे गाडी?" असें म्हणत रस्ता कापीत होता. बरोबर इसम होता त्यानें मधून मधून त्रासल्यासारखें करून " काय गाढव लोक आहेत, झपाट्यानें गाडी पुढें कशी काढली?" वगैरे आविर्भाव करीत, पहाटे चाकण गांठलें. न्हावीदादा चाकणपर्यंत डोक्यावर बाजाच्या पेटीचें ओझें घेऊन चालत आल्यामुळें दमलेले होते. चरफडत, शिव्या पुटपुटत चाकणला येऊन देवळासमोरच्या ओढ्यावर तणावा देऊन त्यांनीं झोपेची आराधना केली. चाकणला रामनवमीच्या आदल्या दिवशीं न्हावी बोलावून सर्वांनीं चेहेरे राखले व **वस्तऱ्यानें** हौस भागविली. देवळासमोरच्या कट्ट्यावर डांब रोवून रंगस्थल केलें होतें. चौदा लाईनच्या दोन चिमण्या टांगल्या. तेलांत तयार केलेले चार हिलाल फूटलाईटकरितां समोर ठोकून बसविले होते. पेटीवाला कुरकुरत पेटीवर बसला. तो आपल्या इच्छेप्रमाणें सूर धरी. पात्रांनीं हवें तर त्या सुरावर पद म्हणावें. तबल्याचें काम रिकाम्या पात्रानें आळीपाळीनें चालू ठेवलें. गालाला लाली आणण्यासाठीं त्या वेळीं हिंगूळ वापरीत, तो आणायचा राहून गेला. लालीशिवाय रंगरचना कशी पूर्ण होणार? परंतु एका कल्पक माणसानें थोडासा गुलाल व थोडी पिंजर (कोरडें कुंकू) यांचा उपयोग करण्याची क्लृप्ती शोधून काढली आणि ती अमलांतहि आणली. अर्थात् रंगरचना मथुरेकडील माकडांच्या लाल तोंडाप्रमाणें पुरेपूर झाली.

नाटक झालें. आदल्या दिवशीं ओझें डोक्यावर घेऊन चालून आल्यामुळें व नाटक पुरें होईपर्यंत सारखी पेटी वाजवीत असल्यामुळें न्हावी दादा फार श्रांत होऊन चिडून गेले होते. राहिलेला भाड्याचा रुपाया त्यांना दिला व उद्यां सर्वजण गाडीनें जाऊं अशीहि त्यांची खातरजमा केली. परंतु हें नाटक चालू असतांना गावांतल्या मंडळींना नाटक रंगदार वाटूं लागलें तेव्हां त्यांनीं आणखी एक नाटक करायचा आग्रह

धरला होता. न्हावी दादानीं तो ऐकला होता. पहाटे खेळ संपल्यावर सर्व मंडळी निजलेली पाहून सावधगिरीनें न्हावी दादा बाजाची पेटी घेऊन पसार झाले. सकाळीं उठून मंडळी न्हाव्याचा शोध करतात तों तो पुण्यास गेला असें त्या गांवांतल्या एका माणसानें सांगितलें.

दुसरे दिवशीं नाटक पुनः करायचें असें ठरलें. परंतु बाजाच्या पेटीशिवाय नाटक कसें करायचें ? परंतु हाहि प्रश्न धसाला लागून शेवटीं एक युक्ति निघाली. एका पातेल्यांत पाणी घालून त्यांत जोंधळ्याचें धाट मध्यें बसवून त्या धाटावरून बोटें ओढलीं कीं सूर निघतो हें पुष्कळांना माहीत असेल. त्या युक्तीचा प्रयोग करावा असें ठरलें. पाणी कमी जास्त प्रमाणांत निरनिराळ्या पातेल्यांत भरून निरनिराळ्या दोन तीन सुरांचीं पातेलीं तयार केलीं आणि आळीपाळीनें सर्वांनीं सूर काढायचे. त्या रात्रीं त्या अजब बाजाच्या पेटीवर नाटक पार पाडलें.

गांवकऱ्यांनीं खूप होऊन पंधरा रुपये वर्गणी करून दिले. चाकणच्या सफरीचा खर्च भागून पांचसहा रुपये उरत होते. त्याची पुण्यास गेल्यावर बासुंदीपुरीची मेजवानी करायची असें ठरवलें. चाकणचा प्रयोग उरकून दुसरे दिवशीं सायंकाळीं चाकणहून निघून रात्रौ बाराच्या सुमारास आमची ही नाटकमंडळी कसब्याच्या गणपतीच्या देवळात येऊन दाखल झाली. गुपचुप सर्वांनीं गाडीवाल्यास रवाना करून माडी गांठली. सकाळीं एक न्हावी बोलावून नाटकासाटीं केलेली केसांची रचना काढून डोकीं तुळतुळीत केलीं.

पहिलें संगीत नाटक १८९३ सालीं मी जें पाहिलें तें गोवा संगीत मंडळीचें "विक्रमशशिकला" होतें. अर्थात् ओळखीच्या फुकट पासावरच. दुसरें त्याच कंपनीचें "संभाजी" नाटक. गद्य नाटक इचलकरंजीकर मंडळींचें "भ्रांतिकृत चमत्कार" (शेक्सपीअरचें कॉमेडी ऑफ एरर्सचें भाषांतर) पाहिलें. त्यामुळें थिएटर, संगीत नाटक व गद्य नाटक याबद्दलच्या कल्पना डोळ्यासमोर आल्या. पण हें चाकणचें नाटक झाल्यापासून नाटक कंपनींत जाण्याची अनिवार उत्कंठा उत्पन्न झाली. या उत्कंठेची सफलता होण्याचा प्रसंगहि आला.

**गोवा संगीत मंडळी** पुन्हा पुण्यास आली. त्या कंपनीचे पुणें येथील एजंट कसबा पेठेंत होते. पहिल्या प्रयोगाच्या अगोदर तीन दिवस त्यांची माझ्यावर दृष्टि गेली. ‘ आमच्या गोवा संगीत मंडळींत येतोस का ’ म्हणून त्यांनीं मला विचारलें आणि मीहि एकदम होकार भरला.

त्या वेळीं पुण्यासारख्या ठिकाणीं निरनिराळया नाटक मंडळयांचे एजंट असत. नाटक मंडळयांना जरूरीप्रमाणें अडचणीच्या प्रसंगाला कर्ज मिळवून देणें, देखणीं मुलें पळवून त्या कच्च्या मालाची कंपनींत भरती करणें, नाटक कंपनीच्या मालकांभोंवतीं हांजी हांजी करून त्यांच्या सर्व शोकांत मदतनीस म्हणून राहणें अगर शोकांत सामील होण्याइतकें मनोधैर्य नसलें तर निदान त्याचें कौतुक करणें, हें या एजंटांचें काम असे. नाटक कंपन्यांच्या प्रत्यक्ष स्पर्धेपेक्षां या एजंटांचीच एकमेकातील स्पर्धा भयंकर असे. या एजंटांची महत्वाकांक्षा एकच. आपल्या इष्टमित्रांना स्नेहीसोबत्याना नाटकें फुकट दाखविणें. डोअरवर सन्माननीय मॅनेजर म्हणून उभें रहाणें, आपल्या विरुद्ध असलेला एखादा माणूस फुकट नाटक पाहण्यास येतो आहे असें पाहिल्यावर त्याच्याकडे तुच्छतेनें पहाणें, माझ्यावर केवढी मोठी जबाबदारी पडलेली आहे, त्या जबाबदारीमुळें आपणास केवढा मोठा त्रास पडत आहे हें लोकांना दाखविणें, नाटक कंपनीवर एकादा प्रसंग गुदरला असल्यास आपल्या स्वतःवरच तो प्रसंग आल्याचा यथातथ्य अभिनय करणें हीं कामें एजंटांचीं असत. ही एजंटांची परंपरा पौराणिक नाटकाच्या काळापासून सुरू झाली. १९३१ सालीं नाटक कंपन्या धडाधड कोसळूं लागल्या तेथपर्यंत या एजंटांचा धुडगूस नाटक कंपन्यांत चालू होता.

नाटक कंपन्यांचे एजंट व बगलबच्चे याचें नाटक कंपन्यांस प्रत्यक्ष साह्य झालें असेल त्यापेक्षां या लोकांनीं नाटक कंपन्यांचें जास्त नुकसानच केलें आहे. अशाच एजंट बगलबच्चांच्यापायीं धंद्यांत माझेंही नुकसान होऊन धंद्यांतील आसन मला लवकर झुगारून द्यावें लागलें.

गोवा संगीत मंडळीच्या एजंटाची दोन दिवस वाट पाहिली. शनिवारीं त्या कंपनीचा पहिला खेळ “ विक्रमशशिकला ” लागला. त्या

दिवशीं दुपारीं तीन वाजतां कंपनीच्या बिऱ्हाडीं मला नेलें. गाण्याची परीक्षा झाली. आवाज कोवळा व सुरेल, स्वरूपही ठीक होतें. मी एकदम पास झालों. कंपनीचे मालक रामचंद्र बळवंत साठे हे खुषींत येऊन माझ्या हिताच्या गोष्टी सांगूं लागले. माझी स्तुति करूं लागले. त्यांनीं गोड गोड अभिवचनें दिलीं.

विक्रमशशिकला नाटकांतील सुमती राणीचें काम मला पाठ करायला सांगितलें. दुसरे दिवशीं शर्ट, कोट, जाकीट, जरीची टोपी, नवीं धोतरें वगैरे पोषाख मला बहाल केला. आयुष्यांत अंगांत घालायला शर्ट प्रथमच मिळाला. त्या पोषाखामुळें कंपनींतील इतर मुलांकडे तुच्छतेनें पहाण्याची दृष्टी उत्पन्न झाली. दुसरीं आवाज बद्द झालेलीं मुलें होतीं. त्यांतला बळवंतराव जुवेकर हा माझा बालमित्र. एकदां आवाजदार असून नुकताच त्याचा आवाज फुटलेला. हाहि माझा दिमाख पाहून मनात हंसत होता. या बाबतींत त्याला चांगलाच अनुभव आला होता. आवाज-दार मुलांची कंपनींत अतिशय बडेजाव असायची. पण आवाज फुटल्या-बरोबर–? बिन आवाजाचा रुपाया जसा. दिसायला उत्तम असला तरी, बद्द वाजल्यामुळें त्याला जसें कोणी पत्करीत नाहीं व त्याची किंमतहि कोणी सोळा आणे देत नाहीं त्याप्रमाणेंच नाटक कंपनींत कोंवळया मुलांची स्थिति होती, आणि म्हणूनच त्याच्या मिस्किल हंसण्याचा अर्थ असा होता कीं, "नाणें वाजत आहे तोंपर्यंतच ही मिजास!" पुढें—?!!!!

पुढच्या बुधवारीं मी नाटकांत काम केलें. एकदोन पदांला वन्समोअर झालें. कंपनींत माझें महत्व वाढलें. निरनिराळीं कामें माझ्यावर सोपविण्यांत आलीं. घराला कुलूप ठोकून वैतागानें मी बाहेर पडलों, त्या वेळीं माझी आई कोंकणांत गेली होती. वडील वारल्यानंतर सुमारें दीड वर्षांनीं माझ्या आतेच्या घरीं जाऊन आजोबांनीं देह टेविला. मरतांना कर्जाच्या पोटीं त्यांनीं सर्व इष्टेट–जमीन जुमला, घर–सावकाराला कब्जे-गहाण दिली होती. जातांना आईला मोठी आशा वाटत होती. थोडासा का होईना आपल्याला आधार आहे असा तिला विश्वास वाटत होता. पण कोंकणांत गेल्यावर तिची अत्यंत निराशा झाली. आपणाला कोंकणांत

आतां आसरा नाहीं अशी तिची खात्री झाली. ती परत फिरली. घरीं पुण्यास परत येते तों तिला आमच्या पलायनाची हकीगत समजली. परंतु कुठें गेलों हें तिला कळलें नाहीं. शेवटीं मला नाटकाचा नाद लागला होता हें तिच्या लक्षांत आलें. इतक्यांत आपल्या बाबूसारखा एक मुलगा गोवा संगीत मंडळींत आहे अशी बातमी तिच्या कानांवर आली. खरी का खोटी हें पहावें असें ठरवलें. पदरचे चार आणे देऊन एका माणसास तिनें नाटक पहावयास पाठविलें. नाटक पाहिल्यावर परत येऊन त्यानें तिला आमचा सुगावा दिला.

दुसरे दिवशीं सकाळीं उठून बघतों तों पुढ्यांत आई उभी. ती अगदीं निराश झालेली दिसत होती. कोंकणांत ती स्थिति; येथें ही स्थिति! तिचें आंतडें पिळवटून निघत होतें. " झालें तें झालें घरीं चल " असा आग्रह ती करीत होती. परंतु मी नाटकाच्या हौसेनें पूर्ण भारलेला. त्यामुळें प्रथम मौन धरलें; नंतर पहातां म्हटलें आणि शेवटीं " मी घरीं येत नाहीं " असें निक्षून सांगितलें. त्या वेळीं तिला ब्रह्मांड आठवलें. ती ओक्साबोक्शीं रडूं लागली. आईला रडतांना पाहून माझेंहि मन तात्पुरतें द्रवलें आणि उद्या काय तें पाहूं असें सांगून मोकळा झालों. ती वेळ गेल्यावर नाटक कंपनींत रहायचें हा निश्चय कायम तो कायमच. नंतर आईनें माझ्या मावसबहिणीच्या नवऱ्याला मुखत्यारपत्र देऊन मुलाला फुसलावून नेल्याची फिर्याद कंपनीच्या मालकावर करविली. मला फरासखान्यांत बोलावून नेलें. त्या वेळीं तेथें बळवतराव फडके फौजदार होते. त्यांनीं मला पुष्कळ समजावलें; धमकीहि दिली. परंतु माझें एकच एक उत्तर " मी नाटकांतच जाणार! " त्यांनीं माझ्या बहिणीच्या नवऱ्यास सांगितलें कीं " तुम्ही सध्यां त्याचा नाद सोडा. थोडासा इंगा फिरल्यावर त्याचे डोळे उघडतील आणि तो आपोआप घरीं येईल. "

* * *

सन १८८० सालीं किर्लोस्कर कंपनी निघाली तेव्हांपासून संगीत कंपन्या निघूं लागल्या. डोंगरे संगीत मंडळी, किर्लोस्कर अनुयायी, ललित कलोत्सव, मुंबईकर संगीत ( पुढें हिलाच पाटणकर संगीत मंडळीं हें नांव

ठेवलें). नाट्यानंद व कांहीं पौराणिक कंपन्या गद्य व संगीत दोन्ही नाटकें करीत असत. चित्त–चक्षुचमत्कारिक कोल्हापूरकर नाटक मंडळी, अण्णा पडळकराची कंपनी, परांजपे संगीत मंडळी, वाशीमकर कंपनी, कळंगुटकर संगीत मंडळी–हिचेंच पुढें गोवा संगीत मंडळींत रूपांतर–आज ज्या आठवणींत आहेत त्या संगीत कंपन्या ह्या. सांगलीकर कंपनी, इचलकरंजी-कर कंपनी याही पौराणिक कंपन्या १८९३।९४ सालापर्यंत कशाबशा जीव धरून होत्या त्या विराम पावल्या.

सुप्रसिद्ध शाहूनगरवासी म्हणजे पूर्वीची सुपेकर कंपनी. ही कंपनी सन १८८१–८२ च्या सुमारास निघाली. १८९३ सालीं ती पुण्यास आली. तेथें कै० वासुदेवराव केळकर या सुप्रसिद्ध नाट्यपटु प्रोफेसरांनीं त्या कंपनीला हाताशीं धरली. त्यांच्या नाट्यचर्चेचा व अभिनयशिक्षणाचा फायदा कै० गणपतराव जोशी व बाळाभाऊ जोग या दोघांना फारच झाला. किर्लोस्करांच्या ‘ मोरोबा व भावड्या ’ प्रमाणें ‘ गणू व बाळ्या ’ हीं जोडी फार लोकप्रिय झालेली होती. त्यांची मोचनगड, मंजुघोषा, विकारविलसित ( हॅम्लेट ), अथेल्लो, ताटिका, राणा भीमदेव, पानपतचा मुकाबला, बाजी देशपांडे, वीरसेनवीरकांत, कांतीपुरचे दोन गृहस्थ, दुर्गा, फाल्गुनराव हीं नाटकें पुण्यास चांगलींच गाजलीं.

किर्लोस्कर कंपनी सोडून इतर कंपन्यांचीं संगीत नाटकें पाटणकरी धर्तीवर असत. उत्तम पोषाख, खरे जरीचे कपडे, चांदीचे दागिने असा किर्लोस्कर कंपनीचा श्रीमंती थाट असे.

दुसऱ्या कंपन्यांतील नेपथ्याचें, नाटकांचें व रहाणीचें वर्णन थोड-क्यांत देत आहें. कंपनींत मालक एक अगर अनेक भागीदार असत. नाटकें मृच्छकटिक, सौभद्र, रामराज्य–वियोग, संभाजी, विक्रम-शशि-कला इत्यादि असत. मालक मोठा धूर्त अथवा गायक असेल तर बहुत-करून तोच नायक असे. त्या काळीं केस ठेवण्याची वहिवाट नव्हती. मोठमोठ्या शेंड्या असायच्या. सर्व स्त्रीपार्टी बहुतकरून उत्तम देखणे असत. रंगसजावटीची सोय फारशी नसल्यामुळें स्त्रीपात्रांना काळ्या कातडीचें वावडें असे. साधारण काळासांवळा अगर गव्हाळा रंग खपत

असे. परंतु हल्लीं ज्याप्रमाणें ग्रीज पेंटखालीं **कोळसावाण** छपतो तसें त्या वेळीं नव्हतें. पुरुषपात्रें बहुधा अविवाहित असत. त्यामुळें वेश्यागमन क्रमप्राप्तच असे. त्याबरोबर गांजाहि असे. दारूचें व्यसन हल्लीं-इतकें महागाईचें नसलें तरी नटाच्या कमाईच्या मानानें थोडेंफार असेच.

मोठाल्या शेंड्या, कमानदार घेरा, दोन भुंवयामध्यें कुंकू, कपाळावर दुबोटी गंध, गळयांत स्फटिक-रुद्राक्षमिश्रित माळ, फटकळ व उत्तान अश्लील भाषाप्रयोग, बेफिकीर वृत्ति हीं पुरुषपात्रांचीं लक्षणें असत. स्त्रीपार्टी या प्राण्याला छबडें पोर, गुलजार पोर, या संज्ञा असत. या वर्गानें मत्रंध केस राखण्याचा प्रघात पाडला होता. यांचा पेहराव म्हणजे शक्य तितकें तलम धोतर, दोन भुवयांमध्यें गंधाची अगर कुंकवाची टिकली, डोक्याचे केस तेलानें तकतकीत केलेले. स्त्रीपार्ट करणारे अटरा वीस वर्षांचे तरुण वेश्यागमनाच्या तडाख्यात सांपडत. फुकट नाटक पहायला मिळतें व गोडस चेहेऱ्याच्या नटाबरोबर विलास करायला सांपडतात म्हणून वेश्याहि स्त्रीचें काम करणाऱ्या नटावर खूप असत. वेश्यागमनामुळें उपदंशासारखे विकार जडत व त्यामुळे हा नटवर्ग गालफडें बसलेला, उत्साहहीन व शरीरानें दुबळा असे.

नाटक मंडळींतील जेवणाचा थाट, स्नानाला ऊन पाणी तापविण्याची वहिवाट नसे. थंड पाण्याचें स्नान; आपापलें तांब्याभांडें, स्वतःचें धोतर स्वतः धुऊन आपल्याच पथारीवर बांधलेल्या एका दोरीवर चापून चोपून वाळत घालणें हें प्रत्येकाला करावें लागे. चहाची चाल नव्हती. दुपारीं बाराच्या सुमाराला पंगत बसे. जेवायला भात, पोळया, आमटी, एखादी भसकापुरी चटणी, मिठाची मोठी चिमूट व वरण. मंडळी कितीही असली तरी सकाळ संध्याकाळला मिळून रोज आठ आण्याच्या तुपाचें बजेट असे. तसेंच दोन आण्याचें दही दोन्ही वेळां पुरे. दही गवळयाकडचें आंबट घेतल्यामुळें त्यांत भरपूर पाणी सामावत असे. भाजी स्वस्तांतली स्वस्त घेत असत. दिवसास कंपनीस भाजीचा खर्च चार आण्यांपेक्षां जास्त नसे. भातावर एक चमचा व

पोळीवरहि एकच तुपाचा चमचा. अर्ध्या भाराचा असेल नसेल. कितीही पोळया खाणारा असला तरी त्यालाहि एकच चमचा तूप मिळे. एखाद्या वेळीं आमटीहि कमी येई. कोणी मागितली कीं खलास म्हणून वाढपी खुशाल उत्तर देई. आमच्या कंपनींतला आचारी हा आचारी तर होताच, पण तो नटहि होता. हलकीं स्त्रीकामें करणारे नट वाढपी असत. सबंध नाटक मंडळीच्या साम्राज्यांत एकच गडी असे. त्यानें फक्त बिऱ्हाडांतील झाडणें, दिवाबत्ती करणें, मालकाचें आंथरूण-पांघरुणाची व्यवस्था ठेवणें हींच कामें करावयाचीं असत. बाकी नटांनीं आपापल्या जागेपुरती झाडसारवणें करावयाचीं असत. पंक्तीला मालक असले म्हणजे त्यांनीं ' सीताकांतस्मरण ' अगर 'पार्वतीपते हर हर महादेव' म्हटल्याशिवाय पंक्तीला असणारांच्या हातातोंडाची गांठ पडत नसे. मालकच मुख्य नट असल्यामुळें त्याच्याच भाताला फक्त दही असे व त्याला साजूक तूप खावेंच लागे. एका नाटक मंडळींत तर नटानींच ताटें, वाट्या मांडून घेण्याची वहिवाट असे. किर्लोस्कर मंडळीशिवाय इतर अनेक कंपन्यांतून मालकाशिवाय इतरांना बसायला पाट अगर चटई नसे. सायंकाळचें जेवण म्हणजे ढक्कू भात, मिठाची चिमूट, सुप्रसिद्ध अर्धा भार चमचा तूप, शिल्लक असेल त्यामानानें वाढपी भराभर उभ्या चमच्यानें वाढून जाई. मागल्या भाताला दिवसभर फसफसून ताडीसारखें घाणत असलेलें आंबट ताक असे. गाजानें पोटांत पडलेल्या आगीमुळें हाही भीमपाक सर्वांच्या पचनीं पडत असे.

आता त्या वेळच्या नेपथ्यरचनेबद्दल थोडक्यांत लिहितों. पिवडी, सफेता, हिंगूळ व पाण्यांत कोळसा उगाळून केलेला काळा रंग, पावशेर खोबऱ्याचें तेल, पैशाची साबणाची वडी. रंग पुसायचें फडकें ज्याचें त्यानें आपल्या फाटक्या कपड्यांतून आणायचें असे.

नाटकांतल्या राजाचा पोषाख म्हणजे एक साटिनचा अंगरखा. त्यात एखाद वेळीं बदल म्हणून मच्छरदाणीच्या जाळीच्या कापडाचा एक आंगरखा. खोट्या जराची पिळदार पगडी. असल्या पगड्या त्या वेळीं फेटणीचे सईस असत त्यांच्या डोक्यांवर असत. मुख्य पात्राशिवाय दुसरें पात्र देव लोकांतलें इंद्रासारखें असलें तरीसुद्धां त्याला पगडी नसे. कारण तो

दुय्यम दर्जाचा. त्याच्या वांट्याला कसला तरी जुना अंगरखा. तो बहुतकरून मुख्य नायकानें जुना म्हणून टाकून दिलेला असे. किंवा एखादी साटिनची निम अस्तनी घालून वर मच्छरदाणीच्या कापडाचा अंगरखा असे. डोंकीला एक पांढरा पटका व त्यावर खोटी फीत गुंडाळलेली. मृत्युलोकांतल्या विक्रमराजाला शिरपेंच तुरा. स्वर्गांतल्या इंद्राला फक्त फुलाचाच तुरा असे. एवंच वैयक्तिक वरिष्ठपणा व कनिष्ठपणा नाटकांतल्या पोषाखात थैमान घालित असे. विजार क्वचित् असे. रेशीमकांठीं धोतरें नसत. साध्या नैनसूख कापडाचीं धोतरें काढून त्याला एका बाजूनें रेशीमकांठासारखें अलवानाच्या कापडाचे तांबडे कांट लावीत. पांढरे आंगरखे जेमतेम असत. आंतील सदरे ज्याचे त्याचे. तबला-पेटी आंत असे. पेटीवाले एका हातानें मुख्य सूर धरून दुसऱ्या हातानें साथ करीत. तबलजीस वस्ताद म्हणत. तोही बेटा मोटा फटेल असे. नाटक संपल्यानंतर जेवण नसे. पण मालक आपले बगलबच्चे एजंट विशेष प्रीतीतलें स्त्रीपात्र यासह एखाद्या फराळाच्या दुकानांत शिरत. पुण्यास त्या वेळीं एकहि चहाचें दुकान नव्हतें. फराळाचीं दुकानें भरपूर होतीं. अशा दुकानात दोन आण्याला मोठा द्रोणभर बासुंदी मिळे. नुसती बासुंदी पीत अगर पुऱ्या बरोबर घेत.

अशा नाटक मंडळ्यांतून जमाखर्चाच्या पद्धतशीर वह्या नसत. कांहीं पात्रांना ठरलेला पगार असे. बाकीच्या लोकांना कपडे करून देणें, विडीकाडीला रुपया आठ आणे देणें इतकाच मेहेनताना असे. त्या वेळीं किर्लोस्कर मंडळीशिवाय इतर मंडळ्यांचे दर म्हणजे शेवटचा दर दोन आणे ते चार आणे. भारी दराची जागा रुपया ते दीड रुपायाची असे. थिएटरें लहान किंवा हल्लींच्या भाषेंत "चिक्कार थिएटर" अथवा "हाऊस फुल्ल" झालें तरीहि दीडशें ते दोनशें रुपयांपेक्षां जास्त प्राप्ति होत नसे. आठवड्यांत फक्त दोन प्रयोग होत. म्हणजे महिन्यास सरासरी आठशें रुपये कंपनीला मिळकत होई. तेवढ्यांतच कंपनीचा कारभार आटोपणें भाग असे. त्यामुळें मुख्य स्त्रीपात्राला जास्तींत जास्त पगार २५ रुपये व इतर नटांना कमींत कमी पगार दरमहा २ रु. अगर इडीकाडी पुरता असे. कंपनींत बऱ्यापैकीं नटवर्ग असला तर ती कशीबशी

चालत असे. नवीन नाटकें लिहून घेण्याचे खटपटींत कोणीं पडत नसे. ठराविक नाटकें, ठराविक साचा, तसेंच नेपथ्य व नाट्यसंगीत. कांहींही नाविन्य नसे. मग त्या कशाबशा चालतील नाहींतर काय होईल ?

आमच्या कंपनीचीं मुख्य नाटकें विक्रम-शशिकला, संभाजी हीं होतीं. केव्हांतरी मृच्छकटिक लागत असे. त्या काळीं माधवराव पाटण-करांचें सत्यविजय नाटक फार लोकप्रिय झालें होतें. नाटकाचें नांव व कथानक तेंच ठेवून रा. दामोदर विश्वनाथ नेवाळकर यांनीं पदें व भाषणें बदललीं. पाटणकरांचें युवति-विजय नाटकाचें नाव तरुणीविजय ठेवून, कांहीं पात्रांचीं नांवें बदलून तें जशाचें तसेंच केलें जात असे. एक आवा-जदार मात्र म्हणून मी मिळाल्यामुळें आमच्या कंपनीचा पुण्यास जम बरा बसला. याच वेळीं पुण्यास किर्लोकर मंडळीहि आपले प्रयोग करूं लागली होती. १८९५ सालीं राष्ट्रीय सभेचें **अधिवेशन** डिसेंबरमध्यें पुण्यास भरण्याचें ठरलें होतें. त्या **अधिवेशनाच्या** खर्चासाठीं किर्लोस्कर मंडळींचा शापसंभ्रम हा लोकप्रिय खेळ एका वारीं लागला होता. किर्लोस्कर मंडळीच्या नाटकांची व त्यांतील भाऊराव वगैरेंच्या गाण्यांची चर्चा इतर सर्व नाटक मंडळयांत फार चालत असे. त्या चर्चेमुळें किर्लोस्करांचें नाटक पहाण्याची अनिवार उत्कंठा मलाहि होतीच. वर सांगितलेल्या दिवशीं शाप-संभ्रम पहाण्याची माझी इच्छा उत्कटतेनें मी मालकांना सांगितली. त्यांनीं बरेच आढेवेढे घेतले; पण शेवटीं एक राखण्या बरोबर देऊन श्री. शंकरराव मुजुमदार यांना चिटी लिहून मला मालकानीं पाठविलें. बरोबर ६॥ वाजतां मी थिएटरवर गेलों. शंकरराव मुजुमदारांना चिठी दिली. त्यांनींही रुबाब-दार सुहास्य करून तळमजल्यावर बाजूला दहा आण्याच्या जागेंत मला नेऊन बसविलें. शंकरराव खरोखरच व्यवस्थापक दिसत असत. त्यांचा तो गोरापान देखणा चेहरा, ती भरदार आगलट, टपोऱ्या मोत्यांची कानात भिकबाळी, बाजूला दोन बटणें असून त्याला मराटीप्रमाणें बंद अडक-विलेली डोक्याला इटालियन कॅप, अंगात पारशी फॅशन कोट, पायांत पाटलोण बूट अशा थाटांत थिएटरमध्यें हिंडतांना शंकररावांचा रुबाब न्याराच दिसे. थिएटरमध्यें शिरतांच नुकतेंच ऊद घातलेलें उदाणें फिरून गेल्यामुळें तेथील कुबट घाण नाहींशी झाली होती. अत्यंत

वरच्या दर्जाचा नटवर्ग, रुबाबदार व्यवस्थापक या सर्वांचा माझ्या अपरिपक्व मनावर आरंभींच गंभीर परिणाम झाला. नाटकाच्या दोन घंटा होऊन बरोबर सात वाजतां पडदा वर गेला. सूत्रधाराची नांदी सुरू झाली. मंडळीचे एक भागीदार रामभाऊ किजवडेकर उंचेपुरे मोठ्या मिशावाले सूत्रधार मध्यें उभे, त्यांच्या बाजूला सुस्वर आवाजाचे तंबोरा घेतलेले नारायणबुवा मिरजकर व दुसऱ्या बाजूला ज्यांचा आवाज गोड व शरीर बांधेसूद असे नारायणराव दडपे उभे होते. नांदीचा हा थाट पाहून मी अगदीं गारेगार झालों. माझ्या कंपनींतील मरतुकडे व पोरकट सूत्रधार आणि **आलबते** गलबते पारिपार्श्वक त्या वेळीं डोळ्यांसमोर उभे राहिले; आणि तुलनेनें किर्लोस्कर मंडळींतील मंडळींचा मला हेवा वाटूं लागला. सूत्रधारानंतर आंतून महाश्वेता—अभिनयकुशल चिंतोबा गुरव, पाठोपाठ चतुरिका—कृष्णराव गोरे व त्यामागून तरलिका असा प्रवेश होऊन प्रत्यक्ष रंगदेवताच असे भाऊराव कोल्हटकर हातात स्फटिकाची माळ, कमंडलु, साटिनची गुलाबी कफनी, पचंग मारलेलें जरीकांठीं धोतर, कानावर पुष्पमंजरी, डोक्यावर कुरळ केसांचा मोहक टोप अशा पुंडरिकाच्या भूमिकेंत प्रवेश करतांच तीनही मजल्यावरून टाळ्याचा कडकडाट झाला. त्यांनीं पुढें येऊन किंचित् हंसतमुखानें वाकून प्रेक्षकांना प्रणाम केला. वाक्य बोलून "नदनवन देवीनें माझा" या पदाला भाऊरावानीं सुरवात करतांच प्रेक्षकवर्ग चित्रासारखा तटस्थ झाला. शातता इतकी निर्माण झाली कीं खिशातील घड्याळाचें बारीक टिकटिकणें स्पष्ट ऐकूं येऊं लागलें. भाऊरावांच्या आवाजानें आणि सुस्वर आलापांनीं त्यांचा नित्याचा प्रेक्षक वर्ग जर इतका तल्लीन झाला तर प्रथमच आस्वाद घेणारा माझ्यासारखा मंत्रमुग्ध झाला असेल यांत काय आश्चर्य ? पात्रें मागें गेलीं म्हणजे मला दिसत नसत त्यामुळें वाईट वाटे. मी मुजुमदारांना गांठून बेधडक म्हटलें 'अहो, मला येथून नीट दिसत नाहीं हो. मला चांगल्या जागेवर बसवा हो. माझा नाटक पहाण्याविषयीं उत्कंठित असा आशाळभूत चेहेरा पाहून त्यांनीं स्मित केलें व समोरच्या गॅलरींत बसविलें. पहिला अंक झाला. दुसरा संपला. तिसऱ्यांतील भाऊरावाच्या पदाला वन्समोअरचा धूमधडाका चालला होता. चौथ्या अंकांतील

अच्छोद सरोवराचा देखावा, त्यापाठोपाठ महाश्वेतेचें तपश्चर्येचें कैलास-नाथाचें देऊळ, महाश्वेतेचा व कादंबरीचा महाल. सहाव्या अंकांत वैशंपायन महाश्वेतेच्या शापानें भस्म होतो तो देखावा असे पहात असतां प्रेक्षकांत आ हा हा! चे आश्चर्य–उद्गार निघत होते. किर्लोस्कर नाटक मंडळींत शालू, शेले यांची लयलूट होती. तेथें मूर्तिमंत वैभव नांदत होतें. भाऊराव–पुंडरीक, चितोबा–महाश्वेता, दडपे–कपिंजल व चंद्रापीड, कृष्णराव गोरे–चतुरिका व कादंबरी या पात्रांचीं कामें पाहून मी फारच आनंदित झालों. नाटक संपलें तरी बसल्या जागेवरून उठायचें भान मला राहिलें नाहीं. दुसरे दिवशीं शापसंभ्रममधील पदें गुणगुण्याचा माझा कार्यक्रम सुरू झाला. पुढें किर्लोस्कर कंपनीची वार्षिक सुट्टी होऊन ती मंडळी घरोघर गेली. आमची गोवा संगीत मंडळीहि अक्कलकोटच्या श्रीमंत राजेसाहेब यांच्या बोलावण्यावरून अक्कलकोटला गेली. अक्कलकोटाहून कंपनी पुनः पुण्यास आली. तेव्हां ती आनंदोद्भव थिएटरमधून गणेश पेठेंतील आर्यभूषणमध्यें प्रयोग करूं लागली. माझ्या बाल आवाजांत वयोमानानें किंचित् फरक पडूं लागला. आर्यभूषण थिएटरमधील रहाण्याच्या जागेंत किर्लोस्करांचें सामान होतें तें संभाळण्यास कंपनीचे स्टेज मॅनेजर होते. ते सकुटुंब होते. जी मंडळीं सुट्टींत घरीं गेली नव्हती ती तेथेंच असत. चिंतोबा गुरवाचें बिऱ्हाड पुण्यासच असल्यामुळें तेहि त्या जागेंत रोज येत असत. त्या मंडळींत मी जाऊं नये, बसूं बोलूं नये, म्हणून आमच्या मालकाचा लांबून लांबून माझ्यावर पहारा असे. हेतु हा कीं मला कोणीतरी फितवील. मुलें फितवाफितवीचे प्रयोग त्या काळीं नाटक कंपन्यांत सर्रास चालू असत. त्यामुळें कंपन्यांचे मालक आपल्या मुलेंरूप इस्टेटीला कृपणाप्रमाणें जपत. मी त्या पहाऱ्याची पर्वा करीत नसें. किर्लोस्करांचे स्टेज मॅनेजर निपाणकर यांच्या कुटुंबाशीं माझ्या आईनें ओळख करून घेऊन ती तेथें येत असे. दोघींत माझ्याबद्दल चर्चा चालू झाली. दोघींनीं संगनमत करून आईनें एक दिवस मला त्यांच्या जागेंत नेलें. तेथें निपाणकरांच्या कुटुंबांनीं किर्लोस्करांच्या व्यवस्थेचें माझ्यासमोर सुंदर चित्र रेखाटून सांगितलें, "तूं या कंपनींत आलास तर तुझ्या जन्माचें कल्याण होईल." माझ्या मनांत विचारांचें आंदोलन सुरू झालें. त्या

बाईच्या सल्ल्यावरून किर्लोस्कर कंपनीचे व्यवस्थापक शंकरराव मुजुमदार यांना माझी आई जाऊन भेटली व ' माझ्या मुलाला तुमच्या कंपनींत घ्या ' अशी तिनें त्यांना विनंति केली. त्यांनाही इच्छा होतीच. पण किर्लोस्कर कंपनी प्रतिष्ठित असल्यानें इतर कंपन्यांप्रमाणें राजरोस पळवापळवी करीत नसल्यामुळें माझ्या आईला शंकररावांनीं सांगितलें कीं तुम्ही होऊन आपल्या मुलाला आमच्या कंपनींत आणिलें तर ठेवून घेऊं. माझ्या आईनेंही कळवळ्यानें मला पाझर फोडला. मी किर्लोस्करात जायला तयार झालों. पण राजरोस जातों म्हणून सांगणें व कंपनींतून निघणें दुरापास्त होतें. कंपनींतून निघून गेलेल्या माणसांना काय काय क्लृप्त्या लढवून पेंचांत आणलें याचीं रसभरीत वर्णनें आमच्या मालकांच्या तोंडून मी ऐकलीं होतीं. म्हणून मला पलायनाचाच मार्ग अनुसरणें प्राप्त होते. आमचे मालक आपल्या एका प्रिय पात्राला पोंच-विण्यास सोलापुरास गेले होते. मी पळून जाईन या भीतीनें मलाहि आपल्याबरोबर आपल्या रांडेच्या घरीं न्यायला कचरत नसत. परंतु या वेळीं त्यांचें पात्र घरगुती असल्यामुळें बोभाटा होईल या भीतीनें त्यांनीं मला बरोबर नेलें नव्हतें. मला पलायन करायला ती सुवर्णसंधि मिळाली. ता. २९ सप्टेंबर १८९५ रोजीं दुपारीं कसें जायचें, कोणती सबब सांगून बाहेर पडायचें याबद्दल बेत ठरला. सप्टेंबर ता. ३० रोजीं सकाळीं आई कंपनींत येऊन मला घरीं जेवायला घेऊन गेली. मालकाच्या बहिणीनें " दादा नाहीं, विचारल्याशिवाय तूं जाऊं नकोस." अशी थोडी हरकत घेतलीच. त्यावर " घरीं जेवायला कशाला परवानगी ? मी काय कैदी आहे कीं काय ? मी जाणार जा. सांगा दादाला." असें मी तडकाफडकीं उत्तर दिलें. तेव्हां नरमून " जा, पण परत केव्हां येणार ?" असें तिनेंच विचारलें. " मी येईन सावकाश संध्याकाळपर्यंत " एवढेंच म्हणून व अंगातील सदरा व टोपी एवढ्यावरच गणेश पेठेंतून बाहेर पडलों. आईबरोबर फरासखान्यापर्यंत आलों. इतक्यांत आपण विश्वास-घात करून पळून जातों आहोंत, हा फाजील सात्विक विचार डोक्यांत उत्पन्न झाला आणि " आई आतां मी येत नाहीं. कांहीं दिवसांनीं पाहूं." असें आईला म्हटलें. त्याबरोबर आई एका दुकानाच्या कट्यावर मट्टदिशीं

बसली. तिला एकदम मोठा हुंदका आला. आईची ती कष्टी व केविलवाणी मुद्रा पाहून मी पुनः विचार टाम केला. बुधवारांतील पंपूशेट सुगंधी यांच्या दुकानीं शंकरराव मुजुमदार यांचे स्नेही वामनराव भावे बसले होते तेथें आईसह गेलों. सर्व बोलणीं झालीं. दरमहा दहा रुपये पगार मला ठरला. आईनें आपल्या गळ्यावर माझ्याकडून हात ठेऊन घेऊन "आजपासून किर्लोस्कर कंपनींत राहिलों" अशी शपथ घेवविली. त्या कंपनीची टोपी व सदरा हीं तेथेंच टाकून एक नवी टोपी व आईनें घरचाच आणलेला सदरा, कोट घालून सकाळच्या ११ च्या गाडीनें ठाण्यास रवाना झालों.

किर्लोस्कर कंपनीची वार्षिक सुट्टी संपून ती त्याच दिवशीं सामानसुमानासह रात्रीं रवाना होणार होती. कंपनीबरोबरच मी जावें असें शंकररावांचें म्हणणें पडलें. परंतु आमच्या मालकांचे पराक्रम मला माहीत असल्यामुळें मीच त्याना सुचविलें कीं मी दुपारच्या गाडीनें ठाण्यास जाऊन उद्यां तेथून मुंबईला येतों. त्याप्रमाणें झालें. माझ्या आईनें हताश होऊन न बसतां नाटकाची माझी आवड पाहून किर्लोस्करसारख्या सर्वश्रेष्ठ कंपनींत मला घातलें, म्हणून आजचे चागले दिवस मला दिसले. तसें न होतें तर कानावर जळकी विडी, कळकट पंचा, बुटाच्या लसच्या रंगाचें जानवें अशा थाटांत अस्मादिकांची स्वारी कुठल्या तरी हॉटेलात आपलें आयुष्य कंठती. आईनें नसता हेकटपणा करून नाटकांतून मला काढलें असतें तर मी तिचाच मुलगा असल्यामुळें मीहि तिच्या विरुद्धच गेलों असतों. नाटकांत का जाईना पण लौकिकवान कंपनींत तरी असू दे अशी आईनें आपल्या चिकाटीला समंजस मुरड घातली. किर्लोस्कर कंपनीबद्दल लोकांत अत्यंत आदर असे. यामुळें नाटकी झाला तरी किर्लोस्कर मंडळींत आहे एवढेंच समाधान तिला पुरेसें झालें. असो आमच्या मालकांनीं गांवाहून येताच मी कंपनींत नाहीं एवढें पाहून किर्लोस्कर मंडळीवर स्टेशनवर येऊन पाळत ठेवली. त्यांचा प्रयत्न फोल ठरला. आक्टोबर १ रोजीं मंगळवारीं ठाण्याहून लोकल गाडीनें मुंबई गाठली. दिलेल्या पत्त्यावर म्हणजे हल्लीं जुन्या गिरगांव पोष्टाचे जुन्या गल्लींतील वीरचंद दीपचंदची चाळ, नातूंची चाळ आहे त्याच चाळीशेजारीं दोन तांबडे पिलर

पुढें असलेलें पोर्च आहे त्या बंगल्यांत किर्लोस्कर मंडळीच्या बिऱ्हाडीं मी दाखल झालों.

आपली पहिली भिकार नाटक मंडळी सोडून आईच्या सागण्यावरून आपण किर्लोस्कर संगीत नाटक मंडळीसारख्या सर्वश्रेष्ठ नाटक मंडळींत राहणार याबद्दल नंतर जातांना मला मनांतून अतिशय आनंद झाला. त्या कंपनीचें शापसंभ्रम मी पहिल्यांदा पाहिलें होतें, त्याचा ठसा माझ्या मनावर आज घटकेला जर ताजा आहे, तर त्या वेळींहि असल्यास त्यांत आश्चर्य कसलें? मुंबईच्या गाडींत बसलों तेव्हां शापसंभ्रममधले देखावे डोळ्यासमोर येऊन मनाला गुदगुल्या होऊं लागल्या. परंतु त्याच वेळीं मधून मधून आपण आपल्या मालकाला फसवून निघालों आहोंत, तो सोलापूराहून परत आला आहे; आपण कंपनींतून गेल्याचें त्याला समजलें आहे, त्यानें आपल्यावर पाळतहि ठेवली आहे; आणि तो संतापून जाऊन आपला पाठलाग करावयाला आपल्या मागें आल्याशिवाय राहणार नाहीं असें मनांत येई व मी कावराबावरा होई.

माझ्याबरोबर आई होती. दगडापेक्षा वीट मऊ या म्हणीप्रमाणें नाटक मंडळी का होईना पण ती कसली तरी असण्यापेक्षा 'किर्लोस्कर'सारखी आपल्या मुलाला मिळाली; मुलगा त्या कंपनींत जावयाला तयारहि झाला; या समाधानात आई होती. मी कावराबावरा झाल्याचें आईनें पाहिलें म्हणजे तिचेंहि मन चलबिचल होई. बाबू बिथरून आपल्या हातावर तुरी देऊन पुन्हां येरे माझ्या मागल्या असें करतो कीं काय? साठे यांच्याच कंपनींत जातो कीं काय? असेंच तिच्या मनांत उभें राही व ती त्याच अर्थानें कावरीबावरी होऊन माझ्याकडे पाहूं लागे. पण खरेंच सांगायचें तर साठे यांच्या कंपनीचा लोभ कमी व्हावयाला लागून किर्लोस्कर कंपनीची ओढ माझ्या मनाला आतां लागली होती यांत शंकाच नाहीं.

ठरल्याप्रमाणें पुण्याहून रात्रींच्या गाडीनें निघालों तो पहिल्यांदा ठाण्यास आमच्या नातेवाईकाकडे पोंचलों. तो सोमवारचा दिवस होता. दुसरा दिवस मंगळवार आक्टोबरची एक तारीख होती.

---

# ३

# अभ्यास

## किर्लोस्कर संगीत मंडळींत प्रवेश

किर्लोस्कर कंपनीच्या बिऱ्हाडीं दिवाणखान्यांत मी पोंचतांच प्रत्येक-जण माझ्याकडे पाहूं लागला. हा मुलगा आपल्याकडे राहिला आहे असें शंकररावांनीं सांगतांच सर्वांना बरें वाटलेंसें दिसलें. त्यांपैकीं कांहींनीं पूर्वींच माझीं कामें पाहिलीं होतीं. त्यामुळें चांगल्या आवाजदार मुलाची कंपनींत भर पडली असेच सर्वांनीं उद्गार काढले. नंतर थोडी औपचारिक चौकशी, जेवणाची विचारपूस झाली. माझें जेवण झालें असें सांगतांच चहा पाजण्यासाठीं मला स्वयंपाक घरांत नेण्यांत आलें. मला चहा देणाऱ्या कृष्णाप्पा जोशी नांवाच्या वाढप्याच्या हातांत सोन्याचें एक लठ्ठ कडें असलेलें दिसलें. तें पाहून मी चकितच झालों. ज्या कंपनींतील वाढप्याच्या हातांत एवढें लठ्ठ सोन्याचें कडें ती कंपनी केवढी संपन्न असली पाहिजे हा विचार मनांत आला. चहा पिऊन वर आलों. 'पार्सल' फोडण्याची गोष्ट निघाली. किर्लोस्कर कंपनींत नवीन आलेल्या मनुष्यास 'पार्सल' म्हणण्याची चाल असे. पार्सल फोडणें म्हणजे त्यांतला गुणाचा माल कसा आहे हें पहाणें. चिंतोबांनीं मला पद म्हणायला सांगितलें. मीहि आमच्या कंपनीच्या नाटकांतील—सत्यविजयांतील पद निर्भीडपणें ठणठणीत म्हणून दाखविलें. मंडळी खूष झाल्याचें दिसलें.

दुसऱ्याच दिवशीं माझ्या कंपनीचे मालक आपल्या स्वभावधर्माप्रमाणें माझ्यावर चोरीची फौजदारी फिर्याद करून वारंटासह पोलिसास घेऊन किर्लोस्कर कंपनींत रात्रीं नऊ वाजतां दत्त म्हणून दाखल झाले. शंकररावांनीं "मुलगा व त्याची आई एका सन्मान्य गृहस्थाच्या घरीं आहेत. मुलाला पोलीस स्टेशनवर उद्यां हजर करूं" अशी हमी दिली. पोलीस परत गेला.

रात्रीच्या रात्रीं मला पोलीसच्या ताब्यांत देण्याचा आमच्या मालकांचा डाव हुकला. दुसरे दिवशीं सकाळीं मी पोलीस कचेरींत गेलों. पहिल्या कंपनींत तिकीटविक्रीचा हिशेब मी घेत असे म्हणून त्या पेटीची किल्ली माझ्याजवळ असे. ती किल्ली माझ्या जानव्याला या वेळीं होतीं. कचेरींत जातांना मी सावधगिरीनें ती किल्ली काढून गटारांत फेंकून दिली. नेसत्या धोतराशिवाय पहिल्या कंपनीची एकहि वस्तु मजजवळ नव्हती. पोलीस कचेरींत मला पाहिल्यावर नाटकी सद्गदित आवाजांत मालक मला म्हणाला " गणू हें काय केलेंस? मी तुला काय कमी केलें होतें? माझ्या अन्नांत माती कालवलीस." मला त्या मानभावीपणाची चीड आली. त्या प्रश्नाला " हरामखोर, सहा महिन्यांत आईच्या औषधाला मला फक्त पांच रुपये दिलेस आणि पाजीपणानें माझ्यावर चोरीची फिर्याद केलीस." असें उत्तर दिलें. त्यावर मवाळून तो माझी समजूत घालूं लागला. तेवढ्यांत एका युरोपियन ऑफिसरासमोर मला नेण्यांत आलें. त्याच्याकडून माझ्यावर रोख रुपये एकोणतीस व पंधरा रुपये भार चांदीचें भांडे चोरल्याचा आरोप असल्याचें समजलें. तें ऐकून मी निर्भीडपणें सांगितलें, ' साहेब, या माणसाच्या कंपनींत मी सहा महिने काम केलें. हिरॉइन, सब् हिरॉइनचीं कामें केलीं. यानें आतांपर्यंत मला फक्त पांच रुपये माझी आई आजारी असल्यावेळीं दिले. यापेक्षां कवडी मिळाली नाहीं. मला फुकट राबविण्याची याची इच्छा मी किर्लोस्कर कंपनींत आल्यानें यापुढें साधत नाहीं म्हणून यानें माझ्यावर खोटी फिर्याद केली. ' माझें हें सरळ व सडेतोड बोलणें त्या ऑफिसरला पटलेंसें दिसलें. सबळ पुरावाहि नव्हता. त्यामुळें मला सोडून देण्यांत आलें. शनिवार तारीख ५ ऑक्टोबर रोजीं सकाळीं मोरोबा वाघोलीकर, काशिनाथपत परचुरे ही मंडळी आली. ' आबा आले, ' ' आबा आले ' ही इतर मुलांची गडबड ऐकून मी पहावयाला गेलों. एका खोलींत मोरोबा दिसले. पाणीदार टपोरे डोळे, वयोमान झालें असूनही पीळदार व पाणीदार शरीर. चेहऱ्यावरचा रुबाब पाहून मी दबकत लांबच उभा राहिलों. पण माझा नवा चेहेरा दिसतांच त्यांनीं ' कोण रे तो? ' असें विचारलें. ' नवीन मुलगा आहे ' कोणीतरी त्यांस सांगितलें. ' ये बाळ पुढे ये ' अशी आबांनीं आज्ञा फर्मावली. समोर जाऊन मी उभा राहिलों.

'बैस' म्हणून बसविलें. माझ्याकडे पहात 'ठीक आहे, डोळे छान आहेत' असें म्हणून त्यांनीं मान डोलावली. इतक्यांत बडोद्याच्या गाडीनें भाऊराव आले अशी हूल झाली. त्यासरसे आम्ही सर्व तिकडे पळत तळमजल्यावर गेलों. भाऊराव व्हिक्टोरियांतून उतरत होते तेथें जाऊन उभे राहिलों. हंसतमुख भाऊराव गाडींतून उतरतांच 'काय ठीक आहे? मोरोबा आले का?' वगैरे पृच्छा करीत त्यांच्यासाठीं ठेवलेल्या तिसऱ्या मजल्यावरच्या जागेंत गेले. आम्ही कौतुकानें त्यांच्याकडे पहात होतों. माझ्याकडे नजर वळतांच 'हा कोण' अशी पृच्छा झालीच. 'पार्सल' असें ठराविक उत्तर त्यांना मिळालें. तेव्हां 'पार्सल फोडलें का?' हा प्रश्न आलाच. त्यालाही 'होय' असें उत्तर गेलें. त्यापुढील त्यांचा प्रश्न 'ब्राह्मण' का 'शेणवी' हा आला. प्रश्नाचें उत्तर 'ब्राह्मण' दिलें गेलें. ब्राह्मण म्हणजे गाणारा व शेणवी म्हणजे प्रोज अशी त्या वेळीं कंपनींत पात्रांच्या बाबतींत परिभाषा असे. भाऊराव दिवाणखान्यांत येऊं लागले. येतांना मध्येंच मोरोबांच्या खोलींत त्यांनीं डोकावलें. उभयतांचे हार्दिक नमस्कार चमत्कार झाले. तब्येतीची वगैरे चौकशी होऊन मोरोबा व भाऊराव उभयतां दिवाणखान्यांत आले. त्यांच्यासमोर पुनः आमची गाण्याची हजेरी झाली. खूष झालेले दिसले. नंतर तुला नाचायला येतें का असें विचारलें. आमच्या पहिल्या कंपनींत थोडा नाचाचा अभ्यास झाला होता म्हणून होय असें सांगतांच तीहि हजेरी झाली. नंतर भाऊराव चिंतोबाला म्हणाले, "कोल्हटकरांच्या वीरतनयांत आतां मालिनीच्या कामाची तजवीज झाली."

रात्रौ जुन्या थिएटरचें (एल्फिन्स्टन) रूपांतर करून गुलाम हुसेन नांवाच्या खोजा जातीच्या गृहस्थानें न्यू एल्फिन्स्टन थिएटर तयार केलें. त्यांत पहिला प्रयोग याच रात्रीं किर्लोस्कर कंपनीचा "शापसंभ्रम" हा झाला. थिएटर पूर्ण भरलें होतें. मुंबईशिवाय गॅसची लाईट कोठेंच नव्हती. गॅसचे भरपूर फिटिंग केलेलें. झगझगीत लाईटमध्यें नाटक खूपच रंगलें.

बुधवारीं ता. ९ रोजीं सौभद्र लागलें. त्यांत मजेसाठीं रुक्मिणीच्या महालांत नाच घातला होता. नाचाचें पद देवलांनीं करून दिलें होतें.

त्या नाचांत दुसऱ्या दोन मुलांबरोबर माझी नाचाची साथ होऊन नाचाची भूमिका मी केली. नंतर दुसऱ्या सौभद्रांत सारंगनयनेची, शाकुंतलमध्यें यवनी स्त्री, ओटी भरणारी बाई, सहाव्या अंकांत दुष्यंताच्या बागेंतील एक दासी अशीं कामें दिलीं होतीं. दासीच्या भूमिकेला एक पद होतें. तें पद "आम्रमंजरी तुला अर्पितें नमुनि मीनकेतुला." या पदाला मला वन्स-मोअर मिळाला. दुसरे दिवशीं सर्वांनीं पद चांगलें झाल्याबद्दल माझी तारीफ केली. मृच्छकटिकमध्यें धूता वगैरे सामान्य भूमिका मला दिल्या. दासीचें काम ठीकठाक म्हणून घ्यायचें काम चिंतोबाकडे होतें. बुधवारीं सौभद्रात भाऊरावाची सुभद्रेची प्रसिद्ध भूमिका, मोरोबांची अर्जुनाची भूमिका पाहून आजपर्यंत जीं वर्णनें ऐकलीं होती तीं खरीं ठरलीं. उत्कंठा वाढली होती तिचें पूर्ण सार्थक झालेंसें वाटलें.

मोरोबा हे अगदीं अशिक्षित असल्यामुळें क्षुल्लक कारणाकरितांहि विशेष रागावत. त्यामुळें त्यांचा दरारा कंपनींत फार असे. परतु ते कंपनीचे पहिले आधारस्तंभ असल्यामुळें सर्वजण त्यांच्याकडे आदरानें पहात असत. मोरोबांचा आवाज फार गोड होता. त्याच्या गाण्यात पल्लेदार तान नव्हती. परंतु त्यांच्या पदात बऱ्याचशा चाली लावणीवजा असल्यामुळें लावणीच्या पद्धतीचीं पदें फार उत्तम म्हणत. त्यांत खटके व मुरक्या असत. त्यामुळें ते आपलें गाणें कर्णमनोहर करीत. मुरकी घेताना ते नाकांत घेत असत, त्यामुळें बहुतेक गाणें नाकांत येत असे. परंतु आवा-जाच्या मधुरपणामुळें, किंवा संगीत गाणें प्रथमच असें त्याचेंच लोकांच्या कानीं पडल्यामुळें ( या नाकांत गाण्याची चहुंकडेच प्रथा असावी. कारण त्या काळच्या कांहीं लोकांचीं गाणीं ऐकली तींही मला नाकांतच वाटलीं. ) म्हणून म्हणा, त्यांच्या नाकांत गाण्याची चर्चा कुठें ऐकली नाहीं. मोरोबांना सतार वाजविण्याचा नाद असे. त्यांची सतार मोठी व जड असून तिला दोन भोपळे असत. त्यांची जागा नीटनेटकी, स्वच्छ बिछायत घातलेली. स्वच्छ घासून ठेवलेलें तांब्याभांडें. एका कोपऱ्यांत सतार गलेफ घालून उभी केलेली. खोलींत सुवासिक फुलांचा व अत्तराचा वास असायचा. एका खोलींत एक शिशवी फिरविण्याची जोडी ठेवलेली

असे. मोरोबा ५४ वर्षांच्या वयापर्यंत या जोडीचा व्यायाम नेमानें घेत असत. एका बाजूला ज्ञानेश्वरीची पोथी आसनांत बांधून एका पाटावर ठेवलेली. त्यावर सुवासिक फुलें वाहिलेलीं असायचीं. त्यावर एक सोन्यांत मढवलेली रुद्राक्षांची माळ असायची. मोरोबा रात्रौ १२।१ वाजतां निजत. सर्वांच्या निजानिजी झाल्यानंतर यांची सतार वाजवायची लहर लागायची. नंतर निद्रा. निद्रा अतिशय सावध असे, त्यामुळें जरा खुट्ट झालें कीं "कोण रे तो" असा ध्वनि त्यांच्या खोलींतून निघायचा. सकाळीं ८।९ वाजतां निजून उठत. नंतर प्रातर्विधि आटपल्यावर कृष्णाप्पानें एका मोठ्या बंपरमध्यें नुसत्या दुधांतला चहा व बरोबर बदामाचा शिरा आणायचा. मग "बाबा आणलास चहा" असें म्हणायचें. नंतर चहापान झाल्यावर १० वाजल्यापासून आंघोळीला उठा असा निरोप आला तरी चेंगटपणानें बसून उठायचचें नाहीं. आलोंच असें म्हणायचे मात्र. ४।५ निरोपांनंतर उठायचे. पुनः शौचास जायचे. शौचास जाण्याच्या क्रियेस ते "घोकाला जाऊन येतों" म्हणायचे. स्नानाला रोज नारळाची (सुक्या खोबऱ्याच्या गोट्याची) अर्धी वाटी दगडावर उगाळून ब्राह्मणानें तयार केलेली सर्वांगाला मर्दन करायची. नाटकाच्या दिवशीं त्याच्या जोडीला गवला कचऱ्याची लिंबाएवढी गोळी असायची. अशा थाटांत भरपूर उष्णोदकानें १५।२० मिनिटें झोकांत स्नान व्हायचें. नंतर संध्येचें मांडून ठेवलेलें असायचें. तेथें जाऊन सावकाश वस्त्रधारण, संध्या वगैरे झाल्यावर ज्ञानेश्वरी वाचायची. इतक्या क्रियेला सुमारें २ तास लागत. जेवण १—१॥ च्या सुमारास व्हायचें. पंक्तीला असायचे. पंक्तीला आपण असावें ही त्यांची फार इच्छा. परंतु त्यांच्या चेंगटपणामुळें डोळे पांढरे होण्याइतका उशीर इतरांना रोज व्हायचा. मोरोबा मुंबईस असले म्हणजे गोकुळदास देवजीकडे नित्य जात असत. पुण्यास क्वचित् बाहेर जात असत. परंतु बाहेर जायचा प्रघात एकंदरींत कमी. नेहमीं घरांतच बसून असायचे. व्यायाम फक्त जोडी फिरविण्याचा करीत. ते दिवसभर घरांत असल्यामुळें त्यांची खोली म्हणजे वाघोबाच्या जाळीसारखी भीतिप्रद वाटे. मोरोबांना धष्टपुष्ट माणसें आवडत. फाटक्या अंगाच्या झाडकुळ्या माणसांना ते हेटाळणीनें × × × रोड म्हणत. कारण

स्वतः त्यांचें शरीर उत्तम असून त्यांनीं त्या वयापर्यंत तसें राखलेलेंहि होतें. एरवीं रागांत नसले म्हणजे त्यांची सर्वांशीं प्रेमळपणाची वागणूक असे. त्या प्रेमळपणाचा कांहीं प्रसंगीं अतिरेक होई. एकादी गोष्ट अंगावर घेतली म्हणजे आपणच उसळून वेळ मारून न्यायची संवय त्यांना असे. मात्र व्यवहाराच्या बाबतींत त्यांचा पूर्ण विश्वास भाऊरावांवर असे. कोणीही त्यांच्याकडे येऊन कांहीं विचारलें अगर कोणी मदत, देणगी मागायला आला कीं "भाऊरावांकडे जा, माझ्याकडे काहीं नाहीं. ते करतील तें योग्य करतील. मला तें कबूल आहे." असें म्हणत. त्यांच्या स्वभावांत हा मोठा गुण होता. त्याना पक्कें माहीत होतें कीं आपण पूर्ण अशिक्षित आहोंत. भाऊराव फार प्रामाणिक व जातिवंत कारकून आहेत. त्यांच्या हातून आपलें कधींही नुकसान होणार नाहीं. भागीदारावरच्या विश्वासाचें केवढें हें उदाहरण आणि म्हणूनच किर्लोस्कर कंपनीची भागीदारी पुष्कळ वर्षें अप्रतिहत टिकली. त्यानंतर भागीदारीमध्यें बगलबच्च्यांच्या चिथावणीनें अविश्वासाचें बीज पेरलें गेलें आणि भागीदारी बुडबुड्याप्रमाणें होऊन गेली. नाटकाचे धंदे बुडायला ही एक अविश्वासी वृत्ति कारण झाली. किर्लोस्कर कंपनींतहि, प्रत्येक मालकाभोंवतीं फिरणारे अवतेभंवते होते. परंतु त्यांपैकीं एकाचीहि बुद्धिभेद करण्याची छाती झाली नाहीं. कारण भागीदारांनीं एकमेकावरचा विश्वास अढळ टेवला होता. एकादे वेळीं मोरोबा रागावून बेभान झाले म्हणजे भाऊरावांनीं नुसतें "मोरोबा काय हें" असें म्हणतांच त्यांच्या रागाचा पारा उतरून ते भाऊरावांना उलट आपल्या रागाचें कारण पटवून देत. मोरोबा इतकीं वर्षें दुष्यंत, अर्जुन, वसिष्ठ, पुरुरवा हीं कामें करीत. परंतु त्यांना प्रॉम्पिटग शेवटपर्यंत लागे. प्राम्प्टरचें काम म्हणजे त्या वेळीं सुळावरची पोळी असे. मोरोबा चुकले तरी दोष प्रॉम्प्टरचाच. हळू सांगितलें कीं "लेका किती हलके सांगतेस ?" जरा मोठ्यानें सांगितलें कीं "किती मोठ्यानें बोंबलतोस ?" इतकेंही होऊन चुकलें कीं मोरोबा आंत यायच्या आंत प्रॉम्प्टरला लपून बसावें लागे. कारण पाटींत केव्हां रट्टा बसेल याचा नेम नसे. नाटकाच्या सुरवातीपूर्वी अर्धा तास ऊद घालण्याची वहिवाट असे व तो ऊद

मोरोबांनीं घालायचा. हा ऊद सुरू होण्याचें कारण मोरोबांच्याच तोंडून ऐकलें तें असें होतें—

१८८० सालीं ता. ३१ आक्टोबर रोजीं किर्लोस्कर कंपनीचा शाकुंतल नाटकाचा प्रथम प्रयोग झाला. मोरोबा हे देवभोळे व साधुसंतांचे नादी असत. त्या वेळीं पुण्यास जंगली महाराज म्हणून साधु हयात होते. त्यांचा मठ आतां मोठा झाला असून दर्शनाला दर गुरुवारीं वगैरे गर्दी जमते. प्रयोगाच्या दिवशीं दुपारीं मोरोबा टांगा करून जंगली महाराजांच्या मठांत जाऊन पायां पडून समोर बसले. त्यांना जंगली महाराजांनीं विचारलें "मोरू तुम बहोत घबराट दिखता है. घबराव मत." त्यावर मोरोबांनीं उत्तर दिलें कीं "महाराज, अण्णासाहेब किर्लोस्करांनीं शाकुंतल नाटक रचलें आहे त्याचा आज प्रथम प्रयोग आहे; मी आपला असा वेडाबोंगाडा! मला त्यांत दुष्यंताचें मुख्य काम दिलें आहे. परंतु माझें काम चांगलें होईल कां कसें होईल या शंकेनें मी घाबरलों आहें; परंतु महाराज, आपण प्रयोग पहायला जर समोर येऊन बसलां, तर मात्र मला धीर येऊन माझें काम खात्रीनें चांगलें होईल." त्यावर जंगली महाराजांनीं पाटीवर थाप मारून डोक्यावर हात फिरवून सांगितलें "बेटा मी येऊं शकत नाहीं. परंतु वाईट वाटूं देऊं नकोस. बेटा ले जा ये उदी" असें म्हणून आपल्या जवळचा लोबान ऊद मूठभर दिला. तो शुभप्रसाद समजून मोरोबा घरीं आले. सायंकाळीं एक धुपाटणें तयार करून चांगला एक शेर लोबान (ऊद) विकत आणून त्यांत तो जंगली महाराजांनीं दिलेला ऊद मिसळला; व नाटक प्रयोगाच्या अगोदर थिएटरमध्यें घातला. त्या दिवशींच्या प्रथम प्रयोगांत मोरोबांचेंच काम सर्वांत अप्रतिम झालें. कै. केरूनाना छत्रे नेहमीं मोरोबांसमोर अण्णासाहेबांना म्हणत "अण्णा, हा मोरोबा असा गबाळ्या, वेडा बोंगळा आणि याला तुम्ही महत्वाची दुष्यंताची भूमिका कशी दिलीत कोण जाणे" परंतु दुसऱ्या दिवशीं प्रत्यक्ष केरूनानांनीं मोरोबांची पाठ थोपटली. तेव्हां मोरोबांना वाटलें कीं हा जंगली महाराजांच्या उदाचा परिणाम झाला. किर्लोस्कर कंपनींतील ती ऊद घालण्याची परंपरा किर्लोस्कर संप्रदायाच्या सर्व कंपन्यांतून पुढें कायमचीच सुरू झाली.

उदाच्या बाबतींतील भाविक कल्पना बाजूस ठेवली तरीहि बंद असलेल्या अंधाऱ्या कुबट नाटकगृहांतील घाणेरडी हवा घालविण्यास व वातावरण सुगंधी शुद्ध व प्रसन्न होण्यास त्याचा फायदा खास होई.

नाटकापूर्वी अर्धा तास ऊद घालून मोरोबा रंगायला बसत. ते रंगायला बसले म्हणजे जिकडे तिकडे चापचूप. पिवडी, हिंगूळ गालावर लावून नंतर कापराच्या धरलेल्या काजळानें भिवया रंगवीत. डोळ्यांत काजळ घालीत. गंध, मुद्रा वगैरे लावून झाल्यानंतर डिकानें मिशीचे आकडे विचवाच्या नांगीसारखे वळवीत. त्याचें हें रंगणें चाललें असतां माझ्यासारखा एखादा मुलगा कुतूहलानें पाहूं लागला आणि त्याच वेळीं त्यांची भिवई रंगविण्यांत चूक झाली म्हणजे ते "अरे लेका माझ्याकडे पहातोस? तुझ्यामुळें माझी भिवई बिघडली ना!" असें एकदम खेकसत. त्यांचें रंगणें चालू असतां स्टेजमॅनेजर नव्या नवरीप्रमाणें वरचेवर घंटेची वेळ झाली असें सुचवावयास येई. ते खुषींत असले व रंग संपण्यास हिशेबी वेळ आहे असें वाटलें तर "झाली घंटेची वेळ? चांगली घणघण घंटा दे" असें सांगत. तब्बेत खुषींत नसली म्हणजे स्टेजमॅनेजरकडे मुद्दाम बघायचे नाहींत. अशा वेळीं स्टेजमॅनेजरची चुळबुळ लक्षांत घेऊन भाऊरावच त्याला म्हणत "काय घंटेची वेळ झाली? मग द्या घंटा" भाऊरावांनींच सांगितलें म्हणजे मग मोरोबा कांहीं बोलत नसत. पण भाऊराव रंगून जाऊं लागले म्हणजे मोरोबा म्हणत "माझं झालंच आहे, परंतु आहेत, भाऊराव आहेत." याचा अर्थच असा कीं मोरोबांचा चेंगटपणा संपायचा नाहीं. वेषसिद्धतेला धांदल आणि उशीर व्हायचा. त्यांच्याकरितां भाऊरावांना नटीचीं पदें घोळून घोळून लांबवावी लागत. रंगून उठल्यावर धांदली धांदलीनें पळतच कपडे करायला जात असत. कपडे चढविणाराला आबांच्या हातचा मार बसल्याशिवाय निभावलें म्हणजे एखाद्या दीव्यांतून बाहेर पडल्यासारखें वाटे. नाहीं तर स्टॉकिंगला भोंकच आहे, पेंड्याचा गोपच चांगला नाहीं, पगडीचे पीळच नीट नाहींत, मागच्या खेळाची पगडी तशीच ठेवलेली दिसते अशा हजारों सबबी काढीत आणि यामुळेंच आबांचा चेंगटपणा संभाळून घेण्याकरित

भाऊरावांना पदेंहि लांबवावीं लागत. रंगभूमीवर जातांना कोणी बोडका समोर आलेला त्यांना खपत नसे.

"तुमच्यामुळें नाटकाच्या सुरवातीला ४।५ मिनिटें तरी उशीर होतो" असें मोरोबा व भाऊराव बोलतांना भाऊरावांनीं सहज म्हटलें. त्यावर मोरोबांनीं "माझ्यामुळें मुळींच उशीर होत नाहीं आणि करूंही नका." असें मोरोबांनीं ठराविक उत्तर दिलें. तें लक्षांत ठेवून भाऊरावांनीं पुढचेंच सौभद्र बरोबर वेळेवर सुरूं केलें. नटीचीं पदं जशीं म्हणावयाचीं तशींच म्हटलीं. नटीचें पद संपतांच "हा मूढा भरतकुलाधमा" हें वाक्य मोरोबांनीं आंतूनच कसें तरी म्हटलें. नटी सूत्रधार आत आले. अर्जुनाचा प्रवेश व्हायला १।२ मिनिटें उशीर लागलाच. कारण आबांचा नेहमींचा चेंगटपणा आड आला. उशीराबद्दल आज रागावण्याचीं सोय नव्हती. त्याचें बोलणें ते विसरले होते. ते रंगभूमीवर गेल्यावर त्यांची धांदल आणि घोटाळा बघून भाऊराव आदि मंडळी गंमतीनें हंसली. त्यांचा क्रम पुढें असाच चाले.

मोरोबांचें कुटुंब अगदीं जुन्या वळणाचें होतें. त्याच्या कुटुंबाच्या भाबडेपणाची एक गंमतीची झालेली गोष्ट येथें देतों. पहिल्यादाच सौभद्र नाटक आबांच्या पत्नीनें पाहिलें. चौथ्या अंकांत मोरोबाना यतिवेषांत पहातांच "अहो, मी आहे ना? मग असा संन्यास घेऊन नारायण नारायण काय म्हणतां?" असें व पुढें सुभद्रेनें अर्जुनाला म्हणजे भाऊरावांनीं मोरोबांना आलिंगन देतांना पाहून "इश्श. अहो असें काय हें? अहो मी बायको समोर आहे ना? हें काय हें?" असे उद्गार काढले!

मोरोबा अंगांत मलमलीचा सदरा घालीत. तलम धोतरें वापरीत. सदऱ्यावर जाकीट असे. गळयांत घालायच्या शेड्याचे सुंदर वॉच बाळगीत. ऋतुपरत्वें गरम अगर सुती कपड्याचा बंदाचा अंगरखा वापरीत. पहिल्यांदा कांहीं काल डोक्याला पागोटें घालीत असें म्हणतात. पण मी त्यांना पाहिलें त्या वेळीं ते लिंबोळी रंगाचा पटका बांधीत. कपाळावर दुबोटी आडवें गंध, कानांत अत्तराचा फाया, पायांत चढाव असा त्यांचा थाट असे. ते झपाट्यानें चालत. बांधेसूद धष्टपुष्ट शरीर असल्यानें

चालतांना ते एखाद्या पंचविशींतल्या तरुणाप्रमाणें दिसत. ज्या मद्यपानाच्या व्यसनाबद्दल आरंभीं किर्लोस्कर कंपनीची प्रसिद्धी होती त्या बाबतींत तेही होते. परंतु मी कंपनींत जायच्या अगोदर दोन वर्षांपूर्वीच त्यांनीं मद्यप्राशनाबरोबर कांदा लसूणहि अजिबात वर्ज्य केलें होतें. इतके ते संयमी होते. एकंदरींत मोरोबाची कंपनींतील कारकीर्द सर्व दृष्टीनें त्यांना सुखावहच झाली. १९०८ च्या जानेवारींत सुखानेंच त्यांची अखेर झाली. नाटकवाला दारिद्र्यांतच मरायचा या म्हणीला प्रथम कोल्हापूरचे विनायकराव कवटेकर आणि त्याच्याप्रमाणेंच दुसरे मोरोबा यानीं हरताळ फासला. मोरोबांची सांपत्तिक स्थिति त्यांच्या हयातीपर्यंत कधींही हाल अपेष्टेची नव्हती.

## भाऊराव कोल्हटकर

मोरोबांच्या बरोबर याच ठिकाणीं भाऊराव कोल्हटकर याच्याबद्दल लिहिणें उचित आहे. भाऊराव अंगानें गोंडस; रंग अतिशय गोरा; नाक, सरळ तरतरीत; डोळे किंचित् लहान; पिंगट केस. दाढी-मिशीला केस अगदीं कमी. तेही भोरे असल्यानें चेहेरा फार नाजूक दिसे. आवाज अत्यंत गोड पल्लेदार. नाट्यसृष्टींत संगीत नाटकें सुरू झाल्यापासून भाऊरावाच्यासारखा चढा, पल्लेदार, सुरेल आवाज आजतागायत रंगभूमीवर ऐकलाच नाहीं. जणूं संगीत नाटकाच्या उत्कर्षासाठींच ईश्वरानें भाऊरावांना निर्माण केलें असावें. त्याचें गाणें विशेष शास्त्रशुद्ध नव्हतें. यमन, भूप, भैरवी, तोडी यांसारखे नित्य परिचयाचे राग सोडले तर इतर रागांत भेसळ होत नसे असें नाहीं. पण तेही आपण गवई नसून संगीत गायक आहोंत असेंच म्हणत. त्यांच्या गाण्यांत लावणी व ठुमरीचा ढंग असे. त्यामुळें त्यांचें गाणें आबालवृद्धांना, जाणत्यानेणत्यांनाहि फार आवडे. किर्लोस्करी संगीताचें वळण पहिल्यापासून शास्त्रीय गाण्यापेक्षां गाणें गोड गायचें असें असल्यामुळें व त्याला वळण देणारा बाळकोबा नाटेकरासारखा सर्वरंगी कलावंत लाभल्यामुळें संगीत म्हणजे गोड गाणें हेंच समीकरण ठरलें. बाळकोबा नाटेकरांचें गाणें भाऊरावांनीं पुष्कळ ऐकल्यानें त्यांच्या गाण्यांतल्या सर्व बारकाया, सर्व रंग आत्मसात्

केले. भाऊरावांच्या आवाजांतच असा लवचिकपणा होता कीं बारीक गोड आवाज म्हणजे बारा तेरा वर्षांच्या कोंवळ्या मुलासारखा व वीर-रसाच्या वेळेस कानाचे पडदे फाटतील असें वाटण्याइतका कठोर व जोरदार. त्यांचें गाणें अतिशय तालबद्ध, लय तर त्यांच्या हातच्या मळासारखी होती. आम्हाला ते नेहमीं सांगत " माझे वडील हरदास होते. त्यांच्या-मागें साथीला उभे रहाण्याच्या संवयीमुळें लय व सभाधीटपणा यांचा पुरा लाभ मला झाला. "

कंपनींत नित्य पंचपदी होई. एखाद्या वेळीं भाऊराव पंचपदीला बसत. झांज इतकी सुंदर वाजवीत कीं पखवाजी जसे पखवाजांत बोल काढतो तसे बोल झांजेंतून ते काढीत. त्यांचा स्वभाव अत्यंत प्रेमळ होता. मोरोबांबद्दल भीति वाटे तर भाऊरावांबद्दल आदर वाटे. किर्लोस्कर कंपनीचे ते मूर्तिमंत वैभव भासत, इतकें त्यांचें तेज असे. त्यांच्या प्रेमळपणामुळें ते आमच्याशीं बोलले म्हणजे माझ्यासारख्याला कृतकृत्य वाटे. त्यांना पत्ते खेळण्याचा, वर्तमानपत्रें, कादंबऱ्या वाचवून घेण्याचा नाद असे. गुलाब, वाळा, पांच हीं अत्तरें त्यांना आवडत. शक्य तितका पांढरा तलम पोषाख त्यांना मनापासून आवडे. वीर रसाचीं आणि करुण रसाचीं त्यांचीं पदें रंगभूमी-वर इतकीं उत्तम वठत कीं वीर रसाच्या पद्यगायनाबरोबर स्फुरण व करुण रसाच्या पद्यगायनाबरोबर दुःखाचे उसासे थिएटरमध्यें निर्माण होत. सुभद्रेचीं करुणरसात्मक पदें व मंथरेचीं वीररसात्मक पदें त्यांनीं म्हण-तांना ऐकलें म्हणजे सुभद्रेचीं गोड पदें म्हणणारे ते हेच का भाऊराव असा ऐकणाराला भ्रम उत्पन्न होई. वीर व करुण या दोनही रसांवर सार-खीच पकड ठेवण्याचें कसब भाऊरावांशिवाय इतर कोणालाही आजपर्यंत साधलें नाहीं. शापसंभ्रमच्या दुसऱ्या अंकांतील कपिंजलाबरोबरचा प्रवेश पहातांना भाऊरावांनीं "कोण जगीं या तुजविण दुसरा मज विश्वासाचा" हें कपिंजलाच्या कठोर झालेल्या मनाला पाझर फोडण्यासाठीं म्हटलेलें पद ज्यांनीं ऐकिलें असेल त्यांनाच माझ्या म्हणण्याची साक्ष पटेल.

भाऊरावांच्या हयातींत तेच एक सर्वश्रेष्ठ नट होते. त्यांच्या वेळीं महाराष्ट्रांत जितका म्हणून गाण्यांतला गोडवा व संगीतांतला योग्य

असा ढंग त्यांच्या ऐकण्यांत आला होता तितका सर्व त्यांच्या गाण्यांत पूर्ण उतरला होता. त्यांच्या गळयाचा धर्मच असा होता कीं गाण्यांतली एखादी गोड जागा त्यांच्या ऐकण्यांत आली कीं पुरे.ती त्यांच्या गळयांतून निघाय-चीच. त्यांचीं पदें ऐकणाराच्या कानांत इतकीं भरलीं जात कीं नाटक होऊन १५।१५ दिवस झाले तरी अंथरुणावर पडल्या पडल्या आठवण झाली म्हणजे तीं आतांहि ऐकतोंच आहोंत असा भास व्हावा. पद म्हणतांना भाऊराव मूर्तिमंत रस उभा करीत. पदांतल्या शब्दांचे उच्चार स्पष्ट असत व शब्दांची ओढताण न कळत क्वचितच त्यांच्याकडून होई. पण त्यांचें एकंदरींत सर्व गाणें निर्दोष आणि रसानुकूल असेंच असे.

भाऊराव रंगभूमीवर आपलें काम नेहमीं अतिशय मन लावून करीत. कमी प्रेक्षक, जास्त प्रेक्षक असा पंक्तिप्रपंचात्मक भेदभाव त्यांच्या ठिकाणीं नव्हता.

किर्लोस्कर कंपनींत जेवणाचा थाट एखाद्या संस्थानिकाच्या खाशा पंक्तीप्रमाणें अप्रतिम असे. नाटकाच्या दिवशीं संध्याकाळीं पिठलेंभाताची पंगत होई. नाटक संपल्यानंतर पहाटे पुनः पंगत असेच. नाटकाच्या वेळीं थिएटरमध्यें दशम्या, भाजी, दही असें फराळाचें असे. नाटकाच्या वेळीं गरम चहाचा प्रघात बिलकुल नव्हता.

नव्या जुन्या नाटकांच्या तालमी दुपारच्या जेवणानंतर संध्याकाळ-पर्यंत चालत असत.

* * *

## १८९५ सालच्या सर्वसाधारण नाटक मंडळ्या

किर्लोस्कर मंडळीसारख्या अव्वल दर्जाच्या कंपनीमधील अंतर्बाह्य साजसजावट सोडली तर अवांतर नाटक मंडळयांच्या रंगभूमीवरील थाट कायम पद्धतीचाच असे. नाटकांतल्या राजाचा वेष पगडी, अनुकूलते-प्रमाणें तुऱ्यासह शिरपेच, फीत लावलेला साटिनचा अंगरखा, काखेंत शेल्याचा बोळा, हातांत तलवार, कानांत इअरिंग (भिकबाळी), गळयांत पेंडी कंठें, पायांत तुमान किंवा पचंग मारलेलें धोतर, भेंडी बाजारांतील खोट्या कलाबतूचे दिल्लीचे चढाव, भल्या मोठ्या शेडीचे दोन्ही

खांद्यावर पाठीवर सोडलेले केंस; पौराणिक नाटकांचे संगीतांत रूपांतर झालें तेव्हां धोतराचे किंवा पितांबराचे कांठ पायाला गुंडाळणें बंद झालें. किरीट कुंडलांची जागा पगडीनें घेतली. कोणत्याही नाटकांतला राजा मुद्रा लावी, त्यामुळें सर्व राजे वैष्णवच वाटत. अभिनयाच्या बाबतींत प्रत्येकजण पदांतल्या प्रत्येक शब्दाचें अॅक्टिंग करी. ती पद्धत चांगली किंवा वाईट याची चर्चा करीत नाहीं. पण जी होती ती उत्तम रीतीनें किर्लोस्करांतच दिसे. इतर ठिकाणीं निरनिराळ्या रीतीनें हात झिंजाडण्यापलीकडे कसलाच अभिनय नसे. मात्र त्या काळचीं नाटकें सहजसुलभ पद्यरचनेचीं असल्यामुळें पद्यें ऐकतांना अर्थ सहज समजे व त्या त्या नाटकांतला जो रस असेल त्याची हानि होत नसे. त्या काळीं स्त्रीपात्रांचा वेषहि त्या काळच्या समाजांतील बायकाच्या परिवेषाचा द्योतक असे. स्त्रीपात्र बहुतेक अंगचे केस ठेवी. नसल्यास टोपाची पट्टी, ऐती तिपेडी वळलेली वेणी, टोपाच्या गांठीखालीं आवळून बांधीत. त्या वेणीमुळें स्त्रीपात्राच्या डोक्याला गांठी येत. डोक्यांतील दागिने म्हणजे खोप्यावर पितळेचीं फुलेंच फुलें गुंफलेली असत. केकत, केवडा, राकडी हे दागिने भांगाच्या मध्यें घालीत. कानांत काप, नाकांत नथ, हातात पितळेचे गोट, पाटल्या, तोडे. कंपनीच्या सांपत्तिक परिस्थितीप्रमाणें जर्मन सिल्व्हरचे किंवा चादीचे पायांत शिदेशाई तोडे घालीत. राणीला पैठणी, शालू व दासीला लुगडीं इतकाच फरक. बाकी वेषभूषेंत मालकीण आणि दासी सारख्याच. मालकाच्या विशेष प्रीतींतल्या एखाद्या नटानें हट्ट घेतल्यास त्याची सामान्य भूमिका असली तरी मालक त्याला शालू नेसायला देत असत! उत्तम, देखण्या व गोंडस मुलांचीच निवड स्त्रीभूमिकेला असल्यानें अशा मुलांच्या भोंवतीं त्यांच्या सौंदर्यावर आषक होऊन त्यांच्याशी मैत्री जोडायला कित्येक लाळघोटे आतुर असत. गुण कमी असला तरी सौंदर्याच्या जोरावर स्त्रीनट अशा लाळघोट्यांना आपल्याभोंवतीं गुंगवीत ठेवीत. या लाळघोट्यांचे कंपनींत ओळख करून घ्यावयाचे मार्गहि विचित्र असत. कंपनीच्या मालकांची हांजी हांजी करणें, स्वयंसेवक वृत्तीनें त्यांची वाटेल ती कामगिरी पत्करणें, दुसऱ्या कंपन्यांची टेहेळणी—मालकांना रुचण्यासारखी असल्यास

आणि ती रुचण्यासारखी असायचीच–ती करणें "अमक्या कंपनींतील माणसें तुमच्यांतला उत्तम मुलगा आहे त्याला फोडून पळवून नेणार आहेत अशी मालकाला गांगरायला लावणारी बातमी देणें व त्याच्या प्रतिकाराची कामगिरी स्वखुषीनें अंगावर घेऊन मुलाला संभाळण्याचें भय्याचें काम मालकांनीं सांगितलें तरी तेंही पत्करणें. अशा रीतीनें कंपन्यांत शिरकाव करून लाळघोटे स्त्रीनटाशीं संधान बांधीत. यापुढील त्यांच्या कामगिऱ्या म्हणजे स्त्रीपार्टी नटाला बरोबर फिरायला घेऊन जाणें, त्याला आवडतील त्या वस्तु विकत घेऊन देणें, तुझ्या डोळयांत कांहीं आकर्षक जादु आहे अशासारख्या स्तुतीचा खुराक चारणें अशा असावयाच्या.

अशा भरमसाट स्तुतीमुळें अपरिपक्व बुद्धीचीं पोरें लाळघोटयांना नादीं लावीत. हे स्त्रीनटहि असे लाळघोटे आपलें सर्वस्व आहे असें भासून वेडेपिसे करीत. अशा लाळघोटयांच्या अशा स्थितीचें कोणालाच कांहीं वाटत नसे. पण असल्याच यांच्या स्नेहविशेषांत फाटाफुटीचीं बीजें रुजत.

* * *

किर्लोस्कर कंपनींत मी दाखल झाल्यानंतर एक महिन्यानेंच बक्षीस लावून पसंत केलेलें श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांचें वीरतनय नाटक कंपनीनें बसविण्यास घेतलें. वीरतनयांत भूमिकांची वांटणी खालील प्रमाणें होती:

शूरसेन–भाऊराव, वीरसेन–दडपे, शालिनी–कृष्णराव गोरे, मालिनी –ग. बोडस, प्रकोप–रामभाऊ, बकूल–बाबू गाडे, शुंभसेन–चिंतोबा.

वीरतनय नाटकाच्या नकला पात्रांना पाठ करण्यास दिल्या. या वेळीं कंपनी मुंबईस होती. डिसेंबरमध्यें राष्ट्रीय सभेचें अधिवेशन पुण्यास असल्या-मुळें कंपनी पुण्यास रवाना झाली. राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष सुरेंद्रनाथ बानर्जी होते. कॉंग्रेस, अधिवेशन सर्वच प्रकार आम्हाला नवीन होते. निरनिराळ्या प्रांतांतले प्रतिनिधी अधिवेशनाला आले होते. कंपनीची विशेष परिचित मंडळी आणि त्यांचीहि स्नेही मंडळी असे बरेच लोक कंपनींत उतरले होते. देवलमास्तरांना त्याच वेळीं मी प्रथम पाहिलें. कंपनींत रोज गमतीचे वादविवाद चालत. त्यांतच देवलमास्तर व तात्यासाहेब

कोल्हटकर यांच्यामध्यें खडाजंगीचा वाद झाला. नाटकें, त्यांचीं कथानकें, नाटकांतील पदें यांवरील वाद भरांत आला. कोल्हटकरांच्या वीरतनयांतील "सुखाशा कांहीं मातें नाहीं या लोकीं" या पदांतील यतिभंग. "प्रिया कांताननना कांता" या चरणांत प्रिया कांता। नना कांता असें म्हणावें लागे. म्हणजे 'प्रिया कांता' येथें यति पडून 'नना कांता' हें निराळें म्हणावें लागे. एका दमांत चरण जोडून म्हटला म्हणजे यतिभंग टाळतां येतो. या यतिभंगाचें भांडण वाढीला लागलें. कोल्हटकरांनीं देवलांच्या "नंदन वन दे। वीने माझा। आदर बहुक। रुनी" या त्यांच्याहि पदातल्या यतिभंगाचा मासला दाखवून दिला. त्यामुळें प्रकरण जास्तच चिडीला गेलें. शेवटीं कोल्हटकरांनीं देवलांना "तुम्हांला माझ्या नाटकांवर टीका करण्याचा अधिकार नाहीं. भाषांतरापलीकडे तुम्ही आज स्वतंत्र काय लिहिलें आहे?" असें ठणठणीत सुनावलें. कडाक्याचा वाद झाला. देवल आपला मत्सर करतात असा कोल्हट-करांनीं आपला ग्रह करून घेतला हें मात्र खरें आहे. पुढें दोघांच्या पुष्कळ बैठकी झाल्या. पण गढूळ मनें कायमचींच राहिलीं. देवलमास्तर तात्यासाहेबांना पदें सुबोध करण्याबद्दल नेहमीं सांगत. आणि तें एका तऱ्हेनें खरेंहि होतें. नैसर्गिक कल्पनाशक्ति उत्कृष्ट असतांना पदें दुर्बोध कां करावींत? असें देवलांना वाटे. आणि तसें पाहिलें तर तात्यासाहेबांच्या वीरतनय, मूकनायक, गुप्तमंजूष, मतिविकार, प्रेमशोधन, सहचारिणी या नाटकांतून उत्तरोत्तर पदांत सुबोधपणा देवलांच्या कल्पनेप्रमाणें येतहि गेला आहे. पार्शी चालीवरील पदें केल्यामुळें उर्दूतला प्रासबद्धपणा उतर-वितांना कोल्हटकरांचीं पदें दुर्बोध झालीं.

पुण्याची कॉंग्रेस संपून आमची कंपनी सोलापुरीं गेल्यावर वीर-तनयाच्या तालमी जोरानें सुरू झाल्या. तात्यासाहेब कोल्हटकरहि मंडळींत रंगले होते. मार्चमध्यें कंपनी बार्शीस गेली. तेथें असतां माझी धाकटी बहीण कृष्णाबाई हिचा विवाह झाला. त्या वेळीं ती नऊ वर्षांची होती. माझ्या स्थितीच्या मानानें स्थळ ठीक होतें. कंपनीकडून चार महिन्याच्या पगाराचे ४० रुपये आगाऊ घेऊन लग्नासाठीं आईला दिले. हें स्थळ



किर्लोस्कर नाटक मंडळी–सन १८९८.



श्री. बालगंधर्व व श्री. गणपतराव बोडस.

म्हणजे गुहागर येथील खाडिलकर घराण्यापैकीं शिवरामपंत खाडिलकर होत. ते जी. आय्. पी. च्या डी. टी. एस्. कचेरींत २५ रुपये पगारावर झांशी येथें कारकून होते.

एप्रिलमध्यें अहमदनगर येथें कंपनी गेली. तेथेंच मे महिन्यांत वीर-तनयाचा पहिला प्रयोग झाला. आनंदनिधान थिएटरमध्यें आमचे प्रयोग होत असत. वीरतनय नाटकाकरितां नव्या तऱ्हेचे कपडे केले होते. पुरुषपात्रांना केसाचे बाबऱ्याचे विग, बाजूला पंखासारख्या सुटलेल्या भागाचे फीत लावलेले मखमलीचे कमरेच्या जरा खालीं असे कोट, इंग्लिश ब्रीचीससारख्या गुडघ्यापर्यंत पोकळ अशा मखमालीच्या अर्ध्या तुमानी, स्टॉकिंग व जरीचे चढाव, डोक्याला पटके. यातही जुनी पुराणी शिरपेंचाची पगडी वीरसेनानें कायम ठेविलेली होती ! स्त्रीपेहरावांत नवा बदल नव्हता. सीनसीनरी थोडी केली होती. नाटकांत मुलांना नाच घातला होता. नाच-णाऱ्या मुलांना पार्शी कंपनीसारखे कपडे केले होते.

मराठी कंपनींत वीरतनयाच्या वेळीं प्रथमच पोषाखाचें नाविन्य दिसल्यानें प्रेक्षकवर्ग खूष झाला. प्रथम प्रयोगाला कोल्हटकरांचे वडील बंधु दत्तोपंत व दिगंबरपंत, नागपूरचे डॉ. गर्दे वगैरे बरीच स्नेही मंडळी आली होती. या मंडळींची करावी तशी विचारपूस कंपनीच्या व्यवस्थापकांनीं केली नाहीं असा समज झाल्यानें तात्यासाहेबांनीं सर्व मंडळींना कंपनी-बाहेर उतरविलें. पहिल्या खेळाचीं तिकिटें खरेदी करण्याचीहि त्यांनीं तयारी केली. पण समजासमजी होऊन तें प्रकरण थोडक्यांत मिटलें. पुढें कंपनी नाशिकला गेली. त्या वर्षी सिंहस्थ असल्यामुळें तपोवनांत बैराग्यांचे तांडेच्या तांडे उतरले होते. ती गम्मत पहायला आम्ही नित्य जात असूं. त्याच वेळीं भाऊराव सहकुटुंब व कंपनींतील कांहीं मंडळी त्र्यंबकेश्वराच्या दर्शनास गेली. मोठा मजा आला.

नंतर कंपनीनें कल्याण घेतलें. सुभेदाराच्या वाड्यांत मांडव घालून प्रयोग सुरू झाले. त्या वर्षी भयंकर पावसाळा सुरू होऊन कल्याणची खाडी मर्यादेबाहेर फुगली. गांवभर पाणीच पाणी झालें. गांवांतून स्टेशनवर जायला होडी लागूं लागली. मुंबई, पुणें, नाशिक बाजूचे रेल्वे रस्ते वाहून

गेले. एंजिन चालूं शकणार नाहीं इतकें पाणी रेल्वे लाइनवर होऊन रस्ते बंद झाले. ओकांच्या घरांत आमची कंपनी उतरली होती. त्या घराच्या तिसऱ्या मजल्यावर उभे राहून कल्याणला बेटाचें स्वरूप आल्याचें आम्हीं पहात असूं. कंपनीला आर्थिक प्राप्ती बेताची झाली. तेथून बाहेर कसें पडायचें ही काळजी पडली. डांसाबद्दल कल्याण प्रख्यात आणि डांस फार भयंकर. कल्याण सोडल्यावर भाऊराव व शंकरराव यांच्याशिवाय आम्हा सर्वांच्या शरीरावर डांसांच्या झालेल्या प्रभावी माऱ्यामुळें आमचीं सर्वांचीं तोंडें, हातपाय आदि अवयव नुकत्याच काजिण्या येऊन गेल्याप्रमाणें दिसूं लागले ! !

आम्ही कल्याण येथें येत असतां नवीनच निघालेली "नाट्यकला-प्रवर्तक मंडळी" ठाण्यास प्रयोग करीत होती. तिचा रामराज्यवियोग खेळ बघण्यास आम्ही गेलों. भाऊरावांचें काम डोळ्यापुढें नाचत असल्यामुळें त्यांचा प्रयोग आम्हाला बिलकुल आवडला नाहीं.

भाऊरावांच्या कामाशीं तुलना करण्याचें बाजूला ठेवलें तर नाट्य-कलाप्रवर्तक मंडळींतील गोपाळराव मराठे, माधवराव केळकर, दत्तोपंत खाडिलकर, वासुदेवराव पटवर्धन, सितारामपंत बापट ही मंडळी पात्रें या दृष्टीनें चांगलीच होती. गोपाळरावांचा आवाज मऊ, कुंद जव्हारी नाहीं असा असल्यामुळें भाऊरावांच्या मंथरेच्या कामाच्या मानानें गोपाळरावांचें मंथरेचें काम भेंड्याच्या भाजीसारखें बुळबुळीत वाटलें. माधवराव केळकरांचा आवाज चांगला चढा पण गोडी नाहीं. नाकांत ताना मारण्याची संवय, लांबलचक लावणीची तान मारतांना ते डोळे झाकीत त्यामुळें एखादा गोंधळी गाणें म्हणतो आहे असें वाटे. त्या वेळचें आतांच्या दृष्टीनें हें माझें निरिक्षण आहे. पण तसें पाहिलें तर त्या कंपनीचा सर्वसाधारण पात्रसमूह चांगलाच होता.

* * *

कल्याणच्या मुक्कामीं कंपनीची वार्षिक सुट्टी झाली. मी पुण्यास आलों. आपल्या परिवारासह रामभाऊ किंजवडेकर पुण्यास आले. कंपनीला वार्षिक सुट्टी देण्याचें प्रयोजन अशाकरितां असे कीं त्या काळीं

कंपनींतल्या मंडळीनीं आपलीं बायकामुलें बरोबर घेण्याची वहिवाट नसे. पुष्कळांना तें परवडण्यासारखेंहि नसे. भाऊराव, मोरोबा हे आपल्या बायकांना केव्हां तरी बरोबर घेत. वार्षिक सुट्टीची चाल फक्त किर्लोस्कर मंडळींतच होती. विवाहित मंडळींना या सुट्टीमुळें वर्षांतून एकदां आपल्या घरीं जाऊन एक दोन महिने विश्रांति घेण्यास मिळे. ही सुट्टी बहुतेक बिनपगारी असे. व्यवस्थापक व कंपनीचें सामान संभाळणारे यांना निम्मा पगार असे. ज्या मुलामाणसाना घरीं [illegible]ाची सोयच नसे त्यांच्या रहाण्याजेवण्याची व्यवस्था कंपनीच्या खर्चानें होइ. ही व्यवस्था रामभाऊंच्या विद्यमानें चाले. त्यावरून "रामभाऊ मुलांना संभाळणारी आत्याबाई आहे" असे भाऊराव केव्हां केव्हां गमतीनें म्हणत. १८९७ पर्यंत कंपनीची कॅश व्यवस्थापकांकडे असे. पुढें ती रामभाऊकडे ठेवली जाऊं लागली. जमाखर्च भाऊराव रोज तपाशीत. त्यामुळें अनागोंदी कारभार नव्हता. १० रुपायांखालील पगारदारास वर्षांतून एक महिन्याचा (उपदंशाखेरीज अन्य आजाराबद्दल) औषधखर्च कंपनी देई. जरूर व सवड असेल त्या मानानें नोकरांची पगारवाढ होई.

## कंपनीच्या खर्चाचें अंदाज पत्रक

मॅनेजराचा पगार ४५ रु. नारायणबुवा मिरजकर ४५ रु. काशिनाथपंत परचुरे ३० रु., दडपे ३० रु., गोरे २५ रु. यांच्याखालीं तबलजी १८ रु, पेटीवाला १५ रु. असे पगार होते. आम्हा मुलांपैकीं मला १० रु., शंकर कडू १० रु., राजाराम कडू ५ रु., बाबू गाडे १० रु. याप्रमाणें मिळे. महिन्याच्या पगाराची रक्कम ४००—४५० रुपये होत असे. भोजनखर्च बादशाही थाटाचा असूनहि ३००—४०० रु. पर्यंत बसे. कंपनीचा सरासरी मासिक खर्च एकंदर १५००—१६०० शेंच्या पुढें नसे. कंपनीच्या उत्पन्नाचें मान मुंबईस शनिवार रविवार मिळून आठवड्याचें साधारण बाराशें तेराशेंपर्यंत असे. मुंबईस घराचें व थिएटरचें भाडें जास्त पडे. पुण्यासहि आठवड्याचें उत्पन्न हजार बाराशें होई. इतर गांवीं पुण्याप्रमाणें क्वचित् उत्पन्न होई. पण ८००—१००० आठवडा कोणत्याही गांवीं मिळे. शनिवार बुधवार दोनच प्रयोग होत. क्वचित् रविवारीं दिवसा प्रयोग लागे.

मालकांची वांटणी दर दोन वर्षांनीं होई. मध्यंतरीच्या काळांत महिन्याच्या खर्चास मालक तसलमात घेत. वांटणीच्या वेळीं आपल्या भागांतून तसलमात वजा करीत. 'गुड कान्डक्ट फंड' त्याच वेळीं वांटला जाई. त्याची विभागणी मालकांच्या मतावर अवलंबून असे. त्या फंडांतला मोठा वांटा नेहमींच व्यवस्थापकाला मिळे. हा त्या फंडवांटणींत एक दोष होता. यामुळें आमच्या कंपनींत 'गुड कान्डक्ट फंड' या शब्दास 'गुंड कांड' असें उपहासात्मक रूप मिळालें होतें! कंपनींत बाजारमास्तर, स्टेज-मॅनेजर, मॅनेजर यांच्याकडे कंपनीच्या नित्य खर्चासाठीं तसलमात रक्कम असे.

## शाहूनगरवासी नाटक मंडळी

१८९६ सालीं सुट्टीच्या वेळीं मी पुण्यास असतांना गणपतराव जोशी व बाळाभाऊ जोग यांच्या शाहूनगरवासी नाटक मंडळीचे प्रयोग चालू होते. त्यांच्या हॅम्लेट, त्राटिका, बाजी देशपांडे, पानपतचा मुकाबला, राणा भीमदेव, मर्कटजीचा सूड, या नाटकांचे प्रयोग पहाण्याचा सुयोग मला प्रथमच लाभला. सर्व नाटकें पाहिलीं. गणपतराव व बाळाभाऊ यांचीं कामें पाहून अत्यंत आनंद झाला. गणपतरावांच्या कामाचा ठसा माझ्या मनावर खोल ठसला. या वेळीं गणपतराव २५।२६ वर्षांच्या ऐन उमेदींत होते. त्यांचा ठेंगणा ठुसका ठसठशीत बांधा, गोरापान रंग, कमानदार भरदार भिवया, बाळसेदार आवाज, अस्खलित वाणी, रसानुकूल शद्बावर आघात देण्याची लकब, सुरांचीं मजेदार आंदोलनें, गणपतरावांच्या या किमयेवर मी बहाल खूप झालों. भाऊरावांच्या गाण्यानें जो आनंद होई तितकाच गणपतरावांच्या भाषणानें होई. गद्य असो वा पद्य असो त्यांत रसानुकूल आंदोलनें नसलीं तर आवाजाचा गोडपणा देखील नीरस वाटतो. पद्याप्रमाणेंच गद्य भाषणालाहि लय पाहिजेच असते. त्याशिवाय गद्य कर्णकटु लागतें. गणपतरावासारखा अस्खलित वाणीचा, जोरदार, खणखणीत पण गोड आवाजाचा, रसानुकूल लय व सुरांचीं आंदोलनें घेणारा नट कृष्णराव गोरे व नानवा गोखले यांखेरीज मला आढळला नाहीं. गणपतरावांप्रमाणें स्वरूप, शरीरसौष्ठव इत्यादि नानबा गोखल्यांना नसल्यामुळें ते गणपतरावां-

इतके प्रभावशाली झाले नाहींत. नानबा शक्य तितके गणपतरावांसारखे काम करतात असें लोक म्हणत. ( गणपतरावांच्या हॅम्लेट, त्राटिका या कामांची चाकोरी सोडून नानबा गोखले यांनीं तोतयाच्या बंडांतील नाना फडणीस, कृष्णार्जुन युद्धांत नारद व हाच मुलाचा बाप यांतील डॉ. गुलाब व माईसाहेबांतील अमृतमामा या भूमिका करून आपलें म्हणून थोडें तरी कामाचें निराळेपण पुढें चांगलें दाखविलें. पण जोंपर्यंत सर्वतोपरी अनुकरणासाठीं गणपतरावांचेंच प्रतीक त्यांच्यापुढें होतें तोंपर्यंत त्यांना स्वतंत्र अस्तित्वच नव्हतें. ) याशिवाय इतर सर्व गणपतरावांसमोर आम्ही काय काम करावें ? या कमकुवत विचारामुळें व स्वतःची अक्कलहुषारी मुळींच न वापरतां निव्वळ अनुकरण करण्यामुळें पुष्कळ प्रभावशाली नट मागे पडले. गणपतराव जोशी यांच्यांत गुणांचा जसा प्रकर्ष होता तशींच थोडीशीं वैगुण्येंहि होतीं. गणपतरावांचे हातवारे आम्हाला गचाळ व अर्थशून्य वाटत. पण त्यांचे शिष्य म्हणविणारे त्यांच्या वैगुण्याचेंहि अंधानुकरण करीत. मी स्वतः गणपतरावांचीं कामें पाहून त्यांचें अनुकरण करताना त्यांची चांगली गोष्ट कशामुळें चांगली वाटते या मूळ तत्त्वाला हात घालून विचारानें ती गोष्ट आत्मसात् केली. गणपतरावांचे हातवारे नेभळे होत असत. त्याचा हा दोष क्षुल्लकच पण पुष्कळ वर्षें नाट्यव्यवसायांत घालविलेल्या माझ्यासारख्याला दिसे. पण सर्वसाधारण प्रेक्षकाप्रमाणें माझ्यावरहि गणपतरावांच्या वाणीची, भाषणाची विलक्षण मोहिनी पडून त्यांच्या त्या गुणसमुच्चयांत त्यांच्या क्षुल्लक दोषाचा कुठल्याकुठें लोप होऊन जाई.

## गणपतरावांच्या भूमिकेबद्दल थोडी चर्चा

गणपतरावांचें शरीरसौष्ठव राजकुलीन मनुष्याला शोभण्यासारखें असे. अस्खलित वाणी, खणखणीत व गोड आवाज यामुळें थिएटरमध्यें लोक भारून जात. गणपतरावांचें काम इतरांप्रमाणें मलाहि सर्व प्रकारें उत्तम वाटे. गणपतरावांना कोणी वाईट म्हटलेलें मला मुळींच खपत नसे. पुणें-मुंबईसारख्या ठिकाणीं किर्लोस्कर व शाहूनगरवासी यांचा मुक्काम असतांना गणपतरावांचीं कामें पहाण्याची एकहि संधि मी दवडीत नसें. या

वेळीं मला थोडी नाट्यदृष्टि येत चालल्यामुळें अभ्यासू दृष्टीनें मला गणपतरावांच्या कामाची छाननी करावीशी वाटूं लागली. त्या दृष्टीनें पाहूं लागलों तेव्हां त्राटिका खेरीज करून गणपतरावांच्या सर्व इतर कामांत मला हॅम्लेटच दिसूं लागलें. पण त्यांच्या एका हॅम्लेटच्या कामावरच मी बेहद्द खूष होतों. हॅम्लेट म्हणजे गणपतराव व गणपतराव म्हणजे हॅम्लेट. बस् दुसरी बात नाहीं; असें वाटे यांत शंकाच नाहीं. हॅम्लेटचें काम सर्वस्वी उत्तम वठायला गणपतरावांना वासुदेवराव केळकर यांचें चर्चात्मक उत्तम शिक्षणच उपयोगी पडलें. केळकरांनीं गणपतरावांच्या रोमरोमांत शेक्स्पीयर भिनवला यात शंका नाहीं. हॅम्लेटप्रमाणेंच त्राटिकेंतील प्रतापरावाचें काम गणपतराव उत्तम वठवीत. पुढें गणपतराव व्यसनाधीन झाले व त्यामुळें त्याची विविध भूमिका करण्याची गती खुंटली. त्यांचे वीर व करुण हेच रस कायम झाले. पुढील काळांत त्यांच्याकरितां नाटकें लिहिणारांनीं त्या दोन रसावरच भर देऊन मागणीप्रमाणें मालाचा पुरवठा करण्याची बाजारी वृत्ति सुरूं करण्याचा पायंडा घातला.

रंगरचना व पोषाख या बाबतींत शाहूनगरवासीनें कधींच लक्ष घातलें नाहीं. पौराणिक नाटकाच्या काळाचें गद्य नाटकाच्या काळांत रूपांतर झालें तरी या मंडळीनें आपला सनातनीपणा सोडला नाहीं. शेक्स्पीअरचीं नाटकें सुरूं केल्यापासून गणपतरावांनीं घेरा शेंडीला काट देऊन केस राखले. इंग्लिश कट ठेविला. त्राटिका नाटक खेरीज करून इतर सर्व नाटकांत गणपतराव अंगांत सद्रा, खालीं सुरवार, पायांत स्टॉकिंग्ज चढाव, एका कानांत ईअररिंग, गळयांत मोत्याचें पेंडे व असेल ती पट्याला अडकविलेली तलवार अशा कायम पोषाखाची त्यांनीं जणूं मोनापलीच घेतली होती. अथेल्लोमध्यें तेवढे कॉर्कबुचें जाळून त्याची राख तोंडाला व हाताला लावीत. क्वचित् गलमिशांचा थाटहि करीत. पुढें काळया रंगाशिवाय कांहींच करीत नसत. त्राटिकेंतल्या प्रतापरावाकरितां गणपतरावांनीं एक पोषाख आडसट्यांत घेतला होता. पुढें पुढें तोच पोषाख हॅम्लेटला व प्रतापरावालाहि वापरीत. गणपतरावांबद्दल मला अत्यंत आदर असल्यामुळें

त्यांना भेटण्याची संधि मी वारंवार मिळवी. अशाच एका भेटींत मी एकदां गणपतरावांना "आपल्या अलौकिक नाट्यनैपुण्याला चांगल्या सजावटीची जोड कां देत नाहीं !" असें विचारलें. तेव्हां त्यांनीं "उत्तम नटाला पडदे, सीनसीनरीची जरूरीच नाहीं" असें मासलेवाईक उत्तर दिलें. त्यांच्या उत्तरांत नटाच्या गुणाला श्रेष्ठत्व दिलें गेलें खरें; पण मला त्यांच्या फाजील गर्वाची घाणच आली. मला बरें वाटलें नाहीं. तरीहि "मग तोंडाला रंग तरी कां लावतां ? कपडे कशाला घालतां ?" असें विचारण्याचें धाडस केलेंच. त्यावर उत्तर न देतां ते नुसते हंसले. असें स्मित करण्याची त्यांना संवयच होती.

१९१६ मध्यें गणपतरावांच्या वयाला ५० वर्षें होत होतीं. या थोर नटाचा ज्युबिली समारंभ करावा अशी कल्पना येऊन मी आमच्या नारायणरावांना व त्या वेळच्या त्यांच्या अज्ञानपालकांना सुचविलें. त्यांनीं होस हो करून मात्र प्रत्यक्षास चालना दिली नाहीं. धंद्यामुळें मी मोकळा नसल्यामुळें त्या कल्पनेला मला मूर्त स्वरूप देतां आलें नाहीं याबद्दल मला अजूनहि हळहळ वाटते.

एकदां सोलापूरपासून पुण्यापर्यंत आगगाडींत गणपतरावांच्या सहवासांत मी असतां आमच्यांत पुष्कळ चर्चा झाली. त्यांत आपल्या पश्चात् आपल्या गुणांची परंपरा चालविणारीं माणसें तयार केलीं नाहींत, हा एक आपल्याकडे मोठा दोष येत आहे असें मी त्यांना म्हटलें. तेव्हां त्यांनींहि "मला शिकवतां येत नाहीं. माझें काम पाहून कुणाला कांहीं उचलतां आल्यास त्यानें तें उचलावें. मला शिकविण्याचें जमत नाहीं व मी कधीं पात्रांना समोर उभे करून तालीम दिलीच नाहीं." असें खरें तेंच सांगितलें, तें ऐकून मला थोडें वाईट वाटलें. पण त्यांच्या प्रांजल कबुलीबद्दल समाधान वाटलें.

गणपतरावांची परंपरा पुढें अनेक अलबत्यागलबत्यांनीं चालविण्याचे फुसके प्रयत्न केले पण गुणाभावीं त्यांचे ते प्रयत्न पावसाळ्यांतल्या छत्र्यांप्रमाणेंच ठरले. धंदा चालविण्याच्या दृष्टीनें व्यसनाधीन झाल्यामुळें गणपतरावांच्या हातून कांहीं चुका होणें अपरिहार्य असलें तरी दानतीच्या

दृष्टीनें त्यांचा गौरवच केला पाहिजे. त्यांची कंपनी बंद व्हायच्या वेळीं त्यांनीं ती निष्कर्जी केली. कर्ज सव्याज फेडलें. मुदतीबाहेर गेलेल्या प्रॉमिसरी नोटांचें देणेंहि त्यांनीं सव्याज दिलें. नाटक कंपन्यांच्या जमान्यांत निष्कर्जी अशी शाहूनगरवासीच पहिली होय. त्यापुढील काळात आवाहन विसर्जन झालेल्या अनेक कंपन्यांपैकीं एक पैहि देणें न ठेवतां बंद झाली अशी एक यशवंत कंपनीच असें म्हणतात. असो. गणपतरावांच्या बरोबरचे दुसरे बाळाभाऊ जोग त्यांच्याबद्दल लिहावयाचें राहून गेलें तें आतां लिहितों.

बाळाभाऊ रंगानें गोरेपान, नाक चपटें, भिवया भरदार कमानदार, स्त्रीपार्टाला योग्य अशी उंची, त्याचें त्राटिकेचें काम अप्रतीम होत असे. मॅकबेथमधील दर्याबाईचें काम उत्कृष्टच करीत. त्यांच्या कामाला बाळसेदारपणा असे. आयागो, जनकोजी, शिवाजी या पुरुषभूमिका बाळाभाऊ करीत; पण त्या मिळमिळीत होत. बाळाभाऊ स्त्रीभूमिकेचे हावभाव इतके सहजसुंदर करीत कीं त्यांच्या चेहऱ्याकडे न पाहता गळयापासून बाकीचे सर्व अभिनय पाहिले तर खऱ्या बायकोचे हावभाव नाहींत असें म्हणण्याची कोणाची प्राज्ञा नव्हती. त्यांनीं त्राटिकेच्या भूमिकेंत प्रवेश करून हातांतील लाटणें टाकल्यावर नुकतीच न्हालेली बायको आपले सोडलेले केस जसे झाडील तसेच हुबेहूब झाडतांना पाहून त्यांच्या अभिजात बाळसेदार अभिनयाचें कौतुक वाटे. गोरापान रंग व शरीराचा नाजुकपणा यामुळें त्यांच्या भूमिकेला फार मौज येई. व्यसनाधीनतेमुळें खंगून बाळाभाऊ आपल्या कोंकणांतल्या घरीं १९१० सालीं कालवश झाले. त्यांच्या कंपनींत गणपतरावांपेक्षांहि बाळाभाऊ जास्त प्रिय असत.

* * *

## प्लेगचें आगमन

मुंबईस एक भयंकर प्रकारचा ताप सुरू झाला त्याचें नांव प्लेग. या तापांत पटापट माणसें मरतात. पेरूएवढी, आंब्याएवढी गांठ येते आणि माणसें मरतात अशा बातम्या पुण्यास येऊं लागल्या. तशांतच

आमची कंपनी तेथें गेली. तेथें पहिल्याच खेळाच्या वेळीं ढोका दुमीन या नांवाचा मुंबईचा एक धनाढ्य नाखवा आमच्या कंपनीच्या खेळांचें कॉन्ट्रॅक्ट मागण्यासाठीं भाऊरावांकडे धरणें धरून बसला. कॉन्ट्रॅक्ट देण्याची कंपनीची वहिवाट नव्हती; पण मुंबईतील प्लेगची धामधूम लक्षांत घेऊन कॉन्ट्रॅक्ट दिलें. याच वर्षापासून स्त्री–भूमिका करावयाची नाहीं असें भाऊरावानीं ठरविलें होतें; परंतु कॉन्ट्रॅक्टरच्या प्रेमाच्या अत्याग्रहावरून त्यांनीं आपला बेत पुढील वर्षापर्यंत लांबविला. १९ प्रयोगांचें कॉन्ट्रॅक्ट दहा हजार पांचशें रुपयाला ठरलें. कागद झाला. शर्त जो मोडील त्यानें दुसऱ्यास दोन हजार रुपये द्यावयाचे. निम्मी रक्कम कॉन्ट्रॅक्टरनें कंपनीस आगाऊ द्यावयाची. कॉन्ट्रॅक्ट सुरूं झालें. मुंबईत वीरतनयाची पहिलीच खेप होती. त्यामुळें आरंभी खेळास कमालीची गर्दी होई. वीरतनयावर जहरी टीका होऊं लागल्या. प्लेगाचें मान वाढूं लागलें त्यामुळें गर्दी मंदावली. कॉन्ट्रॅक्टरला नुकसान येऊं लागलें. म्हणून नाखव्यानें कॉन्ट्रॅक्टमधून मुक्त करण्याविषयीं भाऊरावांना विनंति केली आणि त्यांनींहि मोठ्या मनानें कॉन्ट्रॅक्ट रद्द केलें. कॉन्ट्रॅक्ट मोडल्याबद्दल करारांतील दोन हजारांचा भूर्दंडसुद्धां भाऊरावांनीं नाखव्याला होऊं दिला नाहीं. त्यामुळें तोहि आनंदीत झाला. वीरतनयावर ज्या टीका चालू होत्या त्यांत के. वा. पेठे यांची टीका असे. स्वदेश हितचिंतक मंडळींच्या अभिमान्यांकडून होणाऱ्या टीकेचा मारा विशेष जोरकस होता. त्याला कारण होतें. आमच्या कंपनीनें बक्षिसें लावून मागविलेल्या नाटकांत वीरतनय याच्याबरोबर डोंगरे यांचें चंद्रसेना होतें. चांगलें ठरूनहि आमच्या कंपनीनें त्याचा प्रयोग केला नाहीं. तें नाटक स्वदेशहितचिंतक मंडळीनें केलें. डोंगरे स्वदेशहितचिंतकच्या गोटांत होते तरी वीरतनयाच्या टीकेंत त्यांचें अंग बिलकुल नव्हतें.

कोल्हटकरांनीं नाट्यलेखनांत बंडखोरपणा करून जुन्या परंपरेला धक्का दिला होता. तो सनातनी नाट्याभिमान्यांना सोसणारा नव्हता. जुन्या नव्याच्या झगड्यांत जनतेंत अशी खळबळ नेहमींच उडते. तसेंच हें झालें होतें. वीरतनयांत भाऊराव शूरसेनाची भूमिका अत्यंत तडफदारपणें

वठवीत. स्त्रीभूमिकेचा नाजूकपणा आपल्या पुरुषभूमिकेंत डोकावील असें वाटून भाऊराव कारण नसतांना कठोर गायन करीत. यामुळें आजच्या फेडरल हायकोर्टाचे न्यायमूर्ति एम्. आर्. जयकर यांनीं मुंबई-वैभव पत्रांत शापसंभ्रम नाटकांतील भूमिकेच्या कामावर निर्भीड पण अत्यंत मार्मिक टीका केली होती. त्या वेळीं सम्राट, कोकीळ, गायनहिरा, संगीतरत्न, नाट्यभूषण, इत्यादि पदव्या सवंग झाल्या नव्हत्या. जाहि-रातीचा मलिदा खाऊन मलिदा देणाराची स्तुति व न देणारांवर हीन टीका करणाऱ्या वर्गांतलीं त्या वेळचीं वर्तमानपत्रें नव्हतीं. तेव्हाचे पत्रपंडीत खरोखरीच श्रेष्ठ दर्जाचे असल्यामुळें ते ग्रंथकाराला किंवा नटाला लोळ-विण्याच्या दृष्टीनें टीका करीत नसत. टीका क्वचित् पक्षपाती असली तरी तींत दिलदार मार्मिकपणा असे. सध्यांच्या गर्जना करणाऱ्या हीन पत्रां-प्रमाणें तेव्हांही गुराखीसारखें एखादें वावदूक पत्र असे; पण त्याकडे कोणीही सहसा लक्ष देत नसे.

* * *

भाऊरावांची स्त्रीभूमिका यानंतर दिसणार नाहीं असें जाहीर झाल्यामुळें सौभद्र, रामराज्य–वियोग यांना तुफान गर्दी लोटत असे. शेवटच्या दोन प्रयोगांच्या वेळीं नाखव्यानें आपलें नुकसान भरून काढण्यासाठीं पुनः कॉन्ट्रॅक्ट घेतलें; पण त्याचा फायदा त्याला झाला नाहीं.

१८९६च्या डिसेंबरांत कोल्हापूरच्या राजाराम कॉलेजमध्यें एक प्रदर्शन भरलें होतें; त्याच वेळीं डुणुंग यांनीं बांधलेल्या शिवाजी थिएटराचा उद्घाटन–समारंभ किर्लोस्करांच्या प्रयोगानेंच झाला. त्या वेळीं शाहू-नगरवासीचाहि मुक्काम कोल्हापुरासच होता. शाहूनगरवासी व किर्लोस्कर यांच्या दोस्त भगतांच्या कोल्हापुरास दोन पठड्या होत्या. डॉ. गाडगीळ, डॉ. सावर्डेकर, पंडितराव मास्तर, डॉ. धोंडोपंत भोरकर हे किर्लोस्करांचे दोस्त होते; गणपतराव जोशी वकीलादि वर्ग शाहूचा अभिमानी होता.

रा. ल. ना. जोशी यांनीं लिहिलेल्या गणपराव जोशी यांच्या चरि-त्रांत वर दर्शित केलेल्या वेळेचें वर्णन करतांना शाहूच्या अभिमानानें त्यांची खोटी स्तुति व किर्लोस्करांची निष्कारण कुचाळकी करण्यांत आली आहे.

कोल्हापुराहून सदलगें व तेथून हुबळी आमच्या कंपनीनें घेतली. त्या वेळीं हुबळीस गोपाळराव सुळे, जनुभाऊ जोशी यांच्याशीं परिचय झाला. हुबळीस मांडव बांधून खेळ करीत. शिमग्याच्या सणांत कंपनीकडे गायनाचार्य भास्करबुवा बखले, गायनाचार्य बाळकृष्णबुवा इचलकरंजीकर ही मंडळी आली होती. दोघांही गायनाचार्यांचीं गाणीं झालीं.

हुबळीहून बंगलोरला जाण्याचा बूट निघाला. फायदा होणार नाहीं, पण गाण्याच्या जोरावर कानडी मुलखात घुसता आलें तर पहावें असें ठरून कंपनी बंगलोरास गेली. तेथें कानडी व इंग्रजी भाषेत सगळा कारभार. माराकुटीनें कंपनीला एक दुभाषी मिळाला. प्रसिद्धीकरणा-साठीं इंग्रजी व कानडी मोठालीं हँडबिलें काढलीं. त्यांत भाऊरावांच्या व कंपनीच्या लोकप्रियतेची माहिती छापली. सौभद्र, शाकुन्तल हे खेळ झाले. शाकुन्तलचा प्रयोग चालू असतां प्रेक्षकांनीं व्यवस्थापकांना "आमचा भाषेमुळें नाइलाज झाला आहे. तुमचा प्रसिद्ध नट कोणता ? त्याची १।२ पदें ऐकवा म्हणजे आम्ही तृप्त होऊं." अशी विनंति केली. तेव्हां भाऊरावांनींही दुष्यंताच्या सेनापतीची भूमिका घेऊन दोन पदें म्हटलीं व प्रेक्षकांना गारेगार करून नागाप्रमाणें डोलायला लावलें.

बंगलोरास कांहीं किफायत न होतां कंपनी धारवाडास व तेथून मिरजेस येऊन ठेपली.

मिरजेस पावसाळ्याच्या दिवसांत कंपनी आल्यामुळें उत्पन्न होत नव्हतें. यापुढें स्त्रीभूमिका करावयाची नाहीं असें भाऊरावांनीं धारवाडा-सच ठरविलें होतें. पण मिरजेस कै० श्री. बाळासाहेब मिरजकर यांनीं मंथरेचें काम पहावयाची आपली इच्छा भाऊरावांना दर्शविली. श्रीमंतांचें अगदीं पहिल्यापासून किर्लोस्कर कंपनीवर अत्यंत प्रेम. त्यामुळें भाऊरावांना श्रीमंतांचा शब्द मोडणें अशक्य होतें. शनिवारीं सौभद्र लागलें. भाऊ-रावांची स्त्रीभूमिका यापुढें दृष्टीस पडणार नाहीं हा पुकारा अगोदरच झाल्यानें व भाऊंचें काम पाहण्याच्या अनिवार हौसेनें खेळास खूप गर्दी झाली. पण त्याच वेळीं भयंकर पाऊस पडून जिकडे तिकडे जलमय झालें,

पीटमध्यें चिखल झाला. तशाही चिखलांत प्रेक्षकांनीं नाटक मोठ्या आनंदानें पाहिलें. सोमवारीं रामराज्यवियोग झालें.

याच मुक्कामांतील शेवटच्या प्रयोगाच्या अगोदर एक आठवडा भाऊरावानीं मोरोबांना विचारलें "मी आतां किती दिवस स्त्रीपार्ट करूं?" तेव्हां दूरवर विचार करून मोरोबांनीं "कांहीं हरकत नाहीं. मी तुमच्या इच्छेच्या आड येणार नाहीं." असें म्हटलें. कंपनीला वार्षिक सुट्टी मिळाली. भाऊराव व मोरोबा एकाच गाडीनें निघाले. वांईला जाण्यासाठीं वाटार स्टेशनवर मोरोबा उतरले. निरोप घेतांना "भाऊराव, ठीक आहे. जातों. प्रेम ठेवा. मजेंत कंपनी चालवा. आनंद करा." असें म्हटलें. भाऊरावांनींहि "तुमच्याशिवाय मला एकटें पडल्यासारखें वाटेल. सुट्टी संपताच लौकर या" असें म्हटलें. मोरोबाना वाईट वाटलें "१८।१८ वर्षें आपण प्रेमानें एकत्र काढलीं. मौज आली. आतां मी थकलों, तेव्हां इतकेंच पुरें." एवढेंच म्हणून कदाचित् मनावर परिणाम होईल यासाठीं झटकन् नमस्कार करून एकदम प्लॅटफॉर्मवरून गेले, दिसेनासे झाले. भाऊरावांच्याहि डोळ्यांत पाणी आलें. ते गहिंवरले. याचें नांव भागीदारी. नाहीं तर पुष्कळ भागीदाऱ्या तुटल्या. परंतु कंपनी धरून रहाणाऱ्या भागीदाराच्या मनाचे धर्म बहुतेक "बरें झालें, पिडा टळली" अशाच प्रकारचे. भागीदार याच कल्पनेचा आपल्या मनात सैतानी आनंद मानून घेणारे असतात!!

वर दिलेली हकीगत भाऊराव आजारी असतांना त्यांची शुश्रूषा मी करीत असें त्या वेळीं त्यांनीं ज्या अनेक जुन्या गोष्टी मला सांगितल्या त्यांपैकींच आहे.

* * *

आमच्या कंपनीला या खेपेची वार्षिक सुट्टी बरीच मोठी म्हणजे तीन महिन्यांची घ्यावी लागली. प्लेगनें चोहोंकडे थैमान घातलें होतें. त्यांतच पुण्यास रँड साहेबाचा खून झाल्यानें मोठी खळबळ उडाली होती. भाऊरावांचे दुखरे दात काढून नवीन बसवायचे होते. या सर्व परिस्थितीमुळें कंपनी कोणीकडे न्यावी व केव्हांपासून प्रयोग सुरू करावे

याबद्दल भवति न भवति चालू होती. त्याच वेळीं माझी धाकटी बहीण माहेरीं आली होती तिला भेटून दोन वर्षांवर काळ लोटला होता. तिला भेटण्यासाठींच मी पुण्यास गेलों. नाट्यकलाप्रवर्तक मंडळी पुण्यास असून त्याचा जम चांगला बसला होता. कंपनीचें बोर्ड, दोस्त, अभिमानी यांचा परिवार वाढत होता. कंपनीनें विकल्पविमोचन नुकतेंच रंगभूमीवर आणिलें होतें. तें नाटक शंकरराव पाटकर यांनीं शिकविलें होतें. कंपनीला लोकाश्रय उत्तम होता. या अवधींत भाऊराव व रामभाऊ पुण्यास आले होते. सुट्टीनंतर मिरजेस प्रयोग करून तेथून सातारा घेऊं, पुढें राष्ट्रीय अधिवेशनासाठीं उमरावतीस जाऊं असें ठरलें होतें.

भाऊराव, शंकरराव व मी मिळून विकल्पविमोचन पाहण्यास गेलों. स्वतः दूर उभे राहून खुर्च्यांचीं तिकिटें काढण्यास मला धाडण्यांत आलें. तिकिटें घेऊन आम्ही थिएटरमध्यें गेलों. अहंमन्य शिष्टांनीं भाऊरावांच्या बाबतींत साधा शिष्टाचारहि पाळला नाहीं. किर्लोस्कर कंपनींत पूर्वी गोपाळराव मराठे दोन वर्षें नोकर म्हणून राहून गेलेले.पण त्यांनींहि भाऊरावाच्या बाबतींत दिलगिरी प्रदर्शित केली नाहीं. याला कारण नाट्यकलाप्रवर्तक सर्वस्वी बोर्डाच्या नियंत्रणाखालीं गेल्यानें त्या मालकांना रंगभूमीवर काम करण्यापलीकडे कोणताच अधिकार नव्हता.

नाटक मंडळीवर एखादें अधिकारी नियंत्रण खरोखरच असावें लागतें. त्या दृष्टीनें नाटयकलेनें मानलेली बोर्डाची व्यवस्था योग्यच होती. नाटक कंपन्यांच्या मालकांना नियंत्रण नसलें म्हणजे कंपनीचे तीन तेरा व्हावयाला उशीर लागत नाहीं हे अनुभव अनादिसिद्धच आहेत. नाटयकलेच्या बोर्डाची तेव्हा आम्ही हेटाळणी करीत असूं. आमच्या कंपनीचे मालक शहाणे, हिशेबी व धोरणी असल्यानें आम्हांला वाटे "आमच्या भाऊरावांसारखा त्या कंपनींत एकहि नाहीं का? बोर्डाच्या दुढ्ढाचार्यांचा असा अंमल मालकावर कां असावा? बोर्ड चांगले खरें. शेताला जसें कुंपण तसेंच नाटक कंपनीला बोर्ड हें खरें. पण कुंपण शेत खातें. बोर्डच स्वतःच्या फायद्यासाठीं कंपनींत हवे तसे धुडगुस घालूं लागतें; अशा वेळीं अशा बोर्डाचा काय उपयोग होणार? असा प्रकार नाटयकलेच्या बोर्डाचा

पुढें पुढें होऊं लागल्यानें तो पुण्यास एक चर्चेचा विषय झाला होता. शंकरराव पाटकर विनामूल्य नाट्याचें शिक्षण कंपनीला देत असल्यामुळें कंपनीचे ते सर्वाधिकारीच झाले होते. त्यांच्या उपकारांच्या ओझ्याखालीं कंपनी चिरडण्याची वेळ आली. तें कसेंहि असलें तरी नाट्यकलेंत गोपाळराव मराठे, माधवराव केळकर, वासुदेवराव पटवर्धन हे भागीदार व चांगले नट असून त्यांच्या जोडीला दत्तोपंत खाडिलकर, सितारामपंत बापट, बाबू जोशी अशीं चांगलीं पात्रें होतीं.

* * *

## वांईकर संगीत मंडळी

याच सुमारास मिरजेस यवतेश्वरकर पांडोबा गुरव यांची वांईकर संगीत मंडळी असून ती विसर्जन पावण्याच्या पंथाला आली होती. वांईकर संगीत मंडळीचे द्यूतविनोद, हरिश्चंद्र, नलदमयंती हे खेळ होत. कंपनीचे चालक व मालक पांडोबा गुरव गवई व उत्तम तालीममास्तर होते. डोंगरे कंपनीनंतर शुद्ध रागदारीचीं पदें याच कंपनीच्या नाटकांत ऐकायला मिळत. द्यूतविनोदमध्यें पार्वतीचें काम विनायक गुरव हा मुलगा फार सुंदर करी. या कंपनीचें रासोत्सव नाटक मी मिरजेसच पाहिलें. वांईकर संगीत मंडळींत प्रायः सर्व भरणा गुरव मंडळींचाच होता. एक दोन ब्राह्मण आणि भाऊ जंगम नांवाचा लिंगाइत इतकीच इतर मंडळी होती. आपल्या कंपनींत शक्य तितकी गुरवांचीच भरती करायची या गतानुगतिक हेकट वृत्तीमुळें ही कंपनी ८।१० वर्षांपेक्षा जास्त जगली नाहीं.

* *

१८९७ च्या आक्टोबरमध्यें मिरज सरकारी थिएटरमध्यें दसऱ्याच्या शुभ मुहूर्तावर शाहूनगरवासीचा त्राटिका प्रयोग झाला. त्यानंतर श्रीमंतांच्या आवडत्या किर्लोस्कर कंपनीचा शापसंभ्रम हा सुट्टीनंतरचा पहिला प्रयोग झाला. चारपांच प्रयोगांनंतर कंपनी साताऱ्यास गेली. मिरजेच्या तीन महिन्याच्या दीर्घ सुट्टीच्या काळांत मला आपलें गाणें वाढविण्यासाठीं मेहेनत करावीशी वाटूं लागली. सुराचें साधन फक्त एक

तंबोरा. कंपनीची एक सतार होती, पण तिची एक मध्यमाची व सुराची तार शाबूत होती. बाकीच्या तारा तुटलेल्या होत्या. दोन तारांवर सूर धरून मी गाण्याची मेहेनत सुरूं केली. पद्धतशीर शिकवायला कोणीच नव्हतें. पण मी फिकीर केली नाहीं. नाटकांतीलच पदें म्हणण्याचा सपाटा लाविला. माझी कटकट मंडळींना वाटूं लागली. हेटाळणी होऊं लागली. पण आवाज तयार करण्याचा माझा पक्का निर्धार होता. म्हणून कोणाच्या हेटाळणीचा किंवा रागावण्याचा परिणाम मी मनावर होऊं देत नसे. मला तेव्हां वीरतनयांतील मालिनीचें एवढेंच गाण्याचें काम होतें. मज-कडे चार पदें असत. पण तीं चांगलीं होत नसत. रंगभूमीवर जाईपर्यंत मनाची उभारणी असे. पण प्रवेश सुरूं झाला कीं 'सीदंति मम गात्राणि' अशी माझी अवस्था होई. आवाज फुटला म्हणजे भरड होतो, तसा माझा आवाज वाईट नव्हता. पण भाऊरावांसमोर गाण्याची भीतीच वाटे. एरवीं कंपनींतल्या साऱ्या पात्रांच्या मी नकला करी. पण रंगभूमीवर माझें काम बिघडे. त्यामुळें माझी हेटाळणी जास्तच होई. "लोकांच्या नकला कर, पण स्वतःच्या कामाचा भोपळा." अशा-सारख्या शब्दांचा माझ्यावर वर्षाव होई. पण मी मुर्दाड मनानें नकला करणेंहि सोडलें नाहीं आणि आपल्या अभ्यासांतहि कसूर केली नाहीं. लोकांच्या हेटाळणीनें माझ्या अभ्यासाच्या इच्छेला तीव्रताच प्राप्त झाली. माझा अभ्यास मी चालूं ठेवला.

साताऱ्यास आमचे प्रयोग सुरूं झाले. तेथेंच मोरोबांना बोलावून आणून त्यांच्या मालकीची फारकत झाली. पेन्शनदाखल नफ्यांत मोरोबांची एक आण्याची भागी भाऊरावांनीं ठेविली आणि त्यांच्या हिश्शाच्या सामानाबद्दल काय द्यावें म्हणून विचारलें. तेव्हां मोरोबांनीं "सामान कंपनी पुढें चालवील त्याचें. मला त्याबद्दल कांहीं नको" असें स्वच्छ सांगितलें. यांत दोघांहि भागीदारांनीं आपली उदार वृत्ति उत्कृष्ट रीतीनें व्यक्त केली. अण्णासाहेबांच्या तसबिरीसमोर फारखतीचा कागद ठेवला. त्यावर सही करतांच रामभाऊ व भाऊराव यांना नमस्कार करून मुलांना विचारून, नोकरांची पूसतपास करून मोरोबा टांग्यांत जाऊन बसले.

सर्वांना " येतों " म्हणून लगेच मान वळविली. भाऊरावांना हुंदका आला. अश्रु भरल्या डोळ्यांनीं त्यांनीं त्यांना निरोप दिला. सर्वांनाच वाईट वाटलें. कंपनींत दोन तीन तास शांतता व उदासीनता पसरली होती. या मुक्कामापासूनच भाऊरावांचा सतत सहवास लाभण्याचें भाग्य मला मिळालें. मोरोबा गेल्यामुळें एकेकटें वाटून रात्रीं भाऊराव घळघळ-रडत असत.

× × ×

किर्लोस्कर मंडळीची पहिली पद्धतशीर घटना १८८४ त झाली. अण्णासाहेबांच्या कैलासवासानंतर दुसरी घटना घडली आणि त्यानंतर बारा वर्षांनीं ही तिसरी घटना झाली.

त्या वर्षीच्या उमरावती येथील अधिवेशनाच्या वेळीं आमच्या कंप-नीची सुरवात शापसंभ्रमापासून झाली. गोरे आजारी पडल्यामुळें आयत्या वेळीं कादंबरीचें काम करण्याचा प्रसंग मला मिळाला. पदावर पूर्वी घेत-लेल्या मेहेनतीचा योग्य उपयोग या वेळीं झाला. काम रेटलें. दोन्ही प्रयो-गांत काम केलें. कंपनींतील मंडळी तात्पुरती माझ्यावर प्रसन्न झाली. कॉंग्रेसमुळें कंपनीस प्राप्ति उत्तमच झाली. तेथून जानेवारीच्या पहिल्याच आठवड्यांत कंपनी नागपूरकडे वळली. नागपूर पहाण्याचा मला हा पहि-लाच योग होता. "काहून, मले, तुले" अशा वऱ्हाडी नागपुरी उच्चा-राच्या गमती ऐकून मला हंसू येई. माझा पदें गाण्याचा अभ्यास चालूच होता. तेथेंच कोल्हटकरांनीं आपलें मूकनायक नाटक वाचून दाखविलें. भाऊरावांनीं नाटकाची वाहवा केली. पण तें बसविण्याचा विशेषत्वानें रंग दिसला नाहीं. देवलमास्तरहि शारदा नाटकाचे तयार झालेले दोन अंक घेऊन नागपुरास दाखल झाले. शारदा लिहिण्यापूर्वी त्यांतील तयार झालेलीं ३०।४० पदें मुंबईच्या मुक्कामांत १८९६ सालींच आम्ही ऐकलीं होतीं.

देवलमास्तर ठेंगणे, गौर वर्णाचे व भरदार शरिराचे होते. अण्णासाहेब किर्लोस्करांच्यानंतर देवलांच्याइतका मान किर्लोस्कर कंपनींत दुसऱ्या कोणालाहि नव्हता. मंडळीशीं ते हंसत बोलत. पण त्यांच्याशीं

फाजील सलगी करण्यास कोणीच धजत नसे, इतका त्यांचा दरारा असे. शारदा नाटकाच्या पदांच्या तालमी होऊं लागल्या. पुढें धुळयास तालमीचा रीतसर मुहूर्त झाला. त्या वेळीं पात्रांची योजना अशी होती. सूत्रधार व कांचनभट–दडपे, कोदंड–भाऊराव, हिरण्यगर्भ–चिंतोबा, भुजंगनाथ–नारायणबुवा मिरजकर, सुवर्णशास्त्री–रामभाऊ, नटी व इंदिरा-गोरे, शारदा–रामा डवरी. जान्हवी-बापू गाडे, वल्लरी-प्रथम ग. बोडस पुढें कृष्णा दिवेकर, गोरख व शंकराचार्य हीं कामें माझ्याकडे आलीं. नव्या नाटकाच्या नकला करण्याचें काम माझ्याकडे आलें. माझें अक्षर चांगलें म्हणून नकला लिहिण्याची सक्त मजुरी सोसावी लागे. याशिवाय नाटकाच्या भिंतीवर चिकटविण्याच्या जाहिरातींत तारीख, वार, गांवाचें व थिएटरचें नांव लिहिण्याचें काम आम्हा मुलांना करावें लागे. तसेंच नाटकाच्या वेळीं विंगमध्यें सुरासाठीं आळीपाळीनें रंगभूमीवरचें काम संभाळूनहि तंबोरा वाजवावा लागे. तंबोरा सारखा वाजवीत बसण्याची आम्हाला शिक्षाच वाटे. कंपनींत नवा मुलगा आला म्हणजे तंबोरा वाजविण्याचें कंटाळवाणें काम त्याच्याच गळयांत अडकवलें जात असे. प्रवासांत कंपनीचा तंबोरा, मोरोबांची दोन भोपळयांची सतार संभाळण्याचें काम आम्हा मुलांनाच करावें लागे. माझ्याकडे तंबोरा संभाळण्याचें व नाटकाच्या वेळीं वाजविण्याचें काम होतें तें १८९६ सालीं पांडू गुरव हा मुलगा कंपनींत आला त्याच्या गळयांत युक्तीनें अडकवून मी मोकळा झालों.

आमची कंपनी धुळें, नाशिक, मुंबई येथील मुक्काम उरकून गणपती उत्सवाच्या वेळीं पुण्यास दाखल झाली. तेथें भास्करबुवा बखले, तबलापटु कांताप्रसाद, हार्मोनियमपटु भाचुभाई भांडारे या थोर कलावंतांचा मेळावा कंपनीस मिळाला होता. गाण्या–वाजवण्याच्या मेजवान्या झडत होत्या. गाण्याची मजा लुटण्यासाठीं कंपनीनें बुधवारचा एक प्रयोगसुद्धां बंद ठेवला होता. कोल्हापूर दरबारचे दरबार गवई सुप्रसिद्ध अल्लादिया खांसाहेब भाऊरावांच्या आवाजावर बहाल खूप होते. १८९६ मध्यें मुंबईस कंपनींत त्यांचीं दोन गाणीं झालीं होतीं. त्यानंतर ते दरबार गवई झाले तेव्हां कंपनीचा मुक्काम कोल्हापुरास पडला असतां खांसाहेबांनीं

मंडळीस गाण्याची दावत देऊन मनसोक्त गाणें ऐकविलें. अशा प्रकारचा गुणी लोकांच्या गुणांचा लाभ घेण्यास किर्लोस्कर कंपनीचे चालक सदैवच तत्पर असत.

* * *

लोकमान्य टिळक १८९८ च्या कारावासातून मुक्त झाले तेव्हां कंपनीचा मुक्काम पुण्यास होता. लोकमान्यांच्याकरितां वीरतनयाचा खास प्रयोग रविवारीं दिवसा ठेवून त्यास कंपनीनें लोकमान्यांना पाचारण करून त्यांच्याबद्दलचा आपला आदर व्यक्त केला. भाऊरावांनीं पुरुषभूमिका करूं लागल्यानंतर आपल्या जन्मभूमीला म्हणजे बडोद्यास कंपनीला नेली. सरकारी प्रयोग झाले. महाराजांकडून प्रशंसोद्गारासह चांगली देणगीहि मिळाली. भाऊराव स्त्रीभूमिका करीत असतांना ती त्यांच्या पत्नीनें पाहूं नये असा त्यांचा नियम होता. ते पुरुषभूमिका करीपर्यंत त्यांनीं आपली कंपनी बडोद्यास नेली नव्हती. भाऊरावांच्या पत्नीनें आपल्या पतीचा नियम मनापासून पाळला. तिनें त्यांचा स्त्रीवेष तर पाहिला नाहींच; पण पुरुषवेषहि पहाण्याची मोकळीक भाऊरावांनीं दिली असता त्या माउलीनें 'मी आपल्या मनानेंच आपला कोणताहि वेष पहावयाचा नाहीं असा नियम करून तो आजपर्यंत पाळला आणि आतां तो कधींच मोडणार नाहीं.' असें सरळ सांगितलें व त्याप्रमाणें त्या बाईनें भाऊरावाची कोणतीहि भूमिका पाहिली नाहीं.

बडोद्याच्या मुक्कामांत मी वाचनालयांत नेहमीं जात असें. वाचनाचा नाद मला पहिल्यापासून खूप असल्यानें ज्या मुक्कामीं कंपनी असे तेथें वाचनालयांत मी नेहमींच वाचनास जात असें. हरिभाऊ आपट्यांच्या कादंबऱ्या अतिशय हौसेनें वाचल्या. त्याचें स्मरण आजहि मला ताजें आहे. हरिभाऊंनीं केलेलीं पात्रांचीं यथातथ्य सुंदर वर्णनें नटांना त्याबरहुकूम एखाद्या भूमिकेचें सोंग सजविण्यास अतिशय उपयुक्त आहेत असें त्या वेळेप्रमाणें आजहि माझें मत आहे. नट होऊं इच्छिणाराला ललितवाङ्मयाचा किंबहुना सर्व प्रकारच्या वाङ्मयाचा नाद अवश्य पाहिजे. आपली भूमिका बसविण्याच्या वेळीं चिकित्सकपणा येण्यास बहु-

विध वाचनासारखें दुसरें औषध नाहीं. देवल, कोल्हटकर, गडकरी यांसारख्या विद्वानांच्याबरोबर केलेल्या किंवा त्यांच्या चाललेल्या चर्चेचा उपयोग जसा पुढें माझ्या भूमिका तयार करतांना मी करून घेतला तसाच उपयोग वाचनाचाहि मला झाला आहे हें निःसंशय. बडोद्याच्या वाचनालयात वीरतनय नाटकावर आलेली टीका, वीरतनयाची ढाल या शीर्षकाखालीं कोल्हटकरांनीं दिलेलें उत्तर हीं दोन्हीं माझ्या वाचनांत आलीं. त्या टीका मीच भाऊरावाच्या नजरेस आणिल्या आणि त्यांनींहि मोठ्या उत्सुकतेनें सदर मासिकाचे अंक मला आणायला लावून माझ्या कडून त्या टीका वाचून घेतल्या.

बडोद्याच्या मुक्कामांत शारदेच्या दोन अंकांची तालीम होते न होते तोंच १८९८ डिसेंबरचा तिसरा आठवडा आला व कंपनी इंदूरला गेली.

* * *

इंदुरास श्रीमंत शिवाजीराव होळकर त्या वेळीं गादीवर होते. त्याचें किर्लोस्कर कंपनीवर प्रथमपासूनच अत्यंत प्रेम होतें. अण्णासाहेब, मोरोबा, भाऊराव यावर त्याची विलक्षण भक्ति होती. १८९७ च्या जानेवारींत कोल्हापुरास हे महाराज कंपनीच्या शाकुंतलचे दोन अंक अनाहूत येऊन पाहून गेले होते. त्या वेळीं त्यांना मी पाहिलें होतें. महाराजांनीं कंपनीकडे एक दिवस स्त्रीभूमिका करणाऱ्या मुलांना पाहण्यासाठीं वाड्यावर पाठविण्याची आज्ञा केली. भाऊराव महाराजांना मुजरा करून आलेच होते. इंदुरास महाराजांच्या लीलांनीं प्रजा संत्रस्त होऊन गेली होती. त्या कानावर असल्यानें त्याचा निरोप येताच सर्वांच्याच पोटांत भीतीनें धडकी भरली. परंतु आज्ञेप्रमाणें शंकरराव, चिंतोबा, गोरे, मी, बाबू गाडे यासह जुन्या राजवाड्यात गेलों. महाराज सुखासनावर बसले होते. त्यांच्या अंगावर रूमरी कापडाचा फर्गोल होता. त्यानें त्यांच्या मूळच्या उग्रतेंत भर पडली होती. आम्ही सर्वांनीं महाराजांसमोर जाताच धडधडत्या छातीनें मुजरे केले. आज्ञा झाल्यावर त्यांच्या समोर बसलों. महाराजांच्या नजरेला नजर भिडविण्याचें धैर्य आम्हा कोणालाच नव्हतें. महाराजांनीं नंबरवारीनें माहिती विचारण्यास सुरवात केली.

**महाराज**–( गोरे यांजकडे बोट करून ) हा मुलगा कोठचा ? अगदींच खप्पड.

**शंकरराव**–( मर्यादेनें हंसत ) वांईचा आहे. चांगला गातो. हल्लीं नायिकेचीं कामें हाच करितो.

**महाराज**–( चितोबाकडे बोट करून ) आणि हा ?

**शंकरराव**–चितोबा गुरव. शापसंभ्रम नाटकांत महाश्वेतेची भूमिका करितो. चांगला नट आहे. ( होळकर सरकारांनीं शापसंभ्रमाला ८०० रुपयांचें बक्षीस दिलेलें. त्यांचें आवडतें नाटक म्हणून शंकररावानीं शापसंभ्रमवर मुद्दाम जोर दिला. )

**महाराज**–पूर्वी कोठें होता हा ?

**शंकरराव**–माधवराव पाटणकरांच्या कंपनींत होता.

**महाराज**–कोण ? तो बदमाष पाटणकर ?

महाराजांचे शब्द ऐकून बस्तान बिघडलें हें शंकररावांनीं ओळखलें आणि लगेच चतुराईनें सारवासारवी केली.

कोकणस्थांवर महाराजांचा दांत आहे असें ऐकिल्यामुळें माझ्या चौकशीच्या वेळीं आपलें काय होणार या कल्पनेनें माझ्या अंगाला घामच सुटला होता. 'तुझें नांव काय ?' असें महाराजांनीं मला विचारल्यावेळीं माझी जीभच टाळ्याला चिकटून बसली. 'गणू' एवढाच कसाबसा शब्द उच्चारला. माझ्यावरून बाबू गाडे यावर महाराज वळले तेव्हां हायसें झालें. शंकररावांनीं महाराजांना नाटक पाहण्याची विनंति केली. तेव्हां आपली तब्येत दुरुस्त नसल्याचें व नव्या खेळास युवराज येतील वगैरे सांगून आम्हाला निरोप मिळाला. त्या वेळीं वाघाच्या गुहेतून सही-सलामत सुटल्यासारखेंच आम्हाला झालें.

* * *

इंदूरच्या याच मुक्कामांत म्हणजे १८९९ जानेवारी १३ तारखेस शारदा नाटकाच्या तीन अंकांचा प्रयोग झाला. हें नाटक पूर्वीच्या पौराणिक, काल्पनिक अशा वैभवशाली थाटापेक्षां अगदीं उलट म्हणजे

साधेंसुधें, विषय, पोषाख यांनीं भटी घाटाचें. म्हणून भाऊराव त्याबद्दल जरा साशंकच होते. पण कंपनींत लहानापासून थोरापर्यंत सर्व नाटक तोंडपाठ झालें होतें. प्रयोग चांगलाच रंगला व गांवभर शारदा, शारदा असें होऊन गेलें.

यानंतर कंपनीनें ग्वाल्हेर घेतलें. माधव महाराजांनीं स्वतंत्र प्रयोग करवून हजार रुपये दिले. येथेंच आमच्या कंपनीचे पुढें जे जोगळेकर मालक झाले त्यांची व भाऊराव यांची भेट झाली. त्या वेळीं ते मॅट्रिकची परीक्षा होऊन माधव कॉलेजांत शिरण्याच्या विचारांत होते. यापूर्वी ६ वर्षें ते चिपळूण येथें भाऊरावांना भेटले होते. या वेळच्या भेटींत भाऊरावांनीं त्यांच्या ईश्वरदत्त आवाजाचा उल्लेख करून कंपनींत येण्याच्या कल्पनेस सूचक चालना दिली होती. पण त्या वेळीं नुसतें हंसण्यावारी गेलें.

कंपनी ग्वाल्हेरहून उज्जयनीस व तेथून इंदुरास परतली. उज्जनी येथें शिंदे सरकारांच्या समोर मृच्छकटिक खेळ झाला. त्या खेळांत मी ऐन वेळीं कंपनीला जरूर पडल्यावरून मांगाचें काम केलें. या कामाची वेष-भूषा मी माझ्या कल्पनेप्रमाणें यथातथ्य करून काम वठविलें. इंदूर, देवास हीं गावें घेत घेत कंपनी भुसावळला आली. इंदूरपासून मी खोकल्यानें सारखा आजारी होतों. भुसावळ येथें नारायणबुवा मिरजकरांनीं मला ‘ कंप-नींत तूं निरुपयोगी आहेस ’ असें पर्यायानें सुचवून जवळजवळ कंपनी सोडण्याचाच सल्ला दिला. मला अत्यंत वाईट वाटलें. रडूंही आलें. भाऊरावांच्या जवळ मी कंपनी सोडून जाण्याची गोष्ट काढली. तेव्हां त्यांनीं "वेड्या, तुझ्या मनांत हें काय आलें? तुला कोण बोललें? मी तुला कांहीं म्हटलें आहे काय? तुझी आंच तुला लागली आहे. तूं मेहेनत करतो आहेस हें मी पहातों आहे. निर्घोर राहून असाच अभ्यास चालू ठेव. यांतच पुढें तूं नांव व नशीब काढशील." असें आश्वा-सन आशीर्वादासह त्यांनीं मला दिल्यामुळें मला धीर आला. मी शांत झालों. पुढें एरंडोल करून कंपनीनें अहमदनगर गांठलें. नगर येथें बापूसाहेब प्रधान, बाबुराव प्रधान, बाळासाहेब मिरीकर, हरी केशव

पटवर्धन या मंडळींशीं माझा स्नेह जमला. नगर येथें शारदेचे चार अंक बसून त्यांचा प्रयोग झाला. इंदूरला झालेल्या तीन अंकांच्या प्रयोगाकरितां तात्पुरतें कोरसाचें पद (देवलमास्तरांनीं केलेलें अजून माझ्या ध्यानांत आहे तें) वाचकांकरितां सहज गमतीनें येथें देतों.

धांवा दानवकुलशमना। स्वजन–कुञ्जवन–कुंजरमददमना ॥
दंभा ज्ञानालसादि असुरीं। प्रलय मांडिला आर्यागारीं ॥
आर्यांबा ती कष्टी भारी। कंठ मोकली करि करुणार्णवा ॥ १ ॥

सोलापूरच्या मुक्कामीं शारदा नाटकाच्या पांचहि अंकाचा संपूर्ण प्रयोग कंपनीने केला. त्या वेळीं देवलमास्तर तेथें नव्हते.

## मुंबईस शारदा नाटकाचा प्रयोग

मुंबइच्या मुक्कामीं शारदा नाटकाच्या हक्काबद्दल वाटाघाट होऊन देवलमास्तराना नाटकाच्या सामान्य हक्काबद्दल एक हजार रुपये व नाटक शिकविण्याबद्दल पांचशें रुपये देण्याचें ठरलें. नाटकाचें पुस्तक छापून होईपर्यंत संपूर्ण शारदेचा प्रयोग लावायचा नाहीं अशी अट असल्यामुळें मुंबईस पहिल्या तीन अंकाचा शारदेचा प्रयोग जाहीर केला. या पहिल्या शारदेच्या प्रयोगाला थिएटर प्रेक्षकांनीं चिकार भरलें. नटीच्या 'अजुनि खुळा हा नाद पुरेसा' या पदातील 'नाटक झालें जन्माचें तें' या चरणाचा ध्वनि कानावर पडतांच प्रेक्षकानीं टाळयाचा प्रचंड कडकडाट केला व नाटकाच्या रंगतीस सुरवात झाली. श्रीमंत व भद्रेश्वर यांचा प्रवेश उत्तमच झाला. भाऊरावाच्या कोदंडाच्या भूमिकेंतील तडफदार गाण्यानें व भाषणानें तर प्रेक्षकजन चित्रासारखा स्तब्धच झाला. मुलींच्या रगदार प्रवेशानें पहिला अंक समाप्त झाला. मधल्या विश्रांतीच्या वेळांत देवलांच्या नाट्यलेखनाबद्दल व पात्रांच्या करामतीबद्दल प्रेक्षकांत जिकडे तिकडे वाहवाचा पाऊस पडला. दुसऱ्या अंकाला केव्हां सुरवात होते अशी प्रेक्षकांना उत्कंठा लागली. पुढचे अंक एकसारखे चढतच गेले. तिसऱ्या अंकांतील शारदेच्या "तूं टाक चिरुन ही मान" या पदाचा विलक्षण परिणाम मनावर ठसून प्रेक्षक सारखी वाहवा करीतच थिएटरबाहेर पडले. दुसऱ्या शनिवारला चार

व तिसऱ्या शनिवारला पांचहि अंकांचा संपूर्ण शारदेचा प्रयोग झाला. मुंबईभर चाळीचाळींतून शारदा, शारदा आणि शारदा असा एकच आनंदयुक्त ध्वनि सारखा घुमूं लागला.

एखाद्या उतार वयाच्या मनुष्याचें लग्न झालेलें अगर ठरलेलें ऐकलें कीं शारदेंतल्या त्या त्या भूमिका त्या त्या व्यक्तीच्या माथीं मारून मुलें व मुली " म्हातारा इतुका न " हें पद म्हणून हेटाळणी करूं लागलीं. १९३७ सालापर्यंत शारदा नाटकाइतकी समाजांत विलक्षण खळबळ दुसऱ्या कोणत्याहि नाटकानें केली नाहीं. देवलमास्तरांनीं मध्यम स्थितींतल्या पांढरपेशा वर्गांतील पात्रें निवडून शारदेंत नटवून समाजासमोर उभीं केल्यानें जरठकुमारीविवाह हा समाजांतील मोठा अन्याय आहे असें आबालवृद्धानाहि वाटायला लागलें. मुलींना आपल्या असहाय स्थितीची जाणीव व्हायला लागली. आया सावध झाल्या. विवाहेच्छु म्हातारे नवरदेव हे समाजांतला एखादा कोदंड आपल्या लग्नांत विघ्न आणील म्हणून मनांत भेदरून गेले. भद्रेश्वर चरफडूं लागले.

शारदेंतील " म्हातारा इतुका न । " " घेउनि ये पंखा " " रडसि काय म्हणुनि अशी " " तरुण कुलिन गोरा " " मूर्तिमंत भीति उभी " " नका करूं अविचार " " जागृत ठेवा लग्नाची " " बाळपणींचा काळ सुखाचा " " तूं पापी " " निवर्तली ती तेव्हांपासुनि " " तूं टाक चिरुन ही मान " " यमपाश गळ्याशीं ज्यास " हीं पदें आबालवृद्धाच्या तोंडीं झालीं. शारदेसारखें सर्वांगीण यश त्यानंतर या घटकेपर्यंत कोणत्याहि दुसऱ्या नाटकाला लाभलें नाहीं असें मला वाटतें. शारदा नाटकावर अनुकूल पुष्कळ व प्रतिकूल थोड्याच अशा टीकाहि झाल्या. प्रतिकूल टीकेंत रा. किरात यांची टीका कठोर पण मार्मिक होती.

देवलांची पात्रांना शोभेशी भाषा, सहजसुलभ अशी तोंडीं बसणारी पद्यरचना, असामान्य नाट्यशिक्षण, समाजाच्या जिव्हाळ्याची नाट्यविषयाची निवड, यामुळें शारदेचा नाट्यपरिपाक उत्कृष्ट झाला यांत नवल काय ? असो. मुंबईसच श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांनीं नवीन लिहिलेल्या गुप्तमंजूष नाटकाचें कंपनींत वाचन झालें. नाटक संपूर्ण

विनोदी, अगदीं नवीन तऱ्हेचें असल्यानें त्याचें वाचन चालू असतां आमच्या सर्वांच्या हंसून हंसून मुरकुंड्या वळल्या. पण शारदा नाटकाच्या ताज्या मिनलेल्या यशामुळें गुप्तमंजूष लौकरच विस्मृतींत गुप्त झालें.

## आधुनिक भरतभेटीचें दर्शन

शारदा नाटकाचा प्रयोग मुंबईच्या रंगभूमीवर चालला असतांना थिएटरमध्ये मोरोबा अवचित आले. त्यांना पहाताच 'आबा आले' 'आबा आले' असे आनंदोद्गार मंडळींत निघाले. भाऊरावांचा प्रवेश चालू होता. विंगमध्यें आनंदी मुद्रेनें उभे असलेल्या मोरोबांना पाहून भाऊरावांनीं रंगभूमीवरूनच हंसतमुखानें अभिवादन केलें. "ईश चिंता निवारील" हें भाऊरावांचें पद ऐकतांना विंगमध्यें मोरोबा हर्षभरानें रंगून नाचूं लागले. "जागृत ठेवा लग्नाची" या पदाला भाऊरावांनीं वन्स मोअर घेऊन तें पुनः म्हटल्यानंतर भाऊराव आत आले. मोरोबा भाऊरावांना कडकडून भेटले. तें सुंदर दृश्य म्हणजे आम्हाला भरतभेटच ही असें वाटलें.

* * *

## माझ्या व्यावहारिक शिक्षणाचा पाया

मी व्यवहारदक्ष आहे असा माझा लौकिक आहे. व्यवहारांत दक्षता राखतों हें खरेंहि आहे. पण मी व्यवहारदक्ष एकदम कांहीं झालों नाहीं. चुकत माकत, अनुभव घेत झालों आहे. व्यवहारदक्ष होण्यास मूळची गरीबी व आईची कडक शिक्षा हींहि कारणें आहेत. कंपनींत व्यवहारदक्षतेचा पहिला धडा मला भाऊरावांकडूनच मिळाला आहे. गोष्ट क्षुल्लक आहे. पण त्यांत व्यवहारदक्षतेचें बीज आहे. ती गोष्ट अशी; रंगोपंत मराठे नांवाच्या एका गृहस्थाशीं माझा मुंबईस परिचय झाला होता. त्याना कांहीं अडचण पडली ती त्यांनीं मला सांगितली. मजजवळ त्या वेळीं पैसे नव्हते. पण पगारांतून कांहीं शिल्लक टाकून एक तोळ्याचे मी सोन्याचे सल्ले केले होते. रंगोपंत मराठ्यांची अडचण जाणून ते सल्ले त्यांना मी दिले. त्यांनीं नेले ते कायमचेच. पुनः मला मिळाले नाहींत. माझ्या हातांत सल्ले नाहींत ही गोष्ट भाऊरावांच्या ध्यानीं आली. त्यांनीं

त्याबद्दल मला विचारलें. मी खरी गोष्ट त्यांच्यापासून थापाथापी करून लपविली. पण शेवटीं खरें सांगितलें. तेव्हा भाऊराव माझ्यावर अतिशय रागावले. त्यांचें तें रागावणें म्हणजे कोणाच्या लाघवी बोलण्याला फसायचें नाहीं, असा धडाच मिळविला. माझ्या व्यवहारदक्षतेचा हा एक तऱ्हेनें पायाच होय.

## भाऊरावांना मानपत्र

गुजराथेंतील कच्छ–नळिया प्रांतांत पडलेल्या दुष्काळास मदतीप्रीत्यर्थ कंपनीनें वीरतनय प्रयोग गिएटी थिएटरमध्यें केला. २७०० रुपये उत्पन्न झालें. तें सर्वच फंडाला अर्पण केलें. त्या वेळीं भाऊरावांना जाहीर मानपत्र मिळालें. मानपत्राच्या अर्पणाचा समारंभ टोलेजंग झाला. या मानपत्रात रामभाऊ मालक असूनहि त्यांचा उल्लेख अगर गौरव केला गेला नाहीं. मानपत्र दोघांच्या नांवानें दिलें जाईल असा सर्वांचा समज होता. खरें म्हटलें तर भाऊराव हेच कर्ते दिसल्यानें व त्यांच्या मानानें रामभाऊ प्रामुख्यानें लोकांच्या लक्षांत रहाण्यासारखे नसल्यामुळें मानपत्रांत त्यांचें नाव यदृच्छेनें गळलें असेल. पण रामभाऊ चिडले. त्यांनीं मनांत खुनसहि धरला व पुढें ग्वाल्हेर मुक्कामीं कंपनी गेली त्या वेळीं रामभाऊंनीं बराच गोंधळ घातला.

## राजे लोकांचें नाटक

ग्वाल्हेर येथें श्री. गरुड या सरदाराचा वाडा जयेंद्रगंजांत श्री. सरदार अप्पासाहेब शितोळे यांच्या वाड्यासमोर आहे, तेथें कंपनीस उतरण्यास जागा दिली होती. व सरकारी जुन्या राजवाड्यांत थिएटर मांडवाचें बांधलें होतें. ग्वाल्हेरच्या प्रवासास आम्ही सोमवारीं रात्रौ जे निघालों तों पहिला मुक्काम भुसावळास केला. तेथें दिवसभर राहून सायंकाळच्या गाडीनें निघून बुधवारीं होशंगाबादेस उतरलों. मुक्काम नर्मदा कांठावरच्या सराईंत होता. सायंकाळीं वामकुक्षी, पत्ते वगैरे खेळ संपल्यावर कळलें कीं भोपाळ स्टेशनवर अपघात होऊन रुळांची मोडतोड झाल्यानें लाईन बंद आहे. पण स्टेशनवरून शोध आणविला तेव्हां कळलें कीं रात्रौ नऊ वाजतां लाईन चालू होईल व ग्वाल्हेरकडे गाडी रवाना होईल. ७ वाजतां सराईंतून

स्टेशनवर गेलों. उज्जैनकडून गाडी येऊन सांधा चुकल्यामुळें रुळांचा आकार इंग्रजी S सारखा झाला होता. तरी योजना अशी केली होती कीं अपघाताची जागा सोडून पुढें एक फर्लांगावर दुसरी गाडी उभी ठेवली होती. तेव्हां दोन हमालांकडून जड सामान नेऊन बाकीचें हलकें सामान मंडळींनीं वाहून नेलें. जागा वगैरे गाडींत नीट मिळून पहांटे आम्ही बीना स्टेशनवर आलों. गुरुवारीं दुपारीं १ वाजतां आम्ही ग्वाल्हेरला पोंचलों. तेथें पोंचतांच वार्ता कळली कीं देवासचे महाराज कृष्णराव पोवार हे वारले; सबब दहा दिवस हरताळ आहे. तेव्हां दहा दिवस स्वस्थ बसणें प्राप्त झालें. गांवांत प्रयोग सुरू झाले. सरकारी प्रयोग सुरू झाले. खूपच मजा आली. दसरास्वारी पाहिली. जुनें वैभव मूर्तिमंत दिसलें. त्या समयीं तेथें उत्तम असलेले गवई व नायकिणी यांचीं गाणीं ऐकिलीं.

सतारवादनश्रेष्ठ अमीरखां, सरोदपटु नन्नेखां, सुकीया, मंगु वगैरे नायकिणी, निसारअल्ली गवई वगैरे कलावंत ऐकले. श्री. शिंदे सरकारांचे बंधु श्री. बळवंतराव भैय्या हे कवि असून रसिक होते. हत्तीवरून जाऊन इतिहासप्रसिद्ध ग्वाल्हेरचा किल्ला पाहिला. नाताळात खास जयेंद्र महालांत सरक पडद्यावर वीरतनय प्रयोग झाला. त्या दिवशीं युरोपियन पाहुणे मंडळी वगैरे खुर्चीत होती. महाराजहि आनंदात होते. वरचेवर आंत येऊन भाऊरावांना म्हणत " भाऊराव आज नाताळ आहे. तेव्हां आमच्या उच्छृंखलपणाबद्दल मनांत आणूं नका." नाटक प्रयोग चालू असतां हंसणें, मध्येंच पात्रांना उद्देशून बोलणें चालू होतें. दुसऱ्या अंकाचे शेवटीं मालिनी व वीरसेनचा—माझा व दडपे याचा—सीन संपायच्या वेळीं वीरसेनाला उद्देशून म्हणूं लागले कीं " हनुवटीला हात लावून !" सरकारी आज्ञा पाळणें प्राप्तच झालें. तसें होतांच टाळ्या वाजवून लागलीच पसंती. दौलतजादा करणारे लोक जसे ओरडतात " मांडीवर बसून," " जवळ येऊन " त्यांतलाच हा प्रकार. नाटकाचें कोरस म्हणण्याचे वेळीं महाराज एकदम उठून म्हणाले, " वैशाखमासि वासंतिक " हें सौभद्रांतील पद म्हणा. म्हणणें भाग पडलें. थिएटरमधल्या एका मृच्छकटिक प्रयोगाच्या दिवशीं सातव्या अंकांतील भाऊरावांची करुणरसाची

लयलूट चालली असतां महाराज विंगमध्यें उभे होते. एकाला पाण्यांत कालविलेला सफेता सांगून आणविला व एका मानकऱ्याच्या तोंडाला फासून त्याला रंगभूमीवर ढकलला. महाराजांचे हे खेळ सर्वांना माहीत होतेच. परंतु प्रयोग सपतांच त्यांनीं भाऊरावांना " भाऊराव, माफ करा अं " असें सांगितलेंच.

सरकारी प्रयोगानंतर श्री. संभाजीराव आग्रे यांच्या वाड्यात स्पेशल थिएटर बांधून तेथें आग्रेसाहेबांनीं तीन प्रयोग केले. श्री. महाराजांनीं एकदां भाऊरावांना आग्रह केला कीं " भाऊराव १८८८ सालीं मी लहान असतां तुमचा सौभद्र प्रयोग येथें पाहिला होता. तरी तुम्ही सौभद्र प्रयोग करून दाखवा. व त्यांत सुभद्रेची भूमिका तुम्ही करा." यावर भाऊराव म्हणाले कीं " माझें स्त्रीभूमिका करण्याचें वय नाहीं व माझ्या बरोबरीचें काम करणारा कुणी नाहीं." सरकारानीं बराच आग्रह केला. पण भाऊरावांनीं नानाप्रकारचीं कारणें सांगून महाराजांचे मन मोठ्या खुबीनें वळवून स्त्रीपात्राची आपत्ति टाळली.

श्री. शिंदे सरकारानीं स्वतः भूमिका करून चंद्रहास नाटक करायचें ठरलें होतें. तें नाटक श्री. सरकाराचे बधु श्री. बळवंतराव भैयासाहेब यांनीं रचलें होतें. देवलमास्तरांना श्री. बळवंतराव भैय्यासाहेब वरचेवर आपल्याकडे बोलावून नेत असत व त्याच्या नाटकांतील कांहीं पदात त्यांनीं सुधारणाहि सुचविली होती. कारण श्री. बळवंतराव भैय्यासाहेबांची नित्याची भाषा हिंदी व नाटक मराठींत रचलेलें होतें. त्या नाटकप्रयोगांत श्री. शिंदे सरकार, श्री. आप्पासाहेब शितोळे वगैरे बड्या मंडळींनीं भूमिका घेतल्या होत्या. राजकीय पोषाख व खरे जवाहीर वापरलें होतें. श्री. शिंदे सरकारांचा आवाज गोड होता व म्हणण्याची पद्धतही ढंगदार होती. स्त्रीभूमिकेसाठीं तेथील रहिवासी एक गाणारा मुलगा अठरा एकोणीस वर्षांचा असा नोकर करून घेऊन त्यास ठेवला होता. त्या वर्षी लखनौची कॉंग्रेस होती ती संपल्यावर दे. भ. काळकर्ते वगैरे मंडळी परत जातांना ग्वाल्हेर येथें कंपनींत उतरली होती. त्यांना कंपनींत मेजवानी झाली.

त्या दिवशीं प्रसिद्ध सरोदवादनपटु नन्नेखां यांचा सरोद झाला. त्यांनीं फार बहार केली. एकंदर मजा आली.

* * *

मी कंपनींत आल्यापासून कंपनींतील पात्राना देवलमास्तरांचें जें शिक्षण मिळत असे तें मी भक्तिभावानें पहात असें. कोणालाहि ते शिकवूं लागले कीं मी बारकाईनें तिकडे लक्ष लावून मास्तरांच्या सान्निध्यांत नित्य रहाण्याचा माझा परिपाठ असे.

भाऊराव पुरुषभूमिका पूर्णपणें करूं लागल्यानंतर १८९८च्या एप्रिलमध्यें वर्धा येथें सौभद्र झालें. त्यांत भाऊरावांनीं कृष्णाची भूमिका करण्यास प्रारंभ केला असून मुंबई, पुणें खेरीज करून त्याचे प्रयोगहि झाले. त्यांत माझ्याकडे रुक्मिणीची भूमिका दिलेली होती. ती भूमिका देवलमास्तरांनीं थोडीशी मला शिकवली होती. परंतु ग्वाल्हेर येथें कंपनी आल्यावर माझा कार्यक्रम असा होता. अलीकडे माझ्या शरीराला जाडपणा येऊं लागल्यानें माझी स्त्रीभूमिका बेढब दिसूं लागली होती. बहुतेक प्रसंगीं रा. दडपे व मी अशा दोघांच्या भूमिका एकाच वेळीं रंगभूमीवर येत असल्यानें लठ्ठ जोडी म्हणून प्रेक्षक उपहासानें थोडे हंसत असत. त्यामुळें स्त्रीपात्राला आपण नालायख झालों असें माझ्या मनानें घेतलें होतें. स्त्रीभूमिका गेल्यावर पुढें काय? या प्रश्नानें माझें डोकें भणाणून गेलें व मन उदास झालें. अशा मनःस्थितींत असतां देवलमास्तर दुपारीं झोंपीं गेले कीं एकटा एका पारावर जाऊन 'पुढें काय?' हा प्रश्न घेऊन बसत असें. कंपनीचा मुक्काम ज्या वाड्यांत होता त्यांतील पहारेकरी परदेशी भैया होता. तो रोज त्या पिंपळाच्या पारावर भांग वाटीत असे. मलाहि त्यानें एक दिवस "क्यों बाबूजी, ठंडाई लेते हैं? लेवो." असा मला प्रश्न केला. मीहि विषण्ण मनःस्थितींत असल्यामुळें होकार भरला व त्याच्याकडून रोज भांगेची गोळी मागून घेऊन सुमारें ४|५ वाजतां ती गोळी गट्टकन गिळून वर पाणी प्यावें, हा माझा नित्यक्रम बनला. या नित्यक्रमांत एखाद्या वेळीं देवलमास्तरांच्यासमोर असतांना डोळ्यावर सायंकाळीं निशा आल्यामुळें उर्दू नाटकांतील हरिश्चंद्राचा शिष्य नक्षेत्र याप्रमाणें हास्या-

स्पद प्रकार होत. मास्तरांनीं विडी मागितली कीं विड्याचीं पानें आणावीं. पाणी मागितलें कीं विडी पुढें आणावी. ते जरा रागावले कीं हंसतमुख करून चुकल्याचा बहाणा करावा. मी असाच भांगेच्या तंद्रींत असतां मास्तरांनीं भाऊराव आहेत का तें पहायला सांगितलें. मी शंकरराव आहेत असें बेछूट सांगितलें. त्यावरून मास्तरांनीं मला विचारलें कीं, " काय रे ग्वाल्हेरची भांगेची दीक्षा वगैरे घेतलीस काय ? गुण नाहीं तर निदान दुर्गुण तरी पैदा केलेला दिसतो. " हा त्यांनीं मर्मावर प्रहार करतांच मला एकदम रडूं कोसळलें व मी एकदम मास्तरांचे पाय धरले. त्यांचें मन द्रवून त्यांनीं मला उठवून पाठीवरून हात फिरवतांच मीहि मोकळया मनानें भांगेची संवय मनाच्या संत्रस्त स्थितींत कशी लावून घेतली हें सागितलें व मला काहीं सुचत नाहीं असें सांगितलें.

रंगभूमीवर जरी घाबरत असें तरी मला लहानपणापासून मंडळींतील पात्रांच्या नकला करण्याची कला साधली होती. चिंतोबा, गोरे, दडपे, मिरजकर, भाऊराव यांच्या रंगभूमीवरील कामाच्या नकला करी. गोरे, दडपे वगैरेनीं नकलांनीं चिडून म्हणावें " लोकांच्या नकला कर पण स्वतः रंगभूमीवर पोहो घाल " मला तें ऐकून वाईट वाटे. पण मुर्दाडपणानें नकला करण्याचें मी सोडलेंच नाहीं. मी नकला करतों हें कानावर येऊन एक दिवस भाऊराव, शंकरराव, देवलमास्तर असे बसले असतां मला त्यांनीं नकला कर म्हणून आग्रहानें सांगितलें. मी ताबडतोब चिंतोबा, गोरे, दडपे याच्या नकला करून मंडळींना पोट धरधरून हंसविलें. नंतर भाऊराव म्हणाले " गण्या, माझी नक्कल कर. " एकदम हबका बसला. पण त्यांनीं अत्यंत प्रेमानें सांगितल्यामुळें निर्भीडपणानें भाऊरावांचीहि शापसंभ्रममधील एका वाक्याची नक्कल केली. भाऊराव आंघोळ करून खडावा घालून चालत येत तीहि नक्कल केली व सर्व मंडळी व भाऊराव तर इतके खुष झाले कीं सांगतां पुरवत नाहीं.

देवलमास्तरांनीं माझी निरीक्षणशक्ति पूर्वीच अजमावली होती. एक दोन दिवस गेल्यावर मी व मास्तर त्यांच्या जागेंत एकटेच असतां मास्तरांचीं व माझी पुढील प्रश्नोत्तरें झालीं:—

**देवलमास्तर**–गणू, नुसता काय बसून रहातोस ?

**मी**–मास्तर, काय करावें तें सुचत नाहीं.

**मास्तर**–पुढें काय करायचें ठरविलें आहेस ?

**मी**–( स्तब्धच ) ( डोळ्यांतून गंगायमुना सुरू ).

**मास्तर**–(माझी स्थिति पाहून) गणू, शकाराचें काम करतोस का ?

**मी**–( आश्चर्य व हर्षमिश्रित ) मला शिकवलें तर अवश्य करीन.

**मास्तर**–तर मग एक, पांच, सहा व सात असे अंक सबंध पाठ कर.

**मी**–मास्तर, मला मृच्छकटिक सर्व नाटक तोंडपाठ आहे.

हें ऐकून मास्तरांना आनंद झाला.

मी कंपनींत आल्यापासून माझा नियम असे कीं नाटक चालू झाल्यापासून नाटक संपेपर्यंत नाटकाकडे लक्ष द्यायचें. नेपथ्यांतील वेषरचना झाली कीं एका विंगमध्यें आसन ठोकायचें व नाटक लक्षपूर्वक पहायचें. प्रत्येक पात्र काम कसें करतें, त्याच्या चांगल्या अभिनयाला, पदाला लोक कसे संतुष्ट होतात, पात्रानें अभिनयात अगर पदात विशेष करामत काय केली याचें लक्षपूर्वक अवलोकन व श्रवण हीं दोन्ही करायचीं. या संवयीमुळें त्यांच्या प्रवेशाच्या वेळीं मी विंगमध्यें नेहमीं हजर असायचा हें भाऊरावानासुद्धां ठाऊक असे. भाऊरावांचे आलाप ऐकून आनंदित होऊन मीहि भीतभीत त्यांना साधारण ऐकूं येईल अशी वाहवा द्यावी. ती ऐकून त्यांनाहि संतोष होई. त्यांना संतोष होई हें मी लिहिलें याचा असा अर्थ नाहीं कीं प्रेक्षकांपेक्षां, हजारों लोक टाळ्या देत असतां, एका सामान्य मुलाची वहावा जास्त किंमतीची अगर महत्वाची होती. तर नित्य भक्तीनें मी लक्षपूर्वक पहात असें म्हणून त्यांना आनंद होई. एखाद्या वेळीं नित्यापेक्षां एकादी नवी तान वगैरे आली कीं भाऊराव आंत येतांच त्यांना मी आदरानें सांगे "भाऊराव, आज अमुक पदांत नवीन आणि उत्तम तान आली नाहीं ?" त्यावर ते म्हणत "हं ? तुला नवीन तान आलेली कळली आणि तुला आवडली ना ? बस्स तर मग माझें

आजचें गाणें व काम उत्तम झालीं असें म्हणायला हरकत नाहीं." मी मात्र हें त्यानीं म्हटल्यावर शरमिंधा होई. परंतु ते त्यावरहि म्हणत "अरे प्रेक्षकांनीं वहावा देणें हें माझ्या नित्य संवयींतील आहे, परंतु रोज ऐकणाराला विशेष वाटलें म्हणजे त्यात गंमत आहे."

या प्रकारानें नित्य अवलोकनानें, श्रवणानें व मननानें सर्वच नाटकें माझीं तोंडपाठ झालीं होतीं. त्यामुळें पात्र एखादे वेळीं रंगभूमीवर अडलें तर मी तावडतोब प्रॉम्प्टिंग करीत असें. माझ्यापेक्षां सर्वच मोठीं पात्रें त्या वेळीं श्रेष्ठ होतीं, त्यामुळें प्रत्येकांचीं पदें लक्षपूर्वक त्यांच्यासारखी म्हणण्याचा आणि भाषणसुद्धां त्यांच्यासारखें साभिनय म्हणण्याचा प्रयत्न करणें हा माझा नित्याचाच अभ्यास होता. रंगरचना व पोषाखहि मी ठाकठीक करी आणि तीच संवय मला अखेरपर्यंत होती. कोणीतरी प्रत्यक्ष शिक्षण देईपर्यंत आपल्याहून श्रेष्ठ अशा पात्राच्या उत्तम गोष्टींचें अनुकरण हीच नटाच्या शिक्षणाची प्रथम पायरी होय असें माझें मत आहे. माझ्या बाबतींत तरी मला या अनुकरणानेंच अंधुकसा पुढचा मार्ग दिसूं लागला.

नंतर देवलमास्तरांनीं त्याच दिवसापासून मला शिकवायला सुरवात केली. प्रथम उभें रहाण्याचा पवित्रा कसा असावा, मानेचा झोक मागें झुकलेला. जो पाय पुढे असेल त्याच बाजूचा छातीचा भाग उन्नतपणें वर करून मानेचा झोंकही त्याच प्रमाणांत मागें झुकता ठेवायचा. चालताना वळून मागें येतांना कशा झोकदार रीतीनें मागें यावे, जोरदारपणें पुढें जातांना कसें जावें, हाताला वळणदारपणा कसा असावा, हाताचीं बोटें कशीं ठेवावीं, निर्देश करतांना बोट कसें दाखवावें; नको, ये, जा, कोण, कुठें, केव्हां, पाहिजे वगैरे शब्दांचे अर्थानुसार कसे उच्चार करायचे. हंः वगैरे तिरस्कारयुक्त उच्चार व इतर उच्चार यांचें शिक्षण सुरूं झालें. शकाराची भूमिका शिकवितांना शब्दोच्चार व ध्वनी. मऊ येई. कारण स्त्रीपात्राची संवय. त्याला बोलतांना शद्बाला घुमारा कसा आणायचा, भाषण लयदार कसें असावें व अर्थानुसारें शब्दांना सुरांचें आंदोलन व आघात कसे द्यावे हें अति उत्तम रीतीनें शिकवीत. पदरचे शद्ब पात्रांनीं मध्यें घालूं नये याबद्दल त्यांचा अत्यंत कटाक्ष असे.

ते म्हणत ज्या लेखकानें एवढी शद्बसृष्टि निर्माण केली त्याला तुम्ही जे शद्ब वापरतां ते घालणें अगर सुचणें अशक्य असतें का ? परंतु त्याला ते शब्द पांचट पचकळ वाटतात म्हणूनच तो ते घालीत नाहीं. पात्रांना फारच थोडी सवलत घेण्याचा अधिकार आहे. तो भूमिका करीत असतांना रसाविष्करणासाठीं त्यानें एकादा मुद्राभिनय केला, तर त्याला बरोबर पोषक होईल असा एखादा शब्द साजेल असा घालायला हरकत नाहीं. परंतु तोच आधार घेऊन जास्त फाजीलपणा करणें योग्य नाहीं, व ज्या ज्या नटाचा या बाबतींत तोल सुटला आहे ते ते नट फाजील या संज्ञेला पात्र झालेले आहेत. ज्या ज्या कंपनींत चालकाचें नटावर नियंत्रण आहे अगर होतें किंवा ज्या नटांनीं सवंग लोकप्रियतेला बळी न पडता बुद्धि समतोल ठेवली त्याच कंपनीचीं नाटकें लोकप्रिय व श्रेष्ठ दर्जाचीं ठरलीं. रंगभूमीवरची लोकप्रियता ही अत्यंत मादक आहे. भांग,गांजा, मद्य यांच्या कैफापेक्षांहि ही मादकता जास्त तीव्र असते. भांग गांजाची मादकता ही नियमित वेळेपर्यंत टिकते. परतु हा कैफ सारखा रहातो. परिमित सेवन करणारे ज्याप्रमाणें मादकतेच्या आहारीं जात नाहींत त्याप्रमाणें नटानेंहि ही लोकप्रियतेची मादकता आपल्या अंगावर न चढेल असें जागरूक राहिलें पाहिजे. भांग, गांजा, मद्यानें शरीराची हानी होते. परंतु लोकप्रियतेच्या कैफानें प्रगतीची व चारित्र्याची हानी होते. नट नेहमीं यशाच्या सुवर्णमध्याबद्दल असंतुष्ट असला आणि अजूनही पुष्कळ पुढें व्हायला पाहिजे असा महत्वाकांक्षी असला तरच तो यशाचा सुवर्णमध्य गांठतो आणि यशाच्या कैफानें धुंदींत नेहमीं राहिलेला नट अधोगतीच्या गर्तेत जातो.

मागें सांगितल्याप्रमाणें पद्धतशीर शिक्षण सुरू झालें. रोजच्या अभ्यासानें मनाला शिकण्याची उमेद येऊन बहुतेक दिवसभर माझा नक्कल म्हणण्याचा धूमधडाका सुरू झाला. माझी नकलेची धुमश्चक्री ऐकून व देवलमास्तर शिकवितात हें ऐकून मंडळींत थोडीशी चर्चा सुरू झाली. कोणी पसंती तर कोणी "काय बंब वाजविणार तें दिसतेंच आहे." अशा अर्थाचा सूर निघूं लागला; आणि त्यांत कांहीं गैरहि नव्हतें. कारण वीरतनय नाटकाच्या प्रारंभापासून माझेंच मालिनीचें काम गचाळ

व्हायचें. तेव्हां साहजिकच मंडळींत चर्चा झाली. पण सुमारें पंधरा दिवस अशा रीतीनें देवल मास्तरांच्यासमोर माझी भूमिका बसल्यानंतर लखनौच्या कॉंग्रेसला मास्तर गेले; त्या दिवशीं त्यांना पोंचविण्यास दडपे व मी स्टेशनवर गेलों. त्या वेळीं त्यांनीं दडपे याच्याजवळ भाऊरावांना निरोप सांगितला होता, "आतां जें मृच्छकटिक होईल त्यांत गणूला शकाराची भूमिका द्या. मी बसवून घेतली आहे." हा निरोप दुसऱ्या दिवशीं दडपे यांनीं सांगितला व मला आतां रंगभूमीवर महत्त्वाचें काम मिळालें या कल्पनाराज्यानें मी हुरळून गेलों. परंतु अद्याप दैवानें माझा पाठपुरावाच करायचा ठरविलें असल्यानें आलेली संधी हातीं येऊनहि गेली. मृच्छकटिक लागलें. पण मंडळींत बूट निघाला कीं आजपर्यंत येथें झालेल्या प्रयोगांत शंकररावांनीं काम केलें आहे, तेव्हां एका प्रयोगापुरता बदरंग कां ? झालें ! ! माझ्या डोळ्यांसमोर काजवे चमकले. पण जेथें मी चांगलें काम करीन कीं नाहीं याबद्दल पूर्ण साशंकता सर्वांच्या मनांत होती, तेथें पसंतीचा ध्वनि कोण काढणार ? एतावता काम मिळालें नाहीं. कपाळावर हात मारून कमनशिबाला शिव्या देत बसलों.

## प्रफुल्लतेंत तंटा

ग्वाल्हेर येथेंच भाऊराव रामभाऊंचा एक दिवस प्रफुल्लतेंत तंटा झाला. तंट्याचें मूळ रामभाऊंनीं काढलें. मुंबईच्या मानपत्राची खवखव बाहेर निघून भाऊरावांना ते अद्वातद्वा बोलूं लागले. कांहीं वेळ युद्ध एकेरीच होतें. कारण प्रतिपक्षी समोर नसल्यामुळें "एकट्यानें मानपत्र घेतलें" वगैरे वायबार हवेंत उडूं लागले. कांहीं वेळानें दुसरा योद्धा उठून शब्दांचे वार प्रतिवार होऊं लागले. मंद्र सप्तकांतून तार सप्तकांत शब्द उमटूं लागले. शब्द रबर ताणल्यासारखे ओढत उच्चारले जात होते. नंतर प्रच्छन्न मारा संपून संस्कृत शब्दांचा अहेर होऊं लागला. वेळ रात्रौ ११ वाजण्याची होती. नंतर रामभाऊ झोंपीं गेले. भाऊरावहि व्यवस्थितपणें जाऊन निजले.

## भाऊरावांनाहि पदर पसरावा लागला

भाऊरावांना या चार वर्षांत मी हे तिसऱ्यांदा संतापलेले पाहिलें. एकदां हुबळीस सर्व मुलांनीं भर्जी करून खाल्ली तेव्हां. दुसरी खेप, पुणें स्टेशन-

वर १८९७ सालीं उमरावतीस जातांना मुलांना बसायला जागा नाहीं म्हणून मुलें स्टेशनवर ताटकळत राहिलीं होतीं त्याबद्दल पुणें स्टेशनवर शंकररावांच्यावर संतापले होते ती. व ही तिसरी खेप झाली. या भांडणाचा परिणाम म्हणजे कंपनी निघायच्या वेळीं रामभाऊंनीं कंपनीची जी गंगाजळी (कॅश) त्यांच्याजवळ होती ती माझ्या भागीदारीचा निकाल केल्याशिवाय देत नाहीं, असा भाऊरावांना निरोप पाठविला. भाऊरावांना हें स्वप्न पडतच होतें, कीं रामभाऊंचें मन स्वच्छ नाहीं. परंतु ग्वाल्हेर येथेंच माझी भागीदारी संपली पाहिजे असा त्यांनीं हट्ट धरिला. रामभाऊंनीं पुढील मुक्कामापर्यंत आपला हट्ट सोडावा म्हणून पुढील मुक्कामास त्यांच्या मनाप्रमाणें करतों असें निरनिराळ्या माणसांकडून रामभाऊंना कळविलें. परंतु ते हट्ट सोडीनात. तेव्हां एक दिवस भाऊराव रामभाऊंच्याकडे जाऊन त्यानीं त्यांच्यापुढें पदर पसरला व हात जोडून म्हणाले, "रामभाऊ, येथें आपण काय दिमाखांत वावरलों आणि येथेंच हा तुकडा पाडणें लौकिकाला कमीपणा आणणारें आहे. तरी तुम्ही इंदुरास चला. तेथें सर्व निकाल करूं." असें सांगितल्यावर कुठें एकदाचा कौल मिळाला.

## माझें 'दे दान सुटे गिराण'

श्रीमंत शिंदे सरकारांनीं कंपनीस सहा प्रयोगांचे साडेसात हजार रु. दिले. गोरे यांस त्याच्या आवाजावर खूप होऊन बारा तोळ्यांच्या सोन्याच्या सलकड्यापुरते म्हणजे तीनशें रुपये बक्षिस दिले. या बक्षिसानें लालूच उत्पन्न होऊन जन्माचें कोटकल्याण होईल हा कयास बांधून गोरे यानीं महाराजांना त्यांच्या नोकरीला रहाण्याचें कबूल केलें. श्री. शितोळेसाहेब यांनींहि कांहीं वस्त्रें दिलीं. त्यांत मला एक साधी शालजोडी बक्षिस मिळाली होती. ती कां मिळाली याचें मात्र मला आश्चर्य वाटलें. कारण त्या वेळीं घरांतल्या केराइतकीहि माझी किंमत कंपनींत नव्हती. परंतु माझें सोंग चांगलें दिसत असल्यामुळें केवळ सौंदर्यालाच तें बक्षिस मिळालें असावें. श्री. आंग्रेसाहेब यांच्या येथेंहि देकार झाला. त्यांत भाऊरावांना एक भरजरी शेला, गोरे यांस जरीची टोपी, डवरी यांस कोट व टोपी, मला एक रंगीबेरंगी चौकटीचा डबल ब्रेस्टचा

कोट; पंत, मिरजकर, चिंतोबा वगैरे सर्वांना पाहून पाहून बक्षिसें मिळालीं. कोट टोप्या मात्र वापरलेल्या, ठेवणींत पडलेल्या, आम्हांला मिळाल्या. त्याबद्दल मात्र मी, “ दे दान सुटे गिराण ” असें त्या रंगीबेरंगी कोटाबद्दल म्हणत असें. परंतु पुण्यास आल्यावर तें बक्षिस अंगांत घालून मी बिनदिक्कत हिंडत असें. त्या वेळीं तें पुण्यास खपून गेलें. या काळीं जर मी तसा कोट घालून रस्त्यानें गेलों असतों, तर फाल्गुन वद्य प्रतिपदा मला अनुभवायला मिळाली असती.

कंपनी हलायच्या वेळीं बिन्याहून माझी आई ग्वाल्हेर येथें आली. आणि तिनें काशीयात्रेसाठीं निघण्याचें ठरविलें. त्या वेळीं तिचेजवळ स्वयंपाक करून मिळविलेले तीस रुपये होते. मी कंपनींतून पन्नास–साठ रुपये भाऊरावांच्याकडून यात्रेला मागून घेतले आणि ता. २३।२४ जानेवारी सन १९०० रोजीं मी काशीस रवाना झालों. भाऊरावांचे श्वशुर ग्वाल्हेर येथें आले होते. त्यानाहि संभाळून काशीस नेण्याची कामगिरी आमच्यावर सोंपविली होती.

## आमची काशीयात्रा

आम्हीं रात्रौ ग्वाल्हेरहून निघालों तों पहाटे पांच वाजतां आग्रा स्टेशनवर उतरून सराईत गेलों. तेथें सामान ठेवून यमुनेवर स्नानास गेलों. थंडी भयंकर होती. गार पाण्याचें स्नान करणें म्हणजे शिक्षाच होती. परंतु मातुश्री बरोबर असल्यानें अळंटळं चालणें शक्य नव्हतें. यमुनेंत बुचकळी मारून आई व मी वर आलों. पण भाऊरावांच्या श्वशुरांनीं बुचकळी मारतांच त्यांचीं गठडी वळून त्यांनीं डोळे पांढरे केले. तो देखावा पाहतांच त्यांनीं राम म्हटलें असावें असेंच वाटलें. परंतु म्हातारा तसा चिवट होता. कसातरी धडपडत पाण्याच्या बाहेर पडला. नंतर सराईत जाऊन थोडा बरोबर आणलेला फराळ केला. आईनें उपासाचे जिन्नस आणले होतेच. शिंगाड्याच्या पिठाचा लाडू, बटाट्याचा चिवडा वगैरे जिन्नस होते.

## पंड्यांच्या तडाख्यांत

नंतर पास काढून टांगा करून किल्ला, ताजमहाल वगैरे पाहून सायंकाळीं पांच वाजतां अलाहाबादेस रवाना झालों. दुसरे दिवशीं पहाटे

अलाहाबादेस उतरलों. पंड्याच्या एजंटाच्या तडाख्यांत सांपडलों. पंड्याच्या घरीं गेलों. तेथें त्यानें आपलें मायाजाळ सोडलें. परंतु त्या मायाजाळांत सांपडण्यासारखी माझी सांपत्तिक स्थिति नसल्यानें नागवलें जाण्याची धास्तीच नव्हती. शेवटीं अलाहाबादचा क्षेत्रविधि करण्याचा पंधरा रुपयास मक्ता ठरला. नंतर शौचास गेलों तों मला दोन दिवसांचा मलावरोध झाल्यानें मुळव्याधीचा उपद्रव झाला. पंड्याच्या गुमास्त्याबरोबर संगमावर जाऊन क्षौरविधि झाला. नापित पायधरणी करूं लागला. डोक्याची अर्धी हजामत करून त्यानें मागणीचें चऱ्हाट सुरूं केलें. त्यांतून पार पडतां पडतां पुरेवाट झाली. सुमारें एक तास लागला. दहा अकरा वाजतां संगमावर स्नान ! अरे बाप रे ! आदल्या दिवशीं पाऊस पडलेला, गार वारा वाळवंटांत सुटलेला, संकल्प चाललेला, हुडहुडी भरलेली; पोटांत भूक; असा बनाव झालेला होता. सर्व विधि होऊन पिंडप्रदानास सुमारें दोन वाजले. पंड्याजी दक्षिणेचा करभार ठेवण्यास सांगूं लागले. मीहि एक रुपया मोठें मन करून ठेवला. पंड्या पंचवीस रुपये मागूं लागला. आमची ही हुज्जत सुमारें वीस मिनिटें चालली होती. शेवटीं आमच्या आईसाहेब विरघळून, पांच रुपये ठेव म्हणून मला प्रेमळपणानें खुणा करूं लागल्या. मी आईकडे त्यामुळें हेतुपुरःसर पाहीनासा झालों. शेवटीं पोटांत भुकेची आग, गारव्याचा त्रास, ओलें वस्त्र सर्वांगावर, गार वाळवंटांत बसून पायांना मुंग्या आलेल्या, पेटके यायला लागलेले व पंड्यांनीं हात जोडून जखडलेलें. अशा स्थितींत शेवटीं चिडून पंड्याला म्हटलें, " येथें पिंड दिल्यानें व तुझ्यासारख्या पंड्याची भर दक्षिणेनें केल्यानें, पितर स्वर्गास जातात असा माझा विश्वास मुळींच नाहीं. आईच्यामुळें तुझी भीड धरली. लवकर मोकळा कर नाहीं तर पिंड उचलून गंगेंत टाकून चालता होतों. चले जाव ! " असा माझा रुद्रावतार पहातांच " आच्छा, आपकी इच्छा " असें त्यानें म्हटलें. विधि संपवून घरीं आलों. पंड्यानें पुरी बासुंदी, बटाट्याची भाजी, व कद्दूकी तरकारी ( भोपळ्याची भाजी ) ठेवली होती. ती कशी तरी खाऊन दोन तास विश्रांति घेऊन पंड्याची बिदागी देऊन गंगा भरून आणविली होती ती घेऊन प्रयागहून दुसऱ्या दिवशीं दुपारीं निघालों. गंगेचें पार्सल करायला

पार्सलऑफिसांत गेलों तर चिरीमिरीशिवाय रिसीट होईना. स्टेशनवर तिकीट काढायला पैसे दिले त्यांत बारा आणे परत आलेल्या पैशांत कमी. प्लॅटफॉर्मवर जायला पोलिसाच्या हातावर कांहीं तरी द्यावें लागलेंच. एकंदर उत्तर हिंदुस्थानचा प्रवास व यात्रांच्या ठिकाणीं या पेंढाऱ्यांचा त्रास. अलाहाबादेहून निघून दुसऱ्या दिवशीं पहाटे बनारसला आलों. काशीच्या उपाध्याच्या घरीं गेलों.

## तीर्थविधि

काशीस उतरायला आल्याबरोबर क्षेत्रोपाध्ये सामोरे आले. नुकतेंच निजून उठलेले होते. काळे रोम होते. त्यांनीं आपल्या चाकराला सांगितलें, "यांचें सामान त्या दल्हाणांत नेऊन ठेव." आदल्या दिवशीं सायंकाळीं मनसोक्त घेतलेल्या थंडाईनें त्यांचा घसा दोरवटल्यामुळें ते रेंकून बोलत होते. परंतु आदरातिथ्य करण्यांत तत्परता दाखवीत होते. माझी आई व मी दिसण्यात पांढरपेशा स्थितींतले दिसत असल्यामुळें कदाचित् हा अगत्याचा विधि जरा जास्त लीनतेनें होत असावा. चहापाणी झाल्यावर काय करायचें याची वाटाघाट होऊन काशींतील सर्व विधींचा काळाष्टकासह पस्तीस रुपये मक्ता ठरला. त्या दिवशीं, मला दोन दिवस अगोदर खरजेचा प्रादुर्भाव झाला होता, त्याला जोर आलेला होता. रात्रौ गाडींत थोडा ताप आलेला. मूळव्याधीचा प्रयाग येथें उद्भव होऊन बसणें, चालणें अशक्य होणार असें वाटूं लागलेलें. परंतु आईनें क्षेत्रविधि केलाच पाहिजे असा हुकूम फर्मावल्यावर ज्ञानवापीवर गेलों. त्याचें तीर्थ द्यायला पंड्याजी बसलेले होतेच. ते आपापल्या परीनें ज्ञानवापी( ? )चें माहात्म्य समजावून देऊन आमच्या गळीं तीर्थ उतरविण्याचा प्रयत्न करीत होते. मी हातावर तें तीर्थ घेऊन तोंडाजवळ नेणार, तोंच त्याला कुजलेल्या बेलाच्या पानांची आणि तांदूळ कुजून त्याचीहि मिश्र झालेली घाण येतांच, मी एरंडेलाच्या सेवनाच्या वेळचें तोंड केलें. त्यावर ती ज्ञानवापी फुकट जाईल म्हणून पंड्याजींनीं "नुसतें मार्जन केलें तरी चालतें" असा शास्त्रार्थ सांगितला. मी तसें केलें. परंतु मुद्रा तीच होती. आई जास्त भाविक, परंतु

तिलाहि घाण आलेलीच होती. तिनें मुद्रा निर्विकार ठेवून मार्जन केलें. पैसा पैसा टाकला. पंड्याजी नाखूष झाले. कारण आमच्याकडून प्राप्ति अगदींच सामान्य झालेली. भाऊरावांचे श्वशुर हे एक पेन्शनर डॉक्टर असल्यामुळें त्यांनीं ज्ञानवापीचें सेवन करण्याचें आरोग्याच्या सबबीवर नाकारलें, इतकेंच नाहीं तर पडलेल्या तीर्थानें ओला झालेला हात स्वच्छ पाण्यानें धुवायला ते पाणी शोधूं लागले. नंतर मनकर्णिकेवर स्नानास गेलों. तेथेंहि त्या तीर्थांतलें शेवाळलेलें व विकृत रंग झालेलें पाणी पाहून मी स्नान करण्याचें नाकारलें. झालें! आईशीं माझा वाद सुरू झाला. मी म्हणे, या घाणेरड्या पाण्यानें मी जास्त आजारी पडेन. ती म्हणे, "नाहीं रे बाबू, तीर्थानं स्नान केल्याशिवाय यात्रेचें पुण्य नाहीं. स्नानानें कांहीं होणार नाहीं." हा वाद तेथेंच आटपणार नाहीं, असें पाहून तेथेंहि तीर्थांत हात बुचकळून कसे तरी दोन थेंब उडविल्यासारखें करून मार्जनविधि करून चालूं लागलों. आईचें सारखें चाललेंच होतें. शेवटीं "आचार भ्रष्टी सदा कष्टी" हा मंत्र उच्चारून ती स्नानाला उतरली. तिलाहि तें पाणी जरी घाणेरडें वाटलें तरी उघड कसें म्हणायचें? कारण तीर्थ म्हणून मुलाच्या मनावर बिंबवण्याचा प्रयत्न केलेला. तेव्हां नंतर पुन: गंगेच्या स्वच्छ प्रवाहांत तिनें स्नान केलें. आमचे डॉक्टर-महाशय यांनीं व मीहि गंगेंत संकल्पासह स्नान केलें. आमच्याबरोबर आम्हीं खुर्दा करून घेतलेला जागोजागच्या क्षेत्रस्थांच्या खंडणीनें खलास झाला. शेवटीं गंगेवरून रिक्त हस्तानें घरीं परत आलों. क्षेत्रात त्रिरात्र राहिलें पाहिजे, म्हणून त्या दिवशीं नुसता स्नानविधि झाला. क्षौरमुंडन झालें.

## हजामदादांची अजब करामत

अलाहाबादेच्या मुंडणांत कपाळावरच्या सुरवातीच्या केसांपैकीं कांहीं केस हजामदादांच्या करामतीमुळें तसेच राहिले होते. माझें वय पिंपळपान घालायचें नसूनहि न्हावीदादांनीं ही तरतूद करून ठेवली होती. ते केस आठवणीनें काढण्यास बनारसच्या कारागिराला विनंतिपूर्वक सांगून, दुसरा एखादा देखावा डोक्यावर उत्पन्न करूं नकोस असेंहि विनवायला मी सोडलें नाहीं. नापितमहाशयांनी स्मित करून, "नहीं,

नही, ऐसा नही " असें म्हणून कुशलता संपविली. क्षेत्रविधींतून सध्यां तरी सुटलों म्हणून समाधानाचा विश्वास सोडला ! रात्रौ सपाटून पुनः ताप भरला. दुसऱ्या दिवशीं श्राद्धविधि बिऱ्हाडीं ऊन पाण्यानें स्नान करून उरकला. तिसऱ्या दिवशीं काळाष्टक होऊन, काळभैरवाचें दर्शन झालें. तेथें काळभैरवाचा सोटा पाठींत बसतो असें ऐकलें होतें. म्हणून काळभैरवाच्या देवळांत भीत भीत मागेंपुढें पहातच शिरलों. प्रत्यक्ष सोटा बसला तो मात्र कळे न कळे इतकाच शरीराला जाणवला. सोटा या शब्दाची भीति फोल टरली. काळभैरवाचे गंडे विकत घेतले. परंतु स्नेहीआसेष्टांना गंडादेणगी देण्याच्या भाविक लालसेपायीं किमतीचा मात्र जबर गंडा बसला. गंड्याकरिता आम्ही दिलेली किमत ऐकून लोकांनीं आमच्याकडे पाहून अशी मुद्रा केली कीं, " गाढव आहेत झालं." त्या मुद्रेमुळें गंडा बसण्याचें दु:ख द्विगुणित झालें. दुसऱ्या दिवशीं रात्रौ निघायचें. दुपारीं उपाध्येबुवानीं आम्हाला, " यजमानाला " आपल्या बसण्याच्या जागेंत आदरसत्कार करण्याच्या हेतूनें नेलें होतें. थंडाईचें एक घागरीचें पातेलें तयार केलेले होतें.

## श्रीविश्वेश्वराचा प्रसाद

पातेल्यातील हिरवट रंगावरून मला ज्ञानवापीचें पाणी पाजणार, अशी भीति उत्पन्न झाली. लागलीच असें वाटलें कीं, सडा घालण्यासाठीं शेणकाला तयार केलेला असावा. परंतु इतक्यांत एकेकापुढें एकेक भरलेलें तसराळें ठेवण्यांत आल्यामुळें व मिरींबडीशेपेच्या दर्पामुळें ती थंडाई असें समजलें. माझ्याहिपुढें एक–त्यांच्यामानानें लहान असें–तसराळें ठेवून श्रीविश्वेश्वराचा प्रसाद घेण्याची विनंति करण्यांत आली. तें थंडाईचें तसराळें पाहून पोटांत भीति उत्पन्न होऊन मी उपाध्येमहाराजाना म्हटलें, " मला सोसणार नाहीं, मला संवय नाहीं." त्यावर त्यानीं "कुच हरकत नाहीं. ठंडाई घेऊन या " असें फर्मावलें. शेवटीं जास्त आग्रह करूं लागल्यावर, मी म्हटलें, " इतकी ठंडाई जर मी घेतली तर पुढच्या वर्षी माझेंच श्राद्ध कुणी न केल्यानें माझा आत्मा पिशाचयोनींत प्रवेश करून ठंडाई देणाराच्या मानगुटीवर बसेल. " असें म्हणतांच सर्व भंगट मंडळी गदगदून हसली.

## आमची ठठोली करतां काय ?

नंतर ठंडाई घेऊन उपाध्येबुवांनीं आपल्या उग्राणीसाठीं व आम्हीं क्षेत्रविधि त्यांच्याकडून करविला याबद्दलचा दाखला लिहून घेऊन आमच्या पुत्रपौत्रांनींहि या क्षेत्रस्थ टोळांच्या जाळ्यांत अडकावें असा आमचा वहीवर लेख लिहून घेण्याच्या तयारीनें आपल्या हस्तकासह आमच्यासमोर आसन ठोकलें. कंत्राटाप्रमाणें पस्तीस रुपये देऊन उपाध्यायाचा सन्मान म्हणून तीन रुपये पुढें ठेवले. आम्ही जणुं कांहीं महापातक केलें असून आमच्या हातून कांहीं अशिष्टप्रकार झाला आहे, अशा मुद्रेनें परंतु विनयाच्या आवाजानें, उपाध्याय भाषण करते झाले, " महाराज हें काय ? आमची ठठोली करतां काय ? " मी म्हटलें, आमच्या शक्तीप्रमाणें आम्हीं केलें. त्यावर तीन रुपयांकडे पाहून ते म्हणाले "हा काय उपाध्यायांचा सन्मान ? महाराज, काशीयात्रा मोठी यात्रा. तेव्हां आपण असें करून कसें होणार ? निदान एक शेंकडा तरी ?" त्यांनीं शेंकडा उच्चार करतांच माझ्या डोळ्यासमोर काजवे चमकूं लागले. भाऊरावांचे श्वशुर चांगले सुस्थितींतले असूनहि त्यांनीं माझा प्रकार पाहून माझ्या हाताला हात लावण्यास प्रारंभ केला. मी कांहीं उत्तर देऊन भाऊरावांच्या सासऱ्याकडे पाहूं लागलों, कीं त्यांनीं बोळकें (त्यांचे सर्व दांत पडले होते.) भाषणांतील अर्थाप्रमाणें लांबरुंद व आकुंचित अगर चंबूसारखें करून माझ्या होस हो द्यावा. त्यांनीं तसें केलें म्हणजे उपाध्यायहि त्यांच्याकडे कांहीं विशेष हेतूनें पाहूं लागे. उपाध्यायाला वाटे हा वृद्ध असल्यामुळें भाविक दिसतो आहे. तेव्हां यात्रेचें महत्त्व माझ्या मनावर त्यांनीं बिंबवावें, परंतु तो म्हातारा चांगलाच खमंग असल्यानें तो मला अनुकूल न रहातां उपाध्यायाला अनुकूल होण्यानें त्याच्याहि खिशाला कात्री लागेल हें जाणून तो सारखा नुसत्या मुद्रा करून एक अक्षरहि बोलत नव्हता. शेवटीं उपाध्येबुवा शेंकड्यावरून पन्नासावर, पन्नासानें बधत नाहीं पाहिल्यावर तीस-पंचवीस असा उतरत येऊन पंचवीसावर त्यांनीं मुक्काम करायचें ठरविलें. परंतु आम्ही मुळांत एेशीं नव्वद रुपये घेऊन काशीयात्रेला निघालेले. त्यांत आग्रा, अलाहाबाद, बनारसपर्यंतचें रेल्वेभाडें, टांगाभाडें, मधल्या खंडण्या,

प्रयागचा तीर्थविधि, काशीचे पस्तीस रुपये कॉन्ट्रॅक्ट, ज्ञानवापी, मनकर्णिका, काळभैरव, विश्वेश्वर, गंडे वगैरे खंडण्या देऊन जेर होऊन सरासरी १५ रुपये जवळ राहिलेले. त्या पैशांत गया होणें शक्य नव्हतें. सबब पुढें गयेचें पाहूं असें अक्षयवटाला व विष्णुपदाला आश्वासन देऊन इंदूर गांठायचें ठरविलें होतें. परंतु उपाध्येबुवा अडून बसल्यामुळें शेवटीं तीन रुपयात दोन रुपये मोठ्या कष्टानें घातले. उपाध्येबुवांनीं शेवटीं सांगितलें, कीं पैसे कमी पडत असतील तर मी तुम्हास उसनवार देतों. मागाहून द्या. मी तयार होईन या भीतीनें आई म्हणाली, "नको रे बाबा. क्षेत्रांत कर्ज काढूं नये. कर्ज राहिलें तर यात्रा निष्फल होईल." या आईच्या उद्गारांत भाविकपणापेक्षां उपाध्यायाचा लोभीपणा पाहून उत्पन्न झालेली सावधगिरीच होती असें मला वाटलें. शेवटीं आम्हीं अगदीं गरीब व रंक आहोंत असें पाहून पांच रुपये कडोसरीस लावून निदान उपाद्धीण-बाईस मनकर्णिकेच्या नांवानें लुगडें चोळी तर नेसवा असा निर्वाणीचा सवाल उपाध्यायानीं टाकायला सोडलें नाहीं.

## आमचें पोकळ टावकें !

मी नाटक मंडळींत असल्यामुळें त्यांतल्या त्यांत पोषाख नीटनेटका असल्यामुळें व माझी आई गोरीपान सतेज दिसत असल्यानें आणि भाऊरावांचे श्वशुर जरीकाठी रुमाल व रेशीमकांठी उपरण्यानें विभूषित असल्याने उपाध्येबुवांना चांगलें जरी नाहीं तरी बऱ्यापैकीं टावकें सांपडलें असें वाटलें असेल. परंतु संभावनेचा प्रकार पाहिल्यानंतर त्यांचा आंबुस झालेला चेहेरा पाहून मला मनांतून सारखें हंसूं येत होतें. क्षेत्रस्था-बद्दलची चीड अजूनपर्यंत माझ्या मनांत बसायला या काशीयात्रेचेंच कारण झालें. त्यानंतर मी आजपर्यंत जितक्या वेळां क्षेत्रांत गेलों तितक्या वेळां क्षेत्रस्थांच्या गळाला न लागतां मला जें करायच तेंच करीत आलों आहें. पंढरपूरचे बडवे, पुजारी, नाशिकचे क्षेत्रस्थ यांच्याहि स्तुतीला भुलून मी माझ्या मनाची समता कधींच ढळूं दिली नाहीं. आजपर्यंत मी जर कुणाला कांहीं धर्मादाय केला असेल तर तो मी माझा नांवलौकिक वाढण्यासाठीं नसून माझ्या मनाला तें कृत्य पटतें म्हणून

मनाच्या समाधानासाटींच केला असेल. माझ्या घरांत भिक्षेकरी जर धड-धाकड आला तर त्याला मी "भिक्षा घालायची नाहीं" असा दंडक घालून ठेवला आहे. गरीब विद्यार्थी, म्हातारे, शरीरानें पंगु झाल्यानें अन्न मिळविण्यास असमर्थ झालेले दुबळे लोक अशानाच मी यथाशक्ति मदत माझें तें पवित्र कर्तव्य या दृष्टीनें करीत असतों. वडिलाचीं श्राद्धें वगैरे मी नियमानें त्याचा स्मृतिदिन म्हणून करीत असतों. भिक्षुकवर्गानें एखाद्या व्रताचें, अनुष्ठानाचें, जपाचें, ब्राह्मणभोजनाचें माझ्या मनावर परिणाम करण्याच्या हेतूनें व्याख्यान झोडलें तरी मला त्याचा राग येत नाहीं. कारण भिक्षुकी हा धंदा झाल्यानें धंदेवाल्यानें आपल्या धंद्याच्या वाढीसाठीं जें केलें तें योग्यच होय. इतर धंदेवाले आपल्या धंद्याच्या वृद्धीसाठीं जें करतात त्यासाठीं जर कुणी त्यांची हेटाळणी करीत नाहीं तर भिक्षुकांचीच हेटाळणी का करावी? मात्र क्षेत्रांतील देवाचे पुजारी, बडवे वगैरे वर्गाबद्दल, त्याच्यात जे कांहीं दुर्वर्तनी लोक मी पाहिले व ज्याचा परिचय झाल्यानें त्याच्या अंतरंगाची माहिती झाली, त्यावरून मात्र तिरस्कारबुद्धि उत्पन्न झाली आहे. मी स्वतः माझ्या विद्यार्थीदशेंत वारानें जेवीत होतों म्हणून वार मागायला आलेल्या विद्यार्थ्याला मी कधींहि नाहीं म्हटलें नाहीं, आणि ही माझी वृत्ति माहीत असल्यानें माझी अर्धांगीहि त्याच तत्त्वानें वागत असते.

## क्षेत्रस्थांच्या लुटींतून सुटका !

यांप्रमाणें बनारसहून निघालों त्या वेळीं कट्टाकट्टी झांशीपर्यंत आम्हां दोघांच्या भाड्यापुरतेच पैसे माझ्याजवळ शिल्लक होते. कानपूर स्टेशनवर पुन्हां झांशीचीं तिकिटें काढतांना बुकिंगमास्तरनें मागितले ते पैसे त्याजकडे दिले. बराच वेळ तिकीट मिळेना. गाडी सुटण्याची पहिली घंटा झाली. मी चिडून व गयावया करून तिकीट मागूं लागलों. तिकिटें व राहिलेले पैसे माझ्या हातीं पडले. धांवत धांवत डब्याजवळ जाऊन डब्यांत चढलों व तिकिटांचा हिशेब पाहिला. तों दोन्ही तिकिटांत मास्तरानें नऊ आणे कमी दिल्याचें आढळलें. त्याला अस्फुट आवाजांत पांचसहा शेलक्या शिव्या दिल्या आणि आतां तरी या पेंढाऱ्यांच्या लुटींतून सुटलों

या विचारानें थोडा खुषींत बसलों. झांशीस माझा मेहुणा ( धाकट्या बहिणीचा नवरा ) होता. पत्ता साधारण माहीत होता, त्या पत्त्यावर टांगा करून गेलों. टांगेवाल्यास पैसे देऊं लागलों तों एक आणा शेवटीं कमी आला. तो मेहुण्याकडून घेऊन भागविला. झांशीस उतरून आईला घेऊन भाड्याचे बिना स्टेशनला पोंचण्यापुरते पैसे घेऊन दुसऱ्या दिवशीं बिना येथें आलों. तेथें आई राहिली. माझी बहीणहि माहेरपणासाठीं बिना येथें आली होती. तेथून इंदूरच्या भाड्यापुरते पैसे घेऊन इंदुरास आलों.

## भाऊराव आजारी झाले

ग्वाल्हेर येथें यायच्या अगोदर मुंबईसच एका नामांकित डॉक्टरांची तपासणी होऊन भाऊरावांना त्या डॉक्टरनें सांगितलें कीं, तुमची प्रकृति कांहीं दिवस पूर्ण विश्राति घेतल्याशिवाय सुधारणार नाहीं. परंतु ग्वाल्हेर सरकारांच्या निमंत्रणाचा स्वीकार केल्यानें सध्यां चार महिने विश्रांतीचें जमणार नाहीं; परंतु ग्वाल्हेरचे प्रयोग संपल्यावर विश्राति घ्यायची असें भाऊरावांनीं ठरविलें होतें. ग्वाल्हेर येथें गेल्यानंतर भाऊरावांना नाटकाच्या कामाच्या मेहेनतीचा थकवा येई. परंतु कुणालाहि फारसें त्यासंबंधीं बोलत नसत. एकदां श्रीमंत आंग्रे सरदारांच्या खास शाकुंतल प्रयोगाच्या दिवशीं तिसऱ्या अंकांतील काम चालू असतां त्याना थकल्यामुळें पोटांतून कळा येऊं लागल्या. गातांना त्रास होई. अगोदर त्याची थकलेली प्रकृति पाहून शंकररावादि मंडळी त्याना नेहमीं म्हणत कीं, "तुम्ही सर्वच पदें इतक्या मेहेनतीनें का म्हणता?" त्यावर ते उत्तर देत कीं, "आंगचोरपणें काम करणें माझ्या स्वभावांतच नाहीं त्याला काय करूं? परंतु संभाळून काम करण्याचा प्रयत्न करीत आहें." पण तें बोलणें तितकेंच राहून रंगभूमीवर गेलें कीं आजारी आहेत असें कसें म्हणतां येईल अशी तडफ. परंतु त्या तडफेनें दुसरे दिवशीं भयंकर थकवा येई. असाच प्रकार वर सांगितल्या दिवशीं झाला होता. कसा तरी तिसरा अंक त्यानीं संपविला व आंत येऊन विकल होऊन पडले. पुढें चौथ्या अंकाला विश्रांति मिळाली. पांचव्या अंकाला पोटावर घट्ट असा एक पंचा बांधून त्यांनीं शेवटपर्यंत काम केलें. नाटक संपल्यावर शंकररावांना म्हणाले, "शंकरराव मला

जिवंत पुण्यास न्यायचें असलें तर पुन्हां शाकुंतल लावूं नका." म्हणून इंदूर येथें फक्त पुण्याच्या वाटखर्चीसाठीं व रामभाऊंच्या भागीदारीचा निकाल होईपर्यंत जो काळ जाईल त्या पंधरा दिवसांच्या अदमासानें पांच प्रयोग करायचे असें ठरून कंपनी इंदुरास आणली होती. माझी काशीयात्रा संपवून मीहि पहिल्या प्रयोगाच्या दिवशीं इंदुरास आलों. रामभाऊंची भागीदारी तुटायचें नक्की होऊन फक्त फारकतीचा कागद पुण्यास गेल्यावर करायचा असें ठरलें. मालकांच्या वांटण्या झाल्या. मोरोबांना एक आणा भागानें सरासरी ६०।६५ रुपये महिना पडला. मंडळींना, ९७ सालच्या वांटणीचा व यंदाच्या वांटणीचा गुड कॉन्डक्ट फंड वांटला. माझ्यासारख्या सामान्य माणसाला ७० रुपये आले होते. प्रयोग संपून कंपनी पुण्यास रवाना झाली. रामभाऊहि, त्यांचा कांहीं नाजुक वशिला ग्वाल्हेर येथें लागला होता अशी भ्रामक कल्पना करून घेऊन ग्वाल्हेर येथें गेले.

## रंगदेवता हजर झाली

इ. स. १९०० च्या फेब्रुआरी अखेर कंपनी पुणें येथें आली. काळेवावरांत नव्या विष्णूच्या देवळाजवळ भिडे यांच्या वाड्यांत मंडळी उतरली. निरनिराळया लोकांकडून व "केसरी"मधूनहि शारदा नाटक पहाण्याची लोकांची उत्कंठा पाहून पुण्यास शारदा नाटक करायचें ठरलें. रामभाऊ–सुवणशास्त्री व बाबू गाडे–जान्हवी हीं दोन पात्रें कमी होती. तेव्हां कृष्णाप्पा यांस सुवर्णशास्त्री बनवून नवीनच आलेल्या रंगरूटपैकीं गुंडू वालावलकर यांस जान्हवीचें काम देऊन प्रयोग साजरा केला. पहिला आडवारीं म्हणजे सोमवारीं झाला. प्रयोगास तुफान गर्दी झाली होती. आर्यभूषण थिएटर फुलून गेलें होतें. प्रयोगाच्या प्रारंभीं भाऊरावांना एक मोठी उलटी झाली व त्यामुळें ते अगदीं गळून गेले. प्रयोग कसा पार पडतो याची चिंता उत्पन्न झाली. परंतु त्यांनीं कांहीं झालेंच नाहीं असें मानून रंगभूमीवर कोदंडाच्या भूमिकेंत प्रवेश केला. "नामें ब्राह्मण खरा असे हा" यांतील हा या अक्षराचा टिपेचा सूर लावतांच रंगदेवता हजर झाली! एकेक पद म्हणून, चिंतोबा हिरण्यगर्भ होते त्यांच्या खांद्यावर

भार टाकून विसांवा घेत असत. नाटकाच्या रंगतींत कुठेंही कमीपणा आला नाहीं. याप्रमाणें शारदा नाटकाचे तीन व शापसंभ्रम एक असे चार प्रयोग झाले. मध्यंतरीं होलिकोत्सव पडला. धुळवडीचे दिवशीं मोरोबाहि पुण्यास आले होते. बाळकोबा नाटेकरांना भाऊरावांनीं बोलावून आणलें होतें. १८९३ सालीं बाळकोबा कंपनी सोडून गेले. त्या वेळेपासून सुमारें सात वर्षांनीं त्यांचें प्रथमच भाऊरावांच्या आग्रहानें कंपनींत येणें झालें.

## रंगदार धुळवड !

धुळवडीचे दिवशीं सकाळीं चहापाणी झाल्यापासून गाण्याची लयलूट चालली होती. दत्तोबा हल्याळकरहि आपली करवीर–निवासिनी कंपनी मोडल्यामुळें पुण्यास येऊन कंपनींत उतरले होते. दत्तोबा गायले, मोरोबा गायले, चिंतोबा गोरे, आप्पाराव, भाऊराव, बाळकोबा एकामागून एक व भाऊराव आप्पाराव हे बंधुद्वय जोडीनें बसले. शेलक्या शेलक्या लावण्यांचें गायन इतकें मनमुराद झालें कीं दुपारचे ३ वाजेपर्यंत कुणालाच जेवणाचें भान नव्हतें. शेवटीं शिमगापुराण होऊन तोंड भरभरून गुलाल उधळला गेला आणि हा होलिकोत्सव साजरा झाला. किर्लोस्कर कंपनींतील तीन उत्तम कलावंत ६।७ वर्षांनीं एकत्र आलेले. थट्टा मस्करी हास्यविनोद वगैरे या वयोवृद्धांच्या गमतीचें अजून स्मरण झालें कीं डोळयांत अश्रू येऊन “तेहि नो दिवसा गताः” असे उद्गार येतात.

## राजेलोकांची लहर एकाच गोष्टीवर स्थिरत नाहीं

येणेंप्रमाणें गाण्याचे वगैरे सर्व कार्यक्रम होऊन सुट्टी ता. १६ मार्च पासून सुरू झाली असें कळविण्यांत आलें. सुट्टीच्या दिवशीं जातांना गोरे यांनीं भाऊरावांना सांगून टाकलें कीं मी कंपनी सोडून श्रीमंत शिंदे सरकारांच्या नोकरींत रुजू होण्यासाठीं जाणार. भाऊरावांना त्यांचा तो विचार दूरदर्शीपणाचा वाटला नाहीं. त्याला त्यांनीं पुष्कळ समजून सांगितलें. असेंहि त्यांनीं सांगितलें कीं राजेलोकांची कृपा ही “दुरून डोंगर साजरे” या म्हणीप्रमाणें समज. मलाहि राजेमहाराजे

भेटले नाहींत असें नाहीं, परंतु पहा तुझा तूंच विचार! व शेवटीं म्हणाले, "भाऊ कोल्हटकरानें आजपर्यंत आत्मश्लाघा केली नाहीं. मी रोगग्रस्त झाल्यानें तूं माझ्यावर लादशील तें ओझें अगर तुझी अवास्तव मनधरणी मी कंपनीच्या स्वास्थ्यासाठीं करीन ही कल्पना मनांतसुद्धां आणूं नकोस. परंतु हा भाऊ कोल्हटकर रंगभूमीवर आल्यावर कोणीहि शेंबडे पोर आपल्याबरोबर कामाला घेऊन प्रेक्षकांना संतुष्ट करील हें लक्षांत ठेव. जा, पश्चात्ताप तुला होऊं नये अशी इच्छा आहे. परंतु चार महिन्यांत कंटाळशील. राजेलोकांची लहर एकाच गोष्टीवर स्थिर रहात नाहीं. तूं त्यांच्या नोकरींत असावें ही त्यांची लहर तूं तेथें जाईपर्यंत निघूनहि जाईल. पश्चात्तापानें पोळून परत आलास तर चुकलेला मुलगा म्हणून तुला मी अवश्य ठेवून घेईन." नंतर तो भाऊरावांना लवून आदरपूर्वक नमस्कार न करितां बरोबरीच्या माणसाप्रमाणें नमस्कार करून निघून गेला. भाऊरावांचा चेहेरा जरा चलबिचल झालेला होता. तो स्थिर करून फक्त हँः असा उद्गार काढून "वेडा आहे. भोळसरपणानें आणि लोभानें गेला आहे. लवकरच परत येईल." असें त्यांनीं म्हटलें. वरील सर्व देखावा मी कुतूहलानें पहात होतों. सर्व मंडळी घरोघर रवाना झाली. शंकरराव, चितोबा, मी, पाडू गुरव आणखी एकदोन मुलें अशीं पुण्यासच राहिलों. माझी आई अजून बिना येथून आली नव्हती. खाणावळींतलें जेवण महाग पडेल या कल्पनेनें कंपनींतील एक वाढपी नाना पारोळकर म्हणून होता, त्याला आम्ही गळ घातली कीं कंपनीची जागा आहे तेथें तूं-आपण सर्वजण मिळून राहूं या. स्वयंपाक तूं करावास. तुझा निम्मा खर्च आम्ही सोसूं. त्यानेंहि कबूल केलें. झालें, आमचा कार्यक्रम सुरू झाला. मी मूळव्याध बरी करण्याच्या खटपटीला लागलों. औषधासाठीं डॉक्टरांचीं बिलें भरण्याचें सामर्थ्य नसल्यामुळें देशी व काष्ठौषधी वनस्पतीकडे प्रेमानें पाहू लागलो. हिरडा, बेहडा, आवळकाटी हें त्रिफळाचूर्णाचें साहित्य आणून स्वतः कुटून चांगलें अच्छेरभर चूर्ण तयार केलें व रोज रात्रौ निजतांना एक मूठभर चूर्ण एका पाण्याच्या टमरेलांत कालवून तें मिश्रण पीत असें. या अचरट दिसणाऱ्या प्रकाराचा सुपरिणाम होऊन एक महिन्याच्या आंत मुळव्याध बरी होऊन पुनः खाण्यासाठीं

तोंड मोकाट सोडलें. वीस वर्षांची ऐन ज्वानी व बेडरवृत्ति यामुळें फक्त मनाला एकच व्यसन लागलें तें म्हणजे गाण्याच्या मेहनतीचें.

## नाना पारोळकराच्या पोळया

पुणें येथें कंपनीचें भिड्यांच्या वाड्यांत खालीं तळ-मजल्यांत सर्व सामान ठेवलें होतें. उंची कपड्याच्या पेट्या व चांदीचें वगैरे मौल्यवान सामान माडीवरच्या एका खोलींत ठेवलें होतें. बाकीचा दुमजला, हॉल वगैरे व खपरेलवजा प्रशस्त तिसरा मजला व तळमजल्यांतील स्वयंपाकघर व एक खोली एवढा भाग अगदीं मोकळा होता. नाना पारोळकर स्वयंपाक करी. त्याला स्वयंपाक मुळींच येत नव्हता. परंतु त्यानें होकार भरलेला. तेव्हां तो करील तो पाक खाणें क्रमप्राप्तच झालें. बाजारमास्तरचें काम माझें असे. आवडीप्रमाणें भाज्या खरेदी करायचा मला षोक होता तो आज मितीसहि कायम आहे. व्यंकटराव स्वयंपाकघरावर देखरेख करीत. परंतु नुसती देखरेख करून काय फायदा ? नानानें एखाद्या दिवशीं भाताचें गोपीचंदन करावें, तर पुनः लहर आली कीं कच्चाच भात ठेवावा. दुर्लक्ष झाल्यामुळें भाताच्या खरपुड्या झालेल्या. त्यांच्या जळकट वासानें तोंड वेडेंवांकडें करीत तो मालमसाला पोटांत भरावाच लागे. एखाद्या दिवशीं भाजींत तिखट भयंकर असावें तर दुसऱ्या दिवशीं कच्च्या पोळया !! त्याना हत्तीचे रोट म्हणावे तर ते पक्के भाजलेले तरी असतात. परंतु एकेक वेळीं एका हातानें पोळी धरून दुसऱ्या हातानें पोळीचा तुकडा काढावा लागे. जरा त्याला बोललें तर तो म्हणे ' मनुष्य आहे. बिघडतेंच आहे. ' याप्रमाणें सुट्टींतली आमची कालक्रमणा होती. याप्रमाणें महिना दीड महिना कार्यक्रम चालला होता. त्या वेळीं मी आवाजाच्या मेहेनतीला सुरवात केली. त्या वेळीं पांडु गुरव व मी अशी दोघांची जोड होती. त्यानें पेटीच्या मेहेनतीला सुरवात केली होती. त्यामुळें साथीची संवय करायला त्याला कोणी तरी गाणारा पाहिजेच होता. व मलाहि पेटीची साथ पाहिजे होती. त्यामुळें आमच्या मेहनतीला काळवेळ कांहीं राहिली नाहीं. सकाळीं ७ ते रात्रौ १० वाजेपर्यंत केव्हांहि दोघांस हुक्की आली कीं सुरवात करावी. त्यामुळें आमच्या शेजारीं

राहणाऱ्यांना त्रास होत होता. केव्हां केव्हां त्यांनीं प्रेमानें सूचनाहि केल्या होत्या, कीं सायंकाळीं ७।८ च्या पुढें जरी आमच्या कानांना विश्रांति मिळाली तर बरें. भाऊरावांनीं आपल्या भूमिकेसाठीं माणूस पहा असें शंकररावांना सांगितलें होतेंच. मागें होलिकोत्सवाचें वर्णन लिहितांना मी दत्तोबा हल्याळकर कंपनींत उतरले होते असें लिहिलें आहे.

## आजारांतील भाऊरावांच्या भावी योजना

दत्तोबा हल्याळकर यांना भाऊरावांच्या भूमिकेवर काम करायला बोलावलें तर कांहीं हरकत नाहीं असें कंपनींतील सर्वांचें मत असून दत्तोबांची इच्छा कंपनींत रहाण्याची होती व ती त्यांनीं बोलूनहि दाखविली होती. भाऊरावांचें मत दत्तोबा रंगभूमीवर उत्तम कामगिरी करतील असें होतें. परंतु त्यांनीं आपला अभिप्राय असा सांगितला, " दत्तोबा रंगभूमीवर योग्य आहे. परंतु राहणीवागणुकीचें धोरण किर्लोस्कर कंपनीच्या मुख्य नटाला योग्य असें नाहीं. अशा कंपनीचा जो भावी धुरीण होण्यासारखा निवडायचा तो किर्लोस्कर कंपनीची श्रेष्ठता, लौकीक ओळखणारा आणि समाजांतहि मान्य असा असला पाहिजे. " दत्तोबांचें प्रकरण नकारार्थी ठरून नंतर गोविंदराव धारप यांच्याबद्दल खटपट सुरू झाली. उमरावतीचे बेडेकर व सोलापूरचे काडगांवकर यांच्याकडे निशाण लावलें होतें. शंकरराव हे सर्वतोपरी या खटपटींत होते. रोज शंकरराव सायंकाळीं कंपनींत यायचे. आम्ही भोंवतालीं जमून त्यांना खबर विचारीत असूं. अशा रीतीनें एप्रिल महिना गेला. मेच्या पहिल्या आठवड्यांत भाऊराव बडोद्याहून पुण्यास आले. त्यांना उतरून घ्यायला मी, शंकरराव वगैरे स्टेशनवर गेलों होतों. भाऊराव पुण्याच्या स्टेशनवर उतरले. ते पिवळे धमक व रोगट छटा चेहऱ्यावर आलेले दिसले. आले त्या दिवशीं सर्वसाधारण तब्येत बरी होती. दुसरे दिवशीं सायंकाळीं पर्वतीचे बाजूस फिरायला गेले. तों त्यांना चालतांना धाप लागलेली कळली. रात्रौ २ वाजण्याच्या सुमारास ते जागे होऊन, मी मागील व्हरांड्यात निजलों होतों तेथें येऊन मला धाप लागलेल्या स्थितींत हांक मारूं लागले. मी गाढ झोंपेंतून जागा झालों आणि पहातों तों भाऊराव हांक मारताहेत.

दम छाटत नाहीं. चेहेरा घाबरलेला. नंतर त्यांनीं तसेंच धापा टाकीत सांगितलें कीं मला बोलवत नाहीं. मला लागलीच सुचलें व मी ओरिएंटल बाम होतें तें त्यांच्या पाठीला व छातीला चोळलें. त्या दर्पानें त्यांना जरा आराम वाटून झोंपहि लागली. सकाळीं उजाडेपर्यंत मी त्यांच्याजवळ बसून होतों. त्यांनीं मला माझ्या आईला बोलावण्यास सांगितलें होतेंच. कारण माझी आई सुग्रण असल्यानें तिनें भाऊरावांना पथ्याचें व रुचकर अन्न घालावें अशी इच्छा होती. ४।५ दिवसांत आई आली. सकाळीं उठतांच त्यांनीं सांगितलें कीं मला कोणातरी वैद्याचें औषध पाहिजे. डॉक्टरचें नको. त्याप्रमाणें कृष्णशास्त्री माटे वैद्य यांना बोलावून आणलें. त्यांचें औषध सुरू झालें. ७।८ दिवस रोज रात्रौ श्वास लागावा. रात्रभर जवसाच्या पोटिसानें मी आणि व्यंकटरावांनीं शेकीत असावें. त्या शेकण्यानें त्यांच्या छातीवर व पाठीवर चट्टे पडले होते. आमच्याहि हातांची दुर्दशा झाली होती.

## पोटांत ट्रान्सवालची लढाई

सात दिवसानंतर अण्णासाहेब पटवर्धनांना बोलावून आणलें. त्यांनीं परीक्षा केली व माटे वैद्यास विचारलें, कशावर औषधें देतोस? त्यांनीं श्वासावर औषध देतों असें सांगितल्यावर अण्णासाहेब म्हणाले "श्वासावर औषध देऊन काय होणार? पोटांत ट्रान्सवालची लढाई झाली आहे." नंतर भाऊरावांना म्हणाले "भाऊराव, मी आतां जें औषध देणार त्या औषधाला सात दिवस अन्नपाणी वर्ज्य. नुसत्या दुधावर रहावयाचें. अन्नाचा कण अगर पाण्याचा थेंब पोटांत जातां उपयोगी नाहीं. हें कबूल करीत असाल तर औषधयोजना करतों." त्यावर भाऊराव ठीक आहे असें म्हणाले. परंतु ते कष्टानें कबूल करीत आहेत असेंच आम्हाला वाटलें. नंतर अण्णासाहेबांनीं एक ३२ औषधाच्या काढ्याची यादी दिली व माटे वैद्य यांना औषध काय द्यायचें तें सांगितलें. औषध ताम्रभस्म होतें.

## रोगाचें नांव जलोदर

अण्णासाहेब गेल्यावर भाऊरावांनीं सांगितलें कीं मी अन्नाशिवाय राहीन. परंतु पाण्याशिवाय? त्यांतून या मे महिन्यात? शक्यच नाहीं.

चार तास पाणी मिळालें नाहीं तर मी मरेन. नंतर त्यांनीं शंकररावांना सांगितलें, डॉ. छत्रे यांना विचारा कीं माझ्या रोगाला इंग्रजी वैद्यकांत पाण्याची सवलत देणारें औषध नाहीं का? नंतर शंकरराव जाऊन आल्यावर म्हणाले कीं इंग्रजी वैद्यकांत या रोगावर खात्रीचें औषध नाहीं. अण्णासाहेबांचीच योजना योग्य आहे. त्यावर अत्यंत कष्टी मनानें ठीक आहे असें म्हणून वर पाहून निश्वास सोडला.

सायंकाळीं औषधें आणून काढा केला. रात्रौ औषध पोटांत गेलें आणि त्याच रात्रीं ७।८ दिवस लागणारा श्वास बंद होऊन भाऊरावांना गाढ झोप लागली; भाऊरावांना झालेल्या रोगाचें नांव जलोदार (ड्रॉप्सी) असें कळलें. गाईच्या दुधांत दुधाइतकेंच पाणी घालून लोखंडाच्या कढईत घालून त्यांत पिंपळी घालून पाणी जळून जाईपर्यंत दूध तापवून तें दूध दिवसभर प्यायला द्यायचें. दूध गारून प्यायला परवानगी दिली होती. याप्रमाणें सुरवात झाली.

## मी पाणी पिणार

दुसऱ्या दिवसापासून रोज २० पर्यंत जुलाब होऊं लागले व पोटाचा घेर कमी होऊं लागला. १।२ दिवसांनीं त्यांना विधीला मोरींत धरून बसवावें लागे व जवळ जवळ उचलूनच आणून पलंगावर निजवावें लागे. ५ वे दिवशीं त्यांची तहानभूक इतकी जागृत झाली कीं ते एकदम एकेरीवर येऊन म्हणाले कीं मला या तहानेच्या यातना सोसवत नाहींत. मी पाणी पिणार. या त्यांच्या निर्वाणीच्या शब्दानें सगळयांचा धीर सुटला. माटे वैद्यांकडे मी पळत गेलों व त्यांना भाऊरावांचा निग्रह सांगितला. त्यांनीं सांगितलें दोन दिवस त्यांनीं काढावे हें उत्तम; नसल्यास लोखंडाच्या कढईत पाणी घालून निम्में जाळून तें पाणी थंड करून व साळीच्या लाह्यांच्या पिठांत त्यांचे पिण्याचें दूध घालून तें पीठ खायला देऊन पाणी द्या. त्याप्रमाणें सुमारें सुपारी एवढें पीठ व थोडें पाणी त्यांस दिलें. पीठ खाऊन पाण्याचा एकच घोट घेतला व पुरे म्हणाले. तेवढ्यानेंच इच्छापूर्ति झाली. नंतर ७ दिवस होईपर्यंत पुन्हां अन्नपाण्याची गोष्ट त्यांनीं काढलीच नाहीं.

सात दिवसांनंतर लाह्याचें पीठ (साळीच्या), दूध, मस्कती डाळिंबें, सफरचंद एवढे जिन्नस खायची त्यांना परवानगी मिळाली. आस्ते आस्ते

तब्येत सुधारूं लागली. तोंडावरचा पिवळेपणा जाऊन शरीर पांढऱ्या शुभ्र गोरेपणानें खुलूं लागलें. घरांतल्या घरांत १५ दिवसांनीं किंचित् फिरतां येऊं लागलें.

## माझी घाबरगुंडी उडाली

गुंडू यास बकुलाचें काम शिकवायला चिंतोबांनीं सुरवात केली होती. त्याला मधून मधून पदाची शिकवण हळू हळू देत असत. माझीहि पदांची मेहेनत चालू असे. एक दिवस मी चंद्रापीडाचीं पदें तंबोऱ्यावर एका बाजूस म्हणत असतांना भाऊराव, त्यांचे बंधु अप्पाराव आले होते त्यांना म्हणाले, " पहा गुलाम खालीं एकटा गातो आहे. किती चांगलें पद गातो आहे. आता वर हाक मार कीं मेलाच, घाबरलाच. त्याप्रमाणें त्यांनीं मला वर हाक मारताच तंबोरा ठेवून वर गेलों. मी तें ओळखलेंच होतें. लागलीच " तंबोरा घेऊन ये व येथें माझ्यासमोर मेहेनत कर " असें त्यांनीं म्हणताच माझी घाबरगुंडी उडाली. परंतु जाणें भागच होतें. वर जाऊन पदाला सुरवात केली. धास्तीनें आवाज दोखटायला लागला. एकदां भाऊरावांनीं सांगावें. मी सांगितल्याप्रमाणें प्रयत्न करावा तोंच, अप्पारावांनीं तबला घेतला होताच, त्यांनीं एक तऱ्हा सागावी. ती घेण्याचा प्रयत्न करावा तोंच भाऊरावांनीं दुसरी तऱ्हा सांगावी. अप्पाराव मधून मधून संस्कृत शिव्याहि देत असत. शेवटीं मला एकदम हसूं कोसळलें. तें पाहून अप्पाराव म्हणाले " अरे हंसायला काय झालं ? " मी म्हटलें दोन गाणारे एकामागून एक तऱ्हा सांगत आहांत. एकीचा प्रयत्न करावा तर अप्पाराव संस्कृतांत रागावून दुसरी तऱ्हा सांगतात. तरी कोणती तऱ्हा घेऊं तें एकदां ठरलें म्हणजे बरें. त्यावर अप्पाराव नुसतेच मान हालवीत ठीक आहे ठीक आहे म्हणाले. भाऊराव हंसून म्हणाले हं म्हण. मीच सांगतों. याप्रमाणें एखाद्या वेळीं माझें शिक्षण होई.

## भाऊरावांचा कयास

भाऊरावांच्या जागेवर काम करायला माणूस शोधण्याचें काम चाललेंच होतें. भाऊराव धारप, बेडेकर, काडगांवकर यांच्याबद्दल विशेष उत्सुक नव्हते. याच वेळीं पुण्यास लोकमान्य टिळकांच्या लॉ क्लासमध्यें

रा. नारायण दत्तात्रय जोगळेकर हे वकिलीचा अभ्यास करीत होते. ते एक दिवस दुपारीं भाऊराव आजारी आहेत असें कळल्यावरून समाचारासाठीं आले. नमस्कार चमत्कार झाले. भाऊरावांनीं औपचारिक भाषण संपल्यावर कांहीं वेळानें जोगळेकरांना गाण्यास सांगितलें. जोगळेकर गायले. त्यांचा चढा आणि गोड आवाज ऐकून भाऊराव खूष झाले. ते सुशिक्षित असून नाटकाच्या धंद्याचा त्यांना पूर्वसंस्कार नसल्यानें ते कंपनीला लायख होतील असा भाऊरावांनीं कयास बांधला. नंतर ते गेल्यावर मला म्हणाले कीं हा माणूस मिळवण्याची खटपट केलीच पाहिजे व त्याच गोष्टीचें चिंतन करण्यांत ते मग्न झाले.

मी त्या वेळीं फक्त जेवायला आईकडे जात असें. बाकी बावीस तास भाऊरावांच्याजवळ असें.

## ग्वाल्हेरहून परत आले

भाऊरावाना घरांतल्या घरात फिरायची परवानगी होती. ग्वाल्हेरहून गोरे तेथील नोकरीला कंटाळून परत आला. श्रीमंत शिंदे सरकारांनीं फोटोग्राफीच्या खात्यांत त्याला नोकरी दिली होती. तेथें कांचा धुवून कंटाळून परत आला. भाऊरावांना भेटून वाईस गेला. रामभाऊहि ग्वाल्हेरहून परत आले. नंतर रामभाऊंनीं भाऊरावाना आजारी पाहून "मी कुठें कंपनी सोडली आहे?" असा ध्वनि काढायला सुरवात केली. भाऊरावांनीं कंपनींतील सर्व मंडळींना मी बरा होई तों कंपनी चालवा असें सांगितलें. परंतु कोणाला धाडस होईना. तेव्हां भाऊरावांनीं आपला भाग रामभाऊंना विकायचें ठरविलें.

## मृत्यू सुखानें येणार नाहीं

भाऊरावाना दोन तीन महिने घरांतल्या घरांत राहणें कंटाळवाणें झालें होतें. प्रकृतिहि सुधारायला लागली होती. म्हणून त्यांनीं अण्णासाहेबांना विचारलें कीं मी फैटणमधून फिरायला जाऊं का? त्यांनीं निक्षून नाहीं म्हणून सांगितलें होतें. परंतु माटे वैद्य यांनीं हरकत नाहीं, हलके हलके गाडी न्या असें सांगितलें. दोन तीन दिवस फिरणें झाल्यावर एके दिवशीं पुनः रात्रौ श्वास लागला. मिरजेस डॉ. वॉनलेसकडे जायचें ठरून

भाऊराव मिरजेस रवाना झाले. जातांना शंकररावांना जोगळेकरांच्याबद्दल खटपट करण्यासाठीं सांगून माझ्या डोळ्यादेखत कंपनी सुरू झाली नाहीं तर मला मृत्यु सुखानें येणार नाहीं असें बजावून गेले.

## वकील होण्यापेक्षां किर्लोस्कर कंपनींत जा

शंकररावांनीं लो. टिळकांकडे जाऊन जोगळेकरांना कंपनींत येण्याची अनुमती द्या अशी त्यांना विनंति केली. लोकमान्यांनीं जोगळेकरांना सांगितलें कीं किर्लोस्कर कंपनीला तुमची जरूर आहे. ती उत्तम कंपनी असून मला तिचा अभिमान आहे. तर वकील होण्यापेक्षां तुम्ही अवश्य कंपनींत जा. नंतर जोगळेकरांनीं आपल्या पित्याची अनुमति घेण्याकरितां रामदुर्गास प्रयाण केलं. सप्टेंबर महिन्यांत जोगळेकर मिरज मुक्कामीं येऊन दाखल झाले.

## तिसरी घटना

कंपनीला ही सुट्टी सुमारें सहा महिने पडली. या सुट्टीच्या अवधींत कंपनींतील यच्चयावत माणसें, गडी, न्हावीसुद्धां पदरमोड करून आपल्या घरोघर होतीं. कंपनीचें होय नाहीं, टरल्याशिवाय बाहेर जायचें नाहीं या निर्धाराला यश आलें. कंपनी सुरू करून जोगळेकरांना मुख्य नायकाची भूमिका द्यायची व कंपनीचा गाडा हांकायचा असें ठरून मिरजेस जमण्याबद्दल मंडळींना पत्रें गेलीं. याप्रमाण किर्लोस्कर कंपनीची घटना बदलण्याची ही तिसरी वेळ.

प्रथम १८८५ सालीं अण्णासाहेब किर्लोस्कर दिवंगत होऊन मोरोबा, भाऊराव, रामभाऊ हे मालक व कै. अण्णासाहेबांच कुटुंब पेन्शनर अशी घटना झाली. त्यानंतर १८९७ सालीं मोरोबा कार्यनिवृत्त होऊन भाऊराव व रामभाऊ मालक व अण्णासाहेबांचें कुटुंब व मोरोबा पेन्शनर अशी घटना झाली आणि त्यानंतरहि १९०० सालीं भाऊरावांनीं आपला संबंध तोडून टाकला व रामभाऊ एकमेव एकटे मालक, मोरोबा व किर्लोस्करवहिनी पेन्शनर अशी घटना झाली. याप्रमाणें किर्लोस्कर कंपनीचे सर्व आधारस्तंभ कमी झाले व बदली स्तंभ देऊन कंपनीचा कारभार सुरू झाला.

## नवा जमाना सुरूं झाला

कंपनींतील मंडळी जमूं लागली. आम्ही पुण्यांतील मंडळी मिरजेस जायच्या अगोदर डॉ. वॉनलेसच्या देखरेखीखालीं भाऊरावांना औषधोपचार सुरूं झाले होते. अण्णासाहेबांचें आर्यवैद्यकांतील औषध बंद होऊन इंग्रजी औषधोपचार सुरूं झाले. दुधाचें पथ्य बंद होऊन अन्न खाणें सुरूं झालें. त्याचा परिणाम एवढाच झाला कीं भाऊरावांच्या पायावर सूज येऊं लागली. श्री. त्र्यंबकराव साठे यांनीं डॉ. वॉलनेस यांस सांगितलें होतें कीं हा आमचा महाराष्ट्रातील अलौकिक नट आहे, त्याला बरें करा. त्याच्याकडून तुमच्या मिशनला सढळ हातानें मदत करायला मी लावीन. डॉ. वॉनलेस यांनीं उपाय लागू होणें कठीण आहे असें सांगितलें होतेंच. परंतु त्यांच्यावर साठे यांचा भरंवसा होता; आणि प्रत्ये-काला कुणाच्या तरी हाताला यश येवो अशी इच्छा होणें स्वाभा-विकच होतें. पायाना सूज आली असें पुण्यास शंकररावांना पत्र येऊन अण्णासाहेबांना घेऊन येण्याविषयीं करुणा भाकली होती. शंकरराव अण्णासाहेबाकडे जातांच अण्णासाहेब म्हणाले "येथून त्याना नेलैंत ही चूक केलीत; कारण मी देत होतों तेंच एक औषध त्यांच्या रोगावर आहे." असें खडसावून सांगून दयार्द्र होऊन मिरजेस साठे वैद्य यांना घेऊन गेले व पुनः पथ्य व उपचार सुरूं झाले. पायावरची सूज ओसरूं लागली आणि आम्ही मिरजेस पोंचलों त्या दिवशीं सूज पूर्ण गेली होती.

## बाळ मोठा पायगुणाचा

मिरजेस सकाळीं उतरतांच टांग्यातून थिएटरमध्यें जातांना सरकारी दवाखान्याजवळ टांग्यांतून उतरून मी एकटाच दवाखान्यांत गेलों; तों भाऊराव नुकतेच प्रातर्विधि आटपून पायावरची सूज उतरल्याचें पहात होते. मी जाऊन नमस्कार केला व भाऊरावांची सूज उतरलेली पाहून अतिशय हर्षभरित झालों व म्हटलें, "भाऊराव, पहा आमचा पायगुण कसा आहे! आम्हीं आज आलों आणि आजच सर्व सूज नाहींशी झाली." त्यावर त्यांनीं हंसून "हं. बरें आहे बुवा. आतां कुठेंहि आसन्नमरण झालेल्या रोग्यासमोर तुला उभें करावें म्हणजे डॉक्टरांची

गरज नाहीं. ” नंतर बाळ मोठा पायगुणाचा असें हंसत हंसस म्हणत चहा वगैरे देण्यास कृष्णाप्पास सांगितलें व “ आतां जोगळेकर माझ्या जाग्यावर आले आहेत हें लक्ष्यांत ठेवून त्यांना प्रेमानें वागवा हं.” असें त्यानीं सांगितलें. देवलमास्तरांना बोलावणें पाठवून आणलें.

## जोगळेकरांची व माझी गट्टी

भाऊरावांकडे जाऊन जोगळेकर रोज पदांची तालीम घेत. शारदा नाटकातील कोदंडाची भूमिका देवलमास्तर शिकवूं लागल. सकाळपासून रात्रौ ११ वाजेपर्यंत जेवण व स्नानाला वेळ जाईल तेवढा सोडून सारखी तालीम चाले. जोगळेकरांना विडी ओढण्याचें व्यसन होतें, तें पाहून भाऊरावांनीं त्याना सागितलें कीं गाणाऱ्याला धूम्रपान फार वाईट.तरी तुम्ही विडी ओढणें सोडून द्या. जोगळेकरांनींहि विडी सोडण्याचें कबूल करून सोडली. आरंभीं आरंभीं जोगळेकर उत्साहानें तालमींत रंगत असत. परंतु दिवसभर चरक सुरू झाल्यामुळें जिकीरीस येऊं लागले. जोरदार भाषण म्हणून गाणें म्हणायची संवय नसल्यामुळें आवाज बसूं लागला. देवलमास्तरानीं रिकामा वेळ जाऊंच देऊ नये. माझ्याबद्दल भाऊरावानीं जोगळेकरांना सागितलें होतें कीं “ गणू माझा मनुष्य आहे. बुद्धिवान आहे. त्याच्यावर लक्ष्य असूं द्या. ” यामुळें जोगळेकर याची व माझी गट्टी जमली. मी चोरट्या आवाजांत भाऊरावाच्या पदातील त्या पद्धतीच्या सर्व तऱ्हा शक्य तितक्या त्यांना म्हणून दाखवाव्या. त्यांनींहि प्रेमानें त्या ऐकून मनन करून लक्ष्यात न आल्यास त्याची सारेगम करून लक्ष्यांत ठेवून घटवाव्या, असा सारखा मेहेनतीचा धूमधडाका सुरू झाला. ४।८ दिवसांनीं देवलमास्तर एखाद्या दिवशीं सांगली हरिपुरास गेले कीं हायसें वाटून एक दिवस तरी विश्रांति मिळाल्यासारखें वाटे.

कंपनीचे कायम बाजारमास्तर विठ्ठलराव जाभेकर हे आले नव्हते म्हणून स्त्रीपार्टास निरुपयोगी झालेला मी म्हणून माझ्याकडे बाजारमास्तरचें काम आलें. कारकुनी पेशाचें काम म्हणून मीहि आनंदानें पत्करलें. या पेशापेक्षां हलक्या पेशाचीं कामें करण्याचें मागें मी नाकारलें होतें.

## हें हमाली काम मी करणार नाहीं

१८९९ सालीं एरंडोल येथें असतांना मंडळीना पगारवाढ झाली, त्यांत मलाहि दोन रुपये वढती मिळून दहाचे बारा रुपये झाले. परंतु थिएटरचें सामान जोडायला व मोडायला ज्यांनीं जावें अशा मंडळींत मलाहि गोंवलें होतें. एरंडोलचा मुक्काम संपल्यावर सामान सोडायला मंडळींना फर्मावलें. त्याप्रमाणें मलाहि शंकररावांनीं सांगितलें. मी ऐकलें न ऐकलें करून मुर्दाड चेहेरा करून तसाच पुढें चाललों. शंकररावांनीं पुनः आज्ञा दिली. मी स्तब्धच. नंतर पुन्हां दरडावून "जातोस कीं नाहीं?" असें म्हणतांच "तें काम मी करणार नाहीं" असें उत्तर दिलें. माझी कंपनींत वास्तविक किंमत काय आहे याबद्दल मला जाणीव देऊन माझी निरर्थकता डोळ्यासमोर ठेवण्यांत आली. परंतु मीहि निग्रहच केला होता कीं हें काम करायचें नाहीं. नंतर ती तक्रार भाऊरावांकडे गेली. भाऊरावांनीं मला बोलावलें व सांगितलें "काय रे गण्या, थिएटरमध्यें जात नाहीं असें सांगितलेंस?" मी होय म्हटलें. त्यावर कां नाहीं? असें विचारतांच मी सांगितलें, "हें हमाली काम मी करणार नाहीं. मी पार्ट करण्यासाटीं राहिलो आहें. दुसरें काम करणार नाहीं." हें माझें निग्रहाचें उत्तर ऐकतांच भाऊराव म्हणाले, "जा. मी सांगतों आहें. आतांपुरता जा. शिस्त बिघडवू नकोस. पुढें पाहूं." भाऊरावांचें सांगणें मोडायचें नाहीं म्हणून मी थिएटरमध्यें गेलों व स्टेजमॅनेजर यांस म्हणालों, "हमालास काम द्या." त्यांनीं फ्रंट सीनचे लाफे काढण्यासाठीं स्क्रू ड्रायव्हर हातांत दिला. तो हातांत घेऊन सुमारें १५ मिनिटें एक स्क्रू काढण्याचा प्रयोग मुद्दाम उशीर लावून चालू केला. थोडी वाट पाहिल्यावर निपाणकर (स्टेज-मॅनेजर) म्हणाले, "पुरे झाले स्क्रू काढणें. स्क्रू ड्रायव्हर मोकळा करून दे. जा." देव पावला असें म्हणून मी गेलों व हौसेनें काम करणारे अडकले. *त्यांनीं माझ्याकडे पाहून अशी मुद्रा केली कीं "साधलें, सुटला, लुच्चा आहे."*

## आपण भारभूत होऊं नये

सुमारें दीड महिना बाजारहाट केला. किर्लोस्कर कंपनींत बाजारहाट कोणीहि केला तर त्याला पांच रुपये महिना देण्याची

वहिवाट होती. त्यामुळें मला सुमारें ८ रुपये मिळाले. परंतु हिशेबांत आलेली चूक भरावी लागल्यामुळें फक्त तीन रुपये मला मिळाले. तेव्हां कंपनीच्या बाजारमास्तराला दुकानदार कमिशनाचीं लोभनें कशीं दाखवीत असतात तें कळलें. कारण मी लहान व हंगामी बाजारमास्तर असल्यानें एकाच दुकानदारानें मला कमिशनचें आमिष दाखवून नेहमींचे दुकान सोडून आपल्या दुकानांत माल घेण्यास ये असें सांगण्याचा प्रयत्न केला होता. पुढें नेहमींचे बाजारमास्तर आल्यावर मी मोकळा झालों. मी वाटेल तें काम करायला मागेंपुढें पहायचें नाहीं असें ठरविलें होतें. त्यात दोन खात्यांत प्राणातींहि काम करायचें नाहीं असें ठरविलें होते. एक स्वयंपाक घर, दुसरें थिएटर. या दोन खात्यांत काम करणें मला कमीपणाचें वाटत होतें. त्यामुळें नकला लिहून देणें, तालमीच्या नोटिसा लिहिणें, तिकिटें विकणें, बाजारहाट हीं कामें मधून मधून जरुरीप्रमाणें मी करीत असें. मला अशी जाणीव होती कीं मला मिळत असलेल्या बारा रुपयांत आपल्याकडून देववेल तितकें काम कंपनीस द्यावें व आपण भारभूत होऊं नये. आणि या जाणिवेनेंच माझ्या आयुष्यांत क्रांति घडवून आणली अशी माझी खात्री आहे.

या प्रकारानें कंपनीची घटना चालू असतां व सर्व एक मनानें झटत असता शंकरराव व देवलमास्तर यांचा खटका उडून देवलमास्तराच्या शिक्षणाला कंपनी अंतरली.

## सर्वाधिकार

शंकररावानीं कंपनीचा संबंध अण्णासाहेबांच्या मृत्यूनंतर सोडला. त्यानंतर १८९३ सालीं साठे यांच्या मागून रामभाऊ प्रसाद या नांवाचे एक सेक्रेटरी होते. ते वारल्यानंतर कंपनीसाठीं सेक्रेटरीची जागा भरायची होती. त्या वेळीं देवलमास्तरांचा व शंकररावाचा ऋणानुबंध चांगला होता. तेव्हां त्यांनीं भाऊरावमोरोबांजवळ शंकररावांना ती जागा देण्याबद्दल कसून खटपट केली व मोरोबांनींहि अनुकूलता दर्शविली. त्यामुळें सर्वानुमतें सेक्रेटरी म्हणून शंकररावांची नेमणूक झाली. व १८९३ सालच्या आक्टोबरनोव्हेंबरमध्यें बाळकोबा नाटेकर गेल्यावर कंपनी

पुण्याहून हलतांना अधिकारसूत्रें घेऊन शंकरराव कामावर रुजू झाले. शंकरराव सेक्रेटरी या जागेवर रुबाबदार दिसत व लोकहि प्रथम प्रथम पूर्वीच्या पद्धतीप्रमाणें एक स्त्रीभूमिका करणारा या हेटाळणीनें पहात होते तरी शंकररावांनीं १।२ वर्षांतच लोकांवर पूर्ण छाप बसवलेली होती. मुख्य धोरणाच्या वगैरे गोष्टी व पैशाचा व्यवहार-विनियोग सर्व भाऊरावांच्याच धोरणानें पूर्वापार होत असे. कारण भाऊराव कारकुनींत तरबेज होते. त्यामुळें त्यांच्यासमोर कोणतीहि लटपटीची अगर गैरहिशेबीपणाची गोष्ट लपत नसे. शंकररावांना ठराविक कार्यक्रमापलीकडे स्वयंसिद्ध अधिकार भाऊराव शरपंजरीं पडेपर्यंत नव्हताच. परंतु भाऊरावांनीं आपला संबंध तोडला व रामभाऊ व्यवहारशून्य असल्यामुळें साहजिकच शंकररावांना सर्वाधिकार प्राप्त झाला.

## कीचकासमोर विराट

शारदा नाटक बसत आलें व एका क्षुल्लक गोष्टीवरून शंकरराव व देवलमास्तर दोघेही हट्टाला पेटले. त्याचें पर्यवसान कडाक्याच्या भाडणांत होऊन देवलमास्तर शीघ्रकोपी स्वभावधर्माप्रमाणें एकदम निघून गेले. तें कारण असें:—शंकररावाची इच्छा अशी होती कीं किर्लोस्कर कंपनीची पहिली शाकुंतल नाटकाची तालीम ता. २० आक्टोबर १८८० रोजीं होऊन ता. ३१ आक्टोबर १८८० रोजीं प्रथम प्रयोग झाला. तेव्हां आतां त्याच तारखा या नवीन घटनेच्या प्रथम तालमीला व प्रयोगाला साधल्या तर चांगल्या म्हणून शंकररावांनीं ता. २०।१०।१९०० या दिवशीं रंगी तालीम व ता. ३१।१०।१९०० या दिवशीं शारदेचा प्रथम प्रयोग करावयाचा असें ठरविलें. देवलमास्तराचें म्हणणें असें होते कीं अजून जोगळेकरांचें काम चांगलें बसलें नाहीं म्हणून अपक्व स्थितीत त्यांना रंगभूमीवर नेऊन याच तारखा साजऱ्या करण्याऐवजीं चांगली तयारी करूनच नवीन हीरो रंगभूमीवर न्यावा आणि धंद्याच्या दृष्टीनें देवलमास्तरांचें म्हणणें बरोबर होतें. याला प्रत्यंतर म्हणजे प्रथमचीं कांहीं वर्षें जोगळेकरांची अभिनयाच्या बाबतींत जी निराशाजनक स्थिति दिसली याला कारण त्यांना अभिनयाचें यथासांग शिक्षण मिळालें नव्हतें हेंच होय. परंतु हा वाद दोघांत इतका

तीव्र झाला कीं एकमेकांचे स्वभावदोष, आग्रहाचे विपर्यस्त आरोप एकमेकांनीं एकमेकावर यथास्थित करून देवलमास्तर संतापून हरिपुरास चालते झाले. त्या वेळीं देवलमास्तराचे शंकररावांनीं ऐकलें नाहीं. त्यांनीं परिस्थितिचा पूर्ण फायदा घेतला. कंपनींतल्या जुन्या माणसांत शंकररावांचा गर्भित हेतु जाणण्याचा चाणाक्षपणा नव्हता, मालक रामभाऊ हे कर्तबगारींत शून्य असल्यामुळें कीचकाच्या समोर गप्प बसणाऱ्या विराटाप्रमाणें चुबीत चुळमुळे करीत बसून राहिले. त्यामुळें देवलमास्तरच त्या वादविवादांत दुराग्रही व आततायी टरले. शंकररावाचा सर्वाधिकार प्रस्थापित झाला. कारण देवलमास्तर हे दगडाला देवपणा आणणारे नाट्यशिक्षक आहेत हें प्रत्येकाला पूर्णपणें कळून चुकलें होतें तरी देखील देवलमास्तर गेले ही गोष्ट वाईट झाली, हें प्रकट करायचें मनोधैर्य कोणीहि दाखविलें नाहीं.

## माणुसकी बाहेर वर्तन

यानंतर एक दिवस शंकररावानीं मला एक तालमीची नोटीस लिहावयास सांगितली. सुमारें तास दीड तास खपून छापील अक्षरासारखी वळणदार नोटीस लिहिली व ती शंकररावापुढें पसंतीला ठेवली. त्या नोटिशींत एका नांवाच्या मागें "रा." च्या ऐवजीं रा. रा. असें माझ्या हातून लिहिलें गेलें होतें. ती चूक लक्ष्यांत घेऊन शंकररावांनीं नोटीस पुनः लिहावयास सांगितली. मला साहजिक वाईट वाटून मी म्हटलें कीं एक "रा." मी कागदाची चिठी लावून झांकतों. त्यावर त्यांनीं जरबेनें सांगितलें, ती नोटीस चालणार नाहीं. पुनः लिही. मी प्रथम पुष्कळ आर्जवानें सांगितलें कीं दोन तास मेहेनत करून नोटीस लिहिली आहे. माझी मेहेनत एका अक्षरासाठीं फुकट जाते आहे. परंतु त्याचें एकच आज्ञार्थी वाक्य "तें कांहीं नाहीं. पुनः लिहून आण." मीहि शेवटीं सांगितलें "आतां मी जेवतों. सायंकाळपर्यंत लिहीन." त्यावर "तें कांहीं नाहीं. आतांच्या आतां लिही" झालें. नाहीं नाहीं म्हणतां म्हणतां शेवटीं निक्षून मी सांगितलें "आतां मुळींच लिहिणार नाहीं." त्यानंतर जरा प्रश्नोत्तरें झाल्यावर त्यांनीं एक अश्लील शब्दप्रयोग उच्चारला. माझेंहि देहभान जाऊन त्यांना माझ्याकडून उलट अहेर झाला. त्यांनीं माझ्या श्रीमुखांत मारतांच

मी त्यांचा हात धरून ठेवला आणि सांगितलें कीं "आतां एक अपशब्द अगर हात पडला तर माझ्याकडून ताबडतोब तीच क्रिया होईल. माणुसकी-बाहेर तुमचें वर्तन आहे." इतक्यांत कंपनींतील मंडळी धांवली, दोघांना सोडविलें, मोरोबा जोगळेकरांना सौभद्रांतील अर्जुनाची भूमिका शिकवायला आले होते तेहि मध्यें येऊन "हां हां गणेश, अरे गणेश, काय हें? वडील माणसावर हात उगारतोस? द्या त्याला शकाराचें काम" वगैरे वगैरे म्हणूं लागले. नंतर मी माडीवर माझ्या जागेंत जाऊन माझें सामान आवरायला सुरवात केली. जोगळेकर लागलीच वर आले व मला म्हणाले, "हें काय चालविलें आहेस?' मी उत्तर दिलें "मी कंपनी सोडून जातों. त्यावर ते समजुतीनें म्हणाले तुला कुणी जा म्हटलें आहे का? मी त्यांस सांगितलें कीं आतां कंपनींत शंकरराव मुख्य कर्ते आहेत. परंतु प्रत्यक्ष सांगितलें नाहीं तरी मला जावें लागेल अशी परिस्थिति निर्माण करतील. परंतु येथेंच मी प्राजलपणें लिहून टाकतों कीं शंकररावांनीं अशी परिस्थिती खरोखरीं कधीं निर्माण केली नाहीं; व माझ्या त्या स्वाभिमानी उर्मटपणाकडे सहानुभूतीनेंच पाहिलें. आपण लागण्यासारखे शब्द गणूला उद्देशून उच्चारले म्हणून तो बोलला असें वाटले असावें.

## मोठ्यांनींसुद्धां बोलण्याची मर्यादा राखायला नको का?

सायंकाळीं जोगळेकर भाऊरावांकडे गेले असताना त्यांना आमच्या दंग्याची हकीगत जोगळेकरांनीं सांगितली. मला बोलावणें आलें. मी जाऊन समोर बसलों. मला भाऊराव म्हणाले "गण्या, काय झालें?" मला त्या शब्दांत प्रेमळपणा व सहानुभूति वाटली आणि एकदम हुंदका आला. मला नंतर भाऊराव म्हणाले "तूं शंकररावांच्या अंगावर धांवून गेलास?" मी म्हटलें "भाऊराव, मी धांवून गेलों एवढेंच कळलें? कां धांवून गेलों हें कळलें नसल्यास मी सर्व हकीगत सांगतों. असें म्हटल्यावर व माझा आवेश पाहून म्हणाले मला कळलें आहे. उर्मटपणा चांगला नाहीं. शंकरराव वयानें वडील आहेत, अधिकारी आहेत. तूं लहान आहेस. त्यावर मी म्हटलें "कबूल परंतु मोठयांनींसुद्धां बोलण्याची मर्यादा राखायला नको का? मी लहान

असलों तरी माझ्या जन्मदात्यांबद्दल जर कुणी अपमानकारक शब्द उच्चारले तर मला राग कां येणार नाहीं? माझ्या कसुरीसाठीं त्यांना अपशब्द कां? मला एकट्याला वाटेल तें म्हटलें असतें तर मी बोललों नसतों. त्यावर ते हंसून म्हणाले "बरं जा; घरीं जाऊन जेव जा. उपाशी आहेस." मी म्हटलें मला हा प्रसंग जाचणार आहे. त्यावर ते म्हणाले कांहीं नाहीं, जा. इतक्यावरच तें प्रकरण संपून यानंतर २।३ महिने शंकररावांनीं माझ्याशीं अबोला धरला होता.

## काबुली पठाण

प्रथम प्रयोग शारदा नाटकाचा झाला. त्या प्रयोगाला जोगळेकरांना रंगवून मी तयार केलें. आणि मला पात्र जसें दिसावें अशी कल्पना येई त्या कल्पनेप्रमाणें आपण होऊन त्याची रंगरचना करायची मला हौस असे. ती शेवटपर्यंत राहिली आहे. प्रयोगसुरवातीस भाऊराव येऊन विंगमध्यें बसले. रंगभूमीवर जातांना जोगळेकरांनीं भाऊरावांस डोकें टेकून नमस्कार केला. जोगळेकरांचा प्रवेश झाला. भाऊराव स्मित करून म्हणाले "हा कोदंड काबुली पठाण दिसतो आहे." असा विनोद झाल्यावर पहिला अंक संपल्यावर म्हणाले, "ठीक आहे; आशाजनक आहे." नंतर भाऊराव थिएटरमधून गेले.

## दुर्दैव हात धुवून पाठीस लागलें

दुसरें नाटक वीरतनय बसविण्यास घेतलें.त्या वेळीं दर शनिवारीं प्रयोग होई. नतर वीरतनय रंगभूमीवर आल्यावर मृच्छकटिक बसविलें. त्याची रंगाची तालीम झाली. रंगाच्या तालमींत शकार मीच होतों व तें काम मीच करायचें ठरले होतें व आपला मनोदय सिद्धीस जाणार या हुरुपीनें खूब मेहेनत चालली होती. त्यामुळे रंगी तालमीच्या दिवशीं माझा आवाज अगदीं बसला. "राजाची स्वारी मशालजीचा घातवार" होऊन तालमीस भाऊराव गाडींतून आलेले परत जातांना तालीम संपल्यावर म्हणाले, "गणूचा आवाज बसला आहे. तरी उद्यांच्या प्रयोगास त्याला काम देऊं नका." दुसऱ्या दिवशीं मला तें कळतांच पुनः कपाळावर हात बसला आणि दुर्दैव हात धुवून पुरें माझ्या पाठीस लागलें आहे असें वाटून निराश होऊन बसलों. दोन दिवस नित्य नेमाप्रमाणें

भाऊरावांकडे गेलों नाहीं; त्यांनीं बोलावणें पाठविल्यावर गेलों. त्यांनीं रागावलास कां? असें विचारून मला म्हणाले "वेड्या, बसक्या आवाजांत तुझें काम आवडलें नसतें आणि उगीच रागावलास तूं. चांगलें काम केलेंस तर मला आनंदच होइल. पुढच्या मृच्छकटिकमध्यें काम कर." नंतर झालेल्या मृच्छकटिकमध्यें मी प्रथम शकाराचें काम केलें आणि तें पहिलेंच काम उत्तम झालें असें सर्वांचें मत पडलें. दुसऱ्या दिवशीं भाऊराव मला म्हणाले "मला आनंद झाला आणि असाच झटशील आणि मेहेनत करशील तर खात्रीनें यशस्वी होशील." हा त्यांचा आशिर्वाद बव्हंशानें खराहि झाला. नंतर सौभद्र नाटक होऊन कंपनी सांगलीस जायचें ठरलें. भाऊरावांची तब्येत पुन्हां जरा बिघडूं लागली म्हणून ते अण्णासाहेब पटवर्धनाच्या देखरेखीखालीं औषधोपचारासाठीं जायचे असें ठरून ते निघाले. त्या वेळीं त्याना पोंचविण्यास स्टेशनवर गेलों असतां त्यांना "बरे होऊन लवकर परत या" असें म्हणताच त्यांनीं जें हास्य केलें तें पूर्ण निराशाजनक दिसलें. मंडळी उदास मनानें स्टेशनावरून परत फिरली. लवकरच कंपनी सांगलीस गेली.

डिसेंबरमध्यें कंपनी सांगलीस गेली. नाताळच्या सुट्टींत कंपनीच्या आमंत्रणावरून श्री. तात्यासाहेब कोल्हटकर सांगलीस आले. मूकनायकांतील पात्रनिवड झाली. जोगळेकर विक्रांत, दडपे शरच्चंद्र, परचुरे विकंठ, मिरजकर केयूर, वेत्रिका सोनू वालावलकर, सरोजिनी रामा डवरी, रोहिणी गोरे, चितोबा प्रतोद व मी दोन गृहस्थांपैकीं एक अशी पात्ररचना झाली व त्याप्रमाणें मी इच्छाहि प्रकट केली. परंतु मी तें काम चांगलें करीनच असा कोणालाहि भरंवसा येईना. शेवटीं मी जोगळेकरांच्यामागें लागून त्यांच्यामार्फत तात्यासाहेब कोल्हटकरांचें मन वळविलें. मी अशी अट कबूल केली कीं सुमारें १५ दिवस मी तालमींत काम करावें. बरें होतेंसें वाटलें तर मला द्यावें, नाहीं तर बदलावें. याप्रमाणें ठरल्यावर स्त्रीपात्रांत बदल झाले. सरोजिनी गोरे, रोहिणी चितोबा व रामा डवरी मोकळाच राहिला. तालमी सुरू झाल्या. श्री. तात्यासाहेबांनीं पदांच्या तालमी घेण्यास सुरवात केली.

## वडिलांची शिकवण

याच वेळीं कंपनीचे कारकून व्यंकटराव हे भाऊरावांच्या शुश्रूषेसाठीं त्यांच्याबरोबर गेल्यामुळें कंपनीचा जमाखर्च पक्की कीर्द व खतावणीवर लिहिण्याचा राहिला होता. एक दिवस शंकररावांनीं तुटकपणानें मला सांगितलें कीं "गणू, तूं पक्की कीर्द लिही. तुझें अक्षर चांगलें आहे." सहाव्या इयत्तेंत माझें मोडी अक्षर सहजच घटून गेलें होतें. वडिलांची ती शिकवण होती.

मी बारा वर्षांचा असतां माझा सहाव्या इयत्तेचा अभ्यास पुरा झाला. त्या वेळीं व्हर्न्याक्युलर परीक्षेला सहाच इयत्ता असत, व विद्यार्थ्यांचें वय परीक्षेला बसायला १६ वर्षांचें लागे. मी चार वर्षांनीं लहान म्हणून मला व्हर्न्याक्युलर परीक्षेला बसता आलें नाहीं. माझा मराठी सहा इयत्तांचा अभ्यास पुरा झाल्यामुळें माझा भाषाविषयहि उत्तम तयार झाला होता. मोरोपंत, वामन पंडिताचीं कविताबद्ध आख्यानें तोंडपाठ व अन्वयार्थासह तयार झालेलीं होतीं, त्याचा उपयोग मला फार झाला. त्याप्रमाणेंच मोडी अक्षराचेंहि झालें होतें.

## जबाबदारीचें काम

शंकररावांनीं मला लिहिण्याबद्दल विचारतांच "मी जमाखर्चाची पद्धति विसरलों आहें असें सांगितलें. नंतर त्यांनीं म्हटलें कीं वांईकर मामा (गोरे यांचे वडील बंधू) तुला समजावून सांगतील. (ही मामांची सांथ त्या वेळेपासूनच आतांपर्यंत नाटक व सिनेमा कंपन्यांत पसरली आहे.) जो मी आजपर्यंत हेटाळणीचा विषय होतों तोच मी आतां कंपनीचें एक जबाबदारीचें काम आल्याबद्दल त्या वेळच्या बुद्धीप्रमाणें मनांत हरखून गेलों.

## आमचा अभ्यास

तालमी सुरू होत्या. जानेवारी १९०१ मध्यें कंपनी सांगलीहून बैलगाडी रस्त्यानें निपाणीस रवाना झाली. निपाणीस त्या वेळीं थिएटर नव्हतें; म्हणून शिंत्रे यांच्या अड्डयांत मांडवाचें थिएटर घातलें व त्या

अड्ड्यांतच रहायची जागा होती. पूर्वी ज्या ज्या ठिकाणीं मांडव घालण्याची जागा व रहायाची जागा–थोडी कां असेना–एके जागीं असे त्या ठिकाणीं घर थिएटर एके जागीं झाल्यानें मंडळींची सोय उत्तम होत असे. मूकनायकाच्या तालमी सुरूं झाल्या. जोगळेकर आणि मी रोज सायंकाळीं फिरायला जात असूं. बेळगांव रस्त्याला जाऊन मैदानांत तारेचे खांब असत त्यांतून कान लावला असतां "घूं" असा एक सूर निघे. त्या सुरावर दोघांनींहि खुलेपणानें पदें म्हणावीं, मैदानांत उभे राहून तारेच्या खांबाला शेजारचें पात्र कल्पून नक्कल अस्खलित म्हणावी, वाक्याला घाई झाली अगर बेलय झाला अथवा अस्खलितपणा कमी झाला तर एक-मेकांना सूचना देत असावी. असा आमचा अभ्यास जोरांत सुरूं होता.

## भाऊ कोल्हटकराचें जीवन व लौकीक आवाज

फेब्रुवारीचे प्रारंभापासून भाऊरावांची प्रकृति दिवसेंदिवस निराशा-जनक होत चालल्याचीं पत्रें पुण्याहून येतच होतीं. त्याच्या सर्वांगाला सूज आली होती. म्हणून शंकरराव पुण्यास गेले. बुधवार ता. १३ रोजीं सकाळीं भाऊराव अंथरुणावर पडल्या पडल्या वीरतनयांतील "तूं अनाथ नाथ अशी" हें पद जरा चढ्या आवाजांत म्हणूं लागले. तें ऐकून व्यंकटराव म्हणाले "कां, आज गाण्याची लहर आली आहे. चांगलें चिन्ह आहे. आराम आतां खात्रीनें वाटणार." त्यावर भाऊराव म्हणाले "अरे, आवाज लावून पहातों. मी बरा होऊन आवाज जर कमी झाला तर मी जगायचें कां? भाऊ कोल्हटकराचें जीवन आणि लौकिक आवाज. तोच कमी झाला तर जगण्यापेक्षां मृत्यूलाच मी कवटाळीन." शंकररावांना पुण्यास येऊन बरेच दिवस झाले म्हणून भाऊरावांच्या संमतीनें नाइलाजानें दोन तीन दिवसांनीं येतों असें सांगून त्याच दिवशीं सायंकाळीं शंकरराव मेलनें निघाले व रात्रौ एक वाजतां भाऊरावांचें प्राणोत्क्रमण झालें!!!

## नाट्यकलेच्या हारांतील दैदिप्यमान हिरा

अशा रीतीनें हा महाराष्ट्राचा आवडता, संगीत नाट्यकलेच्या हारांतील दैदिप्यमान हिरा आणि किर्लोस्कर कंपनीचा कुशल कर्णधार

सर्वांना हाय हाय करायला लावून दिवंगत झाला. भाऊरावांनीं रंगभूमीवर सुमारें अठरा वर्षें काम केलें. त्या अवधींत फक्त एकदांच त्यांचा आवाज बसला होता. खरोखरी त्यांचा आवाज जातिवंत होता. कोणत्याहि तऱ्हेचें खाण्यापिण्याचें पथ्य त्यांनीं पाळलें नाहीं. त्या वेळीं व नंतरच्या संगीत नटांचे चोजले पाहिले कीं हंसूं येई. आजपर्यंत झालेल्या नामवंत नटांत भाऊरावांसारखा अष्टपैलू नट झालाच नाहीं. उत्तम कारकून, अत्यंत बुद्धिमान्, कंपनीच्या लौकिकाची व प्रतिष्ठेची अहर्निश काळजी बाळगणारा, अत्यंत प्रेमळ व मनमिळाऊ, असे ते होते. विचारानें अमुक एक गोष्ट करायची, असें एकदां त्यांचें ठरलें कीं अंमलांत आणायची.

## गाणारे स्त्रीपार्टी म्हणजे सुलतान

त्यानंतरचे जे जे गायक नट कंपनीचे मालक झाले त्यांची मालकी ते उत्तम गायक म्हणूनच त्यांना आलेली होती. परंतु धोरण, व्यवहारदक्षता व लौकिकाची चाड या बाबतींत अगदीं शून्य. आणि नाटक मंडळ्या धडाधड कोसळल्या याला जीं कारणें झाली त्यांपैकीं असे अप्रबुद्ध मालक हें प्रमुख कारण होतें. अशा मालकांच्या बेजबाबदार वागणुकीनें नटांची जी कुचंबणा, जी गांजणूक आणि हेळणा होई त्यामुळें केवळ पोट जाळण्यासाठींच रहावें लागत आहे असे उद्गार आंतडें पिळवटून त्या नटांच्या तोंडून निघालेले आहेत. भाऊरावांच्या मृत्यूनंतर जोगळेकरांच्या हयातीपर्यंत प्रथम मंडळींची सुखसोय व त्यांतच आपली सुखसोय अशी किर्लोस्कर कंपनीची परंपरा होती. परंतु इतर कंपनींतले मालक विशेषतः गाणारे स्त्रीपार्टी म्हणजे सुलतान. राज्याची खबर नाहीं. सुखविलासांत कमतरता नाहीं. मंडळींना कदान्न घालून स्वतःचें जेवण चमचमीत करणारेहि हरीचे लाल होते. मी मालक मी मालक म्हणून उठतां बसतां तोंडांत मालकीचा जय. डोळे, भिवया आढ्यतेनें तारवटलेल्या व आइतखाऊ व फुकटे लोकांचा तांडा भोंवतालीं जमवून, आपल्या धोरणाची व गुणाची सारखी त्यांच्या मनावर पेरणी करायची! ते फुकटेहि स्वाभिमानशून्य असायचे. मान तुकावल्यामुळें जर चंगळ चालते आहे तर सारखें तोंड फाटेपर्यंत पसरलें म्हणून बिघडलें कोठें? असें समजून सारखे भोवतीं माना डोलवीत राहायचे. संस्थानांतून त्यांच्या अधि-

पतीभोंवतीं असेच लोक असतात आणि त्यांचें काम असेंच असतें कीं अधिपतीच्या प्रत्येक गोष्टीचें कौतुक करायचें. त्यामुळें अधिपतींना आपण सर्वज्ञ आहोंत असें वाटायला लागतें. परंतु राजा हा ईश्वरी अंश असतो अशी तर आपली समजूत असते. परंतु हा बेगडी--शब्दशः बेगडी–राजा अत्यंत अप्रबुद्ध असून चारित्र्यहीन. इतराच्या स्तुतीनें डोलूं लागला; आणि "आधींच मर्कट" या कवितेच्या अर्थाप्रमाणें त्याच्याकडून सर्व लीला झाल्या तर नवल काय?

## नाटकाच्या दिवशीं एकादशी

भाऊराव व्यसनी होते. परंतु त्यांचीं व्यसनें त्यांच्या आहारीं होतीं. मद्यपानानें प्रकृतीवरच कुरघोडी केल्यानें पुण्यास आजारी पडेपर्यंतच तें होतें. आजारी पडल्यापासून जे सुटलें तें कायमचें. त्याचें कोणतेंहि व्यसन धंद्याच्या व कर्तव्याच्या आड कधींहि आलें नाहीं. नाटकाच्या दिवशीं तर एकादशीप्रमाणें वागत. मिताहार व जरुरीपुरतेंच भाषण करीत. ते नेहमीं म्हणत कीं ज्या कलेवर हें माझें सर्व चाललें आहे तिची सेवा आठवड्यांतून दोन दिवस पवित्रपणानेंच केली पाहिजे. बाकीचे पांच दिवस चैनीला मोकळे आहेतच. त्यांच्या वेळीं असा लोकप्रवाद होता, "भावड्या ना? सारखा (मूठ वळून आंगठा उभा करून) टेर असतो." रंगभूमीवर ते चढ्या सुरांत गात असत आणि जात्या कातडी नाजूक असल्यानें जरा श्रम झाले कीं डोळ्यांवर गाण्याच्या श्रमानें लाली येई. परंतु तो संबंध लोक त्यांच्या मद्यप्राशनाकडे लावीत; इतकेंच नाहीं तर भाऊरावांना नाटकाच्या वेळीं थंड पाणी पिण्याची संवय असे. एकाद्या प्रवेशांत शेजारच्या पात्राचें पद सुरू झालें म्हणजे ते विंगमध्यें जाऊन पाणी पीत आणि ओंठाला लागलेलें अगर हनवटीवरचें पाणी रुमालानें पुशीत टिपीत बाहेर येत. लागलीच "डोस मारून आला बरं का! अहो, उगीच का बेछूट गातो भावड्या?" असें म्हणत. परंतु एकहि दिवस ते नाटकप्रयोगाच्या दिवशीं सकाळपासून रात्रौ नाटक संपेपर्यंत एका थेंबाला स्पर्श करीत नसत हें मला माहीत आहे.

## कर्तव्याला आणि लौकिकाला मुकायला तयार नाहीं

ते सुंदर असून गाण्याची मोहनी पडल्यामुळें बायकाहि त्यांच्यावर लुब्ध होत. अशी एक शेषासानी म्हणून एक अप्सरेसारखी देखणी नायकीण होती. अनेक धनिक लोक तिच्या नादीं असत. तिची प्रतिज्ञा असे कीं माझ्या तावडींत सांपडलेला माणूस मांजरासारखा माझ्या पायांत घुटमळलाच पाहिजे. ती बाई भाऊरावांवर फिदा झाली. त्यांचा स्नेहहि निकट झाला होता. त्या बाईच्या मनांतून स्वतः रंगभूमीवर काम करून नाटक कंपनी काढायचें आलें. तिनें भाऊरावांना विचारलें, "तुम्ही माझ्या कंपनींत आलें पाहिजे." भाऊरावांना तो मूर्खपणाचा प्रकार वाटून वादविवाद नको म्हणून ते 'पाहूं' एवढेंच म्हणाले. बाईनें नेहमींच्या संवईप्रमाणें समजूत करून घेतली, कीं भाऊ माझ्या म्हणण्याबाहेर जाणें शक्य नाहीं. नंतर तिनें धनिकाकडून द्रव्य काढून खर्च करून सामान–पडदे वगैरे करायला सुरवात केली. नंतर पुण्यास भाऊरावांना घेऊन जाण्यासाठीं आली. तीन दिवस धरणें धरून बसली होती. शेवटीं भाऊरावांनीं तिला निग्रहानें सांगितलें कीं "तुझा माझा स्नेह असला तरी मी पागल बनून माझ्या कर्तव्याला आणि लौकिकाला मुकायला तयार नाहीं. किर्लोस्कर कंपनी· शिवाय मी कुठेंही दिसणार नाहीं हें पक्कें लक्ष्यांत ठेव." ती बाई निराश होऊन निघून गेली. परंतु तिला व्यवस्थेसाठीं आपल्या तर्फेचा मॅनेजर म्हणून व्यंकटरावाला पाठवून दिला.

## शकुंतलेचें अधरपान

त्या बाईची कंपनी सुरू झाली. नलदमयंती, सौभद्र वगैरे नाटकें झालीं. गेईटी थिएटर शेषासानीचें सौंदर्यपान करण्यासाठीं फुलूं लागलें. शाकुंतल नाटकांतल्या तिसऱ्या अंकांत लतामंडपांत दुष्यंत शकुंतलेचें अधरपान करूं लागतो. दुष्यंत झालेले गृहस्थ एक गवई होते. त्या दिवशीं त्यांनीं जरा शंकराच्या ज्ञानवल्लीचें सेवन जास्त केलें होतें. त्यामुळें त्या शृंगारिक सीनमध्यें त्यांच्या ज्ञानानें उचल खाऊन खरोखरीचा प्रवेश करण्याचें त्यांच्या मनांत आलें आणि हनवटीस हात लावला. शकुंतलेनें ठरल्याप्रमाणें प्रतिकार केला तरी तो मागें घेईनांत. शकुंतला "अहो

हें काय ? शुद्धीवर आहांत का ?" असें म्हणूं लागली. "अंहं अंहं" म्हणूं लागली. परंतु दुष्यंत रंगांत आलेला. तो काय ऐकतो ? ते शकुंतलेच्या अधराला आपले ओंठ लावण्याचा प्रयत्न करूं लागले. बेभान झालेले. तोंच शकुंतलेनें हातांतील तोड्याचा एक प्रहार दुष्यंताच्या दांतावर केला. दुष्यंताची दंतपंक्ति रक्तबंबाळ झाली. दुष्यंत चिडून शकुंतलेला शेलक्या शिव्या देऊं लागला. लोक हुर्योवडी करूं लागले. पडदा पडला. दुष्यंत आंत आला. एकदम पोषाख उतरून उपरण्याच्यामध्यें भोक पाडून त्याची कफनी केली. अतःपर नाटकांत काम करणार नाहीं अशी प्रतिज्ञा करून ती कफनी अंगावर घेऊन बाहेर पडला आणि मुंबईच्या दोन देवळांत जाऊन दुसऱ्या दिवसापासून पुढें जन्मभर कीर्तन करीत राहिला.

यावरून भाऊराव स्वतःच्या योग्यतेला किती जपत होते हें लक्षांत येईल. एकंदरींत असा सर्वमान्य, सुंदर, उत्तम आवाजदार आणि धोरणी मालक व नट महाराष्ट्रांतून नाहींसा झाला. त्या वेळीं एका महिन्याच्या अवधींत महाराणी व्हिक्टोरिया, न्यायमूर्ति रानडे व भाऊराव हीं तीन श्रेष्ठ माणसें परलोकवासी झालीं.

शंकरराव पुण्याहून निघाले ते मिरजेपर्यंत येतात तों स्टेशनवर त्यांना पुण्याहून तार आली. काका मिरजकर गुरुवारीं प्रयोग म्हणून मिरजेहून आपल्या घरून निपाणीस निघाले होते, ते स्टेशनवर शंकररावांस भेटतांच त्यांच्याजवळ त्यांनीं तार दिली, आणि मी पुण्यास परत जातों असें कळवून ते पुण्यास सकाळच्या गाडीनें मिरजेहून परत निघाले.

## लास्ट ऑफ दि रोमन्स

*गुरुवार ता. १४।२।१९०१ रोजीं निपाणीचा बाजारचा दिवस म्हणून* खेळ होता. दुपारचीं जेवणें वगैरे झालीं. रात्रौ नाटक म्हणून मंडळींची वामकुक्षी झाली. सुमारें तीन वाजले. अगोदर काका मिरजकरांनीं शंकरराव मिरजेहून परत गेल्याचें सांगितलें होतें. मंडळी हवालदील झाली होती. इतक्यांत तार आली. मंडळी गोळा झाली. तार फोडली. प्रत्येकजण काळजीग्रस्त मुद्रेनें तारेंतला मजकूर काय तो कळण्याविषयीं उत्सुक झालेला.

तार वाचली. भाऊराव कैलासवासी झाले!!! एकदम हाहाःकार होऊन सर्व माणसें ओक्साबोक्शी रडूं लागलीं. जिकडे तिकडे कंपनीवर अवकळा दिसूं लागली. घरांतला कर्ता मिळवता धनी गेल्यावर ज्याप्रमाणें घरांतील सर्व माणसें, मुलेंबाळें पोरकीं दिसतात त्याप्रमाणें सर्व कंपनीभर पोरकेपणा दिसूं लागला. दोन दोन चार चार माणसें एका बाजूस बसून भाऊरावांचे गूण आठवून रडूं लागलीं. त्या रात्रीचा प्रयोग बंद ठेवला. सायंकाळीं आचारीपाणक्यापासून सर्व दुःखांत चूर झाल्यामुळें स्वयंपाक वगैरे झाला नाहीं. कुणालाच त्याची आठवण झाली नाहीं. केसरी, काळ वर्तमानपत्रांतून भाऊरावांच्याबद्दल मृत्युलेख आले. काळ-मध्यें दे. भ. परांजपे यांनीं भाऊरावांच्या मृत्यूमुळें नाट्यकलेची हानी झालेली दाखविण्यासाठीं तुलना करितांना एक वाक्य लिहिलें होतें कीं "लास्ट ऑफ दि रोमन्स !" भाऊराव आपल्या हयातींत नाट्यव्यवसायांत श्रेष्ठतर असें मानाचें स्थान मिळवून वाजत गाजत ( लौकिकानें ) गेले. भाऊराव दिवंगत झाले त्या प्रसंगीं शंकरराव जवळ नव्हते व भाऊरावांच्या जवळ त्यांचे बंधु अप्पाराव, गणपतराव, कुटुंब, मातुश्री, मेव्हणे व व्यंकटराव इतकीच मंडळी होती. शनिवारांत श्रीमंत इचलकरंजीकरांच्या वाड्यांत अप-रात्रीं प्राणोत्क्रमण झालेलें, जवळची सर्व मंडळी पुण्यांत अपरिचित, कलेवर मध्यरात्रीपासून किती वेळ घरांत ठेवायचें असा पेंच येऊन पांच पंचवीस मंडळी गोळा होऊन उजाडायच्या आंत अग्नि दिला. गांवांत पुकारा होतांच या आवडत्या नटाला शेवटचा पहाण्याची इच्छा अतृप्त राहिल्यामुळें जवळ जवळ सर्व पुणेंशहर हळहळलें. परंतु इलाज नव्हता. अशा लोकोत्तर नटाची प्रेतयात्रा निघणार हें जर जनतेला कळलें असतें तर जनसंमर्द समुद्रासारखा लोटला असता. परंतु 'असता' असें लिहिणें प्राप्त आहे.

भाऊरावांच्या बाबतींत असें म्हणतां येईल, कीं त्यांचें रंगभूमीवर आगमन झाल्यापासून सर्व जनतेचे ते लाडके होते. लोकप्रियता शेवट-पर्यंत टिकविली. रंगभूमीवर एखादें वैगुण्य उत्पन्न होऊन त्यांचें काम लोकप्रियतेंत कमी पडलें नाहीं. आवाज आणि लोकप्रियता ही शेवटपर्यंत

गाजली. मी स्त्रीपार्टीला नालायख झालों आहें ही जाणीव त्यांना १८८९।९० सालापासून झाली होती. १८९१ सालीं दुसरें स्त्रीपात्र मिळत नाहीं म्हणून कंपनी कायम विश्रांति घेणार अशा जाहिरातीहि लागल्या. परंतु लोकाग्रहानें कांहीं दिवस वाट पाहून स्वतः पुरुषभूमिका करण्याचें ठरवून प्रथम १८९३ सालीं पुरुषभूमिका शापसंभ्रममध्यें केली. १८९५ मध्यें मृच्छकटिक बसवून चारुदत्ताची भूमिका केली. १८९६ मध्यें वीरतनय बसविलें. १८९७ सालीं शेवटची स्त्रीभूमिका मिरज येथें कै. श्रीमंत बाळासाहेब मिरजकर यांच्यासमोरच्या खासगी प्रयोगांत मंथरेची केली.

## रंगदेवतेच्या ठिकाणीं माझी सेवा रुजू झाली

सुमारें ७८ दिवसांनीं ता.२०।२।१९०१ रोजीं मूकनायकाचा प्रथम प्रयोग निपाणी मुक्कामीं झाला. सायंकाळपासून आभाळ अभ्राच्छादित होऊन प्रयोग होतो कीं नाहीं असा संशय उत्पन्न झाला. परंतु ९ वाजतां आभाळ फांकूं लागलें. प्रयोग झाला. त्रेसष्ट रुपये उत्पन्न झालें. सर्व प्रयोगांत माझें काम अतिशय मोकळेपणानें आणि चांगलें झालें असें शंकररावांनीं सांगतांच मला अतिशय हुरूप आला. काम चांगलें ठरायला मी महिना दीड महिना अविश्रांत मेहनत करून बसविलें होतें. त्यामुळें रंगदेवतेच्या ठिकाणीं माझी सेवा रुजू होऊन तिनें यशाचा किरण दिला. सबंध दुसरा दिवस मी आनंदांत होतों. तो इतका, कीं जेवलों केव्हां, काय करायचें वगैरे विचार मनांत आलेच नाहींत. "माझें काम चांगलें झालें," "माझें काम चांगलें झालें" असा अंतःकरणांतून आनंदाचा ध्वनि निघत आहे असा मला भास होई. शंकररावांनीं प्रयोग संपतांच प्रयोगाचें सार सांगतांना एकंदर नाटक चांगलें रंगलें असें सांगून विशेषतः गणूचें प्रतोदाचें काम सर्वांत चांगलें झालें हें त्यांच्या तोंडातून निघतांच जरी मी आनंदानें भरून गेलों तरी फाजील विनयाचा चेहेरा करून नुसतें कळे न कळे इतकेंच स्मित केलें. खरोखरी आंतून इतका आनंद झालेला, परंतु बाहेर दिसला तर "हुरळला" असें म्हणतील म्हणून मनोविकार दाबायला फार श्रम पडले. उजाडेपर्यंत हर्षाच्या उर्मि येत होत्या त्यामुळें झोंप आली नाहीं. जन्मदरिद्र्याला अवचित लाभ

## दर कमी करूं नका

शकाराचें काम यशस्वी झाल्यानंतर हें मूकनायक नाटकांतील कामहि चांगलें झालें. नाटक नवीन, कामहि नवीन त्याप्रमाणें माझें मनहि नवीनतेनें भरून गेलें. या प्रतोदाच्या कामांत फक्त यशस्वितेचीं कारणें मनाला पटलीं तीं हीं कीं भाषण अस्खलित करणें व प्रत्येक हालचालींत सहजपणा आणणें. नाटक चालू असतां सबंध नाटकांत मी अथपासून इतिपर्यंत अगदीं पूर्ण रंगलों होतों. मूकनायक नाटकांतील प्रतोदाच्या कामांत माझा मुद्राभिनयहि चांगला होतो असें प्रत्येकजण म्हणूं लागला. मुद्राभिनयाचें स्वारस्य अगर त्यांतील खुब्या मला त्या वेळीं खरोखरी कळल्या नव्हत्या. निपाणीहून कंपनी कोल्हापुरास आली.

कोल्हापुरास प्रथम प्रयोग शारदा नाटकाचा झाला. त्या दिवशीं शंकरराव प्रेक्षकांसमोर येऊन उभे राहिले. आणि भाषण करतांना मुख्य गोष्ट त्यांनीं सांगितली, भाऊरावांच्या अभावीं कंपनी कोणत्या स्थितींत आली. भाषण करतांना त्यांचा कंठ दाटून येऊन त्यांनीं एक वाक्य उच्चारलें कीं " आजपर्यंत किर्लोस्कर कंपनी अनेकवार येथें येऊन तिनें आपलें मनोरंजन केलें. आपणहि तिचें कोड कौतुक केलें. परंतु या खेपेला कंपनी आपलें सौभाग्य गमावून अनाथ होऊन आपल्यासमोर आली आहे." या भाषणानें बाहेरचे लोक सामसूम होते व कंपनींतील मंडळींना तर हुंदकाच आला. परंतु कंपनीच्या दुर्दैवानें कोल्हापुरांत एक अशी लाट उत्पन्न झाली कीं " आतां या कंपनींत काय राहिलें आहे ? भाऊराव गेल्यानंतर या कंपनीनें शेवटचा दर आठ आणे कां ठेवावा ?" वास्तविक पैसे दिल्याप्रमाणें करमणूक मिळाली पाहिजे. हा पैसा आणि तोलून माल, या व्यापारी व्यवहारी वृत्तीनें प्रश्न बरोबर होता. परंतु एकवीस वर्षें ज्या कंपनीनें उत्तम मनोरंजन केलें, भाऊरावाचें एक पद ऐकल्याबरोबर " पैसे वसूल झाले " मग जास्त पदें फायद्यांत ज्या कंपनीचीं ऐकलीं तो फायदा लक्ष्यांत घेऊन तरी व्यवहारी वृत्ति विसरायला पाहिजे होती. परंतु आपल्यांतील कला जगविल्या पाहिजेत ही वृत्तिच मुळीं हिंदुस्थानांत फार कमी प्रमाणांत–असें अर्धवट कां ? स्पष्टच म्हणतों कीं–अगदींच नसल्यामुळें किर्लोस्कर कंपनीला उत्पन्न फारच कमी होऊं

लागलें. त्यामुळें कोणतीहि आर्थिक मदत न करितां वेळेवर प्रसंग आल्यास निरनिराळ्या अडचणी दाखवून व दिलगिरीचा चेहेरा करून पैशाचा प्रश्न नकारार्थी सोडविणारे, नाटक कंपनीनें अपेक्षा न करितां हितचिंतनाचा आविर्भाव करणारे, नाटकवाल्यांना जगविलें पाहिजे असे म्हणणारे लोक कंपनींतील प्रमुखांना दर कमी करण्याचा सल्ला देऊं लागले.

प्रमुखांपैकीं रामभाऊ या उपदेशाला पाघळले होते. परंतु शंकरराव मात्र त्या उपदेशाच्या अगर सूचनेच्या जाळ्यांत सांपडले नव्हते. परंतु त्यांनीं आपण एकट्यानें ती कल्पना धुडकावण्यापेक्षां सामुदायिक रीतीनें कल्पना धुडकावली असतां ठीक होईल असा कयास बांधून कंपनींतील सर्व मंडळींना जमवून ती कल्पना मांडली. मला मत देण्यासारखें कोणतेंहि महत्त्व आलें नव्हतें, अगर दिलेंहि नव्हतें. प्रत्येकानें आपलें वैयक्तिक मत अशाच अर्थाचें सांगितलें कीं किर्लोस्कर कंपनीचा दर आठ आणे कमी होतां कामा नये. नंतर मध्येंच मी न विचारतां तोंड घालून—वास्तविक सर्वांकडे नजर टाकून शंकरराव पृच्छा करीत होते, परंतु जणुं काय मलाच विचारताहेत अशी भावना करून घेऊन मी मत दिलें—मी असें म्हटलें कीं " मला बोलायचा अधिकार नाहीं. परंतु माझें मत असें आहे कीं किर्लोस्कर कंपनीचा आठ आणे दर लोकांना खुपणार नाहीं. अशा रीतीनें मेहेनत करून, मरून आठ आणे दर टिकवण्याचा प्रयत्न करूं. परंतु दर कमी करून कंपनीचा एक दर्जा आहे तो खालीं आणणें हें ठीक नाहीं. आठ आणे दरानें कंपनी चालत नसल्यास कंपनी बंद राहिली तरी बेहेत्तर; परंतु दर कमी करूं नका. " हें माझें अनाहूत भाषण सर्वांनाच पटलेंसें दिसलें. आणि अगोदर सर्वांनीं नेट धरलाच होता, त्यामुळें कंपनीची श्रेष्ठता कायम ठेवण्याचा मनोभावानें प्रयत्न करायचा असा निश्चय केला आणि सहा महिने—वर्षभर चिकाटीनें आहे त्याच दरानें कंपनी चालवायचें ठरलें.

## मी मतदानाचा अधिकार मिळविला

परंतु यांत शंकररावांनीं सार्वत्रिक पाठिंबा स्वतःसाठीं मिळविला व मी मतदानाचा अधिकार मिळविला. वास्तविक तो माझा फाजीलपणाच

होता. परंतु एका गृहस्थाचें मी एक तत्त्व ऐकलें होतें कीं "ही तुझी जागा" म्हणून आपल्यास कुणी आसनावर बसवीत नाहीं तेव्हां आपण खुशाल रिकाम्या आसनावर दणकून बसावें. लक्ष्यांत येऊन कुणी 'हुडुत' म्हटलें तर आपली नेहमींची जागा आहेच. तिथें जावें. परंतु आक्रमण केलेली जागा कायम पचलीच, तर संस्थानांतल्याप्रमाणें दाखला पटतो व जागा कायम होते. या एकाच ठणठणीत मतदानानें मी कायम मतदार होऊन पुढें पुढें तर माझें मत महत्त्वाचें गणलें गेलें. परंतु या चर्चेनें प्रत्येकाचें मन कंपनीचें श्रेष्ठत्व टिकविण्याचा भगीरथ प्रयत्न करण्याच्या अभिमानानें आणि ईर्षेनें पूर्ण भरून गेलें.

## जळजळीत अभिमान

त्या वेळीं कंपनीला मिरजेस सुरवात झाल्यापासून प्रत्येक मुक्कामांत सरासरी भोजनखर्च आणि प्रवासखर्च भागण्याइतकीच प्राप्ति होत आली होती. त्यामुळें पगार तुंबले. प्रथम सहा महिने सुट्टी बिनपगारी, पदरमोड उसनवारी करून भोगलेली. नंतर पगार देण्याइतकें उत्पन्न होईना म्हणून कुचंबणा झालेली; परंतु किर्लोस्कर कंपनीच्या त्या वेळच्या मंडळींत कंपनीचा अभिमान इतका जळजळीत होता कीं काय त्याचें वर्णन करावें? सांगलीपासून फक्त कुटुंबवत्सलांना काहींतरी पैसे कुटुंबपोषणासाठीं पाठविण्यास देत असत व अविवाहितांना सरासरी धोतरें, सद्रे करायला जरुरीप्रमाणें मिळायचे. म्हणजे १९०० मार्च १६ तारखेपासून १९०१ मार्च अखेरपर्यंत जवळ जवळ पगार नाहींच. असें एक वर्ष मंडळींनीं काढलें. असा तीव्र अभिमान पुनः कुठेंहि दिसला नाहीं. आणि किर्लोस्कर कंपनीच्या परंपरेंतच अशी जादू होती यांत शंका नाहीं.

## मालक रिणको आणि नोकर धनको

यानंतर अनेक कंपन्या आर्थिक संकटांनीं मोडल्या. छिन्नविच्छिन्न झाल्या. कांहीं कंपन्यांच्या मालकांनीं धोरण राखून कांहीं वेळां असेंहि केलें कीं कंपनींतील मंडळींना पगार देतां येत नाहीं तर कंपनी अशा प्रांतांत नेऊन टाकायची कीं लांब जाऊन पडल्यामुळें त्यांना एकदम पळून जातां येऊं नये; शिवाय सहा सहा महिने जेवणावारी नोकरी करून पगार जो

शिल्लक राहिला असेल तो सोडून जातां येऊं नये. त्यामुळें "जातात कुठें" अशी स्थिति होई. त्यांतूनहि कांहीं लोक मालकाच्या कृष्णकृत्यांचा जप करीत बेडरपणानें रेल्वेंतून फुकट जायचें ठरवून पळून आलेले मी पाहिले आहेत. अलीकडे नोकरांच्या राहिलेल्या पगारबाकीबद्दल त्यांना मालकानें प्रॉमिसरी नोटा लिहून दिल्याचेंहि मी ऐकलें आहे. वा रे मालकी! वा रे धनीपणा!! आजपर्यंत नोकरांनीं देणें असलेल्या रकमेबद्दल प्रॉमिसरी नोटा दिलेल्या पाहिल्या, ऐकल्या आहेत. परंतु मालक रिणको व नोकर धनको असा विचित्र व उलटा प्रकार मात्र प्रथमच ऐकला.

कोल्हापूरचे प्रयोग संपले. कै. शाहूमहाराजांनीं कंपनीची विपन्न स्थिति पाहून सरकारी प्रयोग दोन केले होते. श्रीमंत बापूसाहेब कागलकरांनीं एक प्रयोग केला. त्यांचे सर्व मिळून ७५० रु. मिळाले. आणि बेळगांवच्या वाटखर्चाची तजवीज होऊन कंपनी एप्रिलमध्यें बेळगांवास रवाना झाली.

बेळगांवास गणपती गल्लींत एक मोकळी जागा व त्याला जोडून असलेलें घर घेऊन मोकळया जागेंत मांडवाचें थिएटर घालून प्रयोग सुरू झाले. दुसऱ्या शनिवारीं मूकनायक होतें. त्या दिवशीं सायंकाळीं सात वाजेपर्यंत तिकिटविक्री सुमारें पांचशें रुपयांची झाली होती. परंतु वळवाच्या पावसाला आठ वाजण्याच्या सुमारास सुरवात होऊन दहा वाजेपर्यंत इतका जोराचा पाऊस पडला, कीं खड्डयांतील खुर्च्या सांचलेल्या पाण्यांत पोहायला लागल्या, व सर्वत्र चिखलच चिखल होऊन गेला. त्यामुळें कांहीं मंडळी रंगली होती तरी चिखलामुळें प्रेक्षकांना थिएटरमध्यें बसणें अशक्य झालें. खेळ बंद केला. ज्यांनीं मागितले त्यांना तिकिटाचे पैसे परत दिले. बाकी-च्यांना उद्यां निळबाच्या थिएटरमध्यें खेळ आहे असें सांगितलें. व रातो-रात जाऊन तें पक्कें थिएटर ठरविलें.

मे महिन्यांत नवीन घटनेप्रमाणें झालेल्या पहिल्या प्रयोगाच्या दिवसापासून सुमारें चार महिन्यांचा पगार मंडळींच्या नांवावरची उचल वजा होऊन प्रत्येकाला मिळाला. कारण बेळगांवास किर्लोस्कर कंपनी सुमारें सहा वर्षांनीं आलेली होती व प्रयोगहि नवीन होते. त्यामुळें उत्पन्न चांगलेंच झालें. तेरा महिन्यांनीं किर्लोस्कर कंपनींतील मंडळींना

पगाररूपी परमेश्वराचें दर्शन झालें. तेरा महिन्यांत साडेसहा महिने सुट्टीच झाली आणि एक महिन्याचा पगार नियमाप्रमाणें शिल्लक ठेवला गेला व बाकीचा मिळाला.

मे महिन्याच्या सुट्टींत श्री. तात्यासाहेब कोल्हटकर आले व दोन वर्षांखालीं मुंबईस वाचलेलें गुप्तमंजूष नाटक बसविण्याचें काम सुरूं झालें. गुप्तमंजूषमधील सुमारें वीस बावीस पद्यें तात्यासाहेबांनीं येतांना रेल्वेंतच केलीं होतीं. पात्रें वांटून झालीं. गुप्तमंजूष नाटक अथपासून इतिपर्यंत हास्यरसपरिप्लुत होतें. त्यांत तीन पात्रें विनोदी आहेत. शृंगी–भृंगी, वंचक हीं तीं तीन पात्रें. पैकीं वंचकाचें काम सर्व नाटकभर आणि चांगलें होतें. म्हणून सर्व सामान्य नवोदित नटांना आपल्याला पुष्कळ काम असावें ही जी रग असते तशीच मलाहि होती. म्हणून मी घट्टपणानें त्या कामाची इच्छा दर्शविली. परंतु चिंतोबा हे सीनियर असल्यामुळें माझा हक्क कमी पडून मला शृंगीचें काम देण्यांत आलें व राजाराम कडू (आतांचे पुरोहित) यांस भृंगीचें काम देण्यांत आलें.

## चिठ्ठ्या टाकून कौल मागितला

नंतर उपनायिका नंदिनी इचें काम कुणास द्यावें याचा खल सुरूं झाला. कारण ती भूमिका शक्य तितका लहान मुलगा असेल त्यासच देण्यासारखी होती. त्या वेळीं सोनू वालावलकर हा एक बाळ आवाजदार मुलगा होता. परंतु नुसती साधीं पदें सुरांत म्हणण्यापेक्षां गाण्यांत कोणताही आकर्षक अगर करामतीचा गुण नव्हता. दुसरें पात्र रामा डवरी. परंतु तो थोडा मोटा दिसण्यासारखा होता. तेव्हां अण्णासाहेबांच्या तसबिरीसमोर चिठ्ठ्या टाकून–कोंकणांतल्याप्रमाणें कौल मागण्यासारखाच हा विधि आहे–निर्णय करण्यांत येई. त्या नियमाला अनुसरून सोनू, रामा व एक अगदीं कुरूप मुलगा अशीं तिघांचीं नांवें लिहून चिठ्ठ्या टाकल्या व एका अगदीं लहान मुलाला चिठ्ठी उचलायला सांगितली. परंतु चिठ्ठींत नेमकें त्या कुरूप मुलाचें नांव निघालें. अण्णासाहेबांनीं जणुं काय क्षुल्लक गोष्टीसाठीं वादात्मक पिष्ट-

पेषण करून रिकामा वेळ घालविल्याबद्दल चीड येऊन त्यांनीं हा विनोदी निर्णय दिला असावा. कुरूप मुलाचें नांव निघालें म्हणून त्याला काम द्यावें तर चालकांना वेड्याच्या इस्पितळांत कां पाठवूं नये याचीं कारणें दाखवा म्हणून नोटिसा द्यायला लोकांनीं कमी केलें नसतें. सबब नाटकांतल्या चालत आलेल्या परंपरेप्रमाणें औचित्यापेक्षां अगर शोभून दिसण्यापेक्षां गाण्यालाच प्राधान्य मिळून रामा डवरी यास नंदिनीचें काम मिळालें.

संगीत नाटकें या दृष्टीनें औचित्याच्या बाबतींत अगदीं गैरसोईचीं ठरलीं आहेत. गाण्यालाच संगीत नाटकांत प्राधान्य दिल्यामुळें स्त्रीभूमिका करणाऱ्या पात्राची वयोमर्यादा १४।१६।१८।२५।३५।४३।५० वर्षांपर्यंत जाते मुख्य नायिका नाटकांत जरी बाला अगर तरुणी असली तरी ती बाला नाहींच, क्वचित् तरुणी परंतु प्रौढा आणि वृद्धा अशाच दिसत आल्या आहेत. गुप्तमंजूषमधील पदांच्या चाली सांगून तात्यासाहेब सुट्टी संपतांच परत गेले. बेळगांवाहून हुबळीस कंपनी गेली. हुबळीहून धारवाडास गेली. धारवाडास नाटक पूर्ण बसवून निघतांना शेवटच्या आठवड्यांत गुप्तमंजूषचा प्रथम प्रयोग झाला आणि तो यशस्वी ठरला.

गुप्तमंजूष नाटकांत तात्यासाहेबांनीं तीन विनोदी पात्रें निर्माण केलीं. त्यांतला वंचक हा अत्यंत बुद्धिमान आहे, हजरजबाबी आहे व वेळप्रसंगीं वाटेल ती क्लृप्ती करून प्रसंगांतून निसटणारा आहे. शिवाय तो आपला बाळमित्र व धनी "विलास" याच्याशीं एकनिष्ठ आहे.

भृंगी—हा व्यवहारज्ञान व म्हणींचाच निव्वळ नादी अगर वेडा असल्यामुळें आपल्या व्यवहारज्ञानाचें व म्हणींचें वेळीं अवेळीं अनौचित्यानें जें प्रदर्शन करतो त्यामुळें तें पात्र विनोदी झालें आहे.

शृंगी—ही भूमिका मला दिली त्या वेळीं मला दोन चार प्रवेशांतच काम म्हणून मी खट्टू झालों होतों. परंतु भूमिका बसवायला लागलों तेव्हां त्यांतलें स्वारस्य थोडें थोडें मला कळूं लागलें. नाटकाच्या नादानें पागल झालेला भेंकड व औचित्यशून्य अथवा शेंफारलेला एक मूर्ख मनुष्य हीच भावना मी त्या भूमिकेबद्दल दृढ करून ती अभ्यासूं लागलों. रोज नक्कल म्हणतांना भाषणांत अस्खलितपणा व सहजपणा यावा असा प्रयत्न

करीत असें. आवाजहि नैसर्गिक यावा अशी काळजी घेत असें. देवलमास्तरांची शिकवणच तशी होती व गणपतराव जोशी यांचीं कामें प्रत्यक्ष पाहून त्यांच्या कामाची जी छाप आणि पकड मनावर बसली होती त्यामुळें माझा प्रयत्न फलद्रूप होण्याच्या मार्गाला लागला होता. ही नैसर्गिक भाषापद्धति त्या वेळीं सर्रास सर्व नाटक मंडळ्यांतून चालू होती. तें विवेचन पुढें अनुसंधानानें येईलच.

## उत्साहाच्या अतिरेकाचा परिणाम

माझें शृंगीचें काम बहारदार झालें. त्यामुळें उत्साहानें माझें मन भरून गेलें. मनस्थिति कांहीं वेळ अशी होई कीं रोज नाटकें कां होत नाहींत ? तो काळ असा होता कीं मला फक्त या तीन नाटकांतच प्रामुख्यानें प्रेक्षकांसमोर यायला मिळे व इतर प्रयोगांत स्त्रीभूमिका सुटल्यामुळें भालदार, चवरी वारणारा, मारेकरी शिपाई अशा खोगीरभरतींत मी रंगभूमीवर जाई. त्यांतहि माझा प्रयत्न असा असे कीं माझें व्यक्तिमत्व कोणत्या तरी तऱ्हेनें प्रेक्षकांसमोर यावें. यांत अपक्व मनस्थितीमुळें अनौचित्याचाहि प्रकार होई. परंतु उत्साहाच्या अतिरेकाचा तो एक परिणाम होता. सर्वच नवोदित नटांच्या हातून प्रथम प्रथम हे प्रकार होतातच. पुढें मन स्थिर करून चाणाक्षपणें भूमिकेकडे पाहून आपली सुधारणा करणें हेंच मुख्य तत्त्व आहे. हें तत्त्व जो आचरणांत आणतो त्याचीच प्रगति होते व जोआणित नाहीं त्याची प्रगति खुंटून ठराविक सांचाच्या भूमिकेशिवाय त्याला दुसरें कांहींच करतां येत नाहीं.

या वेळेपासून मला असेंहि वाटूं लागलें कीं आपल्याशिवाय दुसऱ्यांच्याहि भूमिकेंत आपण सूचना द्याव्या. वास्तविक त्यांत लब्धप्रतिष्ठेचा वाराहि मनाला शिवला नव्हता. परंतु आपल्याला पटलेली गोष्ट रंगभूमीवर कशी वठते व परिणामकारक होते हें पाहून आपली कल्पना बरोबर आहे अगर नाहीं तें अजमावतां येई. परंतु याचा परिणाम एखाद्या वेळीं असा होई कीं लहान मुलें, मला महत्व नसल्यामुळें, ऐकलें न ऐकलें करीत. बरोबरीचे असत ते ऐकून घेत. पण "यांत काय आहे ?" असें म्हणत. एखादा तर शिमग्यांत साजणारा संस्कृत शब्दप्रयोग उच्चारी.

माझ्यापेक्षां मानानें व वयानें श्रेष्ठ अशीं माणसें फाजीलपणा या शब्दानें माझा गौरव करीत. असें जरी असलें तरी मी मनाच्या तळमळीमुळें तें सर्व मुर्दाडपणानें हंसण्यावारी नेई.

## भावी यशाची खात्री

माझ्या शृंगीच्या यशस्वी भूमिकेपासून कंपनीच्या लोकांत " गणूच्या कामांत नाविन्य व कल्पकता यांचा प्रादुर्भाव चांगला दिसतो. त्याचें काम चांगलें होतें अं " अशी चर्चा चालू झाली. पण यापेक्षां प्रोत्साहनाची मर्यादा वाढली नव्हती. शब्दापेक्षां मुद्राविर्भावावरून खरें मत ओळखतां येतें याचा अनुभव मी या वेळेपासून घेऊं लागलों. माझ्या शृंगीच्या कामाबद्दल लोकांचें मत उत्तम झालें. शृंगीचे प्रवेश नाटकांत अधिक वाढवावेत अशा सूचना लोकानीं नाटककार कोल्हटकरांना केल्या, हें मला कळलें तेव्हां मला भावी यशाची खात्री वाटूं लागली. यामुळें मनाला प्रसन्नता आली.

## विजेच्या दिव्यापुढें डिटमारचा दिवा

भाऊरावांच्यानंतर श्रीयुत नारायणराव जोगळेकर कंपनींत समाविष्ट झाले. त्या वेळीं पुण्याच्या पहिल्या खेपेस जोगळेकरांबद्दल कंपनीचे फुकटे हितचिंतक महाभाग नाटकाच्या वेळीं रंगपटांत येऊन "भाऊरावांच्या पश्चात संगीत गेलें" असे दुःखपूर्ण सुस्कारे टाकीत, प्रलाप काढूं लागले. कोणी " ठीक आहे," " उत्तम आहे," " नाहीं, पण जोगळेकरांत गम्मत आहे, अं " असें म्हणत. " जोगळेकर बेढब दिसतात, " " त्यांच्यामुळें स्टेज कसें भरून दिसतें, " " जोगळेकरांचा आवाज गोड व पल्लेदार आहे परंतु तान बुळबुळीत पुसकट येते. भाऊरावांसारखी दाणेदार, बिजली-सारखी चमकदार येत नाहीं. " प्रोत्साहन देण्याचा बहाणा करून हितचिंतकाचें कातडें पांघरलेले पुष्कळ आचरट वरच्यासारखी बडबड करीत. बाकी इतकें मात्र खरें कीं विजेच्या दिव्यापुढें डिटमारच्या दिव्याचा प्रकाश कमालीचा मंद वाटतो तशीच अवस्था भाऊराव गेल्यामुळें आमच्या कंपनीची झाली होती.

## खोकल्यासाठीं तंबाकुचें व्यसन

आमचा मुक्काम मुंबईस होता. या वेळीं मला पगार बारा रुपयाचा सोळा रुपये झाला. याच वेळीं माझे मुंबईस असलेले एक चुलत चुलते श्रीयुत सदाशिव गणेश बोडस हे जगदीश्वर छापखान्यांत कंपॉझिटर होते त्यांची व माझी भेट होण्याचा सुप्रसंग आला. लहानपणीं कोंकणांत मी आईवडिलांच्याबरोबर जात असें तेव्हां त्यांना मी पाहिलें होतें. त्यानंतर त्यांची माझी भेट नव्हती. आपले चुलते मुंबईस असतात व आपला एक पुतण्या किर्लोस्कर कंपनींत असतो एवढेंच परस्परांना माहीत होतें. ते सदूकाका या वेळच्या मुक्कामांत एक दिवस सकाळीं कंपनींत आले. प्रथम मीच त्यांना दिसलों. "गणेश गोविंद बोडस या कंपनींत आहेत काय?" असें मलाच त्यांनीं विचारलें. "मीच तो" असें मी सांगितलें. त्यावर "तुझा एक चुलता मुंबईस आहे हें तुला माहीत आहे काय?" म्हणून त्यांनीं प्रश्न केला. तेव्हां "मीच तो" असें ते म्हणाले. अशी त्याची माझी फार वर्षांनीं अचानक आनंददायक भेट झाली. मी आपुलकीनें त्यांचें आदरातिथ्य केलें. नंतर त्यांनीं आपल्या बिऱ्हाडाचा पत्ता दिला. त्या दिवशीं संध्याकाळींच त्यांच्याकडे गेलों. त्यांनीं अनेक हकीगती मला सांगितल्या. चहा फराळाचें दिलें. माझ्या रंगलेल्या तोंडाकडे लक्ष जाऊन त्यांनीं हलकेच पानाचा डबा पुढें सरकवला व चंची टाकली. क्षणमात्र मी विचारांत पडलों. एवढ्यांतच, 'पुढें यांच्या आपल्या वरचेवर गांठी पडणार, आपल्याला पान तंबाकूची तलफ येणार व आपली उगाच कुचंबणा होत रहाणार ती न व्हावी, वडील या नात्यानें त्यांच्या आदराला पुढें धक्का बसेल त्यापेक्षां याच वेळीं जें काय होईल तें होईल.' असा विचार करून मी पान खाल्लें आणि सदूकाकांच्यासमोरच तंबाकुची चिमूट तोंडांत टाकली. त्यांनीं कळे न कळे असे माझ्याकडे पाहिलें. मी मुर्दाड मनानें "खोकल्यासाठीं हें तंबाकुचें व्यसन मी मुद्दाम लावून घेतलें आहे अशी मखलाशी करून मोकळा झालों. ही आपल्या पुतण्याची मर्यादेबाहेर बेडर वृत्ति पाहून "कांहीं हरकत नाहीं, असूं दे" असें म्हणून त्यांनीं विषय बदलून माझ्या व्यसनाचा मार्ग मोकळा करून टाकला.

सदूकाकांनीं आमच्या कोंकणांतल्या इष्टेटीबद्दल घर देऊन मला कोंकणांत जायला भाग पाडलें. मी कोंकणची सफर केली. पण त्या वेळीं तेथील सावकारांनीं मला कांहींच दाद लागूं दिली नाहीं.

त्यापुढील नाशिकच्या मुक्कामांत वीरतनयांतील चिंतोबाची लोकप्रिय झालेली शुंभसेनाची भूमिका मला करावी लागली. त्यांतहि मी माझें वैशिष्ठय दाखविलें. नाशिकचा मुक्काम संपवून कंपनीनें उमरावती गांठली. तेथें गणेश थिएटर नुकतेंच बांधलेलें होतें त्यांत आमचे प्रयोग सुरू झाले. या वेळीं श्री. दादासाहेब खापर्डे कंपनींत येत असत. नाट्यविषयावर त्यांची संभाषणात्मक चर्चा चाले, ती फार उद्बोधक वाटे. त्यांनीं एकदां शारदेंतील मुलींच्या प्रवेशाची तालीम घेतली. ती मात्र मला पटली नाहीं. अभिनयाचे कांहीं कांहीं प्रकार मला चमत्कारिक वाटले. तारुण्याच्या सहज उच्छृंखलतेमुळें दादासाहेबांच्या तालमीची नक्कल करून मी करमणूक करून घेत असें. मोठ्या माणसांच्या नकला करण्याची खोड मला पहिल्यापासून होती. असाच दुसरा एक प्रसंग मला आठवतो तो येथें देतों.

## खरे खूष झाले !

शंकरराव मुजुमदार यांनीं रा. खरे या नांवाचे एक गृहस्थ नाट्य-शिक्षक म्हणून आणले होते. त्यांनीं मला अभिनयाचें शिक्षण द्यायला सुरवात केली. नाट्याबद्दल कोणी कांहीं सांगतो असें कळलें कीं त्याचा पिच्छा पुरवून पाणी कितपत खोल आहे तें अजमावायचें हा मला छंदच. खरे यांच्यापुढें एखाद्या भाविक शिष्याप्रमाणें मी बसूं लागलों. त्यांचे कवायतीप्रमाणें धडे घेण्यास आरंभ केला. त्यांनीं " नॉर्मल मुद्रा " म्हटलें कीं मी निर्विकार मुद्रा करावी. त्यांनीं " क्रोध " म्हणतांच मी दांत ओठ चावून भिवया मोडून डोळे वटारावे. नंतर करुणा, हास्य, आश्चर्य, आक्रोश, इत्यादिकांची कवाईत सुरू झाली. खरे यांच्या कवायती शिक्षणांतील मुद्राभिनय माझ्या भूमिकांतून नेहमीं सहजच होत असे. पण खरे यांच्या-पुढें माझ्या अभ्यासूपणाचा आभास मी कायम ठेवीत असें. त्यानंतर एकदां गुप्तमंजूषमधील माझें काम खरे यांनीं पाहिलें आणि मला विचारिलें " गणू, काय ? माझ्या शिक्षणाचा फायदा आहे कीं नाहीं ? " त्यावर

"यांत काय संशय ?" मी विनयाचा आव आणून उत्तर दिलें.खरे खूप झाले.

## अखंड सुवासिनीचें जाळें

उमरावतीहून आमचा मुक्काम नागपूरला गेला. तेथें एका अखंड सुवासिनीनें मला आपल्या जाळ्यांत पकडण्याचा प्रयत्न केला. जवळ जवळ तिच्या कचाट्यांत सांपडलोंच होतों. परंतु वेळींच शुद्धीवर येऊन ताडकन् जाळें तोडून बाहेर पडलों. सत्याचे प्रयोग मला लिहायचे नसल्यामुळें जास्त वर्णन करीत नाहीं. हें सांगायचें कारण इतकेंच कीं तरुण नटावर असले प्रसंग नेहमींच येतात. अशा बाबतींत त्यांनीं अलिप्त राहिलें पाहिजे. तरच आपल्या कार्यांत यश मिळविणें शक्य असतें.

याच मुक्कामीं अनंत वामन बर्वे यांना, त्यांनीं लिहिलेलें उत्तररामचरित्राचें भाषांतरित नाटक आमच्याकडे बसविण्याचा घाट घालून, शंकररावांनीं आणिलें. मूळ नाटक महाकवि भवभूतीचें असलें तरी रंगभूमीवर रंगण्यासारखें नव्हतें. नाटकाचें वाचन झालें. कोणालाच पसंत पडलें नाहीं. त्यामुळें साइडिंगला पडलेल्या रेल्वेच्या डब्याप्रमाणें तें नाटक कायमचेंच बाजूला पडलें.

धुळवडीच्या दिवशीं कंपनींत गाणें बजावणें चाललें असतांना नागपूरच्या गुंडशाहीनें आपला पराक्रम दाखविला. गुंड आंत घुसले. दंगा केला. थोडी मारामारी झाली. गुंडांच्या हातचा प्रसाद शंकररावांनाहि मिळाला. पण एकंदरींत शंकररावांचा दरारा तसा चांगलाच होता. पोलिसांची मदत आम्हास असे. नागपूर, वऱ्हाडकडील गुंडगिरी अनादिसिद्धच आहे. उमरावतीससुद्धा आपल्या हस्तकांकडून थिएटरवर दगडफेक करून एका पोलीस जमादारानेंच गुंडगिरी गाजविली. कारण क्षुल्लक होतें. जमादार मजकूर तर्र होऊन बरोबर एका आपल्या गावभवानीसह आले होते. तिच्या बसण्याची व्यवस्था करण्याचें शंकररावांनीं नाकारलें. एवढेंच कारण पुरेसें झालें.

## तरुणीचें केशवपन

उमरावतीस शापसंभ्रमांतील कपिंजलाचें काम प्रथमच आणि तेंहि आयत्या वेळीं करून शाबासकी मिळवली. त्यामुळें थोड्या

दिवसांत शारदा नाटकांतील कांचनभटाची भूमिका करण्याची संधि मला मिळाली. एकाची अडचण तीच दुसऱ्याच्या उत्कर्षाची नामी संधि हा सिद्धान्तच आहे. तसेंच या वेळीं झालें. माझ्या भावी उत्कर्षासाठीं कांचनभटाच्या कामांत वैशिष्ठय दाखविणें मला भागच होतें. मी त्याकरितां जागरूक होतों. भूमिकेची यथातथ्य सजावट व्हावी म्हणून मी डोक्यावरील केसाची पर्वा न करता हजामत करून गाईच्या पावलाएवढी शेंडी ठेवून दिली. वास्तविक एकच दिवस मला तें काम करायचें होतें. त्यासाठीं तारुण्यांतील आवडती अशी केसांची शोभा कमी केली नसती तरी चाललें असतें. पण आपली रंगरचना यथातथ्य झालीच पाहिजे ही माझी तीव्र इच्छा. म्हणूनच मी माझ्या लाडक्या केसांची पर्वा केली नाहीं. इतर पुष्कळ नटाना आपल्या डोक्यावरील केस काढणें म्हणजे तरुणीचें वपन करण्याइतकें दुःखदायक वाटत असतें. मी ज्या काळांतली हकीगत लिहीत आहें तो काल तर सोडूनच द्या, पण नाट्य व सिनेमा या जगांतील आजचा पुढारलेला व सुधारलेला काल घेतला तरी त्यांतहि रंगरचनेचें वास्तव स्वरूप दाखविण्यासाठीं आपलें केशसौंदर्य गमावण्यास नटवर्ग तयार नसतो. याचें एकच उदाहरण नमूद करितों. १९३५ सालीं प्रख्यात प्रभात फिल्म कंपनीचा निघालेला 'धर्मात्मा' बोलपट मी पाहिला. त्यांत हरी पंडितांचें काम केलेले नट सुविद्य, नाट्यविषयांचे अभ्यासू. त्यांनीं हरी पंडिताच्या भूमिकेची सजावट कशी केली आहे हें पुष्कळांनीं पाहिलें असेल. आधुनिक सुधारकाला शोभतील अशा डोकीवरील बावऱ्या, त्यावर पगडी आणि अंगांत आंगरखा हा हरी पंडित. ही भूमिका कालानुरूप योग्य तर दिसत नाहींच. पण त्यांनीं जो वेष घेतला तो एखाद्या सोनारासारखा किंवा लखूशेट, धीवरमल् यांच्यासारखे ब्राह्मणी पागोटें घालणारे काहीं मारवाडी असतात तसा दिसतो. हरी पंडिताचें काम करणाऱ्या सुविद्य नटास आपल्या यथायोग्य वेषापेक्षां आपल्या डोकीवरील केसांचीच अधिक मातब्बरी वाटली हें पाहून मला तर सखेद आश्चर्यच वाटलें.

## माझी किंचित् मॅनेजरकी

वर्ध्याच्या मुक्कामीं शंकररावानीं मला आपल्या खात्यांतलें ॲडव्हान्स मॅनेजरचें काम सांगितलें. मला मोठा आनंद झाला. दुसऱ्या दिवशीं

सकाळीं जेवण केलें. प्रवासांत पानसुपारी तंबाकू पाहिजेच म्हणून हात-रुमालाच्या चारी कोपऱ्याला चार जिनसा बांधून पानासह पुरचुंडी खिशांत कोंबली आणि निघालों. माझ्या फुगलेल्या खिशाकडे शंकररावांचें लक्ष पोंचलें. " खिशांत काय आहे रे ? " एवढेंच विचारून न थांबतां माझ्या खिशांत त्यांनीं हात घातला; आणि आमचा तंबाकुचा चोरटा षोक उघडा करते झाले. मी ओशाळलों. माझ्याजवळची तंबाकू पाहून शंकररावानीं माझी चांगलीच हजेरी घेतली. मला त्यांचा वचक वाटे. त्याचा मान राहील असा त्यांच्यासमोर वागलों; पण नंतर मला जें करायचें तेंच केले. माझी किंचित् मॅनेजरकी तेथेंच संपली.

सोलापुरास आमचा मुक्काम असतांना माझ्या क्रिकेट खेळाच्या प्रेमानें उचल खाल्ली व कंपनींतील मुलें जमवून खेळ मांडला. फील्डिंग करतांना झेल आला तो झेलण्यासाठीं धांवलों. त्या भरांत लांकडाचा ढीग लक्ष्यांत न आल्यामुळें अडखळून पडलों. तेव्हां उजव्या हाताचा पंजा निखळला. तरी दुसऱ्या दिवशींच्या मूकनायकांतलें काम आजारीपणा आड येऊं न देता बँडेजमध्यें फळी बांधलेला हात गळ्यांत अडकवून केलें. एक महिनाभर गळ्यांत हात होताच.

## जोगळेकर भागीदार झाले

पुढें कंपनी पुण्यास गेली. ह्या वेळपर्यंत नारायणराव जोगळेकर यांना कंपनींत आल्याला दोन वर्षें झालीं होतीं. या अवधींत कंपनीच्या घटनेप्रमाणें जोगळेकरांनीं सर्व पायऱ्या व्यवस्थित ओलांडल्या आणि कंपनीची भागीदारी त्यांना मिळाली. भागीदारांत येण्याचा गोरे यांनाहि हक्क होताच. पण किर्लोस्करसारख्या संस्थेला वागविण्याकरितां आवश्यक लागणाऱ्या गुणांचा अभाव गोरे यांच्याजवळ असल्यामुळें त्यांच्या भागीदारीबद्दल कंपनींत खूपच खळबळ उडाली. अखेर गोरे यांच्या अठ्ठावीस रुपयांच्या पगारांत पाऊणशेंची वाढ होऊन त्यांना गप्प बसविलें. गोरे गप्प बसले. पण मालकी हक्क गेला म्हणून मनांत कायमचेच असंतुष्ट राहिले. जोगळेकरांच्या मालकीला दडपे यांचा विरोध होता. त्यांनीं तो कंपनीकडे पत्रद्वारें व्यक्तहि केला. त्यापुढें कंपनींत दडपे नाहींत अशाच समजुतीनें त्यांचीं

कामें मजकडे येण्याचें निश्चित झालें आणि माझ्या सोळा रुपयांची पंचवीस रुपये पगारांत वाढ झाली. त्या वेळीं खोकल्याच्या आजारानें मी बेजार होतों. तरी पण कामांची संधि अधाशीपणानें सोडली नाहीं.

## एका नाटकांत तीन भूमिका

लगेच डोंगरे यांचें चंद्रहास नाटक कंपनीनें बसवावयास घ्यायचें ठरविलें. मुंबईच्या मुक्कामांत चंद्रहासाच्या तालमींना सुरवात झाली. त्या नाटकांत मी तीन निरनिराळया भूमिका करूं लागलों. पहिल्या अंकांत भटजी, दुसऱ्या अंकांत चंद्रहासाचा मारेकरी मांग, चौथ्यांत तारुण्यांत आलेला दुष्टबुद्धीचा मुलगा मदन अशा भूमिका मी करीत असें. जोगळेकरांचें दुष्टबुद्धीचें काम चांगलें होत असे. चौथ्या अंकांतला त्यांचा माझा प्रवेश उत्तम होत असे. गुंडू वालावलकरांचें लहान चंद्रहासाचें कामसुद्धां चांगलें होई. तरुण चंद्रहास गोरे होत. त्यांचीं तीन चार पदें अतिशय उत्तम होत. पण त्यांतहि 'बंधु मज आजन्मचि तो' हें कर्नाटकी चालीवरील पद अप्रतिमच होई. आवाजाची लज्जत औरच असल्यानें त्या पदाला 'वन्स मोअर' वर 'वन्स मोअर' झडत.

भटजीच्या कामांत माझें म्हणून वैशिष्ठय मी जसें ठेवित असें तसेंच सर्वांगाला काळें फासून मांग बनण्यास यत्किंचित्हि आळस करीत नसें. त्याबरोबरच मदनाची रंगरचना तितकीच काळजीपूर्वक करण्यांत कधींच कसूर करीत नसें. हें लिहिण्याचें कारण पूर्वी कित्येक खमंग नटांनीं रंगरचनेंत मन मानेल तसा हलगर्जीपणा दाखविलेला मी पाहिला आहे.

माझ्या मदनाच्या कामाबद्दल त्या वेळच्या वर्तमानपत्रांतून तारीफ येत असे. प्रवेश करुणरसात्मक होता. माझें करुणरसाचें हेंच पहिलें काम. मी तें मन लावून बसविलें होतें. माझ्या स्वतंत्र नाट्याभ्यासाचें फळ म्हणजे अभ्यास करूं लागल्यापासून उत्तमापैकीं गणना होईल असें हें चौथें मदनाचें काम होतें.

## अंदरकी बात

मुंबईहून कंपनी यवतमाळास गेली. तेथें कंपनींतील नटांना मेडल्स देण्याचा समारंभ झाला. जोगळेकर, गोरे, रामा डवरी, गुंडू यांना मेडल्स व परचुरे, चिंतोबा यांना रुमाल मिळाले. माझी कुणालाच आठवण झाली नाहीं. माझ्या कामांत चांगली सफाई आली असतांना मीच बक्षिसांतून अचुक वगळला गेल्यामुळें मला अतिशय वाईट वाटलें. पण सन्मानास पात्र होण्याची लायकी अजून माझ्यांत आलीच नाहीं अशी मी त्या वेळीं मनाची समजूत केली. परंतु नाटक मंडळ्यांच्या मेडल समारंभांत अंदरकी बात न्यारीच असते, ती अशी. कंपनीचा मालक तो नट असला कीं त्याला मेडल मिळालेंच पाहिजे. स्त्रीनटास वगळून चालेल कसें? लहान मुलांचें कौतुक झालेंच पाहिजे! जनतेकडून–चुकलों–मेडल समारंभ जे होतात ते नेहमीं कंपन्यांच्या दोस्त भगतांकडून होत असतात. गांवांतील धनिक, रसिक पुढाऱ्यांना घेऊन हा भगतगण कंपनीचा सन्मान करीत असतो. वर्गणींत ज्याचा जास्त मोठा आंकडा त्याचा जो आवडता नट असेल त्याला प्रमुख धरून स्नेही झालेल्या आपल्या इतर नटांची वर्णी अगोदर लावणें भागच असतें. अशा सन्मानाला नाटक मंडळ्या चटावलेल्या असतात. ही मेडल्सची अन्दरकी बात मला माहीत होती. तरी त्या वेळच्या तारुण्यांतील मनाला मेडल्सचा लोभ वाटे. आणि म्हणूनच मला वगळल्यामुळें वाईट वाटलें. यवतमाळप्रमाणेंच हैद्राबादच्या मुक्कामींहि असाच मेडलसमारंभ झाला. त्या वेळींहि नेमका मीच गळलों. पण या खेपेस मला थोडा वेळ किंचित् खिन्नता वाटली. ज्यांना मेडल्स मिळालीं त्यांच्या प्रसन्न चेहऱ्याकडे पाहून मला वाईट वाटे. कुस्तींत पडलेल्या पहिलवानासारखा मी पराभूत नट आहें असें समजून मी अशा समारंभानंतर विजयी नटांच्या प्रसन्न मुखाकडे पहाण्याचें दोन दोन दिवस टाळीत असें.

## बायकांचा शिमगा

अक्षय्यतृतीयेच्या वेळीं आमचा मुक्काम नाशिकला होता. पंचवटींतील बायका व नाशिकमधील बायका गोदावरीच्या दोन्ही कांठावर

समोरासमोर उभ्या राहून सार्थ असे हात वारे व अभिनय करीत आणि शब्दप्रयोगांचा उच्चार बेधडक करीत. तो प्रकार पहावयास आम्हाला मिळाला. स्त्रिया ब्राम्हणेतरांच्या पण कुलीनाच्या असत. त्या प्रकाराचें वर्णन साग्रपणें न करितां तो बायकांचा शिमगा म्हणजे पुरुषी शिमग्याप्रमाणें बीभत्सच असे. हा शिमगा पुढें सरकारनें कायद्यानें बंद केला.

## गुरूंचा शुभ आशीर्वाद

आमची कंपनी हैद्राबाद, सोलापूर करून पुण्यास दाखल झाली. या वेळीं जोगळेकरांनीं देवलमास्तरांना कंपनींत आणण्याचें ठरविलें. त्याबद्दल सर्वांच्यापेक्षां मला फार आनंद झाला. देवलमास्तर आले. जोगळेकर त्यांच्याकडून तालीम घेऊं लागले. शंकररावांना देवलमास्तरांबद्दल बरें वाटत नसे. म्हणून त्यांनींहि पंढरपूरच्या हायस्कूलचे हेड्मास्तर शंकर विष्णु कुलकर्णी यांचें सुमती नाटक बसविण्यास घ्यायचें आणि त्याच्या तालमी घेण्यास शंकर आत्माराम पाटकर यांना आणावयाचें असा बेत केला. पाटकर नाट्यशिक्षक उत्तम आहेत कीं नाहींत हें आमच्या कंपनींत अजून अनुभवानें ठरायचें होतें. मला वीररसाचीं कामें करिता यावीं म्हणून देवलमास्तरांच्याजवळ अथेल्लो हें गद्य नाटक शिकायला मी सुरवात केली. लहान मंडळींत नाटक बसविण्याचा प्रथमचा बेत इतरांच्या हेळसांडीमुळें सोडून दिला आणि सर्व पात्रांचीं भाषणें मीच म्हणून अथवा एखाद्याला पुस्तकावरून वाक्यें म्हणायला बसवून शिक्षण घेऊं लागलों. अथेल्लोच्या पांचव्या अंकांतील "मना! तेंच तेंच कारण" हें स्वगत भाषण मी म्हणून दाखवितांना देवलमास्तरांच्या डोळ्यांतून पाणी आलें आणि प्रसन्नचित्त होऊन ते मला म्हणाले "ठीक आहे. चीज करशील." देवलगुरूंचा मला हा भावी उत्कर्षाचा शुभ आशीर्वादच मिळाला असें वाटलें.

## नटाच्या लग्नाला सत्राशें विघ्नें

माझ्या आईला आपला बाबू "लग्नाला योग्य जाहला आहे." असें वाटूं लागलें होतें. घरीं सून यावी, नातवंड आपल्या मांडीवर खेळूं लागावें असें प्रत्येक मातेला वाटणें साहजिकच असतें. तिला वाटे "आपली गरीबी संपणार कधीं आणि बाबूचें लग्न होणार कसें?" माझ्या

लग्नाला एक आमची गरीबीच आड येणारी होती असें नाहीं. मी स्वीकारलेला नाटकपेशा हाहि आड येण्यासारखा होता. लग्नाच्या आड नाटकपेशा येतो हें विधान आजच्या सुधारलेल्या व पुढारलेल्या माझ्या पांढरपेशा समाजाला पटणार नाहीं; पण मी ज्या काळीं घर सोडून नाटकांत गेलों तो कालच तसा होता. त्या वेळचा बहुजनसमाज नाटकें पाहीं; परंतु नाटकवाला म्हणजे बेरड, रामोशी अगर हल्लींच्या गोंडस शब्दांत सांगायचें म्हणजे हरिजन अशा तिरस्कृत वर्गासारखा आहे असें मानी. कित्येक सोंवळे सनातनी नटाचा स्त्रीवेष पाहिला म्हणजे सात जन्म षण्ढत्व येतें असेंसुद्धां मानीत. या मानण्याला शास्त्राधार नसला तरी तो समाज सत्तान्याय होता.

नाटकवाल्यांना अशा तऱ्हेनें मानण्याची समाजाची प्रवृत्ति असायला थोडींफार तशींच कारणेंहि होतीं. नाटकवाल्यात कुटुंबवत्सल लोक थोडेच असत. गांजा, भांग, मद्य इत्यादिकांचीं व्यसनें त्यांच्यांत बोकाळलेलीं असत. ठिकठिकाणीं कंपन्या हिंडत असल्यामुळें तीन तीन वर्षेपर्यंत नटांना घर पारखें होई; त्यामुळें वागणुकींत धरबंद नसे. कंपन्यांचीं बिऱ्हाडें भुताटकीमुळें ओसाड पडलेल्या वाड्यांत, धर्मशाळेंत अगर देवळांत असल्यामुळें नाटकवाले समाजापासून दूर रहात व घरंदाज लोकहि त्यांच्यापासून फटकून वागत. उच्छृंखल मनाच्या अप्रबुद्ध अशा कित्येक बायकाहि नाटकवाल्यांच्या नादीं लागून पळून जात. अशा अनेक कारणानें समाजाच्या तिरस्काराला नाटकवाला पात्र झालेला होता. हा तिरस्कार कमी होण्यास किर्लोस्कर कंपनीच्या कारकीर्दीला आरंभ झाल्यापासून सुरवात झाली. कारण ही कंपनी म्हणजे एक महाराष्ट्रांतील राष्ट्रीय संस्था समजली जात असे. याचें कारण अण्णासाहेबांच्या मित्रमंडळींत मोठाले ऑफिसर, समाजांतल्या श्रेष्ठ दर्जाचे प्रतिष्ठित लोक यांचा भरणा असे. त्यामुळें मानसिक घाण अजून पूर्ण कमी झाली नव्हती तरी नामशेष होण्याच्या मार्गास लागली होती. याबद्दलचा माझा एक अनुभव सांगतों. किर्लोस्कर मंडळींत मी गेल्यानंतर एकदां पुण्यास कंपनी असतांना मी लहानपणीं ज्या गोळे यांच्याकडे जेवायला जात असें त्या गोळ्यांच्या

घरीं गेलों. माझी भेट झाल्यावर गोळे मंडळींनीं माझ्याबद्दल कसलाहि तिरस्कार दाखविला नाहीं. कंपनीबद्दल, नाटकाबद्दल, माझ्या कामाबद्दल मला हकीगती विचारल्या. मी त्या रंगांत येऊन सांगत होतों. तोंच अण्णासाहेब गोळे अचानक येऊन माझ्यामागें उभे राहिले. त्यांना पहातांच मी पळ काढण्यास प्रवृत्त झालों. पण अण्णासाहेब गोळे यांनीं " अरे गणपती, बैस, बैस. नाटकांत गेला असलास तरी तूं किर्लोस्करांच्या कंपनींत आहेस. कांहीं हरकत नाहीं. नाटक कंपनी असली तरी ती किर्लोस्कर कंपनी आहे. " असें हंसून म्हणून किर्लोस्कर कंपनीबद्दल असलेला आपला आदर त्यांनीं व्यक्त केला.

नाटक कंपन्यांबद्दल पूर्ण तिरस्कार समाजांत असे, याची जाणीव मला होती. ती माझ्या प्रत्ययालाहि येत असे. त्याचें एक ठळक उदाहरण देतों. सांगोल्याचे बालपणचे माझे मास्तर मला आपली मुलगी देणार होते. मी कंपनींत पळून गेल्यानंतर ते एकदां पुण्यास आले असतांना जोगेश्वरीच्या बोळांत त्यांची माझी समोरासमोर अचानक गांठ पडण्याचा योग आला. मला पहातांच " काय गणा, काय प्रकार चालवला आहेस ? " असा करडा आवाज माझ्या कानीं आला. मी उत्तर न देतां एकदम वळून धूम ठोकली. बोळाबोळांतून धावत एकदम थांबलों तों अंबरखान्याजवळ. त्याच मास्तरांनीं आमच्या बिऱ्हाडीं जाऊन आईची भेट घेतली व तिला माझ्या वडिलांच्याजवळ त्यांनीं दिलेल्या वचनाची आठवण दिली. त्यांचा हेतु जाणून मास्तरांना माझ्या आईनें वचनमुक्त केलें. हा परिपाक त्या वेळच्या समाजस्थितीचा निदर्शकच नव्हे काय ?

अशा स्थितींत माझ्या आईला माझें लग्न व्हावें असें वाटे. मलाहि वाटत नव्हतें का ? पण माझी स्थिति मी जाणत होतों. त्यांतहि माझ्या लग्नाविषयीं भाषा सुरू असेच; त्या बाबतींत ज्या कांहीं गंमती जमती मला अनुभवाव्या लागल्या त्या खालीं थोड्याबहुत देतों.

१९०० सालीं एक गृहस्थ दोहोंकडचा खर्च करून मला आपली मुलगी देऊन पिवळा करणार होते. आईच्या अत्याग्रहावरून मी वधू

पाहिली. ती वधू पहातांच त्यानंतर तीन दिवस मी घराकडे जाण्याचेंच टाळलें. यावरून माझी भावी वधू कसल्या चेहेऱ्यामोहऱ्याची, रंगारूपाची असेल आणि तिच्या वडिलांनीं आपल्या मुलीसाठीं माझी शिकार करण्याचें कां ठरविलें असेल, याची सहज कल्पना येईल.

मी खोकल्यानें आजारी असतांना आपली मुलगी मला देऊं इच्छिणारे मला पहायला आले; पण माझा खोकला पाहून ते जे गेले ते पुनः परत आलेच नाहींत. त्यांच्या परत न येण्यांतली खरी गोष्ट हीच कीं नवरदेव नाटकवाला. नाटकवाल्याला आपली मुलगी देणें म्हणजे आपण होऊन अनुलोमप्रतिलोम विवाहासारखा पचप्रसंग आपल्यावर ओढवून घेणें असेंच लोकांना वाटत असे.

मला पंचवीस रुपये पगार झाल्यानंतरची गोष्ट आहे. एका सद्गृहस्थांनीं आपली मुलगी माझ्या दृष्टीस पडावी व आपल्या घरच्या मंडळींच्या नजरेंत मलाहि घालावें याकरितां घरीं बोलावून नेलें. पहाण्याचा विधि आटोपला. माझ्या पगाराची चौकशी झाली. मी पंचवीस रुपये पगार आहे असें सांगतांना पंचवीस या शब्दावर ठासून जोर दिला. हेतु हा कीं पंचवीस रुपये पगार म्हणजे कांहीं सामान्य गोष्ट नव्हे. त्यापुढें मी कंपनींत काय काम करितों ही विचारणा झाली. मी पार्ट करितों हें माझें उत्तर ऐकल्यानंतर वधूपिते घाईघाईनें "ठीक आहे. उद्यां काय तें कळवितों" म्हणाले. त्यांचा तो उच्चार, मुद्राविर्भाव, मनाची धांदल इत्यादि प्रकार माझ्या सूक्ष्म नजरेंतून सुटले नाहींत. तेव्हांपासून त्या गृहस्थांची वाट मी रोज पाही; परंतु त्या वेळींच काय पण आतांपर्यंतसुद्धां त्यांनीं मला आपलें तोंड दाखविलें नाहीं.

त्यानंतर मात्र मी ठरवून टाकलें होतें कीं "कुई नवरदेव है" असें कुणी आपल्याला पुकारलेंच तर कोर्टापुढल्या ठराविक जबानीप्रमाणें नांव, वय, पगार, गोत्र, घरचीं माणसें, स्थावर इष्टेट, धंदा ही सर्व माहिती एकदम भडाभड सांगून टाकायची; पण तसा प्रसंग पुनः माझ्यावर आलाच नाहीं.

मला पंचवीस रुपये पगार होण्यापूर्वी माझ्या लग्नाविषयीं माझी आई रंजीस होऊन कळवळून मला लग्नाबद्दल विचारी. तेव्हां तिच्या व माझ्यामध्यें पुढीलप्रमाणें बहुधा भाषण होई.

आई–( कळवळून ) बाबू, तुझें चांगलें झालेलें पाहून माझे डोळे निवायची मला आशाच नाहीं का?

मी–कां नाहीं? पण सध्यां मला बारा रुपये पगार आहे. कंपनी बंद असल्यामुळें तोहि आहे म्हणण्यापलिकडे कांहीं नाहीं. तेव्हां मी लग्न करून घेण्यास तयार होण्यापूर्वी आपल्याला दोन तरतूदी करायला पाहिजेत.

आई–( मी लग्नास तयार होत आहें असें मानून अधीऱ्या आनंदानें ) कोणत्या त्या तरतुदी बाबा?

मी–सकाळीं कोरान्न मागणें व दुपारीं मधुकरीची झोळी फिरविणें या त्या दोन तरतुदी, त्याशिवाय निर्वाहाचें साधन काय आहे?

आई–( चिडून निराशेनें ) मग तूं कधींच लग्न करणार नाहींस का बाबू?

मी–( खऱ्या भावानें ) तें कां? ज्या दिवशीं पंचवीस रुपये पगार मला होईल त्या दिवशीं मी अवश्य लग्न करीन. तोंपर्यंत मात्र नाहीं.

आई–बरें आहे. तुझी इच्छा.

## वरचेवर सलकडीं वाजवित असें

यापुढें मला पंचवीस रुपये पगार झाला तरीहि मी म्हणेपर्यंत माझ्या आईनें माझ्या लग्नाची गोष्ट काढिली नाहीं. पंचवीस रुपये पगार झाल्याला एक वर्ष होऊन गेलें होतें. थेंबे थेंबे तळें सांचे याप्रमाणें सोळा रुपये पगार व कंपनींत कारकुनी करून पगाराशिवाय ४० चाळीस रुपये जादा मिळविले होते ते, या सर्व मिळकतींतून मिळून माझ्या लग्नाची तरतूद म्हणून सुमारें तीनशें रुपये जमविले होते. त्या तीनशें रुपयांचें बारा तोळे सोनें खरेदी करून हौस म्हणून त्याची सलकडीं केलीं आणि हातांत घातलीं. संग्रह करणें, जमाखर्च स्वतःच डायरींत व्यवस्थित ठेवणें याची संवय काशिनाथपंत परचुरे यांच्या शिकवणुकीमुळें

१८९८ सालापासूनच माझ्यांत मुरली होती. सलकडीं हातांत घातलीं त्या दिवशीं मला अवर्णनीय आनंद झाला. माझ्या सलकड्यांकडे प्रत्ये-काचें लक्ष्य जावें म्हणून मी कारण नसतांना वरचेवर सलकडीं वाजवी. रस्त्यानें जातांना शर्टच्या बाहेर तीं मुद्दाम दिसतील असें करीं. नवी आंगठी, नवें घड्याळ, नवा कोट, कोणतीहि नवी वस्तू दुसऱ्याच्या डोळ्यांत भरविण्याकरितां लोकांची धडपड चालते, अनेक चाळे ते कर-तात, हें पुष्कळांना माहीत आहेच. तशाच प्रकारचें माझें सलकड्यांचें प्रदर्शन असे. त्या वेळची आठवण झाली म्हणजे मला आतां हंसूं येतें.

जी वस्तु अगर जो माल मिळेल अशी स्वप्नांतसुद्धां आपल्याला कल्पना नसते, त्याची खरोखरच प्राप्ति झाल्यानंतर मनुष्यमात्राची अशीच कांहीं तरी स्थिति होत असली पाहिजे. आतां ज्या परिस्थितींत जो जसा असेल त्यानुरूप त्याचा आनंद व चाळा, उच्छृंखळ, उघड, थोडा उघड, गंभीर मुद्रेच्या दडपणाखालीं झांकलेले असतील इतकेंच. मला झालेला आनंद व मी केलेले चाळे स्पष्ट लिहिले इतकेंच !

माझ्या सलकडीप्रदर्शनाच्या चाळ्यांचें प्रदर्शन मी मानापमान नाटकांत लक्ष्मीधराची भूमिका करताना झालें. त्या चाळ्यांचा ठसा लक्ष्मी-धराच्या भूमिकेंत मला सहज वठवितां आला.

## मी दगड आहें.

जळगांवच्या मुक्कामीं सुमती नाटकाचे कर्ते शंकरराव कुलकर्णी व त्या नाटकाच्या तालमी घेण्यास शंकररावांनीं नियुक्त केलेले नाट्यशिक्षक श्री. पाटकर दाखल झाले. पाटकरांच्या नाट्यशिक्षणात मला कांहींच वैशिष्ट्य वाटलें नाहीं. भाषेचें स्वारस्य त्यांना कमीच होतें असें माझ्या अनुभवास आलें. आपण देवलमास्तरांच्यापेक्षां नाट्यशिक्षक या नात्यानें जास्त श्रेष्ठ आहोंत असें किर्लोस्कर मंडळींतल्या नटांना वाटावें अशी पाटकरांची इच्छा असे. पण देवलमास्तर ते देवलमास्तर आणि पाटकर ते पाटकर. किर्लोस्कर मंडळीची शिस्त मोडूं नये म्हणून पाटकरांचें शिक्षण मी निमूटपणें घेत असें. त्याचें शिक्षण माझ्या कामांत त्यांना दिसेना, त्यावरून त्यांनीं मला एकदां त्याबद्दल विचारिलें. मी दगड आहें;

माझ्यांत ज्ञान शिरत नाहीं असें त्यांना म्हटलें. पण एकदां मौज म्हणून एक स्वागत भाषण त्यांच्या शिकवण्याच्या पद्धतीप्रमाणें सहज करून दाखविलें. तेव्हां ते एकदम खूष झाले. आणि "काय रे गणू, माझ्याइतकें शिक्षण तुम्हाला कुणी दिलें का? खरें सांग." असें त्यांनीं विचारिलें. त्यावर त्याना आवडणार नाहीं हें मला ठाऊक असूनहि खरें सांगावें लागलें. त्यानंतर ते माझ्या भानगडींत पडले नाहींत. ते विलक्षण थापेबाज होते. ते इतके कीं त्यांना चालू काळाच्या बातारामाचे अस्सल पूर्वज म्हणतां येईल. बाकी त्यांच्या थापा निरुपद्रवी असत. ते हरहुन्नरी मात्र होते. त्यांना वाचनाचें वेड होतें. फोटोग्राफी, चित्रकला, टेलिपथी वगैरे हुन्नराच्या गोष्टी ते पुष्कळ सांगत. वाचन चांगलें असल्यामुळें थाप मिसळलेल्या बाता असल्या तरी त्यांच्याकडून कांहीं नवी माहितीहि आम्हाला मिळे. नाटयशिक्षणापेक्षां त्यांच्याकडून मी कांहीं मिळविलें असेल तर फोटोग्राफीचें शिक्षण व त्यांनीं सांगितलेल्या माहितीवरून How to make up या नांवाचें रंगरचनेसंबंधीचें इंग्रजी पुस्तक जुन्या बाजारांतून आणलें. त्यांत असलेली माहिती. सदर पुस्तक इंग्रजींत व इंग्रजी भाषेला मी पारखा, म्हणून डॉ. मोरेश्वर त्र्यंबक साठे यांजकडून त्या पुस्तकाचें मराठीकरण करून घेतलें. शंकरराव पाटकर यांच्याजवळ ग्रीज पेंट्सची Make up box मी पहिल्यांदाच पाहिली.

आमची कंपनी धुळें, नाशिक, मिरज, कोल्हापूर करून साताऱ्यास गेली. साताऱ्यास सुमती नाटकाचा पहिला प्रयोग झाला. प्रयोग सुमार झाला.

## तपश्चर्येचें फळ.

१९०४ सालात आमच्या कपनींत बऱ्याच घडामोडी झाल्या.

१९०३ सालीं गोरे व डवरी यांनीं कंपनींतून फुटून जाण्याचा बेत केला तो त्या वेळीं फसला होता. पण १९०४ सालीं तो यशस्वी झाला. स्वदेश हितचिंतक मंडळीबरोबर वाटाघाट करून गोरे यांनीं किर्लोस्कर कंपनीला जाणार अशी नोटीस दिली. कंपनींत खळबळ उडाली. गोरे गेल्यानंतर शापसंभ्रमाचा प्रयोग झाला. त्यांत चिंतोबा गुरव यांनीं

आपली महाश्वेतेची हातखंडा भूमिका केली. चंद्रापीडाचें काम देवल-मास्तरांच्या आज्ञेनें मी केलें. पूर्वी आजारी भाऊरावांच्या शुश्रुषेंत असतांना मी चंद्रापीडाची भूमिका स्वतःशींच घटवीत असें. त्या अभ्यासाचें चांगलें फळ या वेळीं मला मिळालें. कंपनींतील एका भल्या गृहस्थानें हेटाळणीनें मला एके वेळीं " चंद्रापीडाचें काम करण्याची वेळ कधीं काळीं तुला येईल असें वाटतें काय ? " असें म्हटलें होतें. सुदैवानें ती वेळ आली. मी तें काम केलें आणि त्या भल्या गृहस्थास " चंद्रापीडाचें काम मी केलें बरें का " असें साभिमान सांगायला कचरलों नाहीं.

## स्वदेश हितचिंतक नाटक मंडळी

जनूभाऊ निमकर बंधू, गणपतराव लळीत यांनीं भागीदारींत सदर कंपनी १८९४ मध्यें काढिली होती. ही किर्लोस्करांच्याच संगीत नाटकांबरोबर कांहीं गद्य नाटकें करी. १९०० अखेरपर्यंत कंपनीची स्थिति कुचरोटी कुचलंगोटी अशीच होती, पण पुढें शारदा नाटक त्यांना मिळालें. जनूभाऊ निमकर पूर्वी १।२ वर्षे किर्लोस्करमध्यें होते. हे गृहस्थ बुद्धिमान् पण स्वभाव खेकड्याच्या चालीचा. कंपनींत त्यांचा वचक चांगला. तोंडांत मध व पोटांत विष हें त्यांच्या वर्तनातील सूत्र. जनूभाऊंनीं किर्लोस्कर कंपनीबरोबर स्पर्धा मांडली. पण त्यांत त्यांना कधींच यश आलें नाहीं. किर्लोस्कराशीं टक्कर देण्याकरितां संगीत, गद्य व संस्कृत शाकुंतल याचेसुद्धां प्रयोग केले.

जनूभाऊंचें हें कृत्य म्हणजे आपलें नाक कापून दुसऱ्याला अप-शकून करण्यासारखेंच होतें. ते उत्तम व्यवहारी, दक्ष मालक व वेळेचा उत्तम उपयोग करून घेणारे होते, यांत मात्र शंका नाहीं. त्यांच्याकडे जीं माणसें होतीं त्यांच्या गुणाच्या मानानें त्या कंपनीचीं नाटकें ठीकठाक होत असत. तालमी घेण्यांत जनूभाऊंची कधींच कसूर नसे. केशव भोसले या लहान मुलास ( पुढें प्रसिद्धीस आलेले केशवराव भोसले ) जनूभाऊंनीं १९०२ मध्यें शारदेची भूमिका दिली. तेव्हांपासून त्यांच्या कंपनीवर लक्ष्मीची कृपा होऊं लागली. त्या वेळीं केशव १०।११ वर्षांचा होता. शारदा परकऱ्या मुलीप्रमाणें दिसे. पण केशवाच्या गाण्यावर लोक खूष

असत. पुढें जनूभाऊंनीं धोरणानें आमच्या कंपनींतून गेलेला गोरे यास भागीदार करून केशव व गोरे या उत्तम गाणाऱ्या नायकनायिकेच्या जोडीवर कंपनीचा चांगला उत्कर्ष साधला. धंद्याच्या दृष्टीनें जनूभाऊंनीं योग्य तीच गोष्ट केली. पण याचमुळें किर्लोस्कर कंपनी व स्वदेश हित-चिंतक मंडळी यांच्यामध्यें पक्कें वितुष्ट आलें. धंदेवाल्यांनीं आपल्या धंद्याला जागरूक राहून चांगलीं माणसें गोळा करणें यांत गैरशिस्त कांहींच नाहीं. शिवाय किर्लोस्कर कंपनीवर रुष्ट झालेला गोरे याला जनूभाऊंनीं संधि साधून मिळविलें यांत वैरापेक्षां आपला धंदाच संपन्न केला असें म्हटलें पाहिजे. धंदा म्हटला म्हणजे त्याच्या बळकटीसाठीं चांगल्या माणसांचा संग्रह करणें हेंच त्याचें खरें रहस्य. आपल्यांतून माणसें जाऊं नयेत, आपल्या न्याय्य वर्तनानें मंडळींना आपल्यांतच रहावेंसें वाटावें, मंडळी निघून जातात त्यांत आपली चूक आहे काय? त्यांना आपणाकडून कांहीं कारण झालें आहे काय? पगार वेळच्या वेळीं देण्यांत अगर योग्य वेळीं प्रमोशन देण्यांत आपणच दक्षता दाखविली आहे कीं नाहीं याबद्दल मालकांनीं स्वतःच्याच कृतीबद्दल छाननी करून घ्यावी व मग जाणाराला बोल लावावा किंवा स्वतःचा दोष कबूल करावा अशी खबरदारी नाटक-मंडळींच्या मालकांनींच बाळगायला नको काय?

## कर्तबगारीला गुणांची जोड

१९०७ सालीं जनूभाऊंनीं स्वतःचा भाग एका आण्याची किंमत सत्राशें रुपये या भावांत कंपनींतील नटांना विकला. इतर भागीदारांकडून जनूभाऊंनीं भागविक्रीचे पैसे घेतले हें योग्यच केलें. पण केशवराव भोसले-यांजकडूनहि पैसे घेतले ती मात्र चूक होय. जनूभाऊ कर्तबगार होते तरीहि त्यांना केशवरावांच्या गुणाची जोड मिळाली म्हणूनच त्यांची कंपनी भर-भराटीला आली. जनूभाऊंचें भाग्य केशवरावामुळें उदयाला आलें हें अगदीं खरें आहे. आणि म्हणूनच वाटतें कीं ज्या केशवरावाला जनू-भाऊंनीं पुत्रवत् मानतों असें भासविलें त्याच्याकडून पैसे न घेतां त्याच्या-पुरता भाग खाऊ म्हणून बक्षिस द्यावयास पाहिजे होता, पण अशी उदार, न्याय्य, कृतज्ञबुद्धि, कोणीहि आजपर्यंत दाखविलेली नाहीं.

१९०७ सालीं केशवराव भोसले स्वदेश हितचिंतक मंडळीमधून बाहेर पडले. त्यानंतर जनूभाऊंनीं श्री. भा. वि. वरेरकर यांना हाताशीं धरून त्यांची कुंजविहारी, संजीवनी हीं नाटकें रंगभूमीवर आणिलीं. मालकी सोडली तरी जनूभाऊ कंपनींत पूर्ण सत्ताधारी होते. १९१२ सालीं अनेक आपत्ति विपत्ति येऊन ही कंपनी कालाच्या उदरांत कायमची गडप झाली.

## माझें लग्न

१९०५ सालीं आमची कंपनी बेळगांवास असतां माझें लग्न जमलें. कंपनीला उत्पन्न जेमतेम होत होतें, पण माझ्या लग्नाला पैसे हवे होते. कंपनीकडे मी मागणी केली. शंकरराव कांकूं करूं लागले. परंतु जोगळेकरांनीं पैशाची व्यवस्था केली. ठाणें येथें माझें लग्न झालें. पत्नीचें नांव सत्यभामा असें ठेविलें. लग्नसमारंभ उरकून मी बेळगांवला आलों. कंपनींतून गोरे गेल्यामुळें पात्रांत बदलाबदल होणें क्रमप्राप्त झालें.

## अध्यापनाचा ओनामा

देवलमास्तरांच्या प्रोत्साहनानें १९१६ सालापासूनच कंपनींतील लहान मुलांना व नवीन नवीन येणारांनाहि मी नाट्याभिनयाचें थोडें थोडें शिक्षण हौसेनें देऊं लागलों होतों. देवलमास्तरांचें सांगणें असे, कीं आपलें स्वतःचें काम बसवितांना आपल्यांत खरी सुधारणा व्हायची असेल तर आपल्यापेक्षां लहान अगर नवीन येणाऱ्या माणसांना आपण शिकवूं लागावें म्हणजे समजावून देण्याची जबाबदारी आपसुकच आपणावर पडते; आणि आपण शिकविलेलें कसें काय वठतें हें पाहावयाला मिळून झालेली चूक सुधारतां येते. १९०५ सालीं मी होऊनच कांहीं मंडळींना शिक्षण द्यायला प्रारंभ केला. कृष्णा कोल्हापुरे, रघुनाथ गोखले, गणपत कडु, गुंडू वालावलकर यांना शिकवूं लागलों.

## "फुल्ल" एकल्याबरोबर "फूल" झाले

शंकरराव पाटकर यांच्याजवळ आम्ही फोटोग्राफीची कला शिकलों त्याचा उपयोग जोड धंद्यासारखा करावा म्हणून मी, चिंतोबा व दादा

लाडू मिळून फोटोग्राफीचा धंदा आरंभला. काम बेताबाताचेंच होई. पण रविवर्म्यांच्या चित्राचें कॉपिंग करून कार्डसाईज फोटो काढून विकूं लागलों. त्या वेळची एक मौज आठवते ती गमतीनें येथें देतों.

आम्ही क्रिकेटहि जोरांत खेळत असूं. बेळगांवला एक मॅच दिली. विरुद्ध बाजूचा पराजय केला. मी व कृष्णा कोल्हापुरे बोलर होतो. कृष्णा लहान, पण बोलिंग चांगलें करी. त्याबद्दल विरुद्ध बाजूच्या खेळाडूंनीं एक बॉल व क्रिकेटच्या खेळावरील एक पुस्तक बक्षिस दिलें. क्रिकेटची मॅच संपल्यानंतर आम्हाला ओळखीकरितां नावें विचारलीं. त्यांत पांडोबा गुरवास What is your full name? विचारतां पांडोबांनीं फुल्ल शब्द ऐकल्याबरोबर "फूल" होऊन उत्तराची सरबत्ती सुरूं केली. ते म्हणाले, "फुल साईज चार रुपये, हाफ साईज दोन रुपये, कार्ड साईज एक रुपया."

पांडोबाचें उत्तर ऐकतांच मंडळींत एकच हंशा पिकला. पांडोबांना मात्र आपली चूक फार उशीरा कळून आली.

## नाटकांत येशील तर मौज करशील

आमची कंपनी मिरजेस असतांना एके दिवशीं संध्याकाळच्या गाडीनें श्रीशाहूमहाराजांनीं डॉ. गाडगीळ यांच्याबरोबर बालगंधर्वास डॉ. व्हेलसाहेब यांच्याकडे त्याच्या कानावर उपचार करण्यासाठीं पाठवून दिलें. नारायण (बालगंधर्व) यापूर्वी म्हणजे १९०३ मध्यें आमच्या नाशिकच्या मुक्कामीं जळगांवच्या म्हाळस वकिलांबरोबर कंपनींत येऊन गाऊन गेला होता. त्या वेळीं त्याचा आवाज फुटून अगदीं बद्द झालेला असला तरी त्याच्या गाण्यांतली लटक झाकलेली नव्हती. पुढें १९०४ च्या च्या मार्चमध्यें आमची कंपनी जळगांवीं असतांना नारायणानें आमची नाटकें पाहिलीं होतीं. नारायणाचा शाळेंतला अभ्यास कसा असे याची कल्पना त्याच्या सहवासांत असणारांना असणार. पण तो गाण्यांचा नादी व स्वतः उत्तम गाणारा. तेव्हां तो नाटकाच्या वेळीं थिएटरच्या आसपास घोटाळत असल्यास नवल काय? त्याची गाण्याची आवड लक्षांत घेऊन

त्याचे आप्त आबासाहेब म्हाळस यांनीं त्याला गाणें शिकविण्यासाठीं महबूबखान नांवाच्या गवयाला शिकवणी दिली होती. नारायण जात्याच सुरेल व रंगदार ढंगदार असल्यामुळें त्यानें रागदारीची थोडीशी माहिती सदर गवयापासून उचलली. गाण्याच्या बाबतींत जें म्हणून गोड वाटेल तें ग्रहण करण्याची त्याला आवड. ती आवड पुढें तो कंपनींत आल्या-वरहि दिसून येत असे. १९०५ सालीं कोल्हापुरास आप्पयाबुवा नांवाच्या गवयाकडून गाणें शिकण्यास नारायण येऊन राहिला. त्या वेळीं श्रीशाहू महाराजांनीं त्याचें गाणें ऐकून व त्यांना किर्लोस्कर संगीत कंपनी आपली आहे असें वाटत होतें म्हणून नारायण किर्लोस्कर कंपनीस द्यावा अशा योजनेनें त्याला महाराजांनीं कंपनीकडे पाठवून दिलें होतें.

मिरजेस रात्रीचीं जेवणें वगैरे झाल्यावर देवलमास्तरादि कंपनींतील मंडळीसमोर नारायणाचें गाणें झालें. सरासरी खुर्च्यांच्या पलीकडे नारायणाचें गाणें ऐकूं जाणार नाहीं असें वाटलें. पण गाण्याची पद्धत सुंदर व ढंगदार, तालसुरांत पक्की, अशीच वाटली. देवलमास्तर खूष झाले आणि त्यांच्याच सूचनेवरून नारायणाला नाटकांत आणण्यासाठीं प्रयत्न करायच्या मार्गाला आम्ही लागलों.

कंपनींत १।२ दिवस नारायण रमला, हें ओळखून त्याच्यावर नाटकी मोहिनी घालायला आम्ही सुरवात केली. त्यांत प्रामुख्यानें मी भाग घेतला. त्याला गोड शब्दांत "नारायण, गाणें शिकून तूं काय करणार आहेस? आतांच्या काळांत गवयाला तेजी राहिलेली नाहीं. परमे-श्वरानें स्त्रीभूमिकेला योग्य असेंच तुला स्वरूप दिलें आहे. नाटकांत येशील तर मौज करशील. पहा. एखादी लहानशी नक्कल तर पाठ कर. तुझ्या प्रवेशापुरती आपण रंगभूमीवर खासगी तालीम करून पाहूं या. त्यांत तुला जर आनंद वाटला तरच तूं नाटकांत ये. नाहीं तर सोडून दे." इत्यादि लाघवी शब्दांत सुचवूं लागलों. तो सहज तयार झाला. शारदा नाटकांतील नटीची नक्कल त्याला पाठ करायला लावली. ती नक्कल मी त्याला शिकविली. नंतर एका रात्रीं मी त्याला रंगवून उत्तम सजविला आणि थिएटरचीं दारें बंद करून देवलमास्तर, कंपनींतील

मंडळी, मिरजेचें अधिकारी मंडळ यापुढें नारायणाची नटीची रंगी तालीम झाली. सर्वांनाच ती पसंत पडली. नारायणाची आई आली होती. आम्ही तिला सर्व समजावून सांगितलें. तिनें घरच्या मंडळींना वळवून अनुमति मिळविण्यासाठीं जळगांव, मालेगांवकडे प्रयाण केलें. पुढें नारायण कंपनींत येऊन त्याच्या कामाची तयारी होईपर्यंत कंपनीला सुट्टी द्यायची असें देवलमास्तरांनीं सांगितलें. सुट्टीची योजना शंकररावांखेरीज सर्वांना मानवली व कंपनीला सुट्टी मिळाली. देवलमास्तरांच्या वरचष्म्याबद्दल शंकररावांना वैषम्य वाटून ते पुण्यास चालते झाले. ते कंपनी सोडणार अशाहि बातम्या उठल्या. देवलमास्तर मिरजेस ठाण मांडून जोगळेकर व कांहीं मुलें यांच्या तालमी घेऊं लागले. त्यांच्यासमोर बसून मुलांना तालमी देण्याचें काम मीहि करूं लागलों. त्या सुट्टींतच मी पुण्यास जाऊन तेथून सहकुटुंब माझे मावसबंधु कृष्णराव परांजपे यांच्याकडे बिन्यास रवाना झालों. दिवाळीपर्यंतचे सुट्टीचे दिवस मी बिन्यासच काढिले.

## तोंडाला टाका घाल

मधल्या काळांत जोगळेकरांनीं पुण्यास जाऊन शंकररावांची समजावणी केली. ते परत येण्यास कबूल झाले. मला परत येण्याबद्दल जोगळेकरांचें पत्र आलें. त्यांत माझ्या तोंडाला टाका घालण्याबद्दल त्यांनीं मला सुचविलें होतें. मी मुंबईस येतांच आमच्या सदूकाकांनीं कोंकणांत मला पुनः धाडिलें.

## कंपनींत पुन्हां पाऊल घालणार नाहीं

अश्विन वद्य द्वादशी म्हणजे गुरुद्वादशी या शुभमुहूर्तावर नारायण कंपनींत आला. मी सुट्टी संपवून तुळशीच्या लग्नाच्या दिवशीं कंपनींत आलों. त्या वेळीं ताप, खरूज या आजारांनीं मला पछाडलें. नारायणास शकुंतलेची भूमिका शिकवूं लागले. शिकवितांना बायकांसारखा पदर कसा सांवरावा हें शिकवित असतांना उपरण्याचा उपयोग करीत असत. पदर सांवरण्याचा अभ्यास त्या वेळीं आवश्यक असे. अलीकडे पदराला पिना लावण्याचा प्रघात पडल्यामुळें बायकांना पदर सावरण्याचें कारणच पडत नाहीं. त्यामुळें गेल्या दहा पंधरा वर्षांपासून स्त्रीभूमिका करणाऱ्या

नवीन नटांनाहि पदराच्या शिक्षणाची आवश्यकता उरली नाहीं. आतां तर स्त्रियांच्या भूमिका स्त्रियांनींच करण्याची प्रथा पडल्यामुळें तें शिकविण्याची जरूरी पडत नाहीं.

या वेळीं देवलमास्तरांनीं कंपनींतील शंकररावांच्या अनिर्बंध सर्वाधिकारी सत्तेवर बंधन घालण्याच्या हेतूनें एक खलिता तयार करून चालकांच्या हातीं दिला. खलित्यांत कंपनींतील कोणत्याहि गोष्टींत अखेरचा शब्द देवलमास्तरांचाच राहिला पाहिजे अशा तऱ्हेची मुख्य अट होती. या खलित्यामुळें कंपनीच्या चालकांत बरीच खळबळ उडाली. आम्हा इतर मंडळींतहि सदर खलित्यावर बरीच चर्चा झाली. देवलमास्तरांच्या या खलित्याला मान्यता देणें म्हणजे शंकररावांच्या रंगभूमि मासिक काढण्याच्या व थिएटर बांधण्याच्या महत्त्वाकांक्षांना तिलांजली मिळण्यासारखें होतें. अर्थात् शंकररावांनीं जोराचा विरोध केला. जोगळेकरांना देवलमास्तर व शंकरराव हे दोघेहि पाहिजे होते. देवलमास्तरांकडे माझा पूर्ण ओढा असला तरी त्यांनीं नाटकाच्या विषयाखेरीज कंपनीच्या इतर भानगडींत पडूं नये असें माझें मत होतें. त्या मताला परचुरे, चिंतोबा यांचा पाठिंबा होता. शेवटीं शंकरराव व देवलमास्तर यांच्यांत खडाजंगी उडून त्यांत देवलमास्तरांना "आपण किर्लोस्कर कंपनींत पुन्हां पाऊल घालणार नाहीं." अशी प्रतिज्ञा करून कंपनींतून पाय बाहेर काढण्याची पाळी आली. बाकी त्या वेळीं देवलमास्तरांचें म्हणणें कंपनीनें मान्य केलें असतें तर पुढें कंपनीच्या नाशास कारणीभूत झालेलें थिएटरकर्ज झालें नसतें व कंपनीचीं शकलेंहि झालीं नसतीं. परंतु—परंतु—

देवलमास्तर निघून गेल्यामुळें नारायणाला नाट्यशिक्षण देण्याचें काम माझ्याकडे आलें. नारायणाशीं खेळीमेळीनें वागत मी शिक्षण देत होतों. माझ्याजवळ शिकण्यांत त्यालाहि आनंद वाटूं लागला. नारायणाचें वय तेव्हां अठरा वर्षांचें होतें.

## किर्लोस्कर कंपनीचा रौप्यमहोत्सव

किर्लोस्कर कंपनी स्थापन होऊन पंचवीस वर्षें झालीं त्याबद्दल कंपनीचा रौप्यमहोत्सव करण्याची कल्पना शंकरराव मुजुमदार यांनीं काढिली.

त्याबद्दल शंकररावांच्या कल्पकतेचें कौतुक झालें. हा रौप्यमहोत्सव पुण्यास करायचें ठरवून कंपनी पुण्यास रवाना झाली.

बालगंधर्व किर्लोस्कर कंपनींत आल्याची प्रसिद्धी अगोदरपासून झाली. त्यामुळें बालगंधर्वास पाहण्याची पुण्यांतील प्रेक्षकांची उत्कंठा वाढली असल्यास नवल नाहीं. कंपनीनें पहिला प्रयोग गुप्तमंजूष लाविला. त्या प्रयोगाच्या आदल्या दिवशीं नारायणाच्या मामानें एक चमत्कार केला. मामा नारायणाला आपल्याबरोबर घेऊन घरीं जाऊं लागला. वाटेंत नारायणाला आपल्या मामाबद्दल कांहीं संशय येऊन त्यानें पुढें जाण्याचें नाकारिलें. तेव्हां मामानें त्याचें मनगट जोरानें पकडून जवळ-जवळ ओढीतच त्याला घरीं नेलें. कंपनींतला एक गृहस्थ नारायणाच्या पाठोपाठ पाठविण्यांत आला होताच; त्यानें मामाभाचांतील वाटेंत झालेली लढत कंपनींत येऊन कळविली. नारायणाशिवाय दुसऱ्या दिवसाच्या गुप्तमंजूष प्रयोगाचा विचका उडणार अशी धास्ती सर्वांनाच वाटली. जोगळेकर, शंकररावांसह नारायणाच्या मामाकडे तात्काल गेले आणि त्यांनीं सर्व प्रकारें मामाची समजूत केली. नारायणाचें लग्न आम्ही करून देऊं असें कबूल केलें आणि नारायणाला परत कंपनींत आणिला. गुप्त-मंजूषमध्यें नंदिनीच्या भूमिकेंत गंधर्वाला पहातांच प्रेक्षकांनीं टाळ्या वाजवून नारायणाचें स्वागत केलें.

पुढें शाकुंतलमध्यें शकुंतला, शारदेंत नटी, सुमतीमध्यें चंपा, चंद्र-हासांत विषया या भूमिका नारायणाकडे गेल्या. मूकनायक व सौभद्र हीं नाटकें पुण्यास पुनः बसविलीं. त्यांत नारायणाला सरोजिनी व सुभद्रा या भूमिका शिकविल्या. सौभद्र नाटकाच्या तालमी चालू असतांना पुण्याच्या मुक्कामीं डोळ्याच्या उपचारासाठीं मोरोबा कंपनींत येऊन राहिले होते. कंपनीचा रौप्यमहोत्सव होणार आहे हें ऐकून मोरोबांना फार आनंद वाटला. मोठ्या थाटानें रौप्यमहोत्सव गाजला. किर्लोस्कर कंपनींतील नटांच्या माहितीचें पुस्तक महोत्सवप्रसंगीं प्रसिद्ध झालें. त्यांत ज्या ज्या नटांचे फोटो आले ती ती मंडळी हरखून गेली.

# माझी सौभद्रमधील कृष्णाची यशस्वी भूमिका

सौभद्रमधील कृष्णाचें काम ऐन वेळीं करण्याचें माझ्याकडे रबकवीच्या मुक्कामीं आलें. त्या क्षणापासून कृष्णाचें काम उत्तम प्रकारानें अभ्यास करून बसविण्याचा निश्चय मी केला. लगेच मेहेनतीस लागलों. कृष्णाचीं सर्व पदें रोज तीन तास घटवीत असें. ताल, सूर, लय यांनीं पदें बांधेसूद अशीं माझीं मीच बसवूं लागलों. पदांतील अर्थाप्रमाणें मुद्राविर्भाव झाले पाहिजेत याकडेहि अवधान ठेवूं लागलों. तंबोऱ्यावर पदें घटवितांना भोपळ्यावर बोटानें लयाचा ठोका एकसारखा वाजविण्याचें काम माझें मीच करीं. रबकवी, जमखंडी, बिना आणि नारायण आल्यानंतर मिरज व पुणें येथें प्रयोग सुरूं होईपर्यंत म्हणजे सुमारें दहा महिने मी कृष्णाची भूमिका सतत अभ्यासानें बसवीत होतों. माझा अभ्यास इतरांना त्रासदायक होई. लोक माझी हेटाळणी करीत; पण मी त्या सर्वांकडे दुर्लक्ष्य करून प्रयत्न करीत असें. रंगभूमीवर कृष्णाचें काम करतांना माझ्याकरितां मी जें केलें तें म्हणजे कृष्णाच्या प्रवेशांत लोडतक्याच्या बैठकीची जुनी रीत होती ती काढिली. प्रवेश उभा राहून करण्याचें ठरविलें. डोकीवरच्या जुन्या पगडीला फांटा देऊन जरीची टोपी डोकीवर चढविली. कलाबतूचें काम केलेला अंगांत कोट, पायांत विजार, हातांत छडी असा परिवेष निश्चित केला. मी उत्तम गायक नाहीं ही जाणीव ठेवून पदांत भरकटावयाचें नाहीं, जी तान अगर मुरकी घ्यावयाची ती घटवून पक्की झाली असेल तेवढीच. मुख्य सर्व भार अभिनयकौशल्यावर द्यावयाचा याबद्दल दक्षता राखिली. सौभद्रमधील कृष्णाच्याजवळ येणाऱ्या सर्व भूमिका त्यांतल्या त्यांत त्याचे वडील बंधु बळरामदादा यांच्याबद्दल व एकंदर नाट्यकथानकांत कृष्णाच्या कामगिरीचें मुख्य उद्दिष्ट काय याबद्दलचें चिंतन व मनन करतांना मी पुढीलप्रमाणें विचार केला होता.—

" बळरामदादांच्या भोळ्या भाविकपणाचा फायदा कृष्णानें घेणें, अर्जुन व सुभद्रा एके जागीं असतां अर्जुनाबद्दल कुत्सित कल्पना काढणें, वेषधारी अर्जुन हा श्रेष्ठ परमहंस यति वाटत असल्यामुळें बळरामाला कृष्णाच्या कुत्सित कल्पनेचा राग येणें, सुभद्रेच्या सहवासांत तरुण यति

राहिल्यास अनर्थ होईल असेंच म्हटलें तर बळराम हट्टानें कृष्णाच्याविरुद्ध सुभद्रेच्या सहवासांत तरुण यतीला खात्रीनें ठेवील आणि कृष्णाला असें बळरामाशीं वागतां आलें तरच अर्जुनसुभद्रेचा विवाह संकल्पाप्रमाणें घडवून आणितां येईल. कृष्णाच्या कामांतील वरील सर्व बारकाया मी अभ्यासून आत्मसात् केल्या. हट्टी, भाविक व प्रेमळ अशा भोळया बळरामाच्या स्वभावाचा फायदा कृष्णानें घेणें हें सूत्र लक्ष्यांत ठेवून मी कृष्णभूमिकेंत नटलों.

## 'वन्स मोअर' 'वर' वन्स मोअर

सौभद्र लागलें. मी कृष्णाच्या भूमिकेंत रंगभूमीवर आलों. माझीं तीन पदें झालीं. आत्मगत भाषण संपलें. तोंपर्यंत आपल्यावरील जबाबदारीची धास्ती मला सोडीत नव्हती. मला आत्मविश्वास वाटत होता. आपण मेहेनत उत्तम केली आहे. आपल्याला यश ठेवलेलेंच आहे. असा माझा आंतला आवाज मला धीर देत होता. मी प्रेक्षकांकडे त्यांना काय वाटतें हें अजमावण्याकरितां पहात होतों. लोक माझें काम पहातांना शांत होते तरी खूष झालेले मला दिसले. दुसऱ्या प्रवेशातील सुभद्रेच्या महालांतल्या विनोदी भाषणाला तर बहार आली. पुढें तिसऱ्या अंकांतील 'लाल शालजोडी' या पदाला वन्स मोअर मिळाला. सारखी टाळी सुरू झाली. वन्स मोअर झाल्याबरोबर हा फजितीचा तर नाहीं ना अशी शंका क्षणमात्र मनांत आली. मी गप्प राहिलों. पण बळरामाचें काम करणारे दडपे यांनीं वन्स मोअर घेण्यास सांगून माझ्या शंकेचें निराकरण केलें. मी पुनः पद म्हटलें. त्यालाहि वन्स मोअर होऊन आणखी म्हणावें लागलें. त्यानंतर "बहुत दिन नच भेटलों", "परम सुवासिक", "नच सुंदरी करूं कोपा", "प्रिये पहा" या सर्व पदांना मी सारखे वन्स मोअर घेतले.

दुसऱ्या दिवशीं पुण्यांत सर्वत्र सौभद्राची प्रशंसा झाली. माझ्या कामाच्या यशानें मला अत्यंत आनंद झाला. १९०७ सालीं देशभक्त शिवरामपंत परांजपे व कृष्णाजीपंत खाडिलकर यांनीं माझें कृष्णाचें काम पाहिलें. शिवरामपंतांनीं " पूर्वी पाहिलेल्या कृष्णाच्या कोणाच्याहि कामापेक्षां तुमच्या कामांत नाविन्य व यथातथ्यत्व पाहायला मिळालें " अशा शब्दांत

माझा गौरव केला. कृष्णाजीपंत खाडिलकरांनीं मुद्दाम आंत येऊन मला शाबासकी दिली. याप्रमाणें कृष्णाच्या भूमिकेंत मी यश मिळविलें.

## महाराष्ट्रछाप भाषणपद्धति

१९०४ मध्यें निघालेल्या महाराष्ट्र नाटक मंडळीचे प्रयोग मी पाहिले. ही कंपनी त्रिंबकराव कारखानीस, यशवंतराव टिपणीस आणि त्यांचे बंधु यांनीं काढिली होती. कंपनीचे मॅनेजर आरंभीं तरी मॅनेजरच होते. या मंडळींतील बहुतेक नट सुविद्य होते. नाट्य व नेपथ्य यात सुधारणा करण्याचे या मंडळीनीं पहिल्यापासूनच प्रयत्न चालू ठेवले होते. मंडळी अत्यंत उत्साही आणि एकजुटीची होती. कीचकवध नाटक बसेपर्यंत या कंपनीची सांपत्तिक स्थिति निकृष्ट होती. यांच्यांतील नटांनीं रंगभूमीवर कामें करतांना आवाज अनैसर्गिक काढण्याचा व शब्दांवर विचित्र जोर घालून बोलण्याचा नवाच पायंडा पाडिला. चांगल्या खुल्या आवाजाचा एकहि नट या कंपनीला मिळाला नाहीं. आणि तसा एखादा मिळता तरी महाराष्ट्राच्या पद्धतीमुळें त्याच्या नैसर्गिक आवाजाचें खोबरेंच झालें असतें. त्या वेळीं आम्ही नैसर्गिक पद्धतीचे पुरस्कर्ते म्हणून महाराष्ट्राच्या नव्या अनैसर्गिक भाषणपद्धतीला महाराष्ट्रछाप असें म्हणत असूं. अगोदर जरी नाहीं तरी या मंडळींचीं कीचक-वध, भाऊबंदकी इत्यादि नाटकें लोकप्रिय झाल्यानंतर केव्हां तरी अधुनमधून नाटकें करणाऱ्या क्लबमधून कामें करणारे नट महाराष्ट्रांतील नटांप्रमाणेंच पिंजके आवाज काढून किंचाळूं लागले. नित्य नवें पाहिजे असणाऱ्या प्रेक्षकांना नाविन्य म्हणून 'महाराष्ट्रा'ची पद्धति आवडूं लागली. या मंडळीनें कृष्णाजीपंत खाडिलकर यांचीं नाटकें केलीं. त्या नाटकांच्या तालमी स्वतः खाडिलकरच घेत असत.

## इतक्यांत झपाट्यासरशीं । पदें हीं रचिलित कैशीं । तात्या हो ?

आमची कंपनी सोलापुरास असतांना नारायणाचें लग्न ठरलें व पुण्यास झालें. पुढें बार्शीच्या मुक्कामीं कोल्हटकर आले व त्यांनीं अवघ्या

सात दिवसांत मतिविकार नाटक लिहून काढलें व कपनास वाचून दाखविलें. या नाटकांतील तात्यासाहेबांचीं कांहीं पदें अगदींच सोपीं होतीं. नमुन्याकरितां त्यांतील एक पद येथें देतों —

॥ कलिका जीर्ण पल्लवापाशीं ॥
॥ कोरि पैठणी रकट्यासरशी ॥
॥ जुनी हवेली नव्या घराशीं ॥ बघवेना ॥

हीं पदें ऐकून "इतक्यांत झगाट्यासरशीं । पद्यें हीं रचिलीत कैशीं ॥ तात्या हो ॥ कशि टीकाकारांची । क्षणामध्यें उडविलित पची ॥ मास्तर ॥" अशा तऱ्हेनें तात्यासाहेबाचे सच्चे चेले व परमभक्त राम गणेश गडकरी यांनीं तात्यासाहेबांना पत्र लिहून विनोदानें डिवचलें होतें.

## गुरुशिष्यांची पहिली भेट

तात्यासाहेब कोल्हटकर व राम गणेश गडकरी हे महाराष्ट्रांतील प्रख्यात गुरुशिष्य होते हें जाहीरच आहे. या श्रीसमर्थ व त्यांचे शिष्य कल्याण यांची पहिली वहिली आनंददायक भेट घडवून आणण्याचा मान योगायोगानें मला मिळाला. ती गोष्ट अशी. राम गणेश गडकरी हे आमच्या कंपनींत लहान मुलांना मराठी व इंग्लिश शिकविण्यासाठीं प्रथम आले. ज्या गाडीनें पुण्याहून बार्शीस आम्ही निघालों होतों त्याच गाडींत कंपनीकडे येण्यासाठीं तात्यासाहेब कोल्हटकर होते. आम्हा तिघांची गाडींत भेट झाली. कुर्डूवाडीस बार्शी लाईट रेल्वेंत बसण्याच्या वेळीं मी या दोन महापुरुषांची ओळख करून दिली. गुरुशिष्यांच्या पहिल्याच भेटींत कोट्या-प्रतिकोट्यांची खैरात झाली. खूपच मजा आली. गप्पाष्टकांच्या समान आवडीमुळें बार्शीस मी व गडकरी जिगर दोस्त बनलों. तेंव्हांपासून आम्ही एकत्र रहात असूं व रात्रीच्या रात्री अखंड जागरण होऊन नाट्यविषयाच्या चर्चेला आमच्यामध्यें अगदीं ऊत येत असे.

## सेवेचें फळ मिळालें

मुंबईस बालगंधर्वाच्या गाण्यानें व स्वरूपसौंदर्यानें लोकांवर चांगलीच मोहिनी घातली. सौभद्राचे प्रयोगावर प्रयोग होऊं लागले. पैसा

चांगला मिळूं लागला. पण मध्येंच जोगळेकरांचा दर वर्षाप्रमाणें आवाज बसला. तेव्हां एका सौभद्राच्या प्रयोगांत दडपे अर्जून झाले. मला नारदाचें काम करावें लागलें. अर्जून बदलेला पाहून प्रेक्षक गिल्ला करूं लागले. कांहींजण पैसे परत मागूं लागले. पण जोगळेकरांना काम करतां येणें शक्य नसल्यामुळें ज्यांनीं हट्ट धरिला त्यांचे पैसे परत केले; राहिलेल्या प्रेक्षकांपुढें प्रयोग झाला. जोगळेकरांचा आवाज पहिल्यासारखा होईपर्यंत त्यांना पूर्ण विश्रांति घेणें आवश्यक झालें. त्यांना विश्रांति मिळाली आणि नाटकी जगांत शिरल्यापासून धक्के चपेटे, अवहेलना, तिरस्कार सोसून चिकाटीनें केलेल्या नाटकाच्या सेवेचें फळ म्हणूनच कीं काय मला नायकांचीं कामें करण्याची संधि मिळाली. मूकनायकांत विक्रांताचें, मृच्छकटिकमध्यें चारुदत्ताचें आणि चंद्रहासांतील दुष्टबुद्धीचें या नायकांच्या भूमिका मुंबईस मी केल्या व त्या प्रेक्षकांनीं सन्मानिल्या.

## सुखाचे घुटके आणि दुःखाचे चटके

तो काल कौटुंबिक दृष्टीनें आईच्या कृपाछत्राखालीं व प्रेमळ पत्नीच्या गोड सहवासांत जितका आनंदाचा तितकाच रंगभूमीवरील चढत्या यशाचा होता. माझीं कामें चढत्या पायरीनें होत होतीं. जोगळेकर व गंधर्व यांच्याबरोबर कामें करण्यांत मजा वाटत होती. मतिविकार नाटकाच्या तालमी घेण्याचें काम जोगळेकरांनीं मजवर सोंपवून नाट्यशिक्षकाचा मान मला दिला होता. कुटुंबांत, कंपनींत व जगांत सुख, मान व लौकिक यांचा आनंद लुटित होतों. मन प्रसन्नतेनें भरून गेलें होतें. त्याबरोबरच पुण्यास आमच्या कंपनीनें नाट्यसंमेलन भरविलें. त्या वेळीं शाकुंतल नाटक लेखी परीक्षेकरितां ठेवण्यांत आलें होतें. त्यांत भाग घेऊन मी दहा रुपयांचें बक्षिसहि मिळविलें होतें. मी बसवून तयार केलेलें मतिविकार नाटक सुंदर होत होतें. नाटकाची कल्पना पुनर्विवाहविषयक प्रामुख्यानें असल्यामुळें व नाट्यरचनाप्रकारांत नाटककारांनीं सनातनीपणा सोडला असल्यामुळें त्याचे धक्के त्या वेळच्या समाजास सहन होण्यासारखे नव्हते. अर्थात् लोकमत चांगलें झालें नाहीं.

## नाटकी डाव

मी कायम बिऱ्हाड पुण्यास ठेविलें होतें. बिऱ्हाडच असल्यामुळें आप्तांची माझ्याकडे नेहमीं ये जा असे. त्यामुळें नेहमीं घरीं आठ नऊ मंडळींचा खर्च असे. १९०२ मध्यें मला पंचवीस रुपये पगार मिळूं लागला होता. त्याचे १९०६ मध्यें तीस रुपये झाले. वर्षांत पस्तीसपर्यंत चढलों. तरीहि मिळकत आणि खर्च यांची तोंडमिळवणी होणें अशक्य होई. कंपनीकडे प्रमोशन मागण्याशिवाय इलाज नव्हता. चालकांपुढें बोलण्याचें धैर्य माझ्यांत नव्हतें. तेव्हां शंकररावांच्या टेबलावर ते तेथें नसतांना प्रमोशनबद्दल पत्र ठेवून दिलें. चालकांनीं मला आश्वासन दिलें. पण तें अमलांत मात्र आणिलें नाहीं. उलट नाटकी डाव रचून माझी कुचंबणा होईल असेच पद्धतशीर प्रयत्न केले. मला दब-विण्याकरितां एक अस्त्र म्हणून एका गृहस्थाला कंपनीनें आणिलें आणि प्रमोशन न दिल्यास आपण कंपनी सोडणार आहों असें मी बाहेर बोल-ल्याचा खोटा आरोप माझ्यावर करण्यास कमी केलें नाहीं. त्या बाबतींत माझी व जोगळेकरांची खडाजंगी होऊन कांहीं कालपर्यंत आमच्यांत बेबनाव झाला होता. शंकररावांनीं त्यासंबंधीं मला विचारलें व अगदीं गहिंवरून जाऊन " तूं कंपनींतून जाईन म्हणालास पण तुझ्याबद्दलची कल्पना अगदीं शेवटची राहूं दे " असें म्हटलें. शंकररावांच्या गहिंवरण्यानें मी विरघळलों. पण त्या एकंदर धांदलींत माझ्या प्रमोशनचा प्रश्न बाजूला पडला.

## किर्लोस्कर थिएटर आणि रंगभूमि मासिक

पुण्यास आमचा मुक्काम असतांना शंकरराव यांच्या थिएटर बांध-ण्याच्या व मासिक काढण्याच्या महत्वाकांक्षेनें उचल खाल्ली. जोगळेकरां-सारखा कर्तबगार मालक पण शंकररावांनीं त्याला आपल्या हातांत कळसूत्री बाहुल्याप्रमाणें ठेविलें होतें. शंकररावांच्या सद्दीचा तो जोरच होता असें म्हटलें पाहिजे. त्यामुळें जोगळेकर सर्वांचें ऐकून घेत पण शेवटीं शंकररावांच्याच म्हणण्याला मान तुकवीत. थिएटरच्या कल्पनेच्या बाबतींत असेंच झालें.

थिएटर बांधण्याचें नक्की झाल्यानंतर प्रथम जोगेश्वरीच्या बोळांतील खासगीवाल्यांचा वाडा पंधरा हजार रुपयांस मिळत होता. पण शंकररावांनीं पंधरा हजार रुपये रोख देणें अशक्य आहे या सबबीवर तो घेण्याचें नाकारिलें, आणि मार्तंडराव टापरे (पुण्यांतील एक सराफ) यांच्या मालकीचा असलेला माणकेश्वराचा वाडा घेण्याकरितां टापरे यांच्याशीं त्यांनीं वाटाघाट सुरू केली. जाणत्या मंडळींनीं टापरे यांचें तुमच्याशीं जमणार नाहीं, त्यांच्याशीं होणारा व्यवहार शेवटीं तुमच्या सुखाला लागणार नाहीं असें शंकररावांना सांगितलें. पण त्यांच्यांत अहंपणा संचारला होता. मार्तंडराव टापरे यांना चुटकीसरसे आपण बगलेंत मारूं या घमेंडीनें शंकररावांनीं टापरे यांच्याशीं थिएटर बांधण्याच्या कामीं भागीदारी करण्याचें निश्चित केलें.

थिएटरच्या भागीदारीचा मसुदा श्री. न. चिं. केळकर यांच्याकडून करून घेतला. शंकररावांनीं आम्हा सर्वांना असें भासविलें होतें कीं थिएटरकरितां पंचवीस हजारांपेक्षां जास्त खर्च होऊंच द्यावयाचा नाहीं. शंकररावांच्या कल्पनेविरुद्ध मी व्यक्तिशः जोगळेकरांना वारंवार जीव तोडून भाऊराव कोल्हटकर यांच्या भाषेंत सुचवीत होतों कीं थिएटर बांधण्यास लागणाऱ्या खर्चापैकीं आपणाजवळ तीनचतुर्थांश रक्कम तयार असेल तरच पाया घालावा. नाहींतर ऋण काढून सण करण्याच्या भानगडींत केव्हांच पडूं नये. पण जोगळेकर शंकररावांच्या झकपक भाषणाला बळी पडले. थिएटर श्री. टापरे यांच्या भागीदारींत बांधायचें असें ठरलें.

शंकररावांनीं "रंगभूमि" मासिक काढून आपली हौस पुरी केली. तें मासिक आपल्या कंपनीचा बडेजाव वाढवायचा व दुसऱ्याची नाहक निंदा करायची अशा धोरणानें चालविण्यांत आल्यामुळें यशस्वी होणें शक्यच नव्हतें. त्याचा जमाखर्च नव्हता. वर्गणीदारांची नांवनिशी व्यवस्थित होती कीं नव्हती याबद्दलसुद्धां शंकाच होती. शंकरराव यांची वागण्याची पद्धतीच अशी होती कीं ते आपल्याकडे पांचशें ते हजार रुपयांपर्यंत तसलमात ठेवीत, तसलमातीचा खर्च ते आपल्या तब्बेतीप्रमाणें देत. जमाखर्चाची कीर्दखतावणी तपासतांना शंकररावांना मी

कधींहि पाहिलें नाहीं. जो व्यवस्थापक हिशेबी असतो तो कंपनीच्या जमा खर्चावर नजर ठेवतोच ठेवतो. जेथें असें नसेल तेथें गैरव्यवस्था माजून कोणतीहि संपन्न संस्था धुळीला मिळाल्याशिवाय कशी रहाणार ?

## बेदिलीचा पाया

१९०८ मध्यें नागपंचमीस थिएटरचा पाया घालण्याचें ठरलें. हा पाया म्हणजे किर्लोस्कर कंपनींतल्या मंडळींत बेदिली उत्पन्न होण्याचा व कंपनी कर्जाच्या घोटाळयांत पडण्याचा पायाच होय. याचें प्रत्यंतर अगदीं आरंभींच पहावयाला मिळालें. कंपनीचा पुण्याचा मुक्काम संपत आलेला. राजापूरकर कंपनीनें शनिवार बुधवारकरितां थिएटर अडविलेलें. उत्पन्नाला गळती लावणारा पुण्यांतला गणपती उत्सव जवळ आलेला. राजापूरकराच्या दामाजी पुंडलिकाकडे प्रेक्षकांचा लोंढा चाललेला. मग मंगळवार शुक्रवारसारख्या आडवारीं आम्हाला उत्पन्न कसें होणार? पण शंकररावांनीं एक महिना कंपनीचा मुक्काम वाढविला. त्यांत त्यांनीं आपल्या घराची पडलेली भिंत बांधण्याचें काम साधलें व कंपनीचें नुकसान केलें. पण त्यांच्यापुढें बोलणार कोण ? शंकररावांनीं आपली कर्झनशाही चालू केली होती.

## हितचिंतकमंडळांत अग्रेसर

रंगभूमीवर नारायणाची लोकप्रियता वाढीस लागली होती, त्या मुळें त्याच्या भोंवतीं बाहेरच्या मित्रमंडळींचा मेळा जमूं लागला. तोहि त्या स्नेह्यासोबत्यात सांपडला. त्याचा स्वभावच असा कीं तो एखाद्याच्या नादीं लागला कीं दिवसरात्र, त्याचें जेवणखाण त्याच्याकडेच. प्रत्येकजणाला वाटे नारायण भोळाभाबडा आहे. तें ओळखून नारायणानें साधेभोळेपणाचें सोंग जें घेतलें तें कायमचेंच. त्याचें तें सोंग कांहीं प्रसंगानें त्याच वेळीं माझ्या ध्यानांत आलें. त्याची वाढती लोकप्रियता लक्ष्यांत घेऊन त्याला आवश्यक त्या पथ्यकर चार गोष्टी सांगितल्या तरी त्या त्याला रुचावयाच्या नाहींत हें ओळखून मी तें सोडून दिलें.

कोल्हापुरास श्रीमंत आक्कासाहेबमहाराज यांच्या लग्नसमारंभास निमंत्रण आल्यावरून कंपनीनें कोल्हापूर घेतलें. त्याच कालांत तेथें गोविंद-

राव टेंबे आणि बाळासाहेब पंडीत हे भक्त नारायणाला मिळाले. गोविंदराव यांच्या पेटीवादनावर नारायण बेहद्द खूष झाला. गोविंदराव हे त्याचे पहिले हितचिंतक होत. नारायण आपल्या कलेवर खूप आहे हें ओळखून-सुद्धां बाकीचे लोक जशी त्याची लाळ घोटीत तसें न करितां ते त्याला त्याच्या मूर्खपणाबद्दल झटकीत असत. त्यामुळें नारायणावर त्यांचा वचक बसला होता. गोविंदरावांच्या हातीं गेलेला नारायण आपल्या हातीं कस येईल अशी चिंता वहाणारांपैकीं एक चिंतातुर जीव होता आणि तो म्हणजे कृष्णाजी परशुराम ऊर्फ बाळासाहेब पंडीत.

या बाळासाहेब पंडिताबद्दल आमचा समज प्रथम असा होता कीं कोल्हापूरच्या प्रसिद्ध पंडित घराण्यापैकींच ते असावेत, म्हणूनच हे बाळासाहेब होत. पण तपासाअंतीं हें बाळ कोल्हापूर संस्थानांतील एका मामलेदारांचे चिरंजीव आहेत असें कळलें. तेव्हां अधिकाऱ्याच्या या बाळाला त्यांच्या कारकून शिपायांनीं बाळासाहेब बनविलें. तेंच उपपद पुढें त्यांच्या मित्रांनीं कायमचें रूढ केलें. आमच्या नारायणाचा स्नेह संपादण्यासाठीं याच बाळासाहेबांना गोविंदरावांची पुढें स्नेहांत रूपांतर पावणारी तोंडओळख प्रथम करून घ्यावी लागली. राजाराम कॉलेजमध्यें नारायणाचें गाणें करविलें, सोन्याचीं बटणें देवविलीं, कपडेलत्ते करविले. इतकेंच काय पण नारायणाची प्रत्येक गोष्ट पुरी करण्यांत इतरांशीं सारखी चढाओढ करून नारायणाच्या हितचिंतकमंडळांत बाळासाहेबांनीं केव्हांच अग्रेसरत्व मिळविलें.

## सुख पाहतां जवापाडें । दुःख पर्वताएवढें ॥

कंपनी कोल्हापूर, हुबळी करून सदलग्यास गेली. सदलग्यास जायच्या दिवशींच मला पुत्ररत्न प्राप्त झाल्याची आनंददायक वार्ता नारायणानें पुण्याहून आणिली. ता. १३ मे १९०७ रोजीं मला पुत्रप्राप्ति झाली. मन आनंदात होतें. मुलाच्या नामकरणसमारंभास जात असतांना वाटेंत डॉ. गाडगीळ यांच्या आग्रहावरून कोल्हापुरास उतरलों. ता. २३ रोजीं शनिवारीं सकाळीं पुण्याहून शंकरराव आले. त्यांनीं मला “ तुझी पत्नी आजारी आहे. आत्तांच तुला पुण्याला जायला हवें ” असें सांगितलें.

बाळंतीण आणि आजारी या कल्पनेनें कंबरच खचली. लागलीच गाडी पकडली. रस्त्यांत नाना तर्ककुतर्क येऊन मन वेडेंविसें झालें. पुण्यास बिऱ्हाडीं पोंचायला रात्रीचे अकरा झाले. घरीं पोंचलों तेव्हां डॉक्टर व्ही. सी. गोखले रोग्याला पहायला आलेले दिसले. माझी प्रिय-पत्नी काष्ठवत् निश्चेष्ट पडलेली. तिच्या अंगांत सहा सात डिग्री इतका भयंकर ताप. डोक्यावर रात्रभर बर्फ आणि माठांतील गार पाणी अंगावर सारखें ठेवलेलें. पहाटे तीनच्या सुमारास ताप तीन डिग्रीपर्यंत खालीं आला. तेव्हां डॉक्टरांच्या सूचनेप्रमाणें पत्नीला कोरडीं वस्त्रें नेसविलीं. नेसवीत असतांच तिच्या कानाशीं हलकेच मी हाक मारली. तिनें डोळे उघडले, बोलण्याचा प्रयत्नहि केला. पण शब्दच उमटेना. पुनः ताप चढूं लागला. तेव्हां तसाच पळत डॉक्टरांकडे गेलों. डॉक्टरांनीं येऊन पत्नीला इंजेक्शन दिलें. पण तिनें डोळे फिरविले आणि सर्व कारभार आटोपला. खालीं घोंगडीवर उतरल्यानंतर—काय झालें कोणास ठाऊक—पत्नीचा श्वास पुनः सुरूं झाला. डोळे उघडले, माझ्याकडे पहात असतांना डोळ्यांतून सारखें पाणी वहात होतें. अखेर रविवार तारीख २४ रोजीं पत्नीचें प्राणोत्क्रमण झालें. चोहोंकडे अंधार झाला.

ही माझी प्रथम पत्नी अत्यंत सुस्वभावी होती. आमचा संसार अवघा सव्वातीन वर्षांचाच. प्रिय पत्नीच्या निधनामुळें माझ्या मनावर दारुण आघात झाला. तारीख २२ पर्यंत पुत्रप्राप्तीचा आनंद, ता. २३ रोजीं सकाळीं पत्नी अत्यवस्थ असल्यामुळें काळजी, आणि त्याच रात्रीं तिला बेशुद्धावस्थेंत पाहिल्यावर आशानिराशेचा झगडा, ता. २४ सकाळीं तर ती मला कायमचीच सोडून गेली. म्हणजे २४ तासांत संसार होता कीं नव्हता असें झालें. माझा मुलगा मी तिसऱ्या दिवशीं पाहिला. चांगला होता तो. पण आईवेगळें मूल क्वचितच जगतें. पत्नीच्या बाराव्या दिवशीं मुलगाहि आपल्या आईच्या मागोमाग तिला शोधण्यासाठीं स्वर्गांत चालता झाला. जन्मापासून तो माझ्या आईच्या मांडीवर सारखा असे. त्यामुळें मुलगा वारल्यानंतरहि माझी आई रात्रीं उठून अंथरुणावर बसे आणि मुलगा मांडीवर आहेच अशा समजुतीनें ती आपली रिकामी मांडी हलवीत असे !

माझ्या त्या पत्नीला एक बंधु आहेत. त्यांचें नांव डॉ. शंकर विष्णु देवधर. ते सध्यां नाशिकास असतात. आपलें आयुष्य अनाथ विद्यार्थिगृहाला त्यांनीं वाहिलेलें आहे. ते क्षयरोगाचे स्पेशॅलिस्ट असून व्हिएन्ना ( ऑस्ट्रिया ) येथून एम्. डी. होऊन आले.

## निसर्गसिद्ध अभिनय

पत्नीचें और्ध्वदेहिक उरकतांच मी हुबळीस कंपनीला येऊन मिळालों. आलों त्याच दिवशीं नाटकांत काम केलें. दुःख ताजें असल्यामुळें काम करतांना नक्कल आठवेना. माणूस पुष्कळ दिवस आजारी असलें आणि त्याच्या अखेरीची कल्पना आली म्हणजे मन पुढील भवितव्याला तोंड द्यायला पुष्कळ तयार झालेलें असतें. पण माझ्या बाबतींत साराच अनपेक्षित प्रकार असल्यामुळें माझ्या मेंदूवर पुष्कळच परिणाम झालेला होता. अशा स्थितींत मतिविकारमधील विहाराची भूमिका मी केली. विहाराच्या भूमिकेंत असाच एक पत्नीनिधनामुळें विहार दुःखव्यास्त असल्याचा नाटकांत प्रवेश आहे. त्या दिवशींचें विहाराचें माझें काम पाहून राम गणेश गडकरी यांनीं तो प्रवेश संपतांच "वा गणपतराव! किती उत्तम अभिनय वठविलात!" असें म्हणून माझी पाठ थोपटली. पण त्या दिवशींचा माझा तो अभिनय नव्हता. पत्नीविरहाच्या ताज्या दुःखाचें तें सत्य होतें; आणि मी गडकरी मास्तरांना "माझें दुःख ताजें आहे; त्याचा खरा खुरा आवेग आला. काम करतांना खरी कला नाहींशीच झाली" असेंच मी त्यांना सांगितलें.

## आनंदांत वैगुण्य

याच हुबळीच्या मुक्कामांत मेडल समारंभ झाला. पूर्वीप्रमाणें मी या समारंभांत वगळला गेलों नाहीं. मला मेडल मिळालें. पण हा समारंभ पहायला आपली प्रेमळ सहचारिणी नाहीं या जाणिवेनें मला कसेंसेंच झाल्याशिवाय राहिलें नाहीं. बहिणीनें आनंद व्यक्त केला. आईनेंहि डोक्यावरून हात फिरवून कुरवाळिलें. आनंद वाटला. पण त्या आनंदांत प्रिय पत्नीच्या सलज्ज सुहास्ययुक्त आनंदाची भर पडण्याचें भाग्य नाहीं म्हणून तेवढेंच वैगुण्यहि वाटलें. मी मागें एकदां असे मेडलसमारंभ कसे साजरे केले जातात

हें लिहिलें आहे. तें जरी खरें आहे तरीहि मी मनुष्यच असल्यामुळें मेडल मिळाल्याबद्दल थोडा वेळ कां होईना मला आनंद झाला हें मी कबूल करतों.

आजपर्यंत अनेक कारणांनीं माझें साइडिंगला पडलेलें प्रमोशनचें गाडें या वेळीं रुळावर आलें व जुलै १९०७ पासून पन्नास रुपयेप्रमाणें पगार आकारण्याचें व चालू जुलै महिन्यापासून साठ रुपयेप्रमाणें पगार मिळण्याचें नक्की झालें.

याच वेळीं आणखी एक गोष्ट घडली. हुबळीस असलेले कृष्णाजीपंत काळे यांनीं मी रिकामा नवरदेव आहें असें ऐकून आपली मुलगी मला देण्याच्या इच्छेनें गांठलें. मी मुलीच्या वयाची चौकशी केली. मुलीचें वय बारा वर्षांचें आहे असें कळलें. तेव्हां इतकी लहान मुलगी मला करावयाची नाहीं, असें स्पष्ट सांगून मी काळे यांना वाटेला लावलें.

हुबळीस असतांनाच पुण्यास थिएटरचा पाया घालून झाला. कंपनींतील आम्हा मंडळींना थिएटर आपलें आहे अशी आपुलकी वाटावी म्हणून एक आराखडा तयार होऊन आमच्यापुढें आला. थिएटरच्या इमारतीस पंचवीस हजार रुपये लागणार होते; त्यात दोघां मालकांनीं आपल्या फायद्यांतले बारा ते तेरा हजार रुपये घालावयाचे व बाकी रक्कम शंभर रुपयांचा एक भाग याप्रमाणें एकशेवीस शेअर आम्हा मंडळींत वांटून भांडवल उभारावयाचें अशी कल्पना होती. कल्पना खरोखरीच चांगली होती. ती अमलांत आली असती आणि थिएटरचा खर्च पुढें अनागोंदी झाला नसता तर—पण तें वर्णन येथें नको. पुढें येणार आहेच.

मिरजेस पुनः मला मुलगी दाखविण्यांत आली. ती मुलगी म्हणजे माझी हल्लींची द्वितीय पत्नीच होय. जिच्या वडिलांना हुबळीस मुलगी लहान म्हणून मला ती करावयाची नाहीं असें सांगितलें होतें तीच मला पुनः दाखविण्यांत आली. या दुसऱ्या वेळींहि मी नाखुषी दर्शविली. त्यावर ती गोष्ट तितक्यावरच राहिली आणि आमची कंपनी मुंबईस गेली. मुंबईस एक दिवस अचानक माझ्या आईची तार आली माझें लग्न



प्रतोद–( मूकनायक )



विहार–( मतिविकार )



मदन—( चंद्रहास )



श्रृंगी—( गुप्तमंजूष )

ठरलें व त्यासाठीं त्वरित निघून ये असा मजकूर तींत होता. आईबद्दल माझी खात्री होती कीं ती कसली तरी मुलगी खास पहाणार नाहीं. मी आयत्या वेळीं कंपनींतून पगारापैकीं अगाऊ शंभर रुपये घेतले व पहिल्या पत्नीचें बारा तोळे सोनें होतें तें घेऊन लग्नासाठीं मुंबई सोडली. सिंहस्थ होता. सिंहस्थांत लग्नें होत नाहींत पण कृष्णानदीच्या दक्षिणेस म्हणजे कोल्हापुरास लग्न होऊं शकतें असा शास्त्राधार मिळाल्यामुळें कोल्हापुरास लग्न व्हावयाचें ठरलें.

इतकें झालें तरी मुलगी कोणती ठरविली आहे हें स्पष्ट न कळल्यामुळें मन संशयित राहून चुटपुट मात्र लागली.

## संसाराची नवी घडी

मुंबईहून लग्नासाठीं निघालों तों दुसरे दिवशीं सायंकाळीं साडेपांच वाजतां मिरज स्टेशनवर आलों. माझ्या डब्याजवळ आई घाई घाईनें येऊन म्हणाली, "जा, कोल्हापूरच्या गाडींत बैस. सर्व मंडळी नवरी मुलगीसुद्धां त्या गाडींत आहेत. वहिनीसाहेब जोगळेकरहि आहेत. जा, जा, लवकर." तिची ती धांदल आणि उत्कंठा पाहून मला मौज वाटली. आई सांगलीस गेली. कोल्हापूरच्या प्लॅटफॉर्मवर जाऊन डबे धुंडाळून पहातां पहातां एका डब्यांत सर्व मंडळी बसलेली दिसली. मी दोन वेळां नाकारलेली मुलगी अखेर माझीच वधू ठरली व मी लग्नासाठीं कोल्हापुरास गेलों. ही वधू वयानें लहान होती. याशिवाय कोणताहि दोष तिच्यांत नव्हता. जोगळेकरांच्या वडिलांनीं सामुद्रिक पाहून तीच वधू नेमस्त केली. सर्वांचें एक मत झाल्यामुळें वधूचा लहानपणा दृष्टीआड करावा लागला. जोगळेकरांचे वडील म्हणाले, "गणू, दोन वर्षें लग्न झालेंच नाहीं असें समज." लग्नाच्या आदल्याच दिवशीं माझी भावी पत्नी जिन्यावरून पडल्यामुळें तिच्या डोक्याला दोन खोका पडल्या. जखमा बांधूनच लग्न पार पडलें. मी मुंबईस आलों.

## नारायणाचे हितचिंतक

मुंबईच्या मुक्कामांत नारायणाच्या भोंवतीं हितचिंतकांचा गराडा पडला होताच. आपली खरी काळजी वहाणारा हाच एक मानून आहे

असा नारायणाचा ग्रह होईल अशी वागणूक पंडीत आणि मंडळीनें ठेविली होती. या मंडळीच्या मदतीला गोविंदराव टेंबे होते. या सर्वांनीं नारायणाला शंभर रुपये पगार होता तो दीडशें करा असा निर्वाणीचा संदेश जोगळेकरांना दिला. दीडशें रुपये पगार झाला नाहीं तर नारायण कंपनीबरोबर यायला तयार नाहीं असेंहि बजाविलें होतें. वास्तविक दीडशें रुपये पगार मिळावा असें नारायणाला वाटलें तर त्यांत कांहीं गैरवाजवी नव्हतें. चालकांच्या मतें खुद्द नारायणानें अगर त्यांच्या मातोश्रीनें ही मागणी करावयास पाहिजे होती. परंतु कंपनीशीं संबंध नसलेल्या माणसांकडून ही मागणी पुढें आली; त्यामुळें बाहेरचीं माणसें कंपनीच्या अंतर्गत व्यवस्थेंत नसती ढवळाढवळ करितात असें चालकांना वाटलें. पण करतात काय ? नाइलाजानें दीडशें रुपये पगार द्यायला चालक कबूल झाले आणि नारायण कंपनीमागून सोलापुरास आला. नारायणाचा सर्व कारभार बाहेरच्या माणसांनीं पहायला या वेळेपासून सुरवात झाली.

## ' गर्वनिर्वाण ' नाटकाचा संकल्प

मुंबईच्या मुक्कामातूनच श्री. राम गणेश गडकरी हें शाळामास्तरची नोकरी पत्करून अकोलाबाळापूरकडे गेले. परंतु तेथें जातांच त्यांना कंपनींतील मंडळींचा विरह असह्य झाला होता. ती विरहवेदना पत्रांतून त्यांनीं माझ्याजवळ व्यक्त केली होती. त्यापैकीं त्याच्या वाग्वैजंयतीमध्यें " एका नटमित्रास " म्हणून एक पद्यमय पत्र प्रसिद्ध झालेलें आहे.

सन १९०६ सालीं मुंबईस असतांना गडकरी आमच्याबरोबर नाट्यचर्चा करीत असत. तुम्ही एखादें नाटक लिहा असा मी त्यांना नेहमीं आग्रह करीत असें. त्यावर ते म्हणत, " माझ्यासमोर कोल्हटकर, खाडिलकर यांच्यासारखे हिमालय उभे आहेत; त्यांच्यापुढें मी किती टेंगू आहें याची कल्पना येऊन धीर होत नाहीं. " शेवटीं स्वतंत्र कथानक न घेतां कै. अण्णासाहेबांचें रामराज्य–वियोग अपुरें राहिलेलें आहे तें तरी पुरें करा असा आग्रह धरला. त्यांना तें मानवलें. त्याप्रमाणें त्यांनीं एक अंक लिहून तयार केला. त्यांत त्यांनीं किर्लोस्करी वळणाची भाषा घातली होती. परंतु तें तितकेंच राहिलें. बाळापुराला जातांना प्रल्हादचरित्रावर " गर्वनिर्वाण " म्हणून नाटक लिहिण्याचा त्यांनीं संकल्प सोडला होता.

# माझी विहाराची भूमिका

भूमिका तयार करितांना माझी नेहमींची संवय अशी, कीं भूमिकेच्या स्वभावाचें मर्मस्थान पकडायचें, आणि तें सूत्र कायम ठेवून बाकीचे स्वभावधर्मांतले तरंगाचे धागेदोरे त्याला जोडायचे. मात्र हें मला मनन करून साधतां येत असे. मला जर एकाद्यानें एकाद्या भूमिकेवर निबंध लिहायला सांगितला असता अगर व्याख्यान द्यायला सांगितलें असतें तर मला साधलें नसतें. कारण त्याचें विशदीकरण करायला जी विद्वत्ता, जी संवय लागते अगर विविध वाचन लागतें त्याचा माझ्या ठिकाणीं अभाव होता. पण भूमिका शिकवितांना मी रंगलों म्हणजे चर्चात्मक असें मला सांगतां येत असे.

माझ्याकडे कोणत्याहि नाटकांतली कोणतीहि भूमिका आली म्हणजे ती मी स्वतःच मननपूर्वक बसवीत असें. भूमिका बसविण्याची माझी रीत अशी असे. नाटकांतले सर्व प्रसंग डोळ्यांसमोर मी प्रत्यक्ष आणी. ते ते प्रसंग आतां प्रत्यक्ष डोळ्यापुढे घडत आहेत असें मानी. त्यानंतर आपल्या भूमिकेला मनानें समोर उभी करी. त्या भूमिकेला असलेलीं वाक्यें साभिनय स्वतःशींच म्हणे. आणि तें दृश्य अंतर्दृष्टीला कसें काय दिसतें हें पहाण्याचा माझ्याशींच मी प्रयत्न करून चुकीची दुरुस्ती करी. बरोबर वाटेल तें कायम करी. प्रत्येक वाक्य घोकून घोकून नुसतें पाठ कधींच करीत नसे. नुसत्या घोकंपट्टीनें वाक्यें पाठ होतात. पण त्यांतील अर्थाकडे अनुसंधान रहात नाहीं. याकरितां नक्कल वारंवार वाची. वही मिटून म्हणायला सुरवात करी. जेथें स्मरणशक्ति दगा देई तेवढ्याच पुरतें वहींत पाही. नंतर पहिला क्रम चालू ठेवी. एवढें झाल्यावर अर्थाच्या अनुरोधानें वाक्य कसें तोडावें, कोणत्या शब्दांवर कां व कसा जोर द्यावा, अर्थानुसारें आणि रसानुकूल भाषणाची लय कशी असावी याकडेहि अवधान राखीं. वाक्यें म्हणतांना मुद्राभिनय करी. दुसऱ्या पात्राच्या भाषणांतील शेवटचें सूचीचें वाक्य मी कधींच लक्ष्यांत ठेवीत नसें, कारण प्रत्यक्ष तालमींत तें विनायासें ध्यानांत राही. तसेंच रंगभूमीवर जाण्यायेण्याच्या गोष्टी तालमींत सहजच तयार होत.

भूमिका बसविण्याच्या या पद्धतीमुळेंच माझ्या जुन्या कोणत्याहि नाटकांतल्या भूमिका जशा मला यथातथ्य वठवितां आल्या त्याचप्रमाणें कोल्हटकरांच्या त्या वेळच्या मराठींतील अगदीं नव्या धर्तीच्या गुप्तमंजूष, मतिविकार या नाटकांतील माझ्याकडे आलेल्या शृंगी आणि विहार याहि भूमिका मी चांगल्या यशस्वी करूं शकलों. भूमिका यशस्वी करण्यास जसा मननपूर्वक विचारांचा हमखास उपयोग होतो त्याचप्रमाणें ऐन वेळीं काकतालीन न्यायानें भूमिकेंत आणखी मखलाशी निर्माण होण्यांत अनपेक्षित अशा कांहीं गोष्टी घडतात. त्यांचाहि उपयोग नटानें चतुराईनें निमिषमात्रांत विचार ठरवून करून घ्यावा लागतो. ज्याला हें साधतें त्याचें प्रेक्षक कौतुक करितात. ज्याला तें साधत नाहीं त्याची फजिती झाल्याशिवाय रहात नाहीं. अशा गोष्टी कशा घडतात याचा थोडासा मासला पुढें देतों.

## शृंगीचीं शिंगें आणि विहाराची आडवी टोपी

गुप्तमंजूषमधील शृंगीच्या भूमिकेला मी शिंदेशाई पगडीचा थाट केला. शृंग म्हणजे शिंग. शिंदेशाई पगडी दोन टोकाची. यामुळें शिंगासारखी दिसे. अर्थात् शृंग आणि शिंगें असें जुळून ती पगडीच लोकांना विशेष आवडली. हें सहजगत्याच झालें होतें. पण लोकांना तें आवडलें हें लक्ष्यांत येतांच तें कायमच केलें. शृंगीचें तिमजली हंसणें मी विचारपूर्वक बसविलें होतें. त्याची चहा माझ्या विचाराप्रमाणें निश्चित झाली. विहाराची भूमिका मी मननपूर्वक बसविल्यामुळें तर लोकप्रिय झालीच. पण त्यांत माझ्या डोकीवर सहजगत्या ठेवलेली टोपी तितकीच लोकप्रिय ठरली. आडव्या टोपीची कथा अशी आहे. मतिविकाराच्या पहिल्या प्रयोगाला मी माझ्या प्रवेशाची वाट पहात विंगमध्यें बसलों होतों. त्याच वेळीं आमचे सदूकाका नाटकाला आले. त्यांना बाहेर बसविण्याच्या धांदलींत होतों तेवढ्यांत माझा प्रवेश आल्याची सूचना मला मिळाली. मी डोक्यावरची टोपी हातांत घेतली होती ती बसली तशीच डोकीवर ठेवून प्रवेश करायला गेलों. मला पहातांच प्रेक्षकांत मोठाच हंशा उडून टाळ्या पडल्या. शेजारच्या पात्रानें डोक्यावर टोपी आडवी आहे त्यामुळें हंशा

होऊन टाळया पडल्या असें मला सांगितलें. माझ्या लक्ष्यांत आलें पण आतां टोपी सरळ केली तर आपला वेंधळेपणा व्यक्त होईल या कल्पनेनें ती तशीच राहूं दिली. तेवढ्यांत भरकन् विचार येऊन गेला कीं विहाराच्या स्वभावधर्माला आडवी टोपी साजण्यासारखीच आहे आणि त्याप्रमाणें मी ती आडवी टोपी त्या वेळेपासून पुढें कायमच ठेविली.

आतां झटकन् ज्याला विचार करून ठरवितां येत नाहीं त्याची रंगभूमीवर कशी फजिती होते याचें एक उदाहरण आहे तें देतों.

मतिविकारांत एक डॉक्टर आजारी मनोहराची प्रकृति तपाशीत असल्याचा प्रसंग आहे. डॉक्टराचें काम करणारे दिवेकर नांवाचे गृहस्थ होते. त्यांनीं तें काम करितांना थर्मामीटर काढून रोग्याला काखेंत ठेवायला दिलें. स्टेथॉस्कोपनें मनोहराची तपासणी केली. नंतर काखेंतून थर्मामीटर काढून घेऊन गंभीरपणानें अगोदर डॉक्टरांनीं झाडलें आणि मग ताप किती आहे तें ते पाहूं लागले. त्याबरोबर प्रेक्षकांत हंशा उडाला. लोक कां हंसले, तें न कळून डॉक्टरमहाशय गडबडले. त्यांच्या अंगाला घाम सुटला. बोबडी वळल्यामुळें त्यांना आपलीं वाक्यें नीट आठवेनात. मग तीं तोंडांतून बाहेर पडण्याची बात दूरच. डॉक्टरांच्या तोंडावर प्रेतकळा आली. अशा मौजेंत त्यांचा प्रवेश संपला.

## आपुलकीच्या भावनेला पहिला धक्का

आमची कंपनी सोलापूर, विजापूर, बागलकोट करून बार्शीस दाखल झाली. बार्शीचे प्रयोग संपतांना मी पुण्यास गेलों. चिंतोबा आदि मंडळी कुतूहलानें 'आपलें थिएटर' कसें काय तयार होत आलें आहे हें पहाण्यास आले होते. थिएटरचा पहिला मजला पुरा होऊन दुसरा मजला व गॅलरी यांचें काम चालू होतें. दुसऱ्या मजल्याची रचना पहात असतांना दुमजल्याच्या गॅलरींतील सर्व ठिकाणांहून प्रेक्षकांना रंगभूमि सर्व सारखी दिसेल असें आम्हां कोणाला वाटेना. गॅलरीच्या दोन बाजू रंगभमीला ज्या ठिकाणीं टेकतात त्या ठिकाणाला मध्यापासून दोन्हीं बाजूंनीं दोन टोंकाला प्रमाणशीर उतार दिला गेला तरच सर्व ठिकाणाहून प्रेक्षकांना दिसणार, एरवीं नाहीं याबद्दल आम्हीं चर्चा करूं लागलों. तेव्हां शंकर-

रावांनीं "थिएटरमध्यें कांहीं चुकलें आहे असें कोणीहि म्हणतां कामा नये. प्रत्येक भाग चांगला झाला आहे असेंच सर्वांनीं म्हटलें पाहिजे." अशा तऱ्हेचें कर्झनशाही फर्मान आम्हां सर्वांना ऐकविलें. फर्मानाचे शब्द कानीं पडतांच 'आमच थिएटर' या आमच्या आपुलकीच्या भावनेला पहिला धक्का बसला.

पुढें किर्लोस्कर थिएटर संपूर्ण तयार होऊन तें खुलें करण्याचा समारंभ नागपंचमीच्या मुहूर्तावर होणार असें ठरलें. समारंभाच्या वेळीं हुबळी, कोल्हापूर येथून मित्रमंडळी बरीच आली होती. मिरजेचे अधिपति श्रीमंत बाळासाहेब मिरजकरहि त्या प्रसंगीं उपस्थित होते. सर मूर मॅकेंझी यांच्या हस्तें उद्घाटनसमारंभ होण्याचें निश्चित झालें होतें. उद्घाटन-समारंभासाठीं संगीत शाकुंतलाच्या चार अंकांचा प्रयोग ठेवण्यांत आला होता. लतापल्लवांनीं थिएटर सुशोभित केलें होतें. दरवाजावर चौघडा झडत होता. सायंकाळीं ४ वाजतां थिएटर खुलें होणार होतें. निमंत्रित मंडळीनीं थिएटर फुलून गेलें होतें. कांहीं थोडी तिकीटविक्रीहि झाली होती. किर्लोस्कर कंपनीचा एकोणतीस वर्षांचा त्रोटक इतिहास निवेदन करणारें शंकररावांचें प्रास्ताविक भाषण झालें. नंतर काहींचीं भाषणें झाल्यावर सर मूर मॅकेंझीनीं थिएटर खुलें झाल्याचें जाहीर केलें. नंतर प्रयोग सुरू झाला. तो रात्रीं आठ वाजतां संपला.

## धन्याला धत्तुरा आणि चाकराला मलिदा

किर्लोस्कर थिएटरचा थाटाचा उद्घाटनसमारंभ होणें म्हणजे शंकररावांनीं बाळगलेली महत्त्वाकांक्षा पुरी होणें असेंच होतें. ही महत्त्वा-कांक्षा भाऊरावांच्या वेळेपासून त्यांनीं उराशीं बाळगिली होती. त्या वेळीं ती त्यांची महत्त्वाकांक्षा पुरी होण्यासारखी नव्हती. १९०३ मध्यें थिएटरचा प्रश्न निघाला असतां चिंतोबांनीं "थिएटरच्या खर्चावर देखरेख कोण करणार?" असा शंकररावांविषयीं यथार्थच असलेला अविश्वासात्मक प्रश्न टाकला होता. म्हणूनच त्या वेळीं शंकररावांना आपली महत्त्वाकांक्षा पूण करितां आली नाहीं. ती या वेळीं अवास्तव अवाढव्य खर्च करून त्यांनीं पूर्णतेस नेली. उद्घाटनसमारंभ यथासांग साजरा झाला. त्या वेळीं

जे जे लोक बोलले त्यांनीं त्यांनीं एकट्या शंकररावांचींच स्तुतिस्तोत्रें गायिलीं. कर्जाची सर्वस्वी जबाबदारी ज्यांच्यावर, जे कंपनीचे मालक त्या बिचाऱ्या जोगळेकरांचा एकाहि वक्त्यानें नुसता निसटता उल्लेख केला नसेल. यालाच म्हणतात धन्याला धत्तुरा, चाकराला मलिदा.

## चांडाळ चौकडी

थिएटरच्या कामाला सुरवात झाल्यापासून कंपनींतील मंडळींनीं 'आपलें थिएटर होत आहे.' या कल्पनेनें पगार तुंबले तरी घरगुती अडचणी सोडून तक्रार केली नाहीं. आठवड्यांतून चार चार पांच पांच प्रयोगांत कामें पडलीं तरी कामें करतांना कुरकुर केली नाहीं. त्या वेळीं मुंबईशिवाय इतर गांवीं वेळेचें बंधन नसल्यामुळें पहाटे चार चार वाजे-पर्यंत प्रयोग होत असत. त्या वेळीं शंकरराव वगैरे अधिकारी मंडळी " थिएटर सुरू झालें कीं सुट्टी व्हायची " असें सांगत असत. सप्टेंबरमध्यें नव्या थिएटरमध्यें कांहीं प्रयोग झाल्यावर अशी भाषा ऐकूं येऊं लागली कीं आतां थिएटरला कर्ज आहे, तेव्हां सुट्टी आतांच कशाला घ्यायची ? पुढें घेतां येईल. ही भाषा सुरू झाल्यावर पंत परचुरे, चितोबा, दादा लाडू व मी या आमच्या चौकडींत सुट्टी पाहिजेच पाहिजे अशी आग्र-हाची चर्चा सुरू झाली. ती बातमी शंकररावांच्या कानावर जाताच त्यांनीं बुद्धिभेद करून सुट्टीचें वैयर्थ्य प्रत्येकाच्या मनावर बिंबवण्याचा प्रयत्न सुरू केला. प्रथम त्यांनीं नारायणाला संथा देतांच त्यानें शंकररावांना " सुट्टी नको " म्हणून सांगितलें. पंत व चिंतोबा यांना विचारतां ते आपल्या निश्चयापासून ढळले नाहींत. नंतर मला बाजूला नेऊन विचारलें तेव्हां मी सांगितलें मला सुट्टी पाहिजे. आमचा नेट पाहतांच त्यांना नाइलाजानें सुट्टी देणें भाग पडलें. परंतु आपल्या प्रत्येक गोष्टीवर हेतूचा प्रकाश पाडणारी ही चांडाळचौकडी आहे, हें मात्र शंकररावांच्या प्रत्ययाला आलें.

## भ्रमाचा भोपळा फुटला

एके दिवशीं प्रयोग संपल्यावर पहांटे चिंतोबा, पंत व मी मिळून आम्ही शंकररावांजवळ गोष्ट काढली कीं, आम्ही थिएटरचे शेअर्स घेतले

आहेत व त्यांच्या रकमेच्या भरतीसाठीं पगारांतून ठरलेल्या प्रमाणांत पैसे कापून देऊन शेअरची भरती करीत आहोंत, तरी शेअर्सचे फॉर्म काढून आम्हांला पावत्या मिळाल्या पाहिजेत. त्यावर शंकररावांचें ठराविक उत्तर आलें कीं "आहे, होत आहे. लवकरच सर्व व्यवस्था होईल." वास्तविक कोणी किती शेअर्स घेतले, पगारांतून कोणी किती द्यायचे, मंडळींच्या शेअर्समधून किती भांडवल वसूल होईल, शेअरहोल्डर्सवर किती कर्ज राहायचें हें सर्व ठरलेलेंच होतें. "थिएटरचे हिशेब चालले आहेत. तेव्हां हिशेब झाल्यावर सर्व होईल." हें मोघम उत्तर आलें. त्यावर झालेला वादविवाद त्रिकोपाला गेला. आम्ही आजपर्यंत भरलेल्या रकमेच्या पावत्या मिळाल्याशिवाय पुढें पैसे भरीत नाहीं असें निक्षून सांगितल्यावर शंकररावांनीं आपलें खरें स्वरूप प्रकट केलें. ते म्हणाले, "ज्यांना इतका विश्वास नसेल त्यांनीं आपले पैसे परत घ्यावे." इतकें बेपर्वाईचें उत्तर ऐकतांच सर्वांच्या डोक्यांत चक्क प्रकाश पडला कीं आमचें आमचें म्हणून ज्या थिएटरसाठीं श्रमाकडे पाहिलें नाहीं, गैरसोईकडे पाहिलें नाहीं तें आमचें थिएटर असें आमचें आहे. शेवटीं शंकररावांना आम्हीं बजावलेंच कीं तुमचा हेतु आम्हीं जाणला आहे. नंतर आमचा चौकडा बसून आमच्या तोंडाला पानें पुसलीं गेलीं त्याबद्दल खल सुरू झाला. या खलांत निष्पन्न झालें कीं थिएटरचा पाया घालण्याच्या वेळीं जर मंडळींना खरोखरी आमच्या थिएटरची हकीगत कळली असती, तर सामुदायिक सहानुभूतीनें, आपुलकीनें जास्त श्रमानें थिएटरबांधणीचा पैसा पुरलाच नसता म्हणून त्या वेळचें "आमचें थिएटर" आतां आमचें नव्हे अशी अशी पूर्ण खात्री झाली. प्रयोग सुरू झाल्यावर एक दिवस टापरे यांचा पुष्कळशा माणसांचा गोतावळा नाटकाला आला होता. एवढ्या गोतावळ्याचा समावेश गर्दीमुळें होण्यासारखा नव्हता. म्हणून डोअरकीपरनें सांगितलें "गर्दी आहे; जागा नाहीं." त्याबरोबर अर्धे मालक टापरे यांच्या चिरंजीवाची (लक्ष्मणरावांची) मिजास जाऊन त्यांनीं डोअरकीपरच्या श्रीमुखांत भडकावली व शेलक्या शेलक्या शिमग्यांतल्या काव्याचा डोअरकीपरला प्रसाद दिला. थिएटरवर कोण दंगा! नंतर टापरे व शंकरराव यांची जुंपली. किर्लोस्कर थिएटर चांगल्या वस्तींत बांधलें असून त्याला ग्रँटरोडचें स्वरूप आलें.

मार्तंडराव टापरे यांनीं ठोकून सांगितलें 'थेटरला कुलूप ठोकतों, कोण थेटर उघडतोय ? खेळ बंद करीन' वगैरे तार सुरांत प्रलाप सुरू होते. यावरूनहि थिएटरची आमची कल्पना स्पष्ट झाली. टापरे यांच्याशीं जमणार नाहीं, असें अनंत लोकांनीं सांगितलें परंतु टापरे यांस जरबेंत ठेवूं अशा घमेंडींत शंकरराव होते ती घमेंड उतरली. त्यानंतर थिएटरला पंचवीस हजारांऐवजीं त्याच्या तिप्पट खर्च झालेला होता. पंचवीस हजारांपुढें खर्च सुरू करतांना, भागीपत्राप्रमाणें टापरे यांची लेखी संमति पाहिजे होती, ती घेतली नव्हती; त्यामुळें मार्तंडरावहि खुषींत होते. त्यांनीं कांहींजणांजवळ स्पष्ट सांगायला सुरवात केली कीं मी पंचवीस हजारांचे दोन तृतीयांश द्यायला बांधलेला आहें. जास्त रकमेचा माझ्याशीं संबंध नाहीं. त्यामुळें टापरे यांचें अंतरंग उघडें झालें. आमचें थिएटर या आपुलकीचें आमच्या मनांतून पूर्ण ठाणें उठलें.

## मालकीची घाण

सुट्टींत बाहेर गांवची मंडळी घरोघर गेली. मी आपल्या मावसभावाकडे बीना येथें गेलों. सुट्टीच्या काळांत, पेठे यांनीं शंकरराव व जोगळेकर यांच्यावर मोहिनी घातली. आम्हीं सुट्टी संपल्यावर परत येतों तों जोगळेकरांच्या वृत्तींत फरक पडलेला होता. जे जोगळेकर आमच्या चौकडींत नित्य येऊन बसायचे, पत्ते खेळायचे व अत्यंत खेळीमेळीनें वागायचे, ते जोगळेकर आमच्या चौकडींत जरा बीरमंत्रानें निराळे वागूं लागले. बीरमंत्र कोठून आला असावा हें आमच्या लक्षांत आलेंच. आम्हीसुद्धां जोगळेकरांशीं वागण्याचा आमचा पवित्रा बदलला. जोगळेकर समोर दिसले कीं त्यांना अदब दाखवावी, कारणपरत्वें त्यांनीं विचारल्या प्रश्नापुरतेंच उत्तर द्यावें, अगदीं जवळ येऊन उभे राहिले म्हणजे संस्थानांतील दरबारी पद्धतीप्रमाणें तोंडाला पदर लावून उत्तर देण्यांत अतिलवेपणा मुद्दाम दाखवावा. या अशा आमच्या वागण्यानें जोगळेकरांना उसनें आणलेलें मालकीचें सोंग असह्य झालें. अखेर चिडले आणि "तुम्ही माझ्याशीं असें कां वागतां ?" असें आम्हांस विचारलें. ते असें विचारतील अशी आमची खात्री होतीच. आमच्या वागण्याचा

परिणाम झाला. आम्हीहि त्यांना उत्तरादाखल सांगितलें कीं जोंपर्यंत तुम्ही आमच्याशीं खेळीमेळीनें वागत होतां तोंपर्यंत आम्हांलाहि मोकळेपणा वाटत होता. पण तुमच्या वागणुकीला मालकीची घाण येऊं लागली, तेव्हां आम्हाला ती बाधूं नये म्हणून आम्ही स्वच्छतेनें वागत आहोंत. त्यावर त्यांनींहि "आपल्याला असें थोडेंसें वाटूं लागलें होतें हें खरें. आतां तें विसरून जा, चला पत्ते खेळूं या पहिल्यांदा." अशा प्रकारचा खुलासा मोकळेपणानें केला.

या सुमाराला हिराबाई पेडणेकर हिच्याबरोबर जोगळेकरांची मैत्री जुळली. हिराबाईनें "दामिनी" या नावाचें नाटक लिहिलें होतें. श्री. राम गणेश गडकरी याच्या 'गर्वनिर्वाण' नाटकाचे तीन अंक तयार झाले होते. जोगळेकरांची इच्छा आपल्या मैत्रिणीचें म्हणून "दामिनी" नाटक बसवावें. आम्हीं सर्व त्याविरुद्ध होतों. जोगळेकराचा जिच्याशीं जिव्हाळयाचा स्नेहसंबंध तिचें "दामिनी" नाटक. जोगळेकरांना नाखूष करावयाचें नाहीं एवढ्याच बुद्धीनें "हरकत नाहीं, पहा प्रयोग करून" असा शंकररावांनीं ध्वनि काढून ते मोकळे झाले. पण दामिनी नाटक अगदींच सामान्य, किर्लोस्करांच्या कंपनीला शोभण्यासारखें नव्हतें.

गडकरी यांच्या गर्वनिर्वाणची वही शंकरारावांच्या बेडिंगमधून रेल्वेंत हरवली. पण गडकरी यांनीं तें नाटक स्मरणानें फिरून अक्षरान् अक्षर जसेंच्या तसें पहिल्यासारखें लिहून काढिलें. तें नाटक कंपनीनें बसविण्याचें नक्की केलें होतें. पुण्याहून कंपनी नाशिक येथें गेली. तेथें दुसऱ्याच प्रयोगाच्या वेळीं जॅक्सनसाहेब नाटकाला आला असतां अनंत कान्हेऱ्यानें पिस्तुल झाडून त्याचा खून केला. धामधूम उडाली. कान्हेरे पकडला गेला. सर्वत्र पोलिसांचें साम्राज्य झालें. सी. आय. डी. चें ऑफिस कंपनीच्या बिऱ्हाडीं उतरल्यामळें आम्हाला कसलाच त्रास झाला नाहीं.

## विश्वासघात

जळगांवास माझ्या भाचीचें लग्न ठरलें. माझ्या पाठची बहीण मैना तिची ही मुलगी. बहिणीचें लग्न झाल्यानंतर एक वर्षानें प्लेग सुरू

झाला. तेव्हांपासून माझ्या बहिणीनें हालअपेष्टेनें दिवस काढिले. तिचा नवरा तऱ्हेवाईक होता. तो तिचा फार छळ करी. १९०२ सालीं ती वारली तेव्हांच ती हालांतून कायमची सुटली. भाचीला मी संभाळलें होतें. तिचेंच लग्न माघांत व्हावयाचें होतें. कंपनीकडे सुमारें तीनशें रुपये माझी पगारबाकी होती. लग्नाकरितां मला पैशाची आवश्यकता अर्थात् होतीच. पण मागूनहि शंकरराव वेळेवर पैसे देणार नाहींत हा नेहमींचाच अनुभव असल्यामुळें एक महिना अगोदर त्यांना मी सूचना दिली. त्यांच्याकडून तजवीज करीन असें नक्की अश्वासनहि मिळविलें होतें. पण शेवटीं आश्वासन पाळलें नाहीं. आणि अशा रीतीनें ऐन वेळीं माझा विश्वासघात झाला. मी पैशाची व्यवस्था अन्यत्र करून तराणा येथें लग्नाकरितां निघून गेलों.

## गर्वनिर्वाण नाटकाची इतिश्री

गर्वनिर्वाणमध्यें हिरण्यकश्यपू या मुख्य नायकाची भूमिका गडकरी यांनीं माझ्याकरितां लिहिली होती. मला ती आवडलीहि होती. पण जोगळेकरांच्या मनांतून तीच भूमिका करावी असें होतें. हिरण्यकश्यपू गणपतरावांच्याकरितांच लिहिला असून आपल्याकरितां संगीतप्रधान दुसरी भूमिका मी योजिली आहे, असें गडकऱ्यांनीं सांगितलें. जोगळेकर त्यामुळें नाराज झाले. गर्वनिर्वाण कंपनीनें बसविण्यास घेण्यापूर्वी कांहीं दिवस वाशीमकर, हल्याळकर या कंपन्यांमधून लोकप्रियता मिळविलेले बळवंत लक्ष्मण पेठे हे आमच्या कंपनींत पदार्पण करते झाले होते. ते कांहीं काल काशिनाथपंत छत्रे यांच्या सर्कसमध्यें नोकर म्हणून राहिलेले होते. आमच्या कंपनींत येण्यापूर्वी बरेच दिवसांपासून त्यांची माझी थोडीशी दोस्ती होती. त्यामुळें कंपनींत आल्यानंतर ८–१५ दिवस त्यांना वागतांना बुजल्यासारखें होई. पण माझ्याशीं मात्र ते खुलेपणानें वागत. काशिनाथपंत छत्रे यांची सर्कस आणि आमची कंपनी यांचा मुक्काम एके वेळीं वर्ध्यास पडला. वर्ध्यास सौभद्र नाटकांतील नारदाची भूमिका पेठे यांनीं आमच्या कंपनीच्या रंगभूमीवर प्रथम केली. आपलें काम पहाण्यास छत्रे यांना पेठे यांनीं कौतुकानें बोलावलें होतें. रंगभूमीवर पेठे काम करतांना अतिशय घाबरले, प्रवेश कसेबसे उरकून आंत आले. आपलें काम

तालीम करून बसवा असें मी त्यांना अगोदरपासून सांगत असतांहि त्यांनीं तें मनावर न घेतां काम केल्यामुळें त्यांना वाशीमकर, हल्याळकर यांतील लोकप्रियता उपयोगी पडली नाहीं.

पेठे इंग्रजी शिकलेले, वाचनाचे नादी; त्यामुळें नाटकाच्या दुसऱ्या दिवशीं आपल्या नेहमींच्या रीतीप्रमाणें आमच्या कंपनींत ग्यारिक वगैरे इंग्रजी नटांच्या माहितीच्या गप्पा मारूं लागले. पण त्यांना सर्व मंडळीनीं त्यांच्या आदल्या दिवशींच्या कामाबद्दल खूब चिडविलें. चिडविणारांत गडकरीहि एक होते. गडकऱ्यांचें जिव्हास्त्र अगोदरच तिखट; यामुळें त्यांचें चिडविणें पेठे यांना जास्तच झोंबलें.

पुढें गर्वनिर्वाणची तालीम झाली. त्याच्या दुसऱ्या दिवशीं त्यावर वादविवाद झाला. चिडलेले पेठे व चिडविणारे गडकरी यांचीच जुंपली. चिडवाचिडवी चांगलीच झाली. त्यांत गडकरी यांनीं पेठे यांच्याबद्दल आपला गैरसमज अकारण करून घेतला. वादविवादाचा शेवट गडकरी यांना प्रतिकूल असा झाला. जोगळेकर गर्वनिर्वाणांतील त्यांच्याकडे दिलेल्या भूमिकेबद्दल नाखूष होतेच. चिडवाचिडवीचें प्रकरण विकोपाला जाऊन त्या भरांत कंपनी सोडून गडकरी गेले आणि त्यामुळें गर्वनिर्वाण मागें पडलें तें कायमचेंच.

## मालकांची मनोवृत्ती

काशिनाथपंत छत्रे यांनीं जोगळेकर व नारायण यांना आंगठ्या देऊन गौरविलें होतें. त्या वेळीं त्यांच्या स्मरणांतून मी सुटलों होतों. पण समारंभ संपतांच माझी गोष्ट त्यांच्या ध्यानीं आली व त्यांनीं आपली चूक मजजवळ लगेच व्यक्तहि केली होती. त्या गोष्टीचें स्मरण त्यांना होतें आणि वर्ध्यास पेठे यांनीं नारदाचें काम ज्या सौभद्रमध्यें केलें तो प्रयोग पहाण्यास आल्यावेळीं त्यांनीं शंकरराव व जोगळेकर यांना "बोडसांना रंगभूमीवर आंगठी बक्षिस द्यायची आहे" असें सांगितलें. पण "एकट्या गणूला गौरविलेंत तर बाकीच्या मंडळींना वैषम्य वाटेल" असें त्या दोघांनीं छत्रे यांना उत्तर दिलें. तेव्हां ते स्वस्थ राहिले. पण त्यांनीं दुसऱ्याच दिवशीं मला सकस पहावयाला मुद्दाम निरोप पाठविला. माझ्याबरोबर

कंपनींतील सर्व मंडळींनाहि निमंत्रण होतें. सर्कस अर्धी झाल्यानंतर काशिनाथपंत छत्रे यांनीं मला हिऱ्याची आंगठी देऊन माझा गौरव केला. अशा रीतीनें त्यांनीं आपली इच्छा पूर्ण केली. आंगठी बक्षिस मिळाल्याचा आनंद मला झाला. जोगळेकर नारायण यांना आंगठ्या मिळाल्या त्या वेळीं माझी आठवण कोणालाहि झाली नाहीं; मला वैषम्य वाटेल याचा विचार जोगळेकरासारख्या मालकाला सुचला नव्हता; पण मला आंगठी बक्षीस मिळाली त्या वेळीं मात्र तो त्यांना सुचला हें मनांत येऊन माझ्याच मनानें "ही मालकांच्या मनाची हलकी मनोवृत्ति" असें उत्तर देऊन टाकलें.

## भांगेची रंगत

तात्यासाहेब कोल्हटकर यांनीं प्रेमशोधन नाटक लिहिलें तें ऐकण्यासाठीं त्यांच्याकडे मी, शंकरराव, जोगळेकर, नारायण, गडकरी असे सर्वजण गेलों. नाटकाचें वाचन झालें. नाटक सर्वांना आवडलें. कंपनीनें तें स्वीकारिलें. गर्वनिर्वाण रंगभूमीवर आल्यानंतर प्रेमशोधन बसवावयाचें असें त्या वेळीं ठरलें; पण गर्वनिर्वाणची इतिश्री झाल्यानंतर प्रेमशोधनकडेच कंपनी वळली. त्या नाटकाच्या चाली घेण्याकरितां आम्ही कोल्हटकरांच्याकडे खामगांवास गेलों होतों. उमरावतीच्या मुक्कामापासून प्रेमशोधनच्या तालमीस जोरांत सुरवात झाली होती.

कंपनीनें अकोला घेतलें. तेथें भयंकर उन्हाळा. उन्हाळ्याचा त्रास कमी वाटावा म्हणून आम्ही थंडाई घेत असूं. थंडाई घेण्याच्या प्रकारामुळें आम्हा सर्वांची एकदां खूबच गंमतीची तारांबळ उडाली. प्रेमशोधनची तालीम पहाण्यासाठीं म्हणून कोल्हटकरांच्या सांगण्यावरून चांद्याचे रावसाहेब गोपाळराव बापट अचानक कंपनीकडे आले. मंडळी काय, भांग पिऊन लुल झाली होती. त्यामुळें तालमीला औरच मजा आला. एकालाहि बोलतांना वाक्यापुढें वाक्य आठवेना. आठवून वाक्य सुरू करावें तें दुसऱ्याच एखाद्या नाटकांतलें असावें, डोळे तारवटलेले; मग वर पहाण्याचें धैर्य कोणाच्या अंगीं असणार ! वाक्य विसंगत उच्चारल्याचें लक्षांत आलें म्हणजे 'अजून चांगलें पाठ नाहीं म्हणून असें

होतें. ' अशासारखी सारवासारवी करावी; पण शेवटीं शेवटीं थापाथापीनें निभेना. तेव्हां बापट यांना थंडाईचा प्रकार सांगून टाकावा लागला. रावसाहेब बापट यांनीं हंसत हंसत " तुम्हा पुण्याकडच्या लोकांना इकडचा उन्हाळा जास्त वाटत असला पाहिजे " असें म्हटलें. ते तरी यापेक्षां काय म्हणणार ?

भांगेची यापेक्षांहि विलक्षण गंमत एकदां १९०९ मध्यें विजापूरला झाली होती. गीतामृत–शतपदीकर्ते बाबा गर्दे हे त्या वेळीं विजापुरास होते. किर्लोस्कर कंपनींत पंचपदी थाटाची होत असे हें बाबा गर्दे यांना माहीत होतें. त्यांनीं ती ऐकण्याची इच्छा दर्शविली. जोगळेकरांनीं त्यांना कबूल केलें. चार दिवसांवर शिवरात्र आली होती. त्या दिवशीं पंचपदी ऐकण्यास ते येणार होते. शिवरात्रीला जोगळेकराच्या एका गवई मित्रानें आम्हाला भांगेची मेजवानी दिली. त्यांत जोगळेकर, नारायण, परचुरे, चिंतोबा, मी, गडकरी आणि आणखी कांहीं मंडळी यांनीं भांग घेतली. घरून निघतांना आम्हाला जमीन अधांत्रीं दिसूं लागली. घरीं येऊन खायला जें मिळालें त्यावर टोळासारखे तुटून पडलों, आणि आपापलीं अंथरुणें धरलीं. मी व जोगळेकर शेजारच्या घरांत शिरूं लागलों, तेव्हां दिव्याच्या प्रकाशामुळें रस्त्यावर घराची सावली पडलेली पाहून जोगळेकर आणि मी आपापलीं धोतरें वर आवरून धरूं लागलों. बरोबरच्या इसमानें " रस्ता साफ आहे. धोतरें कां वर धरितां ? " असें म्हटलें. तेव्हां जोगळेकरांनीं " रस्त्यांत चिखल दिसतो आहे असें सावलीकडे बोट दाखवीत म्हटलें. सोबतच्या इसमानें ' चिखल नसून सावली आहे ' असा खरा खुलासा केला. तेव्हां मनाला सावरीत आम्ही घरांत शिरलों. भांग चढून कोणी वीररसप्रधान वाक्यें बडबडूं लागला; जन्मांत न गाणारा तार सुरांत गाऊं लागला; कांहीं दुसऱ्याच्या गळयाला मिठ्या मारून रडूं लागले. नारायण तर " जीभ टाळयाला चिकटून बसली. माझ्या आईबापांना संभाळा. मी मरतों " असें बडबडत आपलें मृत्युपत्र सांगूं लागला. इतकें होऊन जागजागीं आम्ही पडतों आहोंत तोंच पंचपदी ऐकायला बाबा गर्दे आले. त्यांना बसवून

कृष्णाप्पा आम्हांला उठवायला आला. पण उठणार कोण? मल उठवूं लागला. "तुम्ही कोणी उठत नाहीं; बाबांना काय सांगूं?" कृष्णाप्पाच्या या प्रश्नाला मी उत्तर दिलें "त्यांना सांग, सर्वांनीं भांग पिण्याचा गाढवपणा केला आहे. आतां सारे मरून पडले आहेत. मीहि मेलों आहे!" (ही हकीगत दुसऱ्या दिवशीं कृष्णाप्पानें मला सांगितली.) बाबा गर्दे रागावले. जोगळेकरांनीं दिलगिरी दाखविली आणि प्रकरण संपविलें.

## तुकारामबुवा अजून जन्माला यावयाचे आहेत

नगर मुक्कामीं जोगळेकर, चिंतोबा व मी बसलों असतां थिएटर-संबंधीं चर्चा करीत होतों. तेव्हां मालकीच्या ऐटींत जोगळेकर "मंडळी-साठीं काय करायचें मी ठरविलें आहे, तें मी बोलून दाखवीत नाहीं. पुष्कळ करणार आहें." त्यावर "असे तुकारामबुवा अजून जन्माला याव-याचे आहेत" असें मी स्पष्ट बोलून गेलों! वाद वाढता वाढतां शेवटीं खूबच विकोपाला गेला.

## साईबाबांचा आशीर्वाद

मला साधु, संत, ज्योतिषी यांना भेटण्याचा पहिल्यापासून बिलकुल नाद नव्हता. पण नगरास असतां मला शिरडीच्या साईबाबांचें दर्शन घेण्याची इच्छा झाली. कोणी एखाद्यानें साधुसंताच्या दर्शनाला मला चल म्हटलें तर मी तर जात नसेंच पण उलट जाणाऱ्यांची हेटाळणी करीत असें. पण त्या वेळीं मलाच एकदम इच्छा झाली खरी. कोपर-गांवीं मामलेदार असलेल्या बाळासाहेब मिरीकर या माझ्या मित्रांनीं मला बोलावलें होतें. एका रविवारीं मी त्यांच्याकडे गेलों. तेथून दुसऱ्या दिवशीं शिरडीस गेलों. साईबाबा मशिदींत होते. भक्तगण त्यांची पूजा करीत होता. मी बाबांसमोर जाऊन डोकें टेकलें आणि नारळ व सुकी तंबाखू त्यांच्यापुढें ठेविली. त्यांनीं चिलीम भरण्यास सांगितलें. माझी चौकशी करून दक्षिणा मागितली. मी एक रुपया पुढें ठेविला. बाबांनीं मला जेवण करून जाण्यास सांगितलें. बोलतांना मध्येंच "आपापसांत भाडत्यांत, त्याला बाबानं काय करावें?" असें बाबा म्हणाले. दोनच दिव-सांपूर्वी माझें व जोगळेकरांचें झालेलें भांडण बाबांना कळलें हें लक्ष्यांत

येऊन मला बाबांच्या अंतःसाक्षित्वाची खूण पटली. मी जेवायला मागील इमारतींत गेलों असतां तेथल्याच एकानें "बाबांनीं दक्षिणा मागितल्यावेळीं त्यांच्या हातावर सारें पाकीट ओतावयाचें होतें" असें म्हटलें. मला मग चुटपुट लागली. निघावयाच्या वेळीं बाबांचा निरोप मागायला गेलों. तेव्हां त्यांची श्मश्रू चालली होती. मी पायांवर डोकें ठेविलें. बाबांनीं "निघाला?" असें विचारिलें. "परवानगी मागायला आलों आहे" मी बोललों. बाबांनीं "जा" म्हटलें आणि पुन्हां दक्षिणा मागितली. तेव्हां मला अति आनंद झाला आणि पाकिटांतील सर्व पैसे बाबांच्या हातावर मी ठेवले. बाबांनीं माझ्या कपाळाला अंगारा लावला व डोक्यावरून हात फिरवून "मला दक्षिणा दिलीस, नारायण तुला पुष्कळ देईल" असा आशीर्वाद दिला. तो बाबांचा आशीर्वाद माझ्या पुढच्या आयुष्यांत अक्षरशः खरा झाला. त्यानंतर आजपर्यंत मी कोणत्याहि साधूच्या दर्शनाला गेलों नाहीं. साईबाबा स्वतः ऐश्वर्य भोगीत नसत. एक फाटकी कफनी, एक फुटकी काळवट बिनछापी चिलीम, बसायला एक गोणपट इंच बाबांचें ऐश्वर्य. दक्षिणा मागत पण ती ते एकीकडे घेत, दुसरीकडे देऊन टाकीत. म्हणूनच त्यांच्याबद्दल पूज्यबुद्धि वाटली आणि मी खऱ्या भक्तिभावानें त्यांच्या पाया पडलों.

## प्रेमशोधन

कंपनीनें चालू सामानावर नगर येथें प्रेमशोधनाचा रंगी तालमीसारखा प्रयोग केला. पुण्यास तात्यासाहेब कोल्हटकरांना कंपनीनें रंगी तालीम दाखविली. पुण्याच्या प्रेक्षकांनीं प्रेमशोधनाचें उत्तम स्वागत केलें. इंदिरेच्या साध्या वेषांत नारायण मोह पाडण्याइतका सुंदर दिसे. आम्हां दोघांचीं कामें उत्कृष्ट होत. त्यांतहि पांचव्या अंकांतील कंदन-इंदिरेचा प्रवेश बहारीचा होत असे.

माझ्या "कंदन" व "शुक्राचार्य" या भूमिकांची कांहीं वर्षांपूर्वी "सूत्रधार" या टोपण नांवाखालीं—मला वाटतें ते वरेरकर असावे—वर्तमानपत्रांतील लेखांत फार तारीफ केली होती. कारण नसतांना कोणाबद्दलहि अनुदारपणानें लिहिणाऱ्या वरेरकरासारख्यांच्या लेखणींतून ती

तारीफ उतरली असल्यामुळें माझ्या त्या त्या भूमिका उत्तम होत असत, असें छातीठोकपणें मला म्हणायला काय हरकत आहे ?

प्रेमशोधनाची रंगी तालीम पहायला तात्यासाहेबांच्या बरोबर कृष्णाजीपंत खाडिलकर आले होते. केसरीचे संपादक, नाणावलेल्या गद्य नाटकांचे कर्ते असल्यामुळें त्यांच्याबद्दल आमच्या मंडळींत बराच आदर होता. प्रेमशोधनाचा जाहीर प्रयोग होण्यापूर्वी त्याच्या तालमी खाडिल. कर यांनीं मी घेईन असें सांगितलें. सर्वांना आनंद झाला. मला कसेंसेंच झालें. मनाशीं मी नाखूष झालों. तरीहि शिस्त पाळण्यासाठीं म्हणून खाडिलकरांच्या अनैसर्गिक नाट्यशिक्षणपद्धतीचा–कुटकीचा काढा–घेणें प्राप्तच झालें. आम्ही खाडिलकर सांगतील तें ऐकत असूं. पण रंगभूमीवर देवलांच्या शिक्षणपद्धतीचा ठसा उमटवीत असूं.

प्रेमशोधनाच्या तालमी घेण्याच्या निमित्तानें खाडिलकरांचा किर्लो. स्कर मंडळीशीं संबंध आला. खाडिलकरांच्या गद्य मनोवृत्ति संगीताकडे विशेषतः नारायणाच्या गाण्याकडे १९०७ सालापासून आकर्षिल्या होत्या. तें आकर्षण प्रेमशोधनाच्या तालमी घेतांना वाढीस लागलें. त्यांतच शंकर-रावांनीं त्यांना आपल्या मंडळीसाठीं नाटक लिहावयास आग्रहाची विनंती केली. त्यांनींहि ती मान्य करून "मानापमान" लिहिण्याचें निश्चित केलें.

## नट आणि नाटककार

मानापमान नाटकाचे तयार झालेले दोन अंक कंपनींत ज्या वेळीं वाचले तेव्हां एक मौज झाली.

कोणत्याहि नाटकाचें वाचन मी उत्तम करितों असा कंपनींत माझा लौकिक झाला होता. त्यामुळें कंपनींत वाचनासाठीं आलेल्या नाटकांचें वाचन मी करी. त्यामुळें मानापमानाचे दोन अंक मीच वाचिले. आणि अशा रीतीनें वाचतांना ज्यांना मजकुराचें आकलन होतें, त्यांना लिहिणाराचें मनोगत समजतेंच समजतें. नटाला तर या गोष्टीची अत्यंत जरूरी आहे.

## लक्ष्मीधराला प्राधान्य लाभलें

मानापमानामधील पात्रें वांटतांना खाडिलकरांनीं अशी योजना केली. धैर्यधर, जोगळेकर; मुकुटधर ( नंतरचा लक्ष्मीधर ), चिंतोबा; विलासधर,

बोडस. नाटकाच्या वाचनाच्या वेळीं लक्ष्मीधर व विलासधर यांचे प्रवेश वाचतांना, लक्ष्मीधराचीं वाक्यें मी ज्या रीतीनें वाचलीं, त्याचा परिणाम खाडिलकरांच्या मनावर फार झाला. सर्व मंडळी हंसत होती. ताबडतोब तेथेंच त्याच बैठकींत खाडिलकरांनीं सांगितलें, "लक्ष्मीधराचें काम गणपतरावांनीं करावें व विलासधराचें दुसऱ्या कोणीहि करावें." त्याप्रमाणें लक्ष्मीधर वाढविला आणि विलासधर खलपुरुष म्हणून जो निर्माण करायचा होता तो कमी केला. अशा रीतीनें लक्ष्मीधराला प्राधान्य लाभलें.

## पदांचें विटाळें

नंतर जोगळेकरांनीं विचारलें, "पदें कोण करणार?" "माझीं मी करणार" खाडिलकरांनीं उत्तर दिलें. त्या वेळेपर्यंत खाडिलकरांनीं गद्य पुष्कळ लिहिलें होतें; परंतु त्यांनीं केलेली एकादी ओंवीदेखील आमच्या ऐकिवांत नव्हती. दुसऱ्या दिवशीं त्यांनीं चारचार, पांचपांच मात्रांचें विटाळें करून त्यांत शब्द ठोकून सांचा तयार करून आणला आणि म्हणाले, "याला आतां चाल लावा." जोगळेकर आदिकरून सर्व मंडळींना विजेचा धक्का बसला. एकमेक बारीक बारीक कुजबुजूं लागले. सांचा समोर धरून जर अशा चाली लावायच्या तर मग मनासारखी चाल देऊन पद करून घेऊन गाण्याची आशाच नको. पूर्वी कॉलेजमधून संस्कृत नाटकें करीत असत त्या नाटकांचे कर्ते दिवंगत होऊन अनंत काल लोटला होता. अशा वेळीं चाली देऊन पदें करून घेणें शक्य नव्हतें. परंतु आतां तें शक्य असतांना या विटाळयांना चाली कशा लावायच्या? मोठा पेंच पडला. ही अडचण खाडिलकरांना सांगितली. ते म्हणाले, "काय हरकत आहे?" मंडळींनीं कपाळाला हात लावला. दुसऱ्या दिवशीं नमनाचें पद "नमन नटवरा विस्मयकारा" करून आणलें; "मोदहराचा प्रेम वाढवो" हें तयार झालें. या पदांना चाली लावायचें काम जोगळेकर व चिंतोबा यांच्या कपाळीं आलें. तेच दोघे संगीतांतले तज्ञ. जोगळेकरांनीं कंटाळून शरण चिठ्ठी दिली. चिंतोबांनीं मात्र या तिन्ही पदांना चाली लावण्याचा चंग बांधला. चाली त्यांनीं लावल्या, पण त्यांत शब्दांची थोडी ओढाताण होत होती. गणमात्रांनीं

प्रमाणबद्ध असलेलीं पदें म्हणण्याची आम्हांला संवय. खाडिलकरांचीं पदें आम्हांला कर्णकटु वाटत. परंतु खाडिलकरांनीं "असूं द्या" असें सांगितलें; आणि ऱ्हस्वदीर्घांच्या ओढाताणीबद्दल "असूं द्या" हें तत्त्व त्यांनीं आजपर्यंत अबाधित राखलें आहे.

पदांच्या चाली लावण्याचा दुर्घट प्रयत्न संपल्यावर मग मात्र त्यांनीं चाली घेऊन पदें करायचीं असें ठरविलें. मात्र चाली देतांना चालीच्या अक्षरांखालीं मात्रांच्या खुणा करून द्याव्या लागत. नंतर तालासुरांत पदें म्हणून बघायचीं. साधारण चालण्यासारखीं असलीं तर चालवून घ्यायचीं. फारच ओढाताण होऊं लागली तर बदलायला सांगायचें. अशा रीतीनें सुमारें दहा पंधरा पदें तयार झालीं. कंपनी मिरज, इचलकरंजी येथें जाऊन १९१० सालच्या डिसेंबरांत मुंबईला आली.

## मानापमान

तालमी सुरूं झाल्या. खाडिलकर स्वतः तालमी देत असत. जोगळेकरहि हौसेनें मेहनत करूं लागले. पदांच्या चाली जोगळेकर व टेंबे यांनीं दिल्या होत्या. टेंबे देवलसर्कसमधून नोकरी सोडून आले होते. तालीम दिवसांतून पांचसहा तास चालत असे. नवे सीन, नवे कपडे, नवे दागिने तयार होऊं लागले. मानापमानापासून खाडिलकरांचा व नारायणाचा विशेष ऋणानुबंध उत्पन्न झाला; व नारायणाबद्दल खाडिलकरांना जास्त आपुलकी वाटायला लागली. सगळी तयारी होऊन तारीख १२ मार्च १९११ रविवार रोजीं दिवसा मानापमान नाटकाचा पहिला प्रयोग लागला. त्या दिवशीं सकाळीं नारायणाची तान्ही मुलगी देवीच्या आजाराला बळी पडली. सर्वांना वाईट वाटलें. प्रथम प्रयोगाला अपशकुनच झाला असें वाटलें. नारायणाला अपत्यमरणाचें दुःख तर झालेंच पण तें साधारणच.

दुपारीं प्रयोगाला सुरवात झाली. भामिनीच्या वेषांत नारायण रंगभूमीवर आल्याबरोबर खाड् खाड् टाळी पडली. 'हा टकमक पाही' या पदाच्या लकेरीबरोबर त्यानें प्रेक्षकांचीं मनें भारून काबीज केलीं. नंतर माझा लक्ष्मीधराचा प्रवेश सुरूं झाला. दागिन्यांच्या भारानें नटलेला माझा वेष पाहून लोकांच्या हास्याला भरतें आलें. थिएटरभर टाळयांचा

गजर झाला. प्रत्येक वाक्याला लोक गदगदां हंसून प्रोत्साहन देऊं लागले. जोगळेकर रंगभूमीवर आल्यानंतर पुन्हां टाळी पडली. त्यांच्या पहिल्या तीन पदांना प्रेक्षक चित्राप्रमाणें स्तब्ध होते. दुसऱ्या अंकांतला तरवार धरण्याचा माझा प्रवेश फारच रंगला. हंशानें थिएटर हलत होतें नुसतें. भामिनी–धैर्यधराच्या प्रवेशामध्यें जोगळेकरानीं कामाची–विशेषतः गायनाची इतकी बहार केली कीं नारायणाचीं पदें फिकीं वाटूं लागलीं. तिसऱ्या अंकांत नारायणानें तर कवाली गाण्याची कमाल केली. चौथ्या अंकांत भामिनी-धैर्यधराच्या प्रवेशांत जोगळेकरच उठावदार ठरले. चौथ्या अंकांतील धैर्यधर, विलासधर व लक्ष्मीधर यांच्या प्रवेशांत प्रथम लक्ष्मीधराचें आत्मगत भाषण, नंतर तिघांचा प्रवेश, “ त्या कोण ? ” हें वाक्य तोंडांतून बाहेर पडल्याबरोबर जो हंशा उसळला तो दोन तीन मिनिटें थांबलाच नाहीं. पुढच्या प्रत्येक वाक्याला इतका भयंकर हंशा होई कीं तो थांबेपर्यंत भाषण थांबवावें लागे. शेवटीं सुंदर नाच होऊन प्रयोग संपला. दुसऱ्या दिवशीं सगळ्या मुंबईभर मानापमानांतील धैर्यधर, भामिनी, लक्ष्मीधर आदीकरून पात्रांनीं बहार केली असा पुकारा होऊन दोन दोन आठवडे तिकिटें मिळायची पंचाईत पडूं लागली.

## इकडे आड तिकडे विहीर

किर्लोस्कर थिएटर बांधून सुमारें पावणदोन वर्षें होऊन गेलीं. परंतु त्याचे हिशेब अजून पुरे झाले नव्हते. शंकरराव थिएटरवर येऊन जाऊन देखरेख करीत असत. शंकररावांचें घरहि पुण्यासच होतें. त्यामुळें १९०७ सालीं थिएटरचा करार झाल्यापासून कंपनीच्या खर्चानें पुण्यास वरचेवर जाण्यायेण्याची सोय झाली होती. थिएटरच्या हिशेबावर देखरेख करण्याचें व हिशेब पक्के तयार करण्याचें काम शंकररावांनीं आपल्या एका आप्त गृहस्थावर सोंपविलें होतें. परंतु थिएटरच्या हिशेबाची अजून रुजवात झाली नव्हती अगर ते तयार झाले नव्हते असें कांहीं तरी होतें. आम्हीं नित्य जोगळेकरांच्या मागें लागून त्यांना डिवचित असावें, ‘ थिएटरचे हिशेब पुरे कधीं होणार ? नक्की खर्च किती झाला हें तुम्हांला कळणार तरी कव्हां ? ’ आमच्या या टुमणीला कंटाळून मोठें धाडस करून त्यांनीं

शंकररावांना एक दिवस विचारलें. "दोन हातांनीं काम करतों आहे; होईल तेव्हां होईल." त्यावर शंकररावांचें हें उत्तर. पुन्हां गांठ पडल्यावर जोगळेकरांनीं आम्हांला सांगितलें, "शंकररावांना विचारलें; त्यांनीं लवकरच करतों म्हणून सांगितलें." पण त्या दोघांचा झालेला संवाद मी ऐकला होता. "कशाला उगाच स्वतःला सावरून धरतां? शंकरराव काय म्हणाले तें मी ऐकलें आहे." या दुहेरी माऱ्यानें जोगळेकर रंजीस झालेले दिसले. मालक या नात्यानें शंकररावांना सरळ विचारण्याचेंदेखील मनोधैर्य त्यांच्या अंगीं नव्हतें. ते कीचकवधांतील विराट झाले होते. परंतु आमचें म्हणणेंहि रास्त आहे हें त्यांना पटत होतें.

## पगारवाढीकारितां पयाय

१९०२ सालीं शंकररावांचा पगार पंचेचाळीसाचा साठ झाला होता. नंतर १९०९ सालीं थिएटर पुरें झाल्यावर आपल्या पगारांत वाढ व्हावी म्हणून त्यांनीं एक युक्ति लढविली. किर्लोस्कर कंपनीसाठीं एक मॅनेजर पाहिजे अशी जाहिरात वर्तमानपत्रांत त्यांनीं दिली. ती जाहिरात वाचतांच सर्वांना आश्चर्य वाटलें. त्या वेळीं हुबळीहून गोपाळराव सुळे आलेले होते. एक दिवस त्यांनीं आम्हाला बोलावून विषय काढला. "शंकरराव थिएटरच्या दगादगीनें (!) थकले आहेत. त्यांना आतां विश्रांति पाहिजे आहे. तेव्हां त्यांच्या जाग्याला एक माणूस लायख असून तो तुमच्या येथेंच आहे." जो तो एकमेकांच्या तोंडाकडे पाहूं लागला. असा लायख माणूस कोण याची कल्पनाच कोणाला येईना. नंतर त्यांनीं पेठे यांच्याकडे नजर टाकली. आम्हांला कल्पना येऊन चुकली. गोपाळरावांचें डोकें फिरलें असावें असा भास झाला. १९०५ सालीं त्यांना खरोखरीचा बुद्धिभ्रंश झाला होता त्यांतून ते लवकरच बरे झाले होते. पुन्हां पांच वर्षांनीं त्यांना हा झटका आला असावा असें आम्हांस वाटलें. आमची चलबिचल झालेली पाहून त्यांनीं पेठे यांचें गुणवर्णन सुरूं केलें. "हा मनुष्य फार हुषार आहे. डेप्युटी कलेक्टरच कोठें तरी व्हायचा पण दुर्दैवानें नाटक कंपनींत आला आहे. त्याला म्यानेजर करूनशेनी टाका." (करूनशेनी, देऊनशेनी असा शब्दप्रयोग ते केव्हां केव्हां करीत असत.) एकेकाचें मत अजमावूं लागले.

चिंतोबांनीं नापसंती दर्शविली. मला विचारतांच स्पष्ट सांगितलें, " शंकररावांना विश्रांति पाहिजे असेल तर खुशाल घेऊं द्या. कोणीहि माणूस नेमून त्यांचें काम करून घेतां येईल. वास्तविक पेठे माझे स्नेही आहेत. परंतु आजपर्यंतच्या त्यांच्या चरित्रक्रमावरून ते आमच्या कंपनीचे मॅनेजर व्हायला योग्य आहेत असें मला वाटत नाहीं." मंडळीच्या मताचा रागरंग पाहून मॅनेजरच्या जागेची माळ पेठे यांच्या गळयांत घालायची होती तें रहित झालें. या वाटाघाटींतून शंकररावांचा मात्र फायदा झाला. त्यांना साठाचे शंभर झाले. जबाबदारीच्या दृष्टीनें किर्लोस्कर कंपनीच्या व्यवस्थापकाला शंभर रुपये पगार गैरवाजवी नव्हता. मला पगार वाढवा असें सांगायला शंकररावांना अवघड वाटत होतें. त्याकरितां पेठ्यांना पुढें करून त्यांनीं हा पर्याय केला एवढेंच.

## पुन्हां संसार मांडला

बायकोला बरोबर घेऊन कंपनीबरोबर मिरजेस गेलों. तेथें स्वतंत्र बिऱ्हाड केलें. पुन्हां चार वर्षांनीं संसार मांडला.

## किर्लोस्कर कंपनीस दृष्ट लागली

हुबळीस प्रयोगांना भयंकर गर्दी होत होती. घरासमोरचा रस्ता तिकिटें विकत घेणाऱ्या माणसांनीं अगदीं भरून जात असे. मानापमानाच्या एका प्रयोगाचें उत्पन्न धर्मार्थ दिलें होतें. त्या दिवशींचा प्रयोग फारच रंगला होता. प्रयोग संपल्यावर सुळे म्हणाले " खरोखर कंपनींतला नटवर्ग दृष्ट लागण्यासारखा आहे. कंपनीनें आपलें पूर्व वैभव हस्तगत केलें " आणि सुळे यांच्या म्हणण्याप्रमाणें त्या वेळीं किर्लोस्कर कंपनीला दृष्ट लागली.

## जबाबदारी ओळखली नाहीं

थिएटरचे हिशेब एकदांचे पुरे झाले, असें आम्हांस समजलें. पण थिएटरच्या खर्चापैकीं कंपनीनें किती दिले, सावकाराकडून किती आणले, दुकानदारांकडून माल किती आणला, नक्की खर्च किती झाला, किती देणें शिल्लक राहिलें, या गोष्टी तपशिलवार कळायला पाहिजे होत्या.

हिशेब करणारांना विचारलें म्हणजे ते सांगत " आमच्या तोंडाला कुलूप पडलें आहे !" मग खुबीखुबीनें विचारून आम्हीं त्यांच्याकडून सगळें काढून घेतलें. कंजारणीच्या जटा उकलायच्या कठीण असतें. मजूर एकच; मजुरी दिली एकाचीच. पण हजेरी बुकांत लिहिलेली तीन निरनिराळ्या नांवांवर तिघांची. उदाहरणार्थ, रामा पांडू कदम, या एका मजुराची हजेरी मांडलेली असायची, रामा कदम, रामा पांडू, रामभाऊ पांडोबा कदम या तीन नांवानें; असें कळलें. ही शंकररावांची कारवाई नव्हती; हजेरी मांडणारे व पैसे देणारे यांची होती. शंकररावांनीं जर हिशेब वेळच्या वेळीं तपासले असते तर त्याना ही कारवाई कळून आली असती. परंतु या कामीं शंकररावांनीं आपल्यावर असलेली जबाबदारी ओळखली नाहीं असें म्हणणें भाग आहे.

## किर्लोस्कर कंपनीवर तिसरा आघात

कंपनी हुबळीहून बेळगांवास गेली. तेथें डॉ. जोगळेकर यांच्या जाग्यांत मांडवाचें थिएटर बांधायचें कॅन्ट्रॅक्ट सामंत आप्पा पत्तावळे या गृहस्थास दिलें होतें. बांधलेलें थिएटर इंजिनिअरांनीं नापास केलें. तेव्हां त्यांच्या मताप्रमाणें दुरुस्त्या केल्यावर थिएटर पास होईल असा ज्या दिवशीं हुकूम मिळाला त्याच दिवशीं जोगळेकरांना ताप भरला. दहा दिवस झाले; ताप कांहीं हटेना. नंतर त्यांना उचकी लागली. डॉ. गाडगीळ कोल्हापुराहून येऊन रात्रंदिवस त्यांच्याजवळ जागत बसले होते. औषध डॉ. कित्तूरचें होतें. ताप मलेरियाचाच असें डॉक्टरांचें मत. दोन दिवस अगोदर माझ्या कुटुंबाला मिरजेस आणण्यासाठीं कोल्हापुरास गेलों.

कुटुंबास घेऊन मिरजेच्या स्टेशनवर आलों तो स्टेशनवरच एक ओळखीचे गृहस्थ लांबून दिसले. त्यांनीं हातांनींच मला लवकर जा असें खुणावलें. मला कांहीं उमज पडेना. मनाला मात्र चरका बसला. घराजवळ जातों तों दरवाजाबाहेर प्रेतवाहनाची तयारी चाललेली. कळून चुकलेंच कीं घात झाला !

मंगळवारीं जोगळेकरांना बेळगांवहून मिरजेस आणलें होतें. डॉ. हेल यांनीं तपासून निराशाच प्रदर्शित केली होती. बुधवारीं सकाळपासून त्यांना

खांकऱ्याबरोबर व नाकांतून रक्त पडूं लागलें; व दुपारीं दोन वाजण्याच्या सुमारास जोगळेकरांचें प्राणोत्क्रमण झालें होतें! किर्लोस्कर कंपनीवर कर्ता पुरुष जाण्याचा हा तिसरा आघात!!!

घराच्या मागच्या दरवाजानें आंत गेलों. मला पहातांच जोगळे-करांच्या कुटुंबानें हंबरडा फोडला, "गणपतराव, तुम्हीं तरी हांक मारा हो" मी मट्टदिशीं खालीं बसलों. एकीकडे जोगळेकरांचे वृद्ध वडील व दुसरी कडे त्यांची पत्नी. "गण्या, नाना कसा गेला रे" म्हणून जोगळेकरांचे वडील मोठ्यानें आक्रोश करीत. दोघांना समजुतीच्या गोष्टी सांगून शांत करीत होतों. बाहेर शंकरराव व डॉ. गाडगीळ दिङ्मूढ होऊन स्तब्ध बसले होते. जोगळेकरांच्या कुटुंबांत माझा जास्त घरोबा. त्यामुळें त्यांचे वडील व त्यांच्या पत्नी हीं मला गच्च धरून सारखा आक्रोश करीत होतीं. मोठाच आकांत झाला. शंकरराव बेळगांवास गेले. जोगळेकरांसारख्या लोकप्रिय नटाच्या स्मशानयात्रेला दहा बारा माणसांपेक्षां जास्त माणसें मिळालीं नाहींत. मी स्मशानांत न जातां घरची व्यवस्था पहावी व त्या दोघांचें सांत्वन करावें असें डॉ. गाडगीळांनीं सांगितलें. घोटाळा होण्याचा संभव होता म्हणून जोगळेकरांच्या कुटुंबाच्या चीजवस्तूंच्या ट्रंकांना सीलें केलीं. अशी खबरदारी घेणें भाग होतें.

दुसऱ्या दिवशीं बेळगांवहून शंकरराव व कांहीं मंडळी, हुबळीहून सुळे व डॉ. गोरे, पुण्याहून गायनाचार्य भास्करबुवा, टेंबे व नारायणराव चिटगुप्पी वगैरे मंडळी आली; व पुढें काय करायचें, नायकाच्या कामा-साठीं मनुष्य कोण आणायचा, याची वाटाघाट सुरू झाली. मी गोरे यांचें नांव सुचविलें; पण शंकररावांनीं नापसंती दर्शविली. टेंबे यांचें नांव पुढें आलें. भास्करबुवांनीं कांहीं दिवस काम करावें असें सुळे यांनीं सांगितलें. भास्करबुवा म्हणाले, "माझा नाटकाचा व्यासंग सुटून वीस वर्षांवर दिवस होऊन गेले आहेत. मला तें आतां साधणार नाहीं. परंतु एवढ्याकरितांच जर कंपनी सुरू करतां येत नसेल तर मग पाहूं." या त्यांच्या आश्वासनानें धीर आला. मानापमान व सौभद्र हीं दोन नाटकें खेरीज करून बाकीच्या सर्व नाटकांत नायकाची भूमिका मी करावी आणि काम पुढें चालू करावें असें ठरलें.

## किर्लोस्कर कंपनीची " गोदी "

कंपनी बेळगांवहून मिरजेस आली व तेथेंच पुढची सर्व तयारी करायची होती. नारायणाच्या हितचिंतकांचा–पंडीत आणि को. चा–तांडाहि त्याचें हित कसें होईल, या विवंचनेनें कंपनींत येऊन दाखल झाला. पूर्वापार मिरजेचे अधिपती श्रीमंत बाळासाहेब मिरजकर यांना किर्लोस्कर कंपनीबद्दल आपुलकी वाटे. भाऊराव आजारी पडले आणि जोगळेकर काम करावयास लागले या दरम्यानचा मुक्काम मिरजेस; गोरे गेल्यानंतर नारायण आला, त्याची थोडी तयारी होईपर्यंत मुक्काम मिरजेस; आणि आतांच्याहि प्रसंगाला मुक्काम मिरजेसच. एकंदरींत मिरज म्हणजे आगबोटींच्या दुरुस्तीसाठीं जशी गोदी असते, तशी किर्लोस्करांची गोदी झालेली होती. याचें कारण मिरजेच्या अधिपतींची किर्लोस्कर कंपनीवर पूर्ण मर्जी होती व सर्व तऱ्हेची मदत ते करीत असत.

रामभाऊहि मिरजेस ठाण मांडून बसले. एक दिवस त्यांनीं पिल्लूं सोडलें, "कंपनी सूरू करायची जबाबदारी मी घेतों. मी कुठें कंपनी सोडली आहे?" रामभाऊंचा हा लोभीपणा पाहून सर्वांचें पित्त खवळलें. मी त्यांच्या तोंडावर विचारलें, "कंपनी चालविणार म्हणजे करणार काय? तुम्हीं मालक म्हणून रहाणार आणि कंपनी चालविणार असाल तर आम्ही कोणीहि कंपनींत रहायला तयार नाहीं." हें मंडळीचें स्वरूप पहातांच त्यांनीं आवरतें घेतलें व जोगळेकरांच्या कुटुंबाला आपला भाग २२०० रुपयांस विकला. अशा रीतीनें कंपनीला पडलेला रामभाऊंच्या मालकीचा विळखा सुटला.

## संस्था खिळखिळया कां होतात ?

१९११ सालीं मुंबईत असतांना शंकरराव एकदां म्हणाले, "मी एकट्यानेंच काय काय पहायचें ? कंपनींतील कोणीहि माझा भार हलका करायला तयार होत नाहीं. मी नसलों तर कंपनी एक दिवसदेखील चालणार नाहीं." तेव्हां मी त्यांना सुचविलें, "शंकरराव, तुम्ही इतकी दगदग कां करतां ? एकेकावर एकेका कामाची जबाबदारी सोंपवा. तुम्ही नुसती देखरेख करा. मात्र कोणाच्या व्यवस्थेंत निष्कारण ढवळाढवळ

करूं नका. कांहीं कोठें बिघडतें असें वाटलें तरच सूचना देत चला."
"शंकरराव, आम्ही काय करणार? तुमच्याशिवाय आमचें चालणार नाहीं." असें कोणी तरी म्हणावें अशी शंकररावांची अपेक्षा होती असें दिसलें. परंतु तसें झालें नाहीं. माझी सूचना ऐकतांच त्यांनीं जो आंबट चेहरा केला आणि "हरकत नाहीं. असा माझ्यावरचा भार हलका झाला तर तो मला पाहिजेच आहे." असें म्हटलें. पण माझ्या बोलण्याचा त्यांच्या मनावर झालेला परिणाम त्यांच्या चेहऱ्यावर स्पष्ट दिसत होता. त्यांना न आवडणाऱ्या गोष्टी त्यांच्यासमोर निघाल्या म्हणजे ते चिडून बोलायला लागत. त्या वेळीं त्यांचे दोन्ही गाल प्रत्येक शब्दाला वर उचलले जात.

ही हकिगत देण्याचें कारण एवढेंच कीं किर्लोस्कर कंपनींत कोणाच्याहि कर्तबगारीला वाव मिळत नसे, त्याला कारण वरच्या लोकांचा लोभ कसा होता हें दर्शवावें. एकाद्या संस्थेला चिरस्थायित्व यायचें असेल तर कर्त्या माणसांनीं योग्य संधि येतांच नवीन माणसांवर कामाची जबाबदारी सोंपवून कर्तबगारीचें क्षेत्र मोकळें करून दिलें पाहिजे म्हणजे नवीं नवीं माणसें अहमहमिकेनें पुढें येतात. संस्थेला बळकटी येते. परंतु दुर्दैवानें तसें होत नाहीं. शेवटपर्यंत अधिकाराचा लोभ माणसाला सुटत नाहीं. त्यामुळें परंपरा रहात नाहीं. प्रथमचीं कर्तबगार माणसें गेल्यावर संस्था खिळखिळ्या होतात. हा प्रकार सर्वसाधारणपणें चोहींकडेच दिसून येतो.

## त्रयस्थांची लुडबुड

रामभाऊंची फारखत झाल्यावर कंपनीच्या भागीदारांची पुनर्घटना व्हायची होती. खाडिलकरांनीं पत्र लिहून नारायणराव एकटे मालक असावे अशी सूचना केली. नारायणाबद्दल जी प्रेमबुद्धि त्यांच्या मनांत उत्पन्न झाली होती ती त्यांनीं अशा रीतीनें व्यक्त केली. मात्र थिएटरच्या कर्जाचा उलगडा होईपर्यंत शंकरराव मालकींत रहावे असें सुचविलें होतें. याच्या अगोदरपासूनच खाडिलकरांनीं कंपनीच्या व्यवस्थेंत लक्ष घालण्यास सुरवात केली होती. हुबळीस कंपनीचे हिशेब झाले. 'गुड कॉंडक्ट' फंड

चार हजार रुपये जमला होता. तो नोकर लोकांना वांटायचा, म्हणजे प्रत्येकाच्या खात्यावर जमा करायचा. कारण रोख द्यायला कंपनीजवळ पैसे नव्हते. थिएटरच्या खड्डयांत सर्व पैसे जात होते. या वेळीं रघुनाथ गोखले कंपनी सोडून जाऊं लागला. त्याला गुड कॉन्डक्ट फंड द्यायचा नाहीं असें शंकररावांच्या मनांत होतें. खाडिलकरांचें म्हणणें, "मागचा देणें राहिलेला फंड आज देत अहांत. आजपर्यंत तो इमानें इतबारें वागला आहे. बरें, कंपनी सोडून तो भावाच्या कंपनींत जात आहे यांत गैरशिस्त काय आहे?" खाडिलकरांचें म्हणणें रास्त होतें; परंतु शंकररावांना खाडिलकरांची ही लुडबुड खपली नाहीं. दोघांचें कडाक्याचें भांडण झालें. याचा परिणाम असा झाला कीं या पुनर्घटनेच्या वेळीं कंपनींत अनियंत्रित सत्ता असावी म्हणून नारायण एकटाच मालक असावा असें बीजारोपण केलें. कंपनीचे इतर हितचिंतक होते त्यांनीं नारायण, शंकरराव व मी असे भागीदार असावे असें ठरविलें. मी मात्र या भागीदारीला एकाच गोष्टी-मुळें नाखूष होतों. नारायण म्हणजे नारायण; उठतां बसतां व्यवहारांत शंकररावांशीं प्रसंग; अनागोंदी हिशेब. मला ते खपले नसते; आणि त्यामुळें शंकररावांचा आणि माझा पदोपदीं खटका उडाला असता. या एकाच गोष्टीसाठीं मला भागीदारी नको म्हणून सांगितलें. गोविंदराव टेंबे आदीकरून मंडळी मला आग्रह करूं लागली, "नारायण हा शंकररावांच्या हातांतलें बाहुलें बनेल तेव्हां तुम्हीं मालकींत असलेंच पाहिजे."

## बुद्धिबळाचा डाव

त्या वेळीं कंपनींत बुद्धिबळाचा डाव चालला होता. उघड उघड दोन पक्ष उत्पन्न झाले होते; एक शंकररावांचा, यांत शंकरराव व त्यांचे बगलबच्चे; दुसरा नारायण आणि मी. आंतून आंतून चिंतोबा आणि परचुरे आमच्या पक्षांत असत. शंकररावांनीं आपल्या मतानें नायकाच्या भूमिकेकरितां एका गृहस्थांची निवड केली. ते गृहस्थ म्हणजे कुरुंदवाडचे नानबा लेले. उद्देश हा कीं आपल्या बाजूला नायकाच्या योग्यतेचा एक माणूस असला म्हणजे आपला पक्ष जोरदार होईल. लेले नायकाच्या कामाला शरीरसंपत्तीच्या दृष्टीनें योग्य होते, पण आवाजांत दोष आणि बेंग-

रूळपणा होता. शंकररावांचा हा डाव ओळखून गोविंदराव टेंबे कंपनींत आले पाहिजेत, असा आग्रह आम्हीं धरला. एका नायकाला शह देण्याकरितां दुसरा नायक पुढें उभा केला. शंकररावांना गोविंदराव नको होते. गोविंदराव त्यांच्या हातांतलें बाहुलें बनणें शक्य नव्हतें. अशी योजना होऊन ता. ९ डिसेंबरपासून प्रयोग सुरू झाले.

## नवी इटी नवा दांडू

जोगळेकरांच्या कुटुंबाकडून आमच्या तिघांच्या नांवानें कंपनीचं खरेदीपत्र करून घेतलें. जोगळेकरांच्या कुटुंबाला दरमहा पन्नास रुपये पेन्शन् व तीर्थयात्रेसाठीं एक हजार रोख द्यायचे; किर्लोस्कर कंपनी व किर्लोस्कर थिएटर यांचा परस्परांशीं कोणत्याहि तऱ्हेचा संबंध नाहीं; हें खरेदीपत्रांत नमूद करून ठेवलें. कारण एखाद्या सावकाराला अविश्वास वाटून त्यानें फिर्याद केली तर कंपनी जप्त होऊन धंद्याला धोका बसूं नये. नैतिक दृष्ट्या थिएटरचें कर्ज कंपनीचे वारस म्हणून आम्हीं फेडणें जरूर होतें; व फेडायचें असें ठरलेंहि होतें. त्याला अनुसरून १९१२ च्या मे महिन्यानंतर म्हणजे पुण्यास गेल्यावर कर्जफेडीकरितां कांहीं रक्कम कंपनींतून द्यायची होती.

मागील हिशेब पुरे झाले होते. थिएटरच्या बाबतींत बहात्तर हजार रुपये खर्च झाले होते. पहिला हिशेब चौतीस हजारांचा; तो रद्द होऊन चौपन हजारांचा सुधारून आला होता. बाकीच्या अठरा हजारांचें काय झाल त्याचा उलगडा झालेला नाहीं. तसेंच शंकररावांच्या नांवावर तीन हजार रुपये तसलमात होती तिचा जमाखर्च होऊन चुटकीसरशीं तीहि उडाली. मागच्या हिशेबांशीं आपला संबंध नाहीं म्हणून मी गप्प बसलों. नवीन भागीदारांचा नवा हिशेब सुरू झाला.

## किर्लोस्कर कंपनीची नवी घटना

नव्या घटनेप्रमाणें कंपनीचें काम सुरू झालें. नारायण भागीदार नसावा असें कोणालाहि म्हणण्याची सोय नव्हती. कारण सध्यां तोच कंपनीचा जीव होता. मी वाटेल त्या वेळीं वाटेल त्या कामाची जबाबदारी पार पाडणारा म्हणून मंडळी जरी माझ्यावर खूष होती व मला

भागीदारींतून वगळणें शक्य नाहीं हें जरी पटत होतें, तरी कंपनींतील जुन्या मंडळींना " गणू मालकींत गेला " हें शल्य सलत होतेंच. कांहीं जणांनीं उघड बोलून दाखवायलाहि कमी केलें नाहीं; परंतु वादळ उठलें आणि शांतहि होऊन गेलें.

पेठे यांनीं सौभद्रांत अर्जुनाचें, प्रेमशोधनमध्यें नंदनाचें, शारदेंत एकदांच कोदंडाच व शापसंभ्रममध्ये एकदांच पुंडरिकाचें अशीं कामें केलीं. फक्त अर्जुनाचें व नंदनाचें हीं दोन कामें ते कांहीं दिवस करीत होते. नानबा लेले यांना अर्जुनाच्या कामाची तालीम चिंतोबा देऊं लागले. टेंबे यांना धैर्यधराची तालीम मी देऊं लागलों. बाकीच्या सर्व नाटकांत नायकाचीं कामें मीच करीत होतों. मंडळी जानेवारी अखेर सांगलीस जाऊन फेब्रुवारीच्या मध्याला निपाणीस गेली. निपाणीस लेले यांनीं अर्जुनाच्या कामांत रंगभूमीवर प्रथम प्रवेश केला; व टेंबे यांनीं धैर्यधराची भूमिका केली. धैर्यधराचें काम अर्जुनाच्या कामापेक्षां उठावदार झालें. आमचा पक्ष जोरदार होणार असें लक्षण दिसूं लागलें.

## तीन आश्चर्यकारक गोष्टी

या दरम्यान माझी धाकटी बहीण क्षयानें आजारी होऊन मुंबईला आलेली होती. तिला आणायला गेलों असतां गडकरी यांच्या प्रेमसंन्यास या नाटकाचा प्रयोग पाहिला. आनंद वाटला. गडकऱ्यांना अभिनंदनपर पत्र लिहिलें. "तुमच्या बाबतींत यंदा तीन आश्चर्यकारक गोष्टी घडल्या आहेत. एक तुम्हीं नाटक लिहून पुरें केलेंत. दुसरी, भांडणाशिवाय निर्विघ्नपणें नाटक रंगभूमीवर यशस्वी रीतीनें आलें. तिसरी, तुम्ही प्रीव्हि-असची परीक्षा पास झालां."

बहिणीला आणून औषधोपचारासाठीं मिरजेस ठेविली. जानेवारींत माझे चुलते दिवंगत होऊन मरतांना त्यांनीं आपल्या इस्टेटीचें बक्षिसपत्र माझ्या नांवें करून ठेविलें होतें. त्यांत कोकणांतील घर, थोडी जमीन एक हजार रुपये रोख, व सुमारें पस्तीस तोळे सोनें अशी मालमत्ता होती. त्यांच्या बक्षिसपत्रांतील अटीप्रमाणें वर्षश्राद्धापर्यंत उत्तरकार्याला पांचशें रुपये व बहिणीच्या आजाराला मिळून सर्व रोकड खलास झाली.

## नंतर सांगेन

निपाणीच्या मुक्कामीं खाडिलकर कंपनींत आले. मागच्या वर्षी जोगळेकर व भास्करबुवा यांनीं "भास्कर गायन समाजा"ची स्थापना केली होती. दर गांवीं गायनाचा जलसा करायचा असें ठरलें होतें. त्याप्रमाणें भास्करबुवा आपला नवीन तयार केलेला शिष्य मास्टर कृष्णा यासह कंपनींत आले. शंकरराव आपल्या मुलाच्या लग्नासाठीं पुण्यास निघून गेले. जातांना नेहमींच्या वहिवाटीप्रमाणें पांचशें रुपये तसलमात म्हणून नेले. ते गेल्यानंतर खाडिलकरांच्याकरितां निराळी जागा घेतली होती तेथें कंपनीसंबंधींची चर्चा नेहमीं चाले. शंकरराव पुण्याहून येतांच पांचशें रुपये तसलमातीचा खर्च विचारला. ती रक्कम टापरे यांस दिली असें शंकररावांनीं उत्तर दिलें. "कशासाठीं?" "थिएटर भाड्याच्या पोटीं." "थिएटर भाड्याच्या पोटीं म्हणजे काय?" या माझ्या प्रश्नानें तें थोडेसे नाखूष होऊन म्हणाले, "नंतर सांगेन."

## माझा तोल सुटला

पुढें सुमारें चार पांच महिने तसलमात म्हणून पैशाची उचलाउचल झाली नाहीं. कारण पैसाच नव्हता. निपाणीस पैसा दिसूं लागल्यानंतर तसलमात घेण्याची जुनी वहिवाट सुरू झाली. गोपाळराव सुळे यास पत्र लिहून मी ही गोष्ट कळविली. दुसऱ्या घरांत वाटाघाटी चालत त्य वेळीं व्यंकटराव हे हेतुपुरःसर आमच्यांत सामील होत असत. शंकररावांचें उच्चाटन झालें तर मॅनेजर म्हणून आपली वर्णी लागेल ही त्यांना आशा पण आमच्याकडून ती त्यांची आशा फलद्रूप होण्याचा रंग दिसेना. तेव्हं निपाणीहून बेळगांवास गेल्यावर आमच्या ज्या वाटाघाटी चालल्या होत्या त्या शंकररावांच्या कानांवर त्यांनीं घातल्या आणि मी तुमचा मनुष्य आहे असें त्यांना भासविलें. अशा रीतीनें व्यंकटरावांनीं आपली पगडी फिरविली. पेठे यांनीं मुळापासून नारायणाच्या हितचिंतकांचा स्नेह दूरदर्शीपणानें संपादन केला होता. त्यांत या वेळीं नारायण मालकींत आलेला. तेव्हां हितचिंतकांचा पित्त्या म्हणून पेठे लुडबुड करीत असत. पण आमचा पक्ष जोरदार होणार असा रंग दिसूं लागल्याबरोबर पेठे आमचे पक्षपाती बनले.

आपल्या पक्षपातीपणाचें प्रदर्शन एके दिवशीं रात्रौ पेठ्यांनीं केलें. शंकररावांचा व त्यांचा बराच खटका उडाला. ज्या गोष्टी आम्हीं प्रसंगाप्रसंगानें शंकररावांच्यापुढें मांडणार होतों त्या त्यांनीं आवेशाच्या भरांत त्यांच्याजवळ बोलून टाकल्या. नारायण आणि मी आपल्या बिऱ्हाडीं होतों. त्या ठिकाणीं येऊन पेठ्यांनीं आपल्या पराक्रमाचें वर्णन बरेंच तिखटमीठ लावून केलें. इतक्यांत सुळे यांना बरोबर घेऊन शंकरराव आले. शंकरराव गरम झालेले दिसले. 'माझ्याविरुद्ध तुझ्या काय तक्रारी आहेत त्या सांग' असें तावातावानें म्हणाले. मला कल्पना होतीच. मी शांतपणानें त्यांना उत्तर केलें, "व्यक्तिशः तुमच्याविरुद्ध माझ्या तक्रारी नाहींत; कंपनीच्या व्यवस्थेसंबंधीं आहेत. त्या दुपारीं सावकाशीनें सांगेन." "दुपारीं कशाला ? आत्तांच काय तें सांग." शंकरराव उसळून म्हणाले. "शंकरराव, मी तुमच्यापेक्षां लहान असून डोकें शांत ठेवून बोलतों आहें; आणि तुम्ही वयातीत असून तुमचें डोकें इतकें गरम व्हावें ?" हें ऐकून ते हट्टालाच पेटले. मग माझाहि तोल सुटला. "तुम्हीं काय केलें नाहीं तें सांगा" असें म्हणून अनागोंदी कारभार, थिएटर बांधून कंपनीवर चढलेला कर्जाचा बोजा, आजच्या स्थितीला कारण वगैरे गोष्टीसंबंधानें जें जें म्हणून मनांत खवखवत होतें तें सगळें भडाभड ओकून टाकलें. माझें मन भडकलें होतें. अर्धा तास त्यांना ताड्ताड् बोललों. इतर मंडळी चित्रासारखी स्तब्ध होती. शंकररावहि जरा नरमले. "मालक असूनसुद्धां जोगळेकरांनीं मला कधीं दोष दिला नाहीं." "जोगळेकरांसारखा ढिला माणूस हातांत सांपडला म्हणूनच तुम्हांला कंपनीचा खेळखंडोबा करतां आला." "अरे दिवंगत झालेल्या व्यक्तीबद्दल अनादर दाखवतोस ?" "मालक या दृष्टीनें जोगळेकर आपल्या कर्तव्याला जागरूक राहिले नाहींत एवढेंच माझें म्हणणें."

## खाडिलकरांचा नारसिंहावतार

बरीच खडाजंगी झाली. शंकरराव वैतागले, कंपनी सोडून जायला निघाले. सगळी मंडळी घाबरली. कंपनी कशी चालणार ? मी शंकररावांना पूर्ण ओळखून होतों. ते कंपनी सोडून जात नाहींत याबद्दल माझी खात्री होती. पुढें शंकररावांनीं माझ्याशीं बोलायचें सोडून दिलें.

लवकरच खाडिलकर आले. पुन्हां वाटाघाटी सुरू झाल्या. आल्यापासून खाडिलकरांनीं नैतिक व व्यावहारिक वर्तनावर प्रवचनें झोडण्यास आरंभ केला. माझें मन अस्वस्थ होऊं लागलें. त्यांचा रोख माझ्यावर होता हें मी समजून होतों तरी शांतपणानें त्यांचें ऐकून घेत होतों. शेवटीं एके दिवशीं मनावरचा ताबा उडाला. एकनिष्ठपणानें आजपर्यंत किर्लोस्कर कंपनींत आम्हीं राहिलों हा कांहीं गुन्हा नाहीं; अव्यवस्थितपणानें एखाद्यानें खर्चाची आणि कर्जाची धोंड निर्माण करावी आणि ती दुसऱ्यांनीं मिमूटपणें आपल्या शिरावर लादून घ्यावी? थिएटरबद्दलचें राहिलेलें पस्तीस हजाराचें कर्ज तुम्हीं फेडलें पाहिजे ही नैतिक जबाबदारी तुमच्यावर आहे; असें मी निक्षून सांगितलें. वादविवाद बराच वाढला. शेवटीं आम्हांला निरुत्तर करण्याकरितां खाडिलकरांनीं आपल्या भात्यांतला रामबाण काढला. थिएटरचे करार-मदार नरसोपंत केळकरांनीं केले होते या गोष्टीवर त्यांनीं भर दिला. केळकर हेहि एक मनुष्यच आहेत; त्यांनीं केलेलें सगळें निरपवाद बरोबर असलेंच पाहिजे असें धरून कसें चालतां येईल? आजची स्थिती येईल असें त्या वेळीं त्यांना कसें कळावें? एकाद्या कलमाची भाषा संदिग्ध असली म्हणजे कायदे-पंडित त्याचा फायदा आपल्या हिताकरितां भरपूर करून घेतो असा नियमच आहे. हें त्यांच्या नजरेस आणलें. माझें भाषण ऐकून त्यांचा राग शिगेला पोहचला. "नरसोपंतांबद्दल असे शब्द जेथें निघतात तेथें क्षणभरसुद्धां मला बसायचें नाहीं" असें म्हणून पाय आपटीत खाडिलकर निघून गेले. फट् म्हणून ब्रह्महत्या कोठून केली असें मला वाटलें. त्यांच्या-जवळ गेलों आणि मोठ्या विनयानें त्यांचा गैरसमज घालविण्याचा प्रयत्न केला. पण त्यांनीं मला बोलूंच दिलें नाहीं. "तुम्ही ॲक्टर असाल, उत्तम ॲक्टर असाल; पण गळा आणि डोकें यांत एका वितीचें अंतर असतें. लक्षांत ठेवा" खाडिलकरांनीं सणसणीत टोला दिला. खरें आहे असें म्हणून क्षमा मागितली आणि तेथून हळुहळू पाय काढला.

## तोंड फोडलें

सोलापूर मुक्कामीं महाराष्ट्र नाटक मंडळीची फाटाफूट झाल्याची बातमी आमच्या कानांवर आली. मध्यस्थ म्हणून शंकररावांना बोलावणें

आलें. ते तिकडे निघून गेले. मंडळीचा पगार महिन्याच्या महिन्याला देत होतोंच. शंकरराव गेल्यावर मागील पगारबाकीची फेड करण्यास आस्ते आस्ते सुरवात केली. नंतर बेळगांवास भयंकर पावसाळा सुरू झाला. प्रयोगाचें उत्पन्न त्यामुळें रोडावलें. पुढें मुक्काम कोठें न्यायचा हें ठरलेलें नव्हतें. शंकरराव जाऊन पंधरा दिवस झाले तरी त्यांच्याकडून पत्रहि नाहीं. नंतर एक दिवस व्यंकटरावाच्या नांवानें एक पत्र आलें. अक्षरावरून तें शंकररावांचें आहे हें मी ओळखलें; आणि मी तें बेधडक फोडलें. हेतू हा कीं त्यांनीं आपल्या हस्तकाजवळ कांहीं पोटउकला केला असेल. माझा तर्क खरा ठरला. सोलापूर बँकेकडून पांच हजार रुपयांचें कर्ज काढलें आणि थिएटरचा माल ज्या दुकानदारांकडून आणला त्यापैकीं कृ. ब. साठे यांना ४४०० रुपये दिले असा मजकूर होता. कोल्हापुरास कंपनी न्यायची असेंहि लिहिलें होतें. पांच हजारांपैकीं ४४०० रुपयांचा बटवडा व बाकीची रक्कम नेहमींप्रमाणें तसलमात अथवा तपशीलीं शिल्लक! वास्तविक हें कर्ज काढण्यापूर्वी त्यांनीं नारायणाला व मला विचारायला हवें होतें. पण तसें त्यांनीं केलें नाहीं. सोलापूर बँकेनें कर्जाची मागणी केली तर आपण कानावर हात ठेवायचे असें ठरवलें. बेळगांवच्या मुक्कामांत पगाराची मागील बाकी देऊन प्रवासखर्चासाठीं साडेसातशें रुपये शिल्लक ठेविले होते.

## नारायणाला शह

शंकरराव आले. बरोबर अनगोळ येथील विनायक बेहरे या नांवाचा मुलगा आणला. नारायणाला शह देण्याचा शंकररावांचा विचार होता. त्याची ही पूर्वतयारी आहे हें आम्हाला कळून चुकलें. यांत त्या मुलाचा कांहींच अपराध नव्हता हें जाणून आम्हीं दोघेहि त्याच्याशीं प्रेमानेंच वागत होतों. मी त्याला लहान कामें शिकवायला सुरवात केली.

बेळगांवचा मुक्काम संपल्यावर माझी बहीण नरसोबाच्या वाडीस होती तिला कोल्हापुरास आणून डॉ. गोपाळराव पेंढारकर यांचें औषध सुरू केलें.

# सोन्याचें अंडें घालणारी कोंबडी

कंपनीबरोबर पंडीत आणि को.चा तळहि कोल्हापुरास पडला. नारायण पंडितांच्याकडेच असे. मधून मधून केव्हां तरी व नाटकाच्या दिवशीं त्याची गांठ पडे. पंडितांनीं एक दिवस आपलें पांडित्य सुरू केलें. " सोलापूर बँकेकडून शंकररावांनीं पांच हजार रुपये कर्जाऊ घेतले आहेत, त्याबद्दल बँकेला तुम्ही प्रामिसरी नोट लिहून द्या." मी रोखठोक उत्तर दिलें, " आम्हांला त्यांतलें कांहींहि माहित नाहीं. ज्यानें कर्ज घेतलें तो प्रामिसरी नोट लिहून देईल." नंतर तो विषय तेवढ्यावरच राहिला.

पुढें शंकररावांना पेन्शन देऊन घरीं बसायला सांगायचें अशी वाटाघाट सुरू झाली. शंकरराव निवृत्त झाले तर तुम्ही भागीदार म्हणून रहाणार का ? कंपनीची व्यवस्था एकमुखी चालली पाहिजे हें तत्त्व तुम्हांला मान्य आहे ना ? असे प्रश्नावर प्रश्न सुरू झाले. नारायण एकटा मालक झाला तरी तुमचा दर्जा व मान कंपनींत त्याच्या इतकाच राहील असेंहि सुचविलें. पगार काय घ्याल असें विचारलें. मी मोघम एवढेंच सांगितलें, " व्यवस्था कोणीहि कशीहि करो, माझी हरकत नाहीं. मात्र कंपनी सुव्यवस्थित चालली म्हणजे झालें." नारायण एकटा मालक झाला म्हणजे आपणास मन मानेल तसें वागायला मुळींच हरकत नाहीं हा या वाटाघाटीच्या मुळाशीं पंडितांचा हेतु. पण मी तिकडे दुर्लक्ष केलें. माझी खात्री होती, कंपनीच्या आजच्या स्थितींत चालक कोणीहि असला तरी मला वगळून कंपनी चालणें अशक्य. शंकररावांची जुनी रीत, जुना जमाना; आमचीं नवीं मतें, नवा जमाना. दोघांचें जमणें अशक्य झालें. म्हणून " आमच्या-वर सोंपवा सगळें. फक्त वडीलकीनें सल्ला देऊन आपल्या अनुभवाचा फायदा द्या," असें शंकररावांस सांगितलें आणि त्यांना महिना पन्नास रुपये पेन्शन द्यावयाची असें ठरलें.

याच वेळीं नारायण आणि टेंबे यांचें मनोमन वितुष्ट आलें. एक-मेकांचें भाषणदेखील होईना. नारायण आपल्या एकट्याच्याच काबूंत रहावा असे पंडितांचे प्रयत्न चालू होते त्याचा हा परिणाम. आपला हितकर्ता एकीएक पंडीत अशी नारायणाची खात्री झाली. पंडितांनीं या वेळीं

अगर अलिकडे पलिकडे केव्हांतरी नारायणाला बाराशें रुपये कर्जाऊ दिले. त्या उपकाराच्या ओझ्याखालीं नारायण दडपलेला होता. नारायणाला वडिलोपार्जित कांहीं कर्ज होतें; त्यांत उधळा स्वभाव. त्यामुळें कुणीतरी सावकार पहाणें त्याला भाग होतें. अशा स्थितींत ही सोन्याचें अंडें घालणारी कोंबडी जर हातांत येते आहे तर अशी सुवर्णसंधि पंडितांनीं कां गमवावी ? एकंदरींत या वेळीं नारायण पंडितमय होऊन गेला होता.

शंकररावांच्या बाबतींत शेवटचा निकाल लावावयाचा होता त्यासाठीं गोपाळराव सुळे आले. नवीन चर्चेंत असें निघालें कीं सर्व देणेदारांची व नवीन व्यवस्थापकांची देण्याबद्दल रुजवात करून द्यावी; तोंपर्यंत शंकररावांना शंभर रुपये पगार चालू ठेवावा आणि सर्व कामें संपल्यावर पेन्शन चालू व्हावी.

## ऐन वेळीं अवसानघात

एके दिवशीं सायंकाळीं कोल्हापूर येथील एक वकील मल्हारपंत गर्दे यांनीं एक मसुदा तयार केला. चर्चा होऊन दुरुस्त्या करून नक्की झाला. दुसऱ्या दिवशीं मंडळीची बैठक बसली. शंकरराव, सुळे, पंडीत, टेंबे, नारायण आणि मी एवढेच त्या बैठकींत होतों. शंकररावांनीं पहिली अट अशी घातली कीं पेठे यांना कंपनींतून घालवून दिल्याशिवाय फारकत लिहून द्यायला मी तयार नाहीं. पेठे यांनीं पंडिताच्या गोटांत १९०९ सालापासूनच प्रवेश केला होता. नारायणाची मर्जी आपल्यावर रहावी म्हणून पंडिताच्या भोंवतीं भोंवतीं राहून त्यांच्या कर्तबगारीचें वेळीं अवेळीं कौतुक करायचें हा क्रम अबाधित चालू ठेवला होता. तरी शेवटीं शंकररावांनीं फारकत लिहून द्यावी म्हणून पंडितांनीं मारेकऱ्याचें काम पत्करलें व पेठ्यांच्यावर वार केला.

नंतर गोपाळरावांनीं प्रास्ताविक भाषण केलें. शंकरराव जायला तयार आहेत असें सांगितलें. तोंच नारायणानें इषाऱ्याच्या अपेक्षेनें पंडिताकडे दृष्टिक्षेप केला. नजरेचा इषारा मिळतांच "आपणाला मालकी नको. मी आपला पगारी रहायला तयार आहें" असें नारायणानें सांगून टाकलें. मी तर सर्दच झालों. शंकरराव गेले पाहिजेत, आपण मालक व्हायला तयार

आहोंत ही त्याची कालची भाषा आणि आज त्यानेंच अशी कोलांटी उडी कशी मारली ? या शंकेला उत्तरच सांपडेना. एकट्या शंकररावांबरोबर माझें पटायचें नाहीं ही माझी खात्री. म्हणून मलाहि भागीदारी नको म्हणून सांगितलें. नंतर आजपासून तीन वर्षेंपर्यंत कर्जफेडीकरतां शंकररावांना संधी द्यायची; त्यांनीं तेवढ्यांत कर्ज फेडून टाकायचें; कंपनी आमच्या स्वाधीन करायची आणि सेवानिवृत्त व्हायचें असें ठरल. ठीक आहे म्हणून मी निश्वास सोडला. नारायणानें कबुली दिली. झालें. आदल्या दिवशींचा सर्व रंग पालटला !

## भ्रमनिरास

शंकररावांच्या हातांत पूर्वीसारखाच लगाम राहिला आणि त्यांनीं धरलेल्या रंगणावर फिरण्याची पाळी आली. नंतर नारायणाला दोनशें व मला एकशें दहा रुपये पगार झाला. शंकरराव आपलें व्यंग जाणून होते. तुमच्याच जोरावर ही जोखीम मी घेतली आहे; तुमची मदत मला पाहिजे आहे; मी स्वतः नट नाहीं; द्रव्योत्पादनाची गोष्ट तुमच्या कर्तब-गारीवर अवलंबून आहे; वगैरे गोष्टी सांगून शंकररावांनीं आम्हांला मोठेपणा दिला. तुम्हीं जितका विश्वास उत्पन्न कराल व दाखवाल तितका मोबदला तुम्हांला खात्रीनें मिळेल, असें आश्वासन मी त्यांना दिलें. त्यानंतर "मी हें सोडलें असतें तर कंपनी विस्कळित झाली असती" असें ते झोकांत बोलून गेले. "शंकरराव, या भ्रमांत राहूं नका. अजून सोडा.चालवून दाखवितों." मीहि ताडकन् सांगितलें. माझी निश्चयी मुद्रा पाहून त्यांनीं सारवासारव करून विषय संपविला.

त्या वेळीं गोविंदराव टेंब्यांनीं सव्वाशेंचा दीडशें पगार करण्याबद्दल नोटीस दिली होती. त्यामुळें शंकरराव टेंब्यांना कंपनींतून काढणार अशी बातमी उठली; व तशीच जिरूनहि गेली. कारण टेंब्यांचा व माझा स्नेह आहे हें शंकररावांना माहीत होतें. टेंब्यांना काढलें तर मीहि त्यांच्यामागून कंपनींतून बाहेर पडेन, ही त्यांची खात्री होती व आंतून मी टेंब्यांना तसा धीरहि दिला होता.

## दोन फळ्या

या वेळेपासून कंपनींत दोन फळ्या झाल्या. शंकरराव, नारायण, पंडीत, परचुरे, चिंतोबा ही एक व दुसऱ्या फळींत गोविंदराव टेंबे, दादा लाड्‌ आणि मी. अशा बनावानें कंपनी कोल्हापुराहून साताऱ्यास गेली.

## खर्चांत काटकसर

साताऱ्यास आगटे यांच्या घरांत कंपनी उतरली. शंकरराव एकमेव मालक झाले. लागलीच वायफळ खर्च कोठें होतो त्याची चौकशी सुरू झाली. प्रथम रेल्वेखर्च जास्त होतो हा बूट निघाला. बायकामाणसें बरोबर घेऊन कंपनींत रहाणाऱ्या माणसांचें सामानसुमान जास्त असतें तें कमी करायला लावलें पाहिजे असें त्यांच्या मनानें घेतलें. या बाबतींत त्यांनीं माझ्याशींच प्रथम बोलणें काढलें.

शंकर—गणू, फाजील होणारा खर्च आतां कमी करायला पाहिजे.

मी—हो. करायला पाहिजेच. पण जरूर तेवढा होणारच. कमी करण्यासारखा कोणता आहे ?

शंकर—बायकामंडळींच्या सामानसुमानाचा खर्च जास्त होतो; त्याचा बोजा कंपनीवर नाहीं का पडत ? जरुरीपुरतेंच सामान जवळ बाळगायचें.

त्यांच्या बोलण्याचा रोख आतां माझ्या लक्षांत आला.

मी—जरुरीपुरतें म्हणजे किती ? अवास्तव सामान करायला पैसे लागतात, आणि जरुरीपेक्षां जास्त सामान करण्याइतकी संपन्न स्थिती कोणाची आहे ? अशा सामानाचा खच कंपनीवर पडूं नये अशी जर तुमची इच्छा असेल तर असा नियम करा, कीं कंपनींत माणसें ठेवायचीं तीं अविवाहितच असलीं पाहिजेत. आमचीं लग्नें झालेलीं आहेत त्याला आतां इलाज नाहीं. आमच्या सामानाचा खच कंपनीवर पडूं नये म्हणून ती सोडून जाण्याची आमची तयारी आहे.

माझा रागरंग बघतांच शंकररावांनीं तो विषयच सोडून दिला.

याच सुमारास स्वदेशहितचिंतक मंडळी मोडली आणि गोरे वांईस आपल्या घरीं गेले. ही बातमी शंकररावांस कळली. नारायण पंडिताच्या

पंखाखालीं; मी हा असा; तेव्हां आपलें आसन स्थिर आहे असें शंकररावांस वाटेना. तेव्हां आपल्या विश्वासांतला एकादा गायक नट कंपनींत असावा या इच्छेनें आपल्या चिरंजीवाच्या सासुरवाडीस बावधनास जाऊन येतों असें निमित्त सांगून शंकररावांनीं वांईस गोरे यांना गांठलें आणि त्यांच्याशीं भाषा केली. या भाषेचा पडसाद साताऱ्यास दुसऱ्या दिवशींच उमटला. त्याबद्दल मी शंकररावांस विचारलें. ते आश्चर्यचकित झाले. वांईवरून जातांना गोऱ्यांची सहज गांठ पडली यापेक्षां कांहीं नाहीं अशी सारवासारव केली. मलाहि तें खरें वाटलें.

नंतर फलटणचे राजे श्रीमंत बापूसाहेब यांचें आमंत्रण आलें, म्हणून कंपनी तेथें गेली. मांडवाचें खूप मोठें थिएटर बांधलें होतें. पहिला प्रयोग मानापमान. सरकारी नाटक. तुफान गर्दी लोटली. पण प्रेक्षक इतके निर्विकार होते कीं पहिल्या दोन अंकांत लक्ष्मीधराचें काम पाहून हंशाची लहानशी चमकसुद्धां त्यांच्या चेहऱ्यावर दिसेना. आमच्यापैकीं एकानें थोडेंसें " ओव्हर ॲक्टिंग " म्हणजे फाजीलपणा करून मंडळींना हंसवावें असें सुचवलें. मला तें पसंत पडलें नाहीं. कारण लोकप्रियतेच्या लालसेनें असा एकदां तोल सुटला कीं माणूस मर्यादेबाहेर गेलाच म्हणून समजावें. फलटणचे लोक नाटकांत रंगले नाहींत तर बिघडलें कोठें ?

## पाठबळ नाहींसें झालें

दोन चार दिवसांनीं माझी धाकटी बहीण वारल्याचें पत्र मिळालें. माझीं दोन्हीं भावंडें गेलीं. मी एकाकी झालों. मनाला मोठें दुःख झालें. माझ्या दोन्ही बहिणी अत्यंत सुस्वभावी होत्या. परंतु माझ्या लहानपणच्या विपन्न स्थितीमुळें त्यांना सुख लाभेल असें सासर मिळालें नव्हतें. दुखवट्याच्या भेटीसाठीं जायचें ठरवलें.

याच वेळीं गोरे कंपनींत येणार व पुण्याच्या मुक्कामांत पहिल्याच खेळांत मूकनायकमध्यें विक्रांताचें काम करणार अशी बातमी कानावर आली. मूकनायक शनिवारीं लाविलें होतें व रविवारीं मानापमान. मानापमानांत धैर्यधर गोविंदराव टेंबे. गोऱ्यांनीं पहिल्या खेळांत काम केल्यानंतर दुसऱ्या खेळांत टेंब्यांचें तेज पडलें नसतें. कारण गोरे आवाजदार

होते.ही अडचण टेंब्यांना भासूं लागली.त्या बाबतींत टेंब्यांनीं शंकररावांस पत्र लिहिण्यास सांगितलें; आणि मी लिहिलें. शंकररावांचें उत्तर आलें. "कांहीं मित्रमंडळीच्या आग्रहावरून गोरे यांना कंपनींत ठेवलें आहे." उत्तराबरोबर प्रयोगप्रसिद्धीचें छापील हस्तपत्रकहि पाठवून दिलें. याचा अर्थ असा कीं ठरलेल्या कार्यक्रमांत बदल करतां येणार नाहीं. वास्तविक गोविंदरावांबद्दल शंकररावांना आपुलकी वाटायला पाहिजे होती. शंकररावांनीं आपल्या नटाबद्दल अभिमान बाळगायला पाहिजे होता. पण—

## राबता बंद!

पुण्यास शंकररावांनीं आणखी एक गोष्ट केली, ती ही कीं सुळेप्रभृतींना बोलावून थिएटरसंबंधींच्या कामासंबंधीं अधिकार संपादन करणारें मुखत्यारपत्र जोगळेकरांच्या कुटुंबाकडून करून घेतलें. तें करतांना बातमी अगदीं गुप्त राखण्यांत आली होती. जोगळेकरीण बाईंना योग्य सल्ला देण्याचें मनांत येऊनहि तेथें राबता बंद असल्यामुळें कांहीं करतां येईना. मुखत्यारपत्र होऊन गेल्यावर वहिनींची भेट झाली. आमचें काय बोलणें होतें हें कळावें म्हणून माझ्यावर टेहळ्या टेवला होता. याहि वेळीं टेहळ्या कानोसा घेत होता हें माझ्या लक्ष्यांत आलें. वहिनीनीं मध्यंतरीं मी न भेटल्याबद्दल विचारिलें तेव्हां शंकररावांना कळावें म्हणून मोठ्यांदा "तुमच्यावर पहारा होता. राबता बंद होता मग मी कसा येणार?" असें उत्तर दिलें. त्यांनीं आपल्या दुर्दैवाला बोल लावून मला "तुम्ही मालकी सोडली म्हणून मला शंकररावांच्या तंत्रानें वागणें भाग पडलें. तुम्ही कंपनी कां सोडली? तुमचा भरंवसा मला होता" असें त्या मला म्हणाल्या. "कोल्हापुरास नारायणानें आम्हाला तोंडघशीं पाडल्यामुळें कंपनी सोडणें भाग झालें" असें मी सांगितलें.

## जाज्वल्य अभिमान

सोलापुरास विद्याहरण नाटकाच्या तालमी सुरू झाल्या. पंढरपुरास कंपनी गेली. शंकररावांच्या अनेक कारवायांमुळें आमचीं मनें जास्त जास्त बिघडत चाललीं. कंपनी सोडण्याचेहि विचार येऊं लागले. पण किर्लोस्कर कंपनीच्या जाज्वल्य अभिमानामुळें आलेले विचार लगेच जिरून जात.

मी आणि टेंबे यांशिवाय नारायणसुद्धां बाकीची मंडळी शंकररावांनीं बगलेंत मारली होती. चंद्रभागेच्या वाळवंटांत बसून आम्ही चालू परिस्थितीवर चर्चा करीत असूं.

## चार दिशेला चार

बार्शीस विद्याहरणाच्या तालमी चालू होत्या तरी सर्वांचींच मनें चार दिशेस झाल्यामुळें तालमीला नारायण हजर असला तर टेंबे नसत. मी एकटा मात्र बिनचूक हजर असें. खाडिलकरांनीं माझ्या एकट्याच्याच तालमी घ्याव्यात. मी कंटाळलों. माझे प्रवेश बसले आहेत असें मला वाटतें, असें खाडिकरांना मी म्हटलें. त्यांनींहि "मी तरी काय करूं? रोज कसल्या तरी कारणानें कोणी तरी गैरहजर असतात" असें म्हटलें.

बार्शीस भारत गायन समाजाचा जलसा व्हायचा असें ठरलें. त्यांत टेंबे यांनीं भाग घेण्याचें नाकारलें. खाडिलकरांनीं नारायण, टेंबे यांचा समेट घडवून आणिला. नारायण आमच्या गटांत आल्यामुळें शंकररावांचा पक्ष कमजोर झाला. समेटाचें कार्य शंकररावांच्या गैरहजिरींत झालें.

पुढें एक दिवस व्यंकटरावांनीं कंपनींतील एका गड्याला मारलें. तेव्हां आम्ही मंडळींनीं आपल्या हातांत अधिकार घेऊन व्यंकटरावाला घालवून दिलें आणि त्या हकीगतीचें वीस मंडळींच्या सहीचें पत्र शंकररावांना लिहिलें. शंकररावांना तें खपलें नाहीं. व्यंकटराव मुख्य नव्हे पण पण त्याला काढून शंकररावांचा अंदाज आम्हांला घ्यावयाचा होता, त्याप्रमाणें झालें.

लातुरच्या मुक्कामीं कंपनींतून उत्साहाचें वातावरण अगदीं नाहींसें झालें.

## धोक्याची सूचना

विद्याहरणाकरितां इजिप्शियन पद्धतीचे पोषाख आयते घेतले. सीन सीनरी चालू होतीच. रंगाची तालीम झाली. शिरस्त्याप्रमाणें मी एक दिवस गडकरी यांच्याकडे गेलों. त्यांनीं विचारल्यावरूनच कंपनीची सर्व स्थिति त्यांच्यापुढें मांडली. हीरोची भरती, नारायणाला शह देण्यासाठीं त्याचीं कामें



शिष्यवर-( विद्याहरण )



सुधाकर-( एकच प्याला )



शकार–( मृच्छकटिक )



कांचनभट–( शारदा )

विनायक बेहरे यास देण्याची गुप्त कारवाई वगैरे सर्व सांगितलें. आणि यापुढें शंकररावांशीं एकमत होणें अशक्य कसें आहे हें दाखवून आम्हीं दुसरी कांहीं कल्पना मनांत घेतल्यास तुम्ही आमच्या मदतीला उभे रहाल काय? असा सवाल टाकला. हो हो करून त्यांनीं वेळ मारून नेली. त्याच रात्रीं शंकररावांना आमच्याबद्दल धोक्याची सूचना त्यांनीं दिली. त्याचा परिणाम असा झाला कीं विरुद्ध गोटांतील प्रत्येकजण आमच्याकडे गुन्हेगाराप्रमाणें पाहूं लागला.

जोगेश्वरीच्या बोळांतील नूतन भोजनालयांत पंडीत अँड को.चा तळ पडून तेथें बैठकी होऊं लागल्या. खाडिलकरांच्या घरींहि पंडीत, नारायण यांच्या बैठकी सुरू झाल्या. त्या बैठकींत आम्हाला अर्थात् शिरकाव नव्हता.

नवीन कंपनी काढणें झालेंच तर त्याला भांडवलदाराची आवश्यकता होती. भांडवलदार गांठण्याचें कार्य पेठे यांच्याकडे गेलें व त्यांच्या मुंबई, पुणें अशा खेपा सुरू झाल्या.

## विद्याहरणाचा प्रयोग

तारीख ३१ मे १९१३ रोजीं विद्याहरणाचा प्रथम प्रयोग पुणें येथें झाला. खाडिलकरांचें मानापमान गाजलें गेल्यामुळें त्यांच्या याहि नाटकाला प्रेक्षकवर्ग खूप खेंचला जाऊन थिएटर गच्च भरलें असल्यास नवल नाहीं. नाटकाच्या दिवशीं देवयानीला नवा शालू नाहीं म्हणून नारायण बिथरला. नाटकाला उत्पन्न सपाटून होऊं लागलें. नाटककाराच्या अपेक्षेप्रमाणें नाटक अप्रतिम झालें. या नाटकावर वर्तमानपत्रांतून टीकांचा वर्षाव मात्र खूप होत होता.

## खलबतखानें

नाटक लागून गेल्यानंतर सर्वांना आपापल्या अनुयायांसह खलबतें करायला मुबलक वेळ मिळूं लागला. रंगभूमि ऑफिस, नूतन भोजनालय, खाडिलकरांचें घर आणि टेंबे यांचें बिऱ्हाड हीं खलबतखान्याचीं ठिकाणें होतीं. आमच्या हालचालीवर नजर ठेवण्यासाठीं कंपनींत सी. आय्. डी. खातें निर्माण झालें.

इकडे नारायणाच्या गुणांचा धारकरांच्या मनावर पद्धतशीर परिणाम घडविण्याचे प्रयोग सिद्धसाधकांच्या द्वारें करविण्यासाठीं त्यांना पुण्यास आणविलें. त्या कामीं पेठे यांची कोण धांदल! त्यांचा तो श्रमलेला चेहेरा, कामगिरीचें त्यांच्या चेहेऱ्यावरचें तेज (?) हें पाहून मला हंसू येई. तरी आपल्याला तो मामला अनुकूल असाच असल्यामुळें मी त्या मंडळांत होतोंच. कोणाच्याहि कोंबड्यानें उजाडलें तरी मला तें इष्ट आणि अवश्यच होतें.

कंपनींत फाटाफूट होणार अशा बातम्या गांवांत पसरत होत्या. त्याबद्दल परचुरे यांनीं शंकरराव जवळ असतांना माझ्याकडे रोख ठेवून हळूच "नवीन कंपनी निघणार अशा बातम्या ऐकू येत आहेत बुवा" असें म्हटलें. तेव्हां मीहि म्हटलें "नवीन कंपनी निघण्याच्या बाबतींत अजून तरी राम नाहीं; पण पंत, कंपनी निघायचें ठरलेंच तर गुपचुप निघणार नाहीं. वाजत गर्जत निघेल."

## निर्वाणीचा खलिता

पेणच्या धारकरांनीं भांडवल देण्याचें कबूल केलें असें मी ऐकलें. सकाळपासून टेंबे याच्याकडे खलबत चालूच होतें. दुपारीं म्हणजे तारीख १८ जून रोजीं पंडितांच्या हस्तें निर्वाणीचा तोंडीं खलिता पाठविला. खलित्यांत मुख्य गोष्टी पुढीलप्रमाणें होत्याः—

"कंपनीची मालकी तुमच्यावर पूर्णपणें सोंपवून आम्ही पगारी झालों. त्या वेळीं तीन वर्षांत कंपनी कर्जमुक्त करावी, तुम्ही निवृत्त व्हावें आणि आमच्या स्वाधीन कंपनी करावी असें ठरलें होतें. त्याला दहा महिने होऊन गेले. कंपनीला पैसे मिळूनहि कर्जफेड झालेली आम्हाला दिसत नाहीं. यावरून आपण कर्जफेडीची शर्त पुरी कराल असें वाटत नाहीं. तरी आपण आमच्या स्वाधीन कंपनी करून निवृत्त व्हावें. तुम्ही तसें न केल्यास अपरिहार्य गोष्ट म्हणून स्वतंत्र विचार करणें आम्हांस भाग पडेल."

## खात्री पटली

आमच्या निर्वाणीच्या खलित्याला शंकररावांनीं बेगुमानपणें नकार देऊन वाटाण्याच्या अक्षता लावल्या. गोरे, बेहेरे यांच्या भिस्तीवर

शंकररावांनीं आम्हांला कोलवलें. तेव्हां नोटिसा देऊन त्या शंकररावांनीं स्वीकारतांच नवीन कंपनी स्थापन करायची हें ठरलेंच असें मी मंडळींना सांगितलें. पंडीत आणि को.नें कंपनी काढण्याचें नक्कीच केलें होतें. मला मात्र सामाचे सर्व उपाय थकल्यानंतर दंडाचा उपाय करावा असेंच वाटत होतें. माझ्या म्हणण्याप्रमाणें करून मी व नारायणानें रात्रीं प्रयोगाच्या वेळीं नोटिसा अगोदर देऊन मग रंगायला बसायचें असें निश्चित झालें. पण त्या रात्रीं शंकररावांची व आमची भेटच झाली नाहीं. मग दुसऱ्या दिवशीं मात्र मी ठरविलें व स्पष्टच सांगितलें कीं नारायणानें एकदां उलटा पविता टाकून आम्हांला तोंडघशीं पाडिलें आहे. तेव्हां आतां प्रथम त्यानें नोटीस द्यावी. त्यानंतर मी देईन. नारायण लगेच नोटीस द्यायला तयार झाला. तरीदेखील मला त्याचा विश्वास येईना. तो शंकररावांकडे गेला. मला परचुऱ्यांच्याकडून हें कळलें. मी आश्चर्य दाखविलें तेव्हां " अरे लुच्चा, तुला माहित असून आश्चर्य दाखवितोस ? तुम्ही कर्ती माणसें गेल्यावर आम्हां म्हाताऱ्यांनीं काय करायचें रे ? " असें ते उद्गारले. तेव्हां नारायणाबद्दल खात्री पटली. नतर परचुऱ्यांना सर्व परिस्थिति समजाऊन देऊन नोटीस देण्यासाटीं सायंकाळच्या सुमारास रंगभूमि ऑफिसकडे गेलों.

## तोंडी नोटीस लेखीसारखीच

ऑफिसच्या पायऱ्या चढतांना माझी फारच तारांबळ उडाली. जिन्यापर्यंत जावें, थबकावें; परत फिरावें, पुनः निश्चय करून जिन्याची पायरी चढावी असे चाळे होत होते. शेवटीं मन घट्ट करून धडधडत्या छातीनें वर गेलों. तेथें शंकरराव, तात्यासाहेब केळकर, गडकरीप्रभृति मंडळी बसली होती. मला पहातांच " या, नारायणानें नोटीस दिली. कळलेंच असेल तुम्हाला. " शंकरराव बोलूं लागले, " नारायणानें नोटीस द्यावी असें मी त्याच काय नुकसान केलें आहे ? हा सारा उद्योग त्या विध्वंसक खाडिलकरांचा आहे. " मी उत्तर दिलें, " खाडिलकरांना तुम्ही आपले हितकर्ते समजत होतां आणि आतां ते नकोसे कां वाटतात, कळत नाहीं. " शंकरराव पुनः उसळून बोलूं लागले. त्याला बगल देऊन मी एक महि-

त्यानें कंपनी सोडणार अशी तोंडी नोटीस दिली. लेखीहि देतों म्हटलें. पण "सर्व मंडळींच्या देखत दिलेली तोंडी नोटीस मला लेखीसारखीच आहे. ती पोंचली" असें शंकररावांनीं म्हटलें.

## असह्य वेदना

किर्लोस्कर कंपनी सोडण्याची कल्पना आजपर्यंत कधीं मनाला शिवली नाहीं. कंपनींतून जातों असें कधीं म्हटलें नाहीं. त्यामुळें कंपनी सोडून जातों हे शब्द तोंडाबाहेर पडतांना मला अत्यंत वेदना झाल्याशिवाय कशा रहाणार?

## सर्वांना नमस्कार

नोटीस ता. १९ जूनला दिली. तिची मुदत १९ जुलैपर्यंत होती. ता. २० ला रविवार पडला होता. त्या तारखेस प्रयोग ठेवला होता. 'त्या प्रयोगांत काम कराल काय?' या शंकररावांच्या प्रश्नाला मी उत्तर दिलें, "इतरांची हमी मी घेऊं शकत नाहीं. मी मात्र आणखी चार प्रयोगांत-सुद्धां जरूर तर काम करीन." एवढें म्हणून सर्वांना नमस्कार केला आणि तेथून निघालों.

## जोडा बाहेर पडल्यावर मिळेल

माझे कंपनींतील सामानसुमान गोळा करून मी निघण्याच्या तयारींत असता गडकरी उपरोधिक टीका करीत होते. मी सामानावरून सहज इकडे तिकडे पहात उद्गारलों, "आणखी काय शिल्लक राहिलें आहे?" तेव्हां गडकरी म्हणाले, "कंपनी सोडल्यामुळें होणारी अप्रतिष्ठा!"

नंतर मी पुटपुटलों "जोडा राहिला आहे माझा." त्यावरहि त्यांनीं "तो बाहेर गेल्यावर मिळेल." अशी कोटी केली. मी त्यांना कांहींच उत्तर न देतां शांतपणें टांग्यांत सामान भरून माझ्या स्नेह्याकडे गेलों. निघतांना गडकऱ्यांना मी नमस्कार केला. तेव्हां त्यांच्या डोळ्यांत पाणी चमकलें. चेहरा विरहाकुल झालेला मला दिसला.

## उपदेशामृताच्या बाटल्या

आम्ही नोटिसा दिल्याचें जगजाहीर झाल्यानंतर लब्धप्रतिष्ठित हितचिंतकांचे तांडे आमचें मन वळविण्याकरितां प्रयोगाच्या वेळीं मूजं-

लागले. जो तो आम्हाला भेटण्याचा फार्स करी व नाटक फुकट पाहून एखाद्या पात्राला वाहवा देत आपलें आसन विभूषित करी. ज्याचा त्याचा एक मंत्र कीं आजपर्यंत किर्लोस्कर कंपनी अभंग राहिली. शंकररावांसारख्या अनुभवी माणसाला सोडणें योग्य नाहीं. तुम्ही काय कराल ? सगळा पोरवडा माजेल. अशा सांगणाऱ्यापैकीं एकानेंहि आमची बाजू समग्र ऐकण्याची उत्कंठा दाखविली नाहीं. एखाद्यानें ऐकलीच तर तो शेवटीं म्हणायचा, " हें जरी खरें आहे तरी तुम्ही कंपनी सोडूं नका." एकंदरींत काय आमच्याबद्दल कोणाच्याच मनांत सहानुभूति राहिली नव्हती. उलट उपदेशामृताच्या बाटल्या मात्र पाजल्या जात होत्या.

## तोंडराखणा

नारायणाला श्री.शाहूमहाराजांनीं तार करून बोलावलें तेव्हां आम्हाला जरा पंचाईतच पडली. नारायण एकटा गेला आणि त्याला महाराजांनीं जर " राजहंस, तूं का रे कंपनी सोडतोस ? कंपनी सोडूं नकोस " असें सांगितलें, तर आमचा हा महात्मा नाक वर चढवून " सरकार, मला कुठें कंपनी सोडायची इच्छा आहे ? गणपतराव, टेंबे, यांच्यामुळें निघायला तयार झालों. सरकार नको म्हणतात तर राहिलें." असें म्हणायला चुकणार नाहीं आणि याहि वेळीं असें झालें म्हणजे आमची पुरी कंबक्तीच. महाराष्ट्रांत आम्हांला रहायलाच नको. तेव्हां सर्वानुमतें आमच्या कंपूनें नारायणाला राखणा म्हणून त्याच्या बरोबर मी जावें असें ठरविलें. त्याप्रमाणें दुसऱ्या दिवशीं छत्रपतींच्या दर्शनास आम्हीं दोघे कोल्हापुरास गेलों. महाराजांनीं विचारलें तेव्हां जोगळेकरांच्या मृत्यूपासून तों आम्ही कंपनीला नोटिसा देईपर्यंत घडलेल्या सर्व बारीकसारीक गोष्टी सांगितल्या. नारायणाला बोलण्याची संधीच दिली नाहीं. मीच सारी हकीगत एकदम सांगून टाकली. नारायण " बरोबर आहे. सरकार अगदीं खरें आहे." एवढ्याच शब्दांची मनोभावानें साथ देत होता.

महाराज त्यावर एवढेंच म्हणाले, "तुमचें आणि शंकररावाचें जमणार नाहीं असें दिसतें. शंकरराव इतके हट्टाला का पेटले कळत नाहीं. काय म्हैसकर?" म्हैसकरांनींहि लगेच "हट्टाला कां पेटले कळत नाहीं

सरकार." असें म्हटल. नंतर सरकारना मुजरा करून निघालों आणि पुण्यास दाखल झालों.

मी, पंडीत आणि नारायण मिळून सोमवारीं मुंबईस जाऊन ता. २३ आगष्टपासून आमच्या नव्या निघणाऱ्या कंपनीकरितां एल्फिन्स्टन थिएटर दरमहा आठशें रुपये भाड्यानें ठरवून बयाणाहि दिला. बयाण्याची पावती 'नूतन किर्लोस्कर संगीत मंडळी' या नांवानें आमच्या सांगण्यावरून थिएटर मॅनेजरनें केली.

## माझ्या भवितव्याला हेलकावे

नवीन कंपनीच्या घटनेसंबंधीं वाटाघाट करण्याकरितां खाडिलकरांच्या घरीं नारायण, मी, टेंबे आणि नारायणाचे पाठिराखे पंडीत जमलों. खाडिलकरानीं नव्या कंपनीचे मालक, कंपनीची एकसूत्री व्यवस्था रहाण्याकरितां एकटे नारायणराव असावे, अशी कल्पना पुढें मांडून त्याबद्दल माझें मत विचारिलें. खाडिलकरांची कल्पना ऐकून मी चमकलोंच. नोटिसा देतांना आम्ही तिघांनीं कंपनीचे भागीदार व्हावयाचें असें ठरलें असून ही घटनेची नवीन कल्पना आतांच कशी उद्भवली ? नव्या कंपनींतहि नोकरीच करावयाची तर किर्लोस्कर कंपनी कां सोडली ? नोटीस परत घेऊन तेथेंच राहिलों तर आपल्यामागें आपण त्या कंपनीशीं अठरा वर्षें एकनिष्ठ राहिल्याचा पाठिंबा तरी आहे. त्या कंपनींत राहिल्यानें विरुद्ध पक्षाची एक बाजू लंगडी केल्याचें समाधान शंकररावांना मिळेल. लोकापवाद घ्यावयाचे तर नवीन कंपनींत मानाची फायदेशीर जागा नको का ? लौकिक अगर पैसा यांपैकीं एक तरी भक्कम साध्य पाहिजे. नवीन कंपनींत नोकर या नात्यानें रहाणें अशक्य आहे हे विचार माझ्या मनांत आले. आणि ते सर्व खाडिलकरांपुढें मी मांडले.

खाडिलकरांनीं विचारल्या प्रश्नाचें उत्तर माझ्याप्रमाणेंच गोविंदराव टेंबे यांनीं दिलें. खाडिलकर माझ्या बोलण्यावर कांहीं बोलले नाहींत; पण टेंबे यांच्यावर रागावून त्यांना जरा चढ्या सुरांत म्हणाले " गणपतरावांचें म्हणणें बरोबर आहे; कारण त्यांची तशी लायकी आहे. पण तुमचें तसें नाहीं. तुम्हाला अजून प्राविण्य व लौकिक मिळवायला अवकाश आहे.

कंपनींत नुकतेच आलां आहांत. तुम्हांला मालकी मागण्याचा हक्क नाहीं." वाद विकोपाला जाईल या भीतीनें पंडितांनीं खाडिलकरांना " आतां आम्ही सर्व ठरवून कळवितों " असें गडबडीनें सांगितलें. आम्ही तेथून उठलों. पंडितांच्या हातांत नारायण आहे हें ओळखून खाडिलकर पंडितांचें म्हणणें ऐकत. पंडीतहि तें ओळखून त्यांच्याकडे आपले पवित्रे टाकीत.

खाडिलकरांकडून आम्ही बाहेर पडल्यावर पंडिताना खाडिलकरांच्या बोलण्याचा अर्थ विचारला. हा काय विश्वासघाताचा प्रकार आहे ? त्यावर पंडितांनीं " त्यांचें काय मनावर घेतां ? मी त्यांची समजूत घालतों. आता तुमच्या तिघांची भागी तुम्ही ठरवा. नारायणरावाचा भाग सात आण्यांचा राहील. उरल्या नऊ आण्यांतील एक आणा धर्मादाय वगळून बाकीच्या आठ आण्यांत तुमची वाटणी तुम्ही ठरवून घ्या. " असें खाडिलकरांची नाडी आपल्या हातात सांपडली आहे अशा विश्वासानें पंडितांनीं आम्हाला सांगितलें. आणि हें सर्व मुंबईस धारकर व सॉलिसिटर वैद्य यांच्या समोर निश्चित करावयाचें असें ठरलें.

## आज कोण लागले ?

आमच्याप्रमाणें गोविंदराव टेंबे यांनींहि नोटीस दिल्यानंतर दादा लाडू, राजाराम कडू, लक्ष्मण देवस्थळी, स्टेज मॅनेजर, बाळकृष्ण पेंटर या मडळीनींहि नोटिसा दिला. नोटिसांची ही सांथ जास्त पसरूं नये म्हणून किर्लोस्कर संगीत मंडळीचें सी. आय्. डी. खातें जागरूक राहूं लागलें. "आज कोण लागले" हें पारिभाषिक वाक्य कंपनींत उच्चारलें जाऊं लागलें. नव्या कंपनीची जागा म्हणजे प्लेगानें दूषित अशा समजानें जो तिकडे गेला तो मेला व जो जाणार तो लागला. अशा अर्थानें तें वाक्य उच्चारण्यांत येत असे. थिएटरमध्यें आम्हाला घालून पाडून विरुद्ध पक्ष बोले. तें ऐकण्याचा आमचा नित्यक्रमच झाला होता.

नव्या कंपनीकरितां बुधवारांतील डमढेरे यांच्या बोळांत असलेली माळ्याची धर्मशाळा भाड्यानें घेतली होती.

किर्लोस्कर कंपनींतून कृष्णाप्पाकरवीं एक लहान बाण आणला होता, त्याची देवघरांत स्थापना करून पूजाअर्चेस सुरवात केली. ता. ५ जुलै रोजीं दुपारीं पुष्य नक्षत्रावर ५॥ वाजतां समारंभ साजरा झाला. समारंभास निमंत्रित मंडळी जमूं लागली.

## दुर्योधनाच्या जन्माच्या वेळीं गाढव ओरडलें !

शंकररावांनाहि निमंत्रणपत्रिका धाडली होती. समारंभांत पेठे यांचें भाषण झालें. त्या भाषणावर शंकररावांनीं मनाच्या तीव्र स्थितींत असतांहि दुसऱ्याच दिवशीं "दुर्योधनाच्या जन्माच्या वेळीं गाढव ओरडलें होतें" अशी उत्तम कोटी केली. शंकरराव एखादे वेळीं अशाच मजेदार कोट्या करीत असत. आमच्या कंपनीला बोचणारी वरील कोटी जशी त्यांनीं या वेळीं केली तशीच पुढें एकदां आमची कंपनी निघाल्यानंतर कांहीं कालानें त्यांनाच लागूं पडणारी व बोचणारी कोटी त्यांनीं करण्यास कमी केलें नाहीं. तो प्रसंग असा.

## "येथें थुंकूं नये."

शंकररावांनीं पुण्यास थिएटरमध्यें "येथें विडी ओढूं नये" "येथें थुंकूं नये" असे सूचनात्मक बोर्ड लावण्याकरितां तयार करविले होते. सर्व ठिकाणीं बोर्ड लावून कांहीं शिल्लक राहिले. ते कोठें लावावे असें लावणारानें शंकररावांना विचारलें तेव्हां त्यांनीं सध्यां आपल्या कंपनींत असलेली पात्रें व त्यांच्यामुळें होणारीं कशींबशीं नाटकें हें ध्यानांत येऊन बोर्ड लावणारास "एक तेथें लाव, दुसरा त्या ठिकाणीं लाव" आणि शंकररावांनीं आपल्या गळयाकडे बोट दाखवीत "उरलेलों इथे लाव" अशी कोटी केली.

## गनिमी कावा

नव्या कंपनीची आम्ही वर्तमानपत्रांत पुढीलप्रमाणें जाहिरात दिली. "कांहीं अपरिहार्य कारणांमुळें किर्लोस्कर कंपनी सोडून नवीन कंपनी काढणें आम्हाला भाग पडलें आहे. आमची नवी कंपनी सौभद्र, शाकुंतल, रामराज्यवियोग, मृच्छकटिक, मूकनायक, मानापमान हीं नाटकें करणार आहे." आमची जाहिरात प्रसिद्ध होतांच दोनतीन दिवसांनीं आम्हां

तिघांना शंकररावांकडून सौभद्र, शाकुंतल, रामराज्यवियोग आणि मानापमान या नाटकांचे प्रयोग न करण्याबद्दल मनाई नोटिसा आल्या. मानापमान नाटकाबद्दल आमच्याबरोबर खाडिलकरांनाहि नोटीस मिळाली. किर्लोस्करांच्या नाटकांचा हक्क अण्णासाहेबांच्या पत्नी सावित्रीबाई किर्लोस्कर याच्याकडे होता. त्यांनीं आपले सांगलीचे भाचे रामभाऊ फडणीस यांना त्याबद्दल मुखत्यारपत्र दिलेलें होतें. पण शंकररावांनींहि एक मुखत्यारपत्र मिळविलें आणि आम्हाला नोटीस देऊन आमची रसद तोडण्याचा पद्धतशीर गनिमी कावा लढविला होता. मानापमानाचीहि कायदेशीर मोनापली अजून किर्लोस्कर कंपनीकडे नव्हती, तरीहि शंकररावांनीं दिलेल्या नोटिशींत "जोगळेकरांच्या वेळेपासून मानापमान नाटकाची मोनापली किर्लोस्कर कंपनीकडे आहे" असें दडपून लिहिलें होतें.

परंतु मानापमानाच्या मोनापलीसंबंधींची खरी हकीगत पुढीलप्रमाणें होती. १९११ मध्यें मानापमानाच्या मोनापलीबद्दल खाडिलकरांना तीन हजार रुपये द्यायचे असें ठरलें होतें. त्यापैकीं काहीं रक्कम खाडिलकरांना पोंचली होती. मोनापलीचा कागद रक्कम पुरी पोंचल्यावर व्हावयाचा होता. रामभाऊंच्या भागीची भानगड मिटून नवें भागीपत्र होईपर्यंत तो करावयाचा नाहीं असा गुप्त बेत होता. परंतु जोगळेकर अवचित वारले त्यामुळें मोनापलीचा कागद व्हावयाचा होता तो तसाच लोंबकळत राहिला. जोगळेकर वारल्यानंतर मोठ्या मनानें खाडिलकरांनीं कंपनीला सुस्थिति येईपर्यंत कंपनीकडे आपल्या पैशाची मागणी आपण करणार नाहीं असें कळविलें होतें. त्याप्रमाणें कोल्हापुरापर्यंत त्यांना पैसे दिलेहि नव्हते. शंकरराव एकटे मालक झाल्यानंतर त्यांनीं त्यांना किती दिले हें आम्हांला कळायला मार्ग नव्हता.

तसेंच विद्याहरणाबद्दल प्रयोग करण्याच्या सामान्य हक्कासाठीं १००० रुपये व जाण्यायेण्याच्या खर्चाबद्दल २०० रुपये असे १२०० रुपये खाडिलकरांना द्यावयाचे ठरलें होतें. पैसे चुकते करून मोनापली लिहून घ्या असें खाडिलकरांनीं सोलापुरास शंकररावांना सांगितलें होतें, पण शंकररावांनीं आपल्या स्वभावधर्माप्रमाणें खाडिलकरांची सर्व बाकी चुकती

केली नव्हती. त्यांनीं खाडिलकरांना व आम्हांला नोटीसा दिल्या त्या वेळेपर्यंत त्यांच्याकडून ४२०० रुपयांपैकीं फक्त २७०० रुपयांची पोंच खाडिलकरांना झाली होती.

## ' मानापमाना 'बद्दल खूणगांठ

नोटिसा मिळाल्या त्याच्या दुसऱ्या दिवशीं खाडिलकर नवीन कंपनीच्या बिऱ्हाडीं आले. मानापमानबद्दल आम्ही विचारलें तेव्हां " सोलापुरास शंकररावांकडे मी पैशांची मागणी करतांना ता. ३० जून १९१३ च्या आंत आपली रक्कम पुरेपूर दिली तरच मानापमानाची मोनापली तुम्हाला द्यायला मी बांधला आहें. नंतर नाहीं. ता. १ जुलैस मी मानापमान वाटेल त्याला देईन. अशा तऱ्हेनें मी शंकररावांना वचनबद्ध झालों आहें. तेव्हां शंकररावांनीं वरील मुदतींत सर्व पैसे दिले तर तुम्हाला मानापमान मिळणार नाहीं. असें खाडिलकरांनीं सांगितलें. तेव्हां मी मनाशीं विश्वासपूर्वक गांठ बांधली कीं शंकररावांकडून खाडिलकरांना मुदतींत पैसे मिळत नाहींत आणि मानापमान आपल्याला नक्की मिळाल्याशिवाय रहात नाहीं.

## प्रथमग्रासे मक्षिकापातः

आम्हां तिघांच्या भागीबद्दल मुंबईस नक्की व्हावयाचें होतें. वास्तविक त्याकरितां नारायण, गोविंदराव याच्याबरोबर मलाहि जाणें अवश्य होतें. परंतु मंडळी जमत होती. किर्लोस्करांतून दत्तु पेठकरास जवळ जवळ आम्ही फितवूनच आणिला होता. त्याच्या तालमी घेणें मला आवश्यक होतें. त्यामुळें स्वतः मुंबईस न जातां माझ्या भागीबद्दल योग्य तें ठरविण्याची कामगिरी मी गोविंदरावांवर विश्वासानें सोंपविली होती. त्याप्रमाणें नारायण व पंडीत यांच्याबरोबर गोविंदरावांना मी पाठविलें.

मुंबईहून मंडळी परत आली. मोठ्या उत्सुकतेनें काय काय ठरलें असें गोविंदरावांना मी विचारिलें, तेव्हां त्यांनीं " नारायणाचा भाग ठरलाच होता, माझा ८५ आण्यांचा व तुमचा तीन आण्यांचा असे भाग सर्वानुमतें ठरले आहेत " असें गोविंदरावांनीं बेछूट मला सांगितलें.

## अजून आपला लाभकाळ आला नाहीं.

त्यांचे ते शब्द कानीं पडतांच माझ्या पायांपासून डोक्यापर्यंत एक सणक येऊन गेली. आपल्याला हे मुळींच मान्य नाहीं हें सांगण्याकरितां ओठापर्यंत शब्द आले. पण त्याच वेळीं " या लोकांची एकी पुरी दोन महिनेसुद्धां रहाणार नाहीं आणि हेच लोक मुठींत नाक धरून परत येतील अशा तऱ्हेची शंकररावांनीं अगोदरच केलेली घोषणा मनांत उभी राहिली. अजून आपला लाभकाळ आला नाहीं अशी मनाची समजूत घालून मी गम खाल्ली. " ठीक आहे." एवढेंच गोविंदरावांना म्हटलें.

वास्तविक रंगभूमीवरील माझी लोकप्रियता तावून सुलाखून ठरली होती. माझ्या मानानें गोविदरावांना लोक काय समजत होते हें मी पहात होतों. वस्तुस्थिति गोविंदराव जाणत नव्हते असेंहि नाहीं. पण ज्या गोविंदरावांच्यावर मी विश्वास टाकला त्यांनींच माझ्या गैरहजेरीचा फायदा घेतला त्याला काय उपाय ?

## कंपनीचें बारसें

आमच्या नव्या कंपनीचें नांव खाडिलकर यांनीं ठरविलें. केसरी कचेरींत कंपनीची जाहिरात द्यायला मीच गेलों होतों. तात्यासाहेब केळकरांनीं विचारलें तेव्हां " गंधर्व नाटक मंडळी " असेंच नांव ठेवा असें खाडिलकरांनीं सांगितल्याचें मी त्यांना कळविलें. तात्यासाहेबांनीं नुसतें हंसून " ठीक आहे " म्हटलें. त्यावरून त्यांना तें नांव विशेष आवडलें नाहीं असें दिसलें. मी गंधर्व नाटक मंडळीच्या नांवाची केसरींत जाहिरात दिली आणि तात्यासाहेबाना ते नको नको म्हणत असतांहि आमच्या बोर्डमध्यें आपण असलें पाहिजे, आम्ही आपलें नांव त्यांत घालणारच असें विनंति करून सांगितलें.

———

# ४

# विकास

## गंधर्व नाटक मंडळीचा पोलादी पाया

किर्लोस्कर कंपनीमध्यें मी अनेक प्रकारचे, लहान मोठ्या सर्व तऱ्हेच्या कामांचे, तीं तीं कामें करून, निरनिराळ्या खात्यांतील प्रत्यक्ष अनुभव घेतलेले होते. त्यामुळें त्या सर्व अनुभवांचा फायदा गंधर्व मंडळीची उभारणी करण्याच्या कामीं उपयोगांत आणणें क्रमप्राप्तच होतें. माझ्या स्वतःच्या लायकीबद्दल लिहितांना या वेळीं मला संकोच वाटत आहे. तरी मी गंधर्व कंपनीच्या उभारणीची तयारी सुतळीच्या तोड्यापासून तों नाटक रंगभूमीवर येईपर्यंत सर्व प्रकारची जुळवाजुळव तन मन धन वेंचून केली त्याचें यथार्थ वर्णन करणें मला अशक्य आहे. "कलावंताच्या सहवासांत" या सदराखालीं दोन तीन वर्षांखालीं किर्लोस्कर मासिकांत 'धनंजय' नांवाच्या लेखकानें गंधर्व कंपनीची रचना पोलादी पायावर बोडसांनीं केली अशा प्रकारचा मजकूर लिहिला आहे यावरून माझ्या बद्दलची कल्पना कोणालाहि येईल. माझ्यापेक्षां तो मजकूर यथार्थ साक्ष देईल. नारायणाला तात्यासाहेब कोल्हटकरांकडे आणि टेंबे यांना कपडे मिळविण्याकरितां बडोदें, देवासकडे रवाना केलें. कंपनीला लागणाऱ्या सर्व प्रकारच्या सामानाची तपशीलवार यादी करून ती स्टेजमॅनेजर, बाजारमास्तर यांजकडे मी दिली. जरूर लागणारीं भांडीं खरेदी केलीं. वेळेवर सीनसीनरी मिळावी असें धोरण ठेवून शापसंभ्रम, मूकनायक, मानापमान यांना लागणारें सामान एकाच पेंटरकडे न देतां छोटू पेंटर, मुंबईचे बाबूराव पेंटर, रघुवीर पेंटर आणि आणखी एक पेंटर यांच्याकडे करावयास दिलें. कारकून अजून ठेवला नसल्यामुळें मी जमाखर्चहि

लिहीत असें. धारकरांकडून येणारे पैसे पंडितांच्या पन्हाळींतून माझ्याकडे येत. त्यामुळें मला पंडितांचें खातें घालून त्या खात्यावर ते जमा करावे लागत. त्यामुळें धारकरांच्या नावें खाते घातलें नाहीं.

## समेटाच्या शेवटच्या वावटळी

गंधर्व कंपनीची विधिपूर्वक स्थापना तारीख १९१३ च्या जुलै पांच तारखेस झाल्याचें मागें एकदां लिहिलेंच आहे. तो समारंभ झाल्यानंतर आमचा किर्लोस्कर मंडळीशीं समेट व्हावा असे दोन तीन प्रयत्न झाले. पहिला प्रयत्न जो करण्यांत आला तो श्रीमंत मिरजकर यांनीं तशी इच्छा प्रगट करून आम्हाला बोलावलें तेव्हां श्रीमंतांच्या आज्ञेनुसार आम्हीं गेलों. पण शंकररावच आले नाहींत. त्यामुळें मीटिंग झाली नाहीं. त्याच वेळीं त्रिंबकराव साठे यांना कंपनीचे मॅनेजर करावयाचें असें ठरवून त्यांची मिरजेसच संमति मिळविली. देवलमास्तरांना कंपनींत आणावें म्हणून मी एकटाच त्यांच्याकडे गेलों. त्याना आग्रह केला. त्यानीं स्पष्ट होकार दिला नाहीं. तरीहि त्याना आपण कंपनींत नेऊं अशी माझी खात्री होती. आम्ही पुण्यास गेलों. खाडिलकरांना झालेली हकीगत कळविली. मॅनेजर व देवलमास्तर यांना कंपनींत आणण्याबद्दल खाडिलकरांकडे आम्हाला कौल लावणें भाग होतें. कौल लावला आणि त्यांनीं अनुकूल असा कौल दिलाहि.

समेटाचा दुसरा प्रयत्न इन्स्पेक्टर सदावर्ते यांनीं पुढाकार घेऊन करण्याचें काम सुरू केलें होतें. त्यांतहि यश आलें नाहीं. शेवटीं तात्यासाहेब केळकर सांगतील त्याप्रमाणें समेट कबूल करूं असें आम्हीं सांगितलें. तात्यासाहेबांच्याकडे ता. १९ रोजीं जायचें ठरलें.

आमच्या नोटिशीची मुदत जुलै १८ शुक्रवारला संपत होती. शंकररावांनीं त्याच वारीं मानापमान नाटक ठेविलें होतें. किर्लोस्कर कंपनींत आम्ही सर्व असतांना होणारा हा प्रयोग शेवटचाच होता. अशा पात्रांचा जमाव पुनः एकत्र दिसणार नाहीं म्हणून आडवार असतांनासुद्धां थिएटर महापुराप्रमाणें भरून गेलें. प्रयोगाला अतिशय रंग चढला.

## जगासमोर आम्हांला रहायचें आहे.

रात्रीं अकरा वाजतां म्हणजे तिसऱ्या अंकाच्या अगोदर सदावर्ते आंत येऊन त्यांनीं आम्हांला विचारिलें " बारा वाजतां नोटिशीची मुदत

संपते. तेव्हां अर्धांच प्रयोग टाकून तुम्ही जाणार आहां असें शंकररावांना कळलें आहे तें खरें काय ?" त्यांना मी उत्तर दिलें, "आम्हांला आजच धंदा सोडायचा नाहीं. जगासमोर आम्हाला रहावयाचें आहे. जग छी थू करील अशी गोष्ट आम्हीं करूं काय ?"

## आईवेगळें मूल

प्रयोग संपला. रंग पुसला. घरीं जायला निघालो. थिएटरच्या दरवाजापर्यंत जातांनाहि पाय भारावल्यासारखे झाले. मनांत कढावर कढ येऊं लागले. ज्या कंपनींत अठरा वर्षे राहिलों, वाढलों, लौकिकाला चढलों, जग ओळखूं लागलों, कौतुकास पात्र झालों, त्या कंपनीला सोडून जाण्याची पाळी आज आपल्यावर आली हे विचार मनांत दाटले. डोळ्यांतून अश्रूंच्या धारा वाहूं लागल्या. मुलाला आईवेगळें होतांना जशा तीव्र मनोवेदना होतात तीच गत किर्लोस्कर कंपनीरूपी आपली आई सोडून जातांना होऊन मन अत्यंत कष्टी झालें. थिएटरबाहेर पडतांना एकवार मागें वळून पाहिलें. भरल्या हृदयानें आणि डोळ्यांनीं बिऱ्हाडीं आलों. किर्लोस्कर कंपनीचा आपला संबंध तुटला. हॅम्लेटला ज्याप्रमाणें आपली आई चुलत्याच्या राक्षसी इच्छेला बळी पडलेली पाहून चीड आली होती त्याप्रमाणें आमची कंपनीरूपी आई शंकररावस्वरूपी चुलत्याच्या ताब्यांत गेली. तरीहि आम्हाला काहीं प्रतिकार करतां आला नाहीं म्हणून हॅम्लेटप्रमाणें आमचीहि स्थिति झाली.

## तात्यासाहेब केळकर यांच्या पुढें समेटाचा अखेर निकाल

आम्ही कंपनीच्या बिऱ्हाडीं आलों आणि शंकररावांच्याकडून आम्हाला घालण्यांत आलेल्या व आम्ही कबूल केलेल्या अटींचा एक मसुदा तयार केला. तो मसुदा पुढील प्रमाणें होताः—

## अटींचा मसुदा

(१) शंकररावांना तहहयात ७५ रुपये पेन्शन देणें,

(२) किर्लोस्कर छापखाना शंकररावांना बक्षिस देणें,

(३) " रंगभूमि " मासिक नुकसानींत असलें तरी शंकररावांच्या हौसेसाठीं त्या मासिकाच्या वर्गणीशिवाय जेवढी रक्कम कमी पडेल ती आम्ही त्यांना द्यावी.

(४) थिएटरच्या कर्जापैकीं दहा हजार रुपये कंपनीची किंमत म्हणून आम्ही शंकररावांना द्यावी. पण त्या रकमेचा विनियोग त्यांनीं कर्जफेडी-कडेच केला पाहिजे आणि बाकीचें कर्ज थिएटर भाड्यांतून फेडलें पाहिजे.

वरील मसुदा करण्याकरितां आम्हा मंडळींची बैठक सकाळीं सहा वाजेपर्यंत चालली. तात्यासाहेबाच्याकडे सायंकाळीं चार वाजता जायचें ठरलें होतें. इकडे आम्ही हा उद्योग करीत असतांना तिकडे शंकररावांच्या प्रेरणेनें त्यांच्या चिरंजीवांनीं कंपनीच्या वंशपरंपरागत मालकीचा लोभ धरून कंपनींतील अदूरदर्शी, भोळ्या मंडळींना आपलेसे करण्याचा उद्योग चालविला होता. " नवीन कंपनी काढणारे लोक यापुढें जर कंपनींत राहिले आणि आमच्या नानांना (शंकररावांना त्यांचे चिरंजीव नाना म्हणत असत) दूर व्हावें लागलें तर ते लोक जुन्या सर्व माणसांना कंपनींतून काढून टाकणार आहेत. याकरितां तुम्ही सर्वांनीं नानाच कंपनीचे मालक असले पाहिजेत अशीं मतें द्या. तुमच्या सर्वांच्या सह्यांचा कागद केळकरांच्यापुढें हजर करूं म्हणजे समेट मोडेल आणि मग कंपनीचे मालक नानाच राहून तुमचें सर्वांचेंच कल्याण होईल." याप्रमाणें मंडळींच्या मनावर परिणाम करून चिरंजीवांनीं मंडळींच्या सह्या मिळविल्या.

समेटासाठीं ठरल्याप्रमाणें केळकरांच्या येथें दोन्ही पक्षांतील वीर दुपारीं ४ वाजतां जमले. शंकररावांच्या बाजूचे सेनापति स्वतः शंकरराव होते. आणि आमच्या बाजूला मी, पंडीत, टेंबे असे सेनाधिपति होतों. आम्ही नुसते सेनापतिच होतों. आम्हांला सैनिक नव्हतेच. शंकरराव मात्र ससैनिक होते.

भापण रंगांत आलें. शंकररावांकडून आलेल्या आणि आम्ही मान्य केलेल्या अटी केळकरांच्यासमोर मांडल्या. त्या पाहून केळकर शंकररावांना म्हणाले, " शंकरराव, या मंडळीनीं तुमच्या सर्वच अटी मान्य केल्या आहेत, तेव्हां आतां संपवून टाका. "

परंतु शंकररावांनीं तात्यासाहेबांच्यापुढें आपल्या चिरंजीवांकडून मंडळींच्या मान्यतेचा तयार केलेला खलिता बाहेर काढिला. पंत परचुरे यांनींहि मध्येंच आम्हांला विचारलें, " जुन्या लोकांना तुम्ही कमी करणार आहांत असें ऐकिलें त्याचें काय ?" " ते खोटें आहे. फक्त ३०–४० रुपये पगारावर नानबा लेले रहात असतील तर त्यांना ठेवणार आहोंत. नाहीं तर कमी करणार. त्याशिवाय दुसऱ्या कोणालाहि कमी करणार नाहीं." असा मी खुलासा केला. यावर शंकररावांनीं राखून ठेवलेली शक्ति बाहेर काढली. ती म्हणजे जुनी मंडळी केव्हांहि आम्ही काढणार नाहीं अशी आमच्याकडून लेखी हमी आम्हीं दिली पाहिजे. अशी अव्यवहार्य अट कोण मान्य करणार ? जुना मनुष्य निरुपयोगी झाला, अत्यंत वाईट वागूं लागला तर त्याला कमी करावयाचें नाहीं हें व्यवहाराला धरून कसें होईल ? केळकरांनींहि शंकररावांना "तुमची ही अट व्यवहार्य नाहीं. समेट मोडायचा असा तुमचा बेत अशा अटी घालण्यांत दिसतो." असें म्हटलें. तेव्हां शंकररावांनीं विचाराकरितां वेळ मागितला. केळकरांनीं " एक महिन्याची नोटीस देऊन तुम्हाला या मंडळीनीं वेळ दिला होता. आतां तुमचा विचार होईपर्यंत यांनीं काय करायचें ?" असा प्रश्न टाकला. शंकररवांनीं सांगितलें "मूकनायक प्रयोग आज लावलाच आहे. मंडळींनीं येऊन कामें करावीं. काम चालू ठेवून विचार करूं." शंकररावांची ही अट मान्य करणें अशक्य होतें. आम्ही सामानसुमानासाठीं तीन चार हजार रुपयांचें कर्ज काढून ते खर्चहि केले होते. तरीहि केळकर सांगतील तें आम्ही मान्य करूं; समेट झाला तर खर्च झालेली रक्कम कर्ज म्हणून फेडूं; पण समेटाचा निकाल याच बैठकींत झाला पाहिजे असा विचार आम्ही पुढें मांडिला. तरीहि शंकररावांनीं " विचाराला वेळ पाहिजे. जुन्या मंडळींनीं माझ्यावर विश्वास टाकला आहे. त्यांचें हित मला पाहिलें पाहिजे " हा पहिलाच मंत्र जपला. शेवटीं केळकरांनीं शंकररावांना " तुमची समेट करण्याची इच्छाच नव्हती, मग मला अध्यक्ष नेमून विनाकारण माझा वेळ कशाला खाल्लात ?" असें सांगून आम्हांलाहि आपल्या उद्योगाला लागा असें सांगितलें.

बैठक उठली. आपल्या होयबांसह शंकरराव थिएटरकडे आणि आम्ही आमच्या नवीन जागेकडे वळलों. अशा रीतीनें किर्लोस्कर कंपनीची शेवटीं अखेरपर्यंत प्रयत्न करूनहि फाटाफूट झालीच.

## चोहोंकडून नाकेबंदी

नोटीस दिल्यापासून पुण्यांत रस्त्यानें हिंडण्याची लाज वाटूं लागली. किर्लोस्कर कंपनीचा द्रोही, कंपनी फोडणारा म्हणून कोणी आमच्याकडे बोट दाखवील कीं काय, हिणवील कीं काय, अशी भीति वाटे. म्हणून आम्ही, निदान मी तरी, दिवसा बाहेरच पडत नसें. आम्हीं निघायच्या अगोदर सावित्रीवहिनी किर्लोस्कर पुण्यास आल्या आहेत असें कळलें. नारायण आणि मी त्यांना भेटलों आणि सौभद्राच्या परवानगीची गोष्ट काढली. कंपनी कां सोडलीत म्हणून त्यांनीं आम्हांला विचारलें. आम्हीं त्यांना सर्व हकिगत सांगितली. नंतर "रामभाऊ फडणीस व शंकरराव यांना मी मुखत्यारपत्र दिलेलें आहे, त्यांना विचारा" असें त्यांनीं सांगितलें. शंकररावांकडे जाणें शक्यच नव्हतें. तेव्हां फडणीसांकडे गेलों आणि विनंती केली. मावशीच्या मनांत इतक्यांत परवानगी देण्याची इच्छा नाहीं असें म्हणून आम्हांला त्यांनीं वाटेला लावलें. यावरून शंकररावांनीं चोहोंबाजूंनीं नाकेबंदी करून आम्हाला वठणीवर आणायचें असा निश्चय केला आहे हें समजून चुकलें.

## माझी मागणी खिशांत राहूं द्या

परत येत असतांना गडकरी यांची गांठ पडली. ते धांदलींत होते. त्याच दिवशीं त्यांच्या प्रेमसंन्यास नाटकाचा पहिलाच प्रयोग पुण्यांत व्हायचा होता. आम्हीं मुंबईस जात आहोंत असें सांगून एकादें नाटक आमच्याकरितां लिहा अशी विनंती केली. किर्लोस्कर कंपनीच्या अभिमानानें गडकरी भारलेले होते. त्या आवेशांत माझ्याकडे तिरस्काराची मुद्रा करून म्हणाले, "शक्यच नाहीं, तुम्हांला माझ्याकडून नाटक मिळणें शक्य नाहीं." "तें ठरलेलेंच आहे. परंतु धंदेवाला या नात्यानें मी मागणी केली आहे. तुमच्या खिशांत राहूं द्या." नंतर ते घाईघाईनें नमस्कार

करून निघून गेले. रात्रौ कंपनीसह व माझ्या मंडळीसह मुंबईस रवाना झालों.

## व्ही. शांतारामबापू

मुंबईस विठ्ठल सायन्ना बिल्डिंगमध्यें कंपनी उतरली. पंडितांच्या "बिग बबल बँकिंग ब्यूरो" मध्यें पोटभाडेकरी म्हणून मी राहिलों. नारायणराव—नारायणाला या वेळेपासून नारायणराव या नांवानें हांक मारायला सुरवात केली—याच बिल्डिंगमध्यें बिऱ्हाड करून राहिले. घरमालक व आमचे सावकार तेथेंच रहात. कंपनींत नाटकाच्या तालमी सुरू झाल्या. सबंध दिवसांत जेवणाकरितां फक्त एक तास मोकळा सोडायचा. बाकीच्या वेळांत तालमी सारख्या चालू होत्या. त्यामुळें सुखाला चटावलेले कांहीं नट जेरीस आले. प्रभात फिल्म कंपनीचे सुप्रसिद्ध डायरेक्टर व्ही. शांताराम हे या वेळीं मुलांच्या भरतींत आले होते. गाण्याचें अंग नसल्यामुळें नाचाच्या मुलांत, क्वचित् एखाददुसऱ्या वाक्याचें काम करीत. परंतु प्रत्येक गोष्ट लक्षपूर्वक पहायची हा त्यांचा नित्यक्रम होता. या वेळीं त्यांचें वय बारा तेरा वर्षांचें असावें.

## पहिली बोहणी

मी तालमी घेत मुंबईस होतों. टेंबे, अण्णासाहेब गायकवाडाबरोबर बडोदें, देवास येथें कपडे जमा करायला गेले. नारायणराव तात्यासाहेब कोल्हटकरांकडे गेले आणि एक हजार रुपयांत मूकनायक, गुप्तमंजूष, प्रेमशोधन या तीन नाटकांची परवानगी घेऊन आले. ता. २२ आगष्ट रोजीं त्र्यंबकराव साठे हजर झाले. ता. ३ सपटेंबर बुधवार रोजीं प्रथम प्रयोग मूकनायक नाटकाचा करायचा असें ठरलें. मुंबईतले श्रीमान भाटिया गृहस्थ शेट माधवदास हे कंपनींत आले आणि एकशें पांच रुपये देऊन चार सीझन तिकिटें ठेवण्यास त्यांनीं सांगितलें. याप्रमाणें त्यांच्या हातून तिकीटविक्रीची पहिली बोहणी झाली.

प्रथम प्रयोगाच्या सुरवातीचा पडदा सर डॉ. भालचंद्र यांच्या हस्तें वर जायचा होता. जाहिराती लागल्या. फक्त खालच्या दरांचीं

तिकिटें विक्रीला ठेवलीं होतीं. खुर्चीच्या जागा निमंत्रित मंडळीकरितां राखून ठेविल्या होत्या. ठरल्याप्रमाणें बरोबर सव्वा नऊ वाजतां पडदा वर गेला. प्रयोग सुंदर झाला. प्रत्येक प्रमुख पात्र रंगभूमीवर आल्याबरोबर टाळ्या देऊन प्रेक्षकांनीं आनंद व्यक्त केला. शनिवारीं शापसंभ्रम झाला. रविवारीं मानापमान लागला होता.

## 'मानापमाना'बद्दल इंजंक्शन

शंकररावांनीं नोटीस दिली होती. तींत मानापमानाची मोनापली (सर्व हक्क) जोगळेकरांच्या वेळेपासून किर्लोस्कर कंपनीकडे आहेत असा मजकूर होता. परंतु सोलापूर मुक्कामीं खाडिलकरांच्या पैशाची वाटाघाट पंडीत यांच्या मार्फत शंकररावांनीं चालविली होती. त्या वेळीं शंकरराव व पंडीत यांच्यामध्यें जो पत्रव्यवहार झाला यांत "खाडिलकरांजवळ मोनापलीचें एकदां ठरवून टाका" असें लिहून मोनापलीबद्दल काय रक्कम द्यावी लागेल व प्रयोगाच्या सामान्य हक्काबद्दल काय द्यावें लागेल ही विचारणा केली होती. १९११ सालीं मानापमानाचा प्रयोग झाला. त्याच सालीं जोगळेकर वारले आणि वर उल्लेख केलेलें पत्र १९१३ सालीं लिहिलेलें होतें. या पत्रावरून नोटिशींत केलेलें विधान खोटें ठरत होतें. हें पत्र पंडीत यांच्या संग्रहीं होतें. तें सॉलिसिटर वैद्य यांस दाखविलें. खाडिलकरांची परवानगी घेऊन खुशाल प्रयोग करा असा कायदेशीर सल्ला आम्हांला मिळाला. त्याप्रमाणें खाडिलकर आल्यावर त्यांना रोख नऊशें रुपये देऊन दहा रुपयांच्या स्टॅम्पावर त्यांची लेखी परवानगी घेतली. तरीसुद्धां मानापमानाचा प्रयोग रविवारीं करणार असें अगोदर प्रसिद्ध केलें तर कदाचित् शंकरराव इंजंक्शन आणून ऐन वेळीं घोटाळा करतील म्हणून शनिवारीं दुपारीं हायकोर्ट बंद होईपर्यंत मानापमान प्रयोग प्रसिद्ध केला नव्हता. सॉलिसिटर वैद्य यांनीं हायकोर्टामध्यें शंकरराव इंजंक्शन मागतात कीं काय यावर नजर ठेवण्याकरितां एक माणूस बसवून ठेविला होता. शनिवारीं सकाळीं अकरा वाजल्यापासून तासातासानें टेलिफोन करीत होते. अखेर दुपारीं तीन वाजतां त्यांनीं प्रयोग प्रसिद्ध करा असें सांगितलें. सायंकाळीं जाहिराती लावल्या. रविवारीं सकाळीं

इंदुप्रकाशमध्यें जाहिरात आली. थिएटर पूर्ण भरलें. खळ हातखंडाच होता. प्रेक्षकवर्ग तल्लीन होऊन गेला. नाटक निर्विघ्नपणें पार पडलें. आमच्या डोक्यावरचा भार उतरल्यासारखा झाला.

## नवीन प्रघात

या वेळीं पंडितांनीं नवीनच एक प्रघात पाडला. नारायणरावांचे स्नेही व कंपनीचे हितचिंतक यांनां जागा मिळत नाहीं, करितां स्टॉल्सची सबंध एक लाईन व कांहीं खुर्च्या पंडीत आपल्याकडे राखून ठेवूं लागले. अशा रीतीनें स्नेही आणि हितचिंतक यांच्या नांवावर मुंबईतल्या मुक्कामांत चौदाशें रुपयांचा उठाव करण्यांत आला.

खाडिलकरांची संमती घेऊन देवलमास्तरांना आम्हीं बोलावलें. त्याप्रमाणें ते आले. शापसंभ्रम, मृच्छकटिक व शारदा या तीन नाटकांच्या परवानगीबद्दल नऊशें रुपये द्यायचे असें ठरलें. देवलमास्तर आल्यापासून त्यांचीच छाप सर्वांवर अधिक बसली. नारायणराव तर त्यांच्याजवळ नेहमीं बसूं लागले.

खाडिलकरांनीं तीनशें रुपये घेऊन विद्याहरण नाटकाच्या सामान्य प्रयोगाची परवानगी स्टॅम्पवर लिहून दिली. या नाटकांत शुक्राचार्यांच्या कामाकरितां दत्तु पेठकर यास तयार केला होता. परंतु असलें काम करण्याची संवय त्याला नव्हती. त्यामुळें त्याचा आवाज चालेना. कसेबसे दोन प्रयोग झाले. त्यानंतर शुक्राचार्यांचें काम मी एक वर्ष करीत होतों.

## पेठे यांचा गंधर्व कंपनींत समावेश

आमच्या नवीन कंपनीच्या स्थापनेपासूनच पेठे हे पंडीत ॲण्ड को. च्या तर्फें उगीच मॅनेजरकी करीत असत. साठे मॅनेजर म्हणून आल्यापासून त्यांची निराशा झाली. त्या कारणानें साठ्यांची निंदा करून, त्यांच्या नकला करून पंडीत-कंपूला खूष करण्याचा पेठे प्रयत्न करूं लागले. मॅनेजर म्हणून नाहीं तर नाहीं पण निदान ॲक्टर म्हणून तरी गंधर्व कंपनींत आपली वर्णी लागेल ही त्यांना आशा वाटत होती. तीन प्रयोग झाले तरी ती सफल होण्याचें चिन्ह त्यांना दिसेना. म्हणून कंपनीचें

सावकार धारकर, भास्करबुवा इत्यादि मंडळीकडे पेठ्यांनीं संधान बांधलें आणि त्यांचें मन वळविलें. पंडीत अनुकूल होतेच. पंडितांचें मत तेंच नारायणरावांचें मत हें ठरलेलें. टेंब्यांना ही भगभग नको होती. त्यांनीं माझ्याकडे बोट दाखविलें. तेव्हां पेठे माझ्याकडे आले. त्यांच्या वागणुकीचे प्रकार दाखवून तुम्हीं कंपनींत येणें आमच्या सुरक्षिततेच्या दृष्टीनें इष्ट नाहीं असें स्पष्ट सांगितलें. परंतु इतर थोर मंडळींच्या आग्रहामुळें मला संमती द्यावी लागली. अशा रीतीनें पेठ्यांना गंधर्व कंपनींत स्थान मिळालें आणि त्यांनीं पंडीत आणि नारायणराव यांच्यासाठीं देह झिजवायचा निश्चय केला.

## आमच्या श्रमाच्या पैशाचा विनियोग

भारत गायन समाजाची व्यवस्था प्रथम टेंबे यांच्याकडे होती. नंतर ते किर्लोस्कर कंपनींत आल्यानंतर ती नाना हर्डीकर यांच्याकडे आली. १९१३ सालीं समाजाची स्थिती चांगली नव्हती. भास्करबुवा उत्तम गवई होते पण व्यवस्थेचें काम त्यांच्या हातून पार पडण्यासारखें नव्हतें. म्हणून शिकविण्याशिवाय ते कांहीं करित नसत. समाजाची बिघडलेली स्थिती सुधारून देण्याचें आश्वासन देऊन त्याचीं सर्व सूत्रें पंडितांनीं आपल्या हातीं घेतलीं. भास्करबुवांना दरमहा तीनशें रुपये पगार द्यायचा; बाकी जलसे वगैरे करून समाज कर्जमुक्त करायचा असें ठरविलें. सुरवातीपासूनच गंधर्व कंपनीशीं भारत गायन समाजाचा संबंध जोडून घेतला. आमची बैठक भरवून पंडितांनीं सर्व हकिगत आम्हांस सांगितली. आणि ज्या ज्या गांवीं कंपनी जाईल त्या त्या गांवीं समाजाचा जलसा झालाच पाहिजे असें ठरविलें. भास्करबुवांबद्दल आम्हां सर्वांच्या मनांत आदर होताच. भारत गायन समाज सुस्थितींत राहिला तर तेंहि आम्हांला इष्टच होतें. नारायणरावांनीं एकदां एक गोष्ट मनावर घेतली कीं कांहीं झालें तरी ती पार पाडायची अशी त्यांची इच्छा असे. आणि त्यांत "आपल्या बाळासाहेबांनीं" जबाबदारी घेतलेली. मग नारायणराव वाटेल तें करायला कबूल झाले यांत नवल काय ! टेंबे भास्करबुवांना गुरु मानणारे परंतु समाजाचा सगळा कारभार पंडितांच्या हातीं म्हणून प्रथम धरसोड करूं

लागले; शेवटीं त्यांनीं संमती दिली. रहातां राहिलों मी. माझ्या मनांत जरी भास्करबुवांच्या गायन विद्येबद्दल परमेश्वरतुल्य आदर वसत होता तरी पंडितांच्या हातून समाज कर्जमुक्त होईल असें मात्र वाटत नव्हतें. म्हणून मी गुळमुळीत उत्तर दिलें. नंतर समाजाची गंगाजळी तयार करण्यासाठीं कंपनीनें दर मुक्कामीं एका प्रयोगाचें उत्पन्न समाजाला द्यावें असें एक पिल्लूं पंडितांनीं सोडलें. मग मात्र एक अट मी घातली. ती ही कीं समाजाच्या आर्थिक स्थितीचा अहवाल दर सहा महिन्यांनीं आमच्याकडे आला पाहिजे. हेतू हा कीं आमच्या श्रमाच्या पैशाचा विनियोग योग्य रीतीनें होत आहे कीं नाही हें पहावें. ही अट कोणालाहि नाकबूल होण्यासारखी नव्हती. अर्थात् पंडितांनाहि ती मान्य झाली. इतकें करूनहि समाजाचा अहवाल आम्हांला पहायला कधींहि मिळाला नाहीं. बरें, ही गोष्ट भास्करबुवाजवळ बोलण्याची सोय नव्हती. अशा रीतीनें भारत गायन समाजाच्या कर्जाच्या खड्ड्यांत गंधर्व कंपनीचे पैसे जाऊं लागले. शिवाय भारत गायन समाज कर्जमुक्त झाला नाहीं तो नाहींच.

## गंधर्व कंपनीस वर्षासन

बडोद्याचे अधिपती कै. श्रीमंत सयाजीराव गायकवाड यांच्या मनांत ललितकलांपैकीं नाट्यकलेला उत्तेजन देण्याची इच्छा पुष्कळ दिवसांपासून होती. ती त्यानीं १९११ सालीं सर्वोत्कृष्ट कंपनी म्हणून किर्लोस्कर मंडळी-कडे प्रकटहि केली होती. परंतु त्या वेळीं जोगळेकर नुकतेच दिवंगत झालेले होते. त्यामुळें शंकररावांनीं त्यांना “ सध्यांच्या स्थितींत महाराजांचें वर्षासन घेण्यास कंपनी पात्र नाहीं. ” असें कळविलें होतें. १९१३ सालीं गंधर्व कंपनी स्थापन होऊन तिचा बोलबाला सर्वत्र झाला होता. त्या वेळचे बडोद्याचे खासगी कारभारी श्री. आर्. आर्. शिरगांवकर यांचा आणि धारकरांचा स्नेह होता. एकदां शिरगावकर मुंबईस धारकरांच्या घरीं उतरले असतां त्यांनीं महाराजांच्या वर्षासनासंबंधीं गोष्ट काढली. महाराजांच्या मनांतून नाट्यकलेच्या उत्तेजनासाठीं एका गुजराती कंप-नीला व एका दक्षिणी कंपनीला वर्षाला पांच हजारप्रमाणें वर्षासन द्यायचें होतें. धारकर हे आमच्या कंपनीचे सावकार आणि पुरस्कर्ते

असल्यामुळें आपुलकीनें त्यांनीं गंधर्व कंपनीचें नांव सुचविलें. तें वर्षासन केशवराव भोसले यांच्या कंपनीस मिळावें म्हणून दामोदर सावळाराम यंदे-प्रभृतींची खटपट चालू होती. शिरगांवकरांनीं दोन्ही कंपन्यांचीं नाटकें पाहिलीं. नंतर आमच्या कंपनीच्या मासिक खर्चाची चौकशी केली. आमचा जमाखर्च आम्हीं त्यांच्यासमोर ठेवला. त्यांनीं गंधर्व कंपनीस वर्षासन देण्याबद्दल सुचविलें आणि श्रीमंत महाराजांनीं तें त्याप्रमाणें दिलें. वास्तविक सांपत्तिक दृष्ट्या हें वर्षासन फायदेशीर नव्हतें. परंतु कै. श्रीमंत सयाजीराव महाराज यांच्यासारख्या रसिक व कलोत्तेजक स्वभावाचें व मानाचें प्रसादचिन्ह म्हणून आम्हीं तें पत्करलें.

## कंपनींत असंतोष उत्पन्न करूं नका

आम्हां त्रिवर्गाचें भागीपत्र व्हावयाचें राहिलें होतें; धारकरांनाहि त्यांनीं दिलेल्या कर्जाबद्दल प्रामिसरी नोटा लिहून द्यायच्या होत्या. धारकर एक दिवस मला म्हणाले, "गणपतराव, तुमचें आतां भागीपत्र व्हायचें आहे. भाग ठरवितांना आमच्या हातून चूक झाली आहे ती आतां सुधारण्याचा माझा विचार आहे. तुमच्या आणि टेंब्यांच्या भागीची अदलाबदल झाली पाहिजे. रंगभूमीशिवाय तुमची इतर कामगिरी मी पाहिली नव्हती. भाग ठरविते वेळीं कर्ते पुरुष टेंबेच आहेत असा आमच्या मनाचा ग्रह झाला होता. पण इथें आल्यापासून पहात आहें, पात्रें तयार करणें, देखरेख करणें यांसारखीं इतर कामेंदेखील तुम्हींच करीत अहांत, रंगभूमीवर तुम्ही लोकप्रिय झालेले अहांत. टेंबे व्हायचे आहेत. म्हणून झालेली चूक दुरुत करणें भाग आहे." मी आर्जवानें पण आग्रहानें सांगितलें, "ठरलें तें ठरलें. मी कांहीं कुक्कुबाळ नव्हतों. ठरलेल्या भागाला मी संमती दिलेली आहे. ती आजहि मला मान्य आहे. फिरवाफिरव करून कृपा करून कंपनींत असंतोष उत्पन्न करूं नका एवढीच हात जोडून प्रार्थना आहे." धारकरांच्या मनाचें समाधान झालें नाहीं. मला त्यांनीं वेड्यांत काढलें. माझा ठाम निश्चय पाहून सॉलिसिटर वैद्य यांच्या मसुद्याप्रमाणें पूर्वी ठरलें तसें भागीपत्र झालें. मी केलेल्या तीन सूचनाहि त्यांत समाविष्ट केल्या. त्या अशाः—

१. भागीची मुदत दहा वर्षांची राहील.

२. कंपनीचा खर्चवेंच वजा जातां जी शिल्लक राहील. ती महिन्याच्या महिन्याला वांटून घ्यायची.

३. कंपनींतील नोकर लोकांना उत्तेजन मिळावें म्हणून दरवर्षी वाढदिवसानिमित्त त्यांना सहाशें रुपये वांटायचे.

आम्हां तिघांचे एका रुपयांतील भाग असे होते:—नारायणराव सात आणे, गोविंदराव टेंबे पांच आणे, बोडस साडेतीन आणे, धर्मादाय अर्धा आणा.

## गुरुदक्षिणा

देवलमास्तर कंपनींत आल्यावर मृच्छकटिक नाटकाच्या तालमी घेऊं लागले. त्या वेळीं आम्ही तिघांनीं त्यांना असें लिहून दिलें कीं, नाट्यप्रयोगावर अखेरचा शब्द देवलमास्तरांचा मानायचा; खाडिलकरांशिवाय इतर कोणाचेंहि नाटक घ्यायचें झालें तर तें देवलमास्तरांनीं पसंत केलेलें असलें पाहिजे; देवलमास्तर कंपनींत येऊन जाऊन रहातील, त्यांचा कच्चा खर्च व रेल्वेभाडें हीं कंपनीनें सोसायचीं. ते जो शिक्षणाचा लाभ आम्हांला देतील त्याबद्दल कृतज्ञता बुद्धीनें वर्षाच्या एकंदर सर्व प्रयोगांत तिसऱ्या नंबरच्या उत्पन्नाचा जो प्रयोग ठरेल त्याच्या उत्पन्नांतून खर्चवेंच वजा जातां जी रक्कम शिल्लक राहील ती गुरुदक्षिणा म्हणून देवलमास्तरांना द्यायची.

कंपनी कर्जमुक्त होईपर्यंत नारायणरावांनीं दरमहा दोनशें, टेंब्यांनीं दीडशें व मीं एकशें दहा अशी तसलमात घ्यायची असें ठरलें होतें, व त्याप्रमाणें आम्हीं घेत होतों.

## आर्बिट्ररी बोर्ड

कंपनींत फाटाफूट होऊं नये म्हणून एक आर्बिट्ररी बोर्ड नेमलें होतें; त्यांत खालील गृहस्थ होते:—

१. श्री. नरसिंह चिंतामण केळकर,

२. श्री. दत्तात्रय लक्ष्मण वैद्य, सॉलिसिटर

३. श्रीमंत आबासाहेब विंचूरकर, जहागीरदार

४. श्री. विनायकराव धारकर, सावकार

५. श्री. कृष्णाजी परशराम पंडीत.

शेवटचें नांव नारायणरावांनीं आपलें " इंटरेस्ट गार्ड " करायला (पंडितांच्या तोंडचा शद्ब) बाळासाहेब यांत आलेच पाहिजेत असा हट्ट धरला म्हणून घातलें. मुंबईचा मुक्काम संपून कंपनी राजपुत्राच्या लग्नाकरितां बडोद्यास गेली.

## नाटकांतल्या काळाप्रमाणें साजसजावट असावी.

बडोद्यास महाराजांना प्रथम मुजरा करण्याकरितां आम्ही तिघे गेलों. महाराजांनीं कांहीं उपयुक्त सूचना केल्या. महाराजांसमोर मानापमान, मूकनायक, मृच्छकटिक, विद्याहरण असे चार प्रयोग झाले. महाराज खूष झाले असें कळलें. मात्र त्यांनीं एक मार्मिक सूचना केली. जुन्या काळांतील पेहराव, मुखासनें हींच जुन्या काळच्या नाटकांत दिसावीं. आम्हांला ती सूचना पटली. परंतु जमावें कसें ? जुन्या काळांतला साजसजावट पहायला कोठें मिळणार ? पाटणा (बंकीपूर) येथें पहायला सांपडतील असें महाराजांनीं सांगितलें.

गावांतहि प्रयोग झाले; पण उत्पन्न यथातथाच झालें. मुंबई ते बडोदें व बडोदें ते इंदूर या प्रवासाचा खर्च फक्त बाहेर पडला. मुंबई मुक्कामांत झालेलें उत्पन्न व धारकर यांच्याकडून काढलेलें कर्ज मिळून झालेल्या रकमेतून सगळा खर्चवेंच वजा जातां नवीन सामानाच्या देण्यापैकीं फक्त साडेतीनशें रुपये आणि धारकरांचे सहा हजार सातशें पंचाहत्तर रुपये देणें राहिले होते.

## स्टेशनच्या प्लॅटफार्मवर गाणें !

बडोद्यांतहि पंडीत आणि को.चा दौरा आलाच. पंडितांनीं नारायणरावांना जी रक्कम कर्जाऊ दिली होती ती सोलापूर बँकेंत नारायणरावांचें खातें उघडून व बँकेकडून नारायणरावांना कर्ज द्यायला लावून पंडितांनीं वसूल करून घेतली असें ऐकलें. दोघांचीं वैयक्तिक कर्जें दिवसें दिवस वाढ-

तच होतीं. कर्ज मिळविण्यासाठीं अगर फायदेशीर गोष्टी पदरांत पाडून घेण्यासाठीं, कोठेंहि लागू पडण्यासारखा पंडिताच्या हातांतला अमोघ बाण म्हणजे नारायणरावांचें गाणें. एकदां रेल्वेतील मंडळींना खूष करण्याकरितां स्टेशनच्या प्लॅटफार्मवर नारायणरावांचें गाणें झालें ! नारायणरावांच्या गाण्याची जडीबुटी दाखवून पंडीत अनेक चमत्कार करून दाखवीत. बडोद्याहून पेठे यांना कर्जाच्या मोहिमेवर पाठवायचें असें ठरलें. पेठे यांना रीतसर रजा नव्हती; पण एवढें नारायणास्त्र हातांत असल्यावर आम्हां दोन भागीदारांना विचारण्याचें कारणच पडलें नाहीं. पेठे लाड सॉलिसिटरांकडे गेले आणि नारायणस्तोत्र म्हणून कर्जाची मागणी केली. सॉलिसिटर लाड मूळपासून नारायणरावांच्या गाण्यावर फिदा होतेच. त्यांत भरीला अडचणीची परि·स्थिती सांगून नारायणरावांसाठीं त्यांनीं त्यांच्याकडून कर्ज मिळविलें. (ही हकिगत पेठे यांनीं सांगितल्यावरून दिली आहे.)

इंदूर येथें बोराडे यांच्या थिएटरांत प्रयोग सुरू झाले. देवल-मास्तरांच्या वजनानें आणि खटपटीनें रामभाऊ फडणीस यांच्याकडून, सौभद्र, शाकुंतल व रामराज्यवियोग या तीन नाटकांच्या प्रयोगाची परवानगी कंपनीस मिळाली. या वेळेपर्यंत वरील नाटकांचे प्रयोग सर्व नाटकमंडळयांनीं सर्रास फुकट केले होते; परंतु किर्लोस्कर कंपनीची परंपरा पुढें चालविणाऱ्या गंधर्व कंपनीला मात्र साडेसोळाशें रुपये देणें भाग पडलें ! ही रक्कम अण्णासाहेबांच्या स्मारकासाठीं खर्च व्हायची होती.

## 'मानापमाना'च्या मोनापलीच्या दाव्याचा निकाल

याच वेळीं मानापमानाच्या मोनापलीच्या दाव्याचा बेळगांवचे वकील गोविंदराव ओक यांच्या हातून आपसांत निकाल होऊन असें ठरलें कीं गंधर्व कंपनीला दिलेली परवानगी कायदेशीर समजावी; तिला शंकर-रावांनीं हरकत करूं नये; गंधर्व कंपनीनें दिलेले नऊशें रुपये शंकररावांच्या देण्यांत वजा घालावे; व सर्व हक्क किर्लोस्कर कंपनीकडे रहावे.

## पैशाची व्यवस्था

इंदूर मुक्कामीं बडोद्याच्या महाराजांकडून वर्षासन आलें. त्यांतून घारकरांचे तीन हजार व मुंबईची बाकी तीन चारशेंची होती ती देऊन

टाकावी ही माझी इच्छा. पैशाचा व्यवहार माझ्या हातीं होता व प्रथम प्रत्येक भागीदाराच्या कानावर घालायचें आणि नंतर पैशाची व्यवस्था करायची अशी माझी वहिवाट होती. त्याप्रमाणें टेंबे यांना मी सांगितलें. लोकांचें देणें हप्त्याहप्त्यानें द्यावें असें त्यांचें म्हणणें पडलें. मला तें पसंत पडेना. हाताशीं रक्कम असतांना दुसऱ्याचें देणें कां ठेवायचें? ही विचारसरणी टेंबे यांना पटेना. ते जरासे चिडले. मला त्यांना निक्षून सांगावें लागलें, "पैशाची जबाबदारी माझ्यावर टाकणार असाल तर मी ती अशीच, अशाच पद्धतीनें पार पाडणार. पसंत नसल्यास आपल्या हातांत व्यवस्था घ्या." मग ते स्वस्थ बसले. माझ्या इच्छेप्रमाणें पैशाची व्यवस्था केली.

## मृच्छकटिकांत नाच

इंदुरास दोन सरकारी प्रयोग झाले. श्रीमंत होळकर सरकार अतिशय खूष झाले. महाराणी श्री. सौ. चंद्रावतीबाईसाहेब यांनीं आपला म्हणून मृच्छकटिक नाटकाचा खासगी प्रयोग करविला. त्यांत त्यांनीं नाच घालायची आज्ञा केली होती. नाच घालण्यासारखा नाटकांत तर एकहि प्रसंग नव्हता. मोठा पेंच पडला होता. पण देवलमास्तरांनीं आर्यकाचा दरबार भरवून चारुदत्ताला राज्य द्यायचें आणि दरबारांत नाच घालायचा असें ठरविलें. पडलेला पेंच सुटला.

सरकारी तीन प्रयोगांबद्दल एक हजार रुपये बिदागी मिळाली; म्हणजे प्रयोगाला सव्वातीनशें रुपये पडले. एकदां हा प्रघात पडला म्हणजे तोच पुढें अखंड चालू रहाणार म्हणून मी आणि टेंबे बसून विचार केला व टेंब्यांनीं इंग्रजींत पत्र लिहून महाराजांना आमची अडचण कळविली. त्यांनीं आणखी पांचशें रुपये दिले.

इंदूरचा मुक्काम संपायच्या वेळीं तात्यासाहेब कोल्हटकरांचें आग्रहाचें पत्र आलें म्हणून देवलमास्तर व मी खामगांवास निघालों. पहांटे भुसावळ स्टेशनवर केशवराव भोसले भेटले. ते उमरावतीस चालले होते. जलंब स्टेशनपर्यंत देवलमास्तरांना एकटे सोडून केशवराव व मी मोकळेपणानें बोलतां यावें म्हणून दुसऱ्या डब्यांत बसलों.

## ललितकलादर्श नाटक मंडळीची स्थापना

केशवराव स्वदेशहितचिंतकमध्यें असतांना त्या कंपनींत मी राजाराम सोहनी याच्याकडे जात असें. चार सहा दिवस रहातहि असें. त्या वेळीं केशवराव मला बोडसमामा असें लाडिकपणें म्हणत असत. त्यांनीं भाऊरावांचीं शापसंभ्रममधील पदें ऐकवा म्हणून माझ्या पाठीस लागावें आणि मी त्यांची इच्छा पूर्ण करावी. बाहेरच्या माणसांचा वारा जास्त वेळ केशवरावांना लागूं नये म्हणून कंपनीच्या मालकांचा कडेकोट बंदोबस्त असे. कारण केशवरावांनीं शारदेंतील "मूर्तिमंत भीति उभी" या पदानें मुंबई काबीज केली होती. नंतर केशवरावांनीं स्वदेशहितचिंतक सोडून १९०८ च्या जानेवारींत हुबळीस ललितकलादर्श नाटक मंडळी स्थापन केली. कंपनीजवळ भांडवल नव्हतें; केशवरावांच्या आवाजांतील चमक गेलेली; त्यामुळें आर्थिक मदत करायला कोणीहि पुढें येईना. पण मंडळीची एकी दांडगी होती. पेटीवाल्यासकट आठदहा मंडळींना मालक बनवून पगाराचें बंड न वाढेल असा बंदोबस्त केशवरावांनीं प्रथमच करून टाकला. मंडळीचे फार हाल चालले होते तरी आपुलकीच्या भावनेनें प्रत्येकानें ती विपन्नस्थिति अंगवळणी पाडिली.

## केशवराव भोसले यांची कर्तबगारी

श्री छत्रपति शाहू महाराजांच्या कृपेनें नारायणरावांप्रमाणें केशवराव भोसले एके वेळीं किर्लोस्कर मंडळीला मिळणार होते. पण ते निघण्याच्या वेळीं त्यांनीं जाऊं नये म्हणून त्यांच्या कंपनींतील मंडळी आडवी पडली होती. त्यामुळें केशवरावांनीं विचार बदलून स्वतःचीच कंपनी ऊर्जितावस्थेस आणण्याचा चंग बांधला आणि प्रयत्नाला सुरवात केली. १९१० मध्यें केशवरावांनीं आपल्याकडे एकहि पात्र चांगलें नसतांना केवळ स्वतःच्या गुणांवर सौभद्र या एकाच नाटकानें पुणें डोलायला लावलें. पुढें केशवरावांच्या चहात्यांपैकीं डॉ. आजगांवकर व यंदे प्रभृतींनीं वर्तमानपत्रांतून केशवरावांना खूप प्रसिद्धी दिली आणि प्रेक्षकांचें चित्त केशवरावांकडे वळविलें. १९१३मध्यें गंधर्व कंपनी निघण्याच्या वेळेपर्यंत केशवरावांनीं आपल्या कंपनीला चांगलेंच स्वरूप आणिलें होतें.

केशवरावांनीं पाण्यासारखा पैसा खर्च करून कोल्हापूरचे प्रसिद्ध आर्टिस्ट आनंदराव पेंटर यांच्या कुंचल्यानें आपली रंगभूमि उत्कृष्ट सजविली. पडदे, सीन, मखमलीचा ड्रॉप ( दर्शनी पडदा ) यांची चांगली जुळणी केली. जुन्या लेण्यांतील नक्षीदार कामानें नटविलेले नमुने आनंदराव पेंटरांनीं प्रत्यक्ष पुढें उभे करण्याचें श्रेय मिळविलें. मधल्या काळांत पडद्यावर इंग्रजी तसबिरा, तारेचे खांब, पोष्टाची पेटी, बगीच्यांतील गायन-स्टँड अशा तऱ्हेच्या धेडगुजरी देखाव्यांचे, कोणत्याहि नाटकाला चालविण्यांत येणारे, पडदे रंगभूमीवरून बाजूला सारण्याचें श्रेय, कल्पक व खर्चिक अशा कर्तबगार केशवराव भोसले यांनींच निःसंशय मिळविलें.

## केशवरावांची ‘ राक्षसी महत्त्वाकांक्षा ’

वऱ्हाडांतील वीर वामनराव जोशी यांनीं लिहिलेलें “ राक्षसी महत्त्वाकांक्षा ” नाटक केशवरावांनीं रंगभूमीवर आणिलें. या नाटकाची रंगभूमीवरील सजावट त्यांनीं फारच उत्तम केली होती. राक्षसी महत्त्वाकांक्षा नाटक उर्दू खूपसुरत बला या नाटकाचें रूपांतर होय. उर्दू खूपसुरत बला नाटक मी पाहिलें होतें. मूळच्या त्या नाटकाच्या प्रयोगाची व राक्षसी महत्वाकांक्षा या नाटकाची तुलना केली तर त्या दोंहोंत जमीनअस्मानाचें अंतर होतें हें खरें आहे. उर्दूतील सोराबजी कात्रक या नटाचें वजनदार, धीर गंभीर काम कोणीकडे आणि राक्षसी महत्वाकांक्षेंतील विक्रांताचें काम करणाऱ्या किरकोळ पात्राचें काम कोणीकडे ? खूपसुरत बला मधील जगन्नाथ गुजराथी या नटाचें स्वभाव तंतोतंत व्यक्त करणारें आणि खरोखरी सुंदर दिसणारें राणीच काम कोणीकडे आणि राक्षसी महत्त्वाकांक्षेंतील ताडमाड उंच, खप्पड चेहेऱ्याच्या, दुखऱ्या डोळयाच्या व निव्वळ खरडून रगडून ओरडून बोलणाऱ्या राणीचें काम कोणीकडे ? खूपसुरत बलामधील राणी प्रथम रंगभूमीवर येई त्या वेळीं जिन्यावरून उतरतांना तिचा दिमाख, त्या वेळच्या सीनची मांडणी, संगीत वाद्यांचा ध्वनि इत्यादिकांमुळें तिच्या कर्तृत्वाची मूर्तिमंत कल्पना प्रेक्षकांसमोर उभी राही.

खूपसुरत बलेची बरोबरी केशवराव भोसले यांच्या राक्षसी महत्त्वाकांक्षेला जरी मिळाली नाहीं, त्या नाटकाची भाषा व ती बोलणाऱ्यांची

पद्धति जरी राक्षसी नांवाला शोभण्यासारखी होती, तरीहि ज्याप्रमाणें महाराष्ट्र मंडळीच्या नाटकांचा स्वीकार रुचिपालट म्हणून प्रेक्षकांनीं केला होता त्याप्रमाणेंच राक्षसी महत्त्वाकांक्षा तोंडपालट म्हणून प्रेक्षकांना आवडलें; त्यामुळें तें नाटक केशवरावांना चांगलेंच उत्पन्न देऊं लागलें.

## दोन नाटक मंडळ्यांची युति

आमच्या गंधर्व मंडळीची सुरवात आणि केशवरावांनीं राक्षसी महत्त्वाकांक्षा रंगभूमीवर करण्याची सुरवात या दोन्ही वेळा एक आल्या आणि योगायोगानें दोन्ही मंडळ्या मुंबईस समोरासमोरच्या थिएटरामध्यें आपापले प्रयोग करूं लागल्या. आपल्या नव्या नाटकाच्या बलावर पूर्णांशानें मिळणाऱ्या यशाच्या मार्गांत गंधर्व कंपनी कांट्यासारखी आली असें मानवी धर्माप्रमाणें केशवरावांना वाटलें असल्यास त्यांत नवल नव्हतें. एक दोन कंपन्यांना एकाच वेळीं भरपूर आश्रय देण्यास मुंबईसारखें अफाट शहर तयार असतें आणि त्याप्रमाणें आश्रय देत असलें तरीसुद्धां गंधर्व मंडळी व ललितकलादर्श मंडळी यांची मुंबईस जी युति झाली त्या युतींतून गंधर्व कंपनीकडे केशवराव भोसले, गुप्त रीतीनें कां होईना पण, प्रतिस्पर्धी कंपनी म्हणून पाहूं लागले हें फळ निर्माण झालें. यानंतरच १९१४ मध्यें केशवरावांची आणि माझी भुसावळ स्टेशनवर भेट झाली. त्या भेटींत त्यांच्याकडील देवधराचें पत्र आमच्या कंपनीला आलें आहे व त्याबरोबरच तयार झालेला मनुष्य तुम्हीं दवडूं नये असें त्यांना मी सांगितलें. आपल्या कंपनींतील हवा बिघडत चालली आहे असा वास केशवरावांना अगोदरच आला असावा.

## बापू राजहंस

१९१२ मध्यें फाटाफूट झाल्यानंतरची महाराष्ट्र नाटक मंडळी मी कोल्हटकरांच्याकडे गेल्या वेळीं खामगांवास होती. तिचा प्रयोग पहाण्यास गेलों. त्या वेळीं थिएटरच्या बाहेर एक गोरा, डोकीवर कुरळे केस असून ते पाठीवर व मानेवर इतस्ततः मोकळे सोडलेला मुलगा बेफिकीरपणानें बसलेला दिसला. लांबून नीटसें दिसलें नाहीं. जवळ जाऊन पहातों तों तो बालगंधर्वांचा भाऊ—बापू. "कसें काय बापू?"

असें मी विचारतां त्यानें नाक चढवून "बरं आहे. कोठून आलांत?" असें म्हटलें. त्या दिवशींच्या नाटकांत त्याला काम नसेल म्हणून बापू आपल्या कुरळ्या केसांचें प्रदर्शन मांडून बाहेर बसला असावा असें मला वाटलें.

## नारायणराव व बापूराव

हा बापू नारायणरावांचा सख्खा धाकटा भाऊ. गंधर्व मंडळींत पहिल्यापासून घेतला असता तर सुरेल, देखणा असल्यानें दुय्यम नायिकेच्या कामास खात्रीनें कायमचा उपयोगी पडला असता. असा हा बापू, नारायणरावांचा—गंधर्व मंडळीच्या एका भागीदाराचा—भाऊ असूनहि, ज्या वेळीं १९१३ मध्यें गंधर्व कंपनी निघाली त्याच वेळीं नेमका गद्य नाटकें करणाऱ्या महाराष्ट्र नाटक मंडळींत, संगीताची त्याला बाजू असूनहि, गेला. पण तो गेला असें म्हणण्यापेक्षां त्याला त्या कंपनींत घातला असें म्हणणें रास्त होईल. महाराष्ट्र मंडळींत बापू जाणार हें कळलें तेव्हां थोडासा लांडा कारभार करून मी नारायणरावांना "घरचें सुरेल पात्र संगीत नाटकाला उपयोगी असतां त्याला गद्य मंडळींत घालून असुर कां करतां?" असें विचारलें. परंतु नारायणरावांची सर्वतोपरी काळजी वाहणाऱ्या पंडितांनीं ही घटना दूर दृष्टीनें केली होती. न जाणो बापू व नारायणराव एके ठिकाणीं राहिले तर सख्ख्या भावाचें वजन नारायणरावांवर जास्त पडेल आणि नारायणरावांना सर्वस्वी आपल्या मुठींत ठेवण्याकरितां दीर्घकाल केलेली तपश्चर्या व कारवाई फुकट जाईल या विचारानें पंडितांनीं धूर्तपणा करून नारायणरावांच्या मनांत बापूबद्दल तो गंधर्व मंडळींत दुय्यम म्हणून असण्यापेक्षां महाराष्ट्र मंडळींत खात्रीनें श्रेष्ठ पद मिळवील असें भरविलें असल्यास नवल काय?

## आपल्या वाटेंतून दूर केलें

आपल्याला महत्पदाला चढविण्याचें महत्कार्य ज्या पंडितांनीं हातीं घेतलें आहे तेच पंडीत आपल्या बापूला श्रेष्ठ पदाला चढवीत आहेत असा समज स्वतःच्या गुणांची जाणीव नसलेल्या बिचाऱ्या नारायणरावांचा झाला होता. नारायणरावांची ठाम समजूत होऊन बसली होती, कीं पंडितांच्या मदतीशिवाय आपण श्रेष्ठ पदाला कसे आलों असतों? पंडितांनीं नारायण-

रावांना भारलें तसेंच “ भावाच्या कंपनींत इतर भागीदार असतांना तूं नोकर म्हणून रहाणें योग्य नाहीं. तुझी योग्यता कमी होईल. ” असें बापूला पटवून देऊन पंडितांनीं आपला बेत पूर्णतेस नेला.

नवीन माणसासाठीं हपापलेल्या महाराष्ट्र मंडळीलाहि बालगंधर्वांचा भाऊ आणिला आहे या भपकीचा धंद्याला उपयोग होईल असें वाटलें म्हणून बापूला त्या मडळीनें घेतलें. गंधर्व मंडळीचा भाऊ आपण दुसऱ्या मंडळीला दिला हा मोठेपणा पंडितांना मिळाला; शिवाय त्या कंपनीनें पंडीत आपला पुरस्कर्ता असें म्हणायला सुरवात केली. परंतु तें खरें होतें कीं वरोपचारी होतें कोण सांगणार ? परंतु एवढें खरें कीं पंडितांनीं बापूला आपल्या वाटेंतून दूर केलें.

## पहिल्या वर्षींच गंडांतर

औरंगाबादेस आमच्याबरोबर देवलमास्तर होते. प्रत्येक मुक्कामीं नारायणरावांचें इन्टरेस्ट गार्ड करण्यासाठीं पंडीत आणि को.ची फेरी असे. त्याप्रमाणें ती तेथेंहि आली. नारायणरावांचें हित कसें साधेल ही चिंता लागल्यामुळें त्यांच्या निराळ्या जागीं बैठकी बसत. प्रत्येक मुक्कामीं एखादी तरी भानगड उपस्थित होईच.

औरंगाबादेस देवलमास्तरांना खाडिलकरांची इच्छा म्हणून नारायण-रावांसह पंडितांनीं बोलून दाखविली. “ नारायणराव यानंतर कोणत्याहि नाट-कांत प्रामुख्यानें दिसतील अशींच कामें करतील. तुम्ही नाटक लिहिलें तर नारायणरावांसाठीं लिहिलेली भूमिका त्यांना आवडेल अशीच लिहिली तर ते काम करतील आणि भिकार पोषाखांत ते दिसतां कामा नयेत. ”

“ एवढ्या चढेल अटी संभाळून पात्रांना खूष करण्यासारखें व एकाच पात्राला समोर ठेवून नाटक लिहिण्याचें मला कांहींच कारण नाहीं. ज्यानें आपलें स्वत्व हलकें केलें असेल तो तसें नाटक लिहील. ” देवलांनीं एवढेंच उत्तर दिलें.

नारायणरावांच्या हितसाधकांच्या पुनःपुन: बैठकी होत. त्यांत पंडीत कंपनीचे मॅनेजर झाल्याशिवाय नारायणरावांचें हितरक्षण होणार नाहीं असें ठरलें असावें.

केशव देवधर औरंगाबादेस कंपनींत आला आणि आमच्यांतील एक स्त्रीपार्टी आनंदविलास मंडळीनें पळविल्यामुळें पुण्यास सदाशिव रानडे यास आणविलें.

पुण्याच्या मुक्कामीं पुनः पंडीत अँड को. आणि खाडिलकर यांच्या बैठकी होऊन नारायणराव आणि त्यांचें हित हा एकच विषय दुमदुमूं लागला.

## मी एका झरोक्यांतून पहाणारा आहें

एक दिवस खाडिलकर कंपनींत आले, आणि मला व टेंबे यांना बोलावून आमच्यापुढें त्यांनीं बोलणें काढिलें. "गणपतराव, नारायणरावाचें कंपनीवरील लक्ष उडत चाललें आहे. आपण कंपनींत कोणीच नाहीं असें त्यांना वाटूं लागलें आहे हें बरें नव्हे." आम्ही उत्तर दिलें, "त्यांना विनाकारण असें वाटल्यास त्यांची मर्जी. कंपनींतील नोकरांशीं नाटकाच्या वेळेशिवाय मालकाची गांठ पडेनाशी झाली तर नोकरांना अगत्य कसें वाटावें?" त्यावर नारायणरावांच्या मनःस्थितीबद्दल खाडिलकरांनीं बरेंच प्रवचन केलें आणि शेवटीं आमच्यापुढें एक बंडल टाकिलें. तें असें "प्रत्येक कामांत नारायणरावांचा शब्द शेवटचा असला पाहिजे. प्रत्येक नाटकांतील पात्रांची नेमणूक नारायणराव करतील. नोकर काढणें अगर ठेवणें याहि बाबतींत त्यांचा शब्द निर्णयात्मक झाला पाहिजे." तेव्हां मी त्यांना विचारलें "मग आम्ही कोण? आमचीं कर्तव्यें काय?" खाडिलकरांनीं "तुम्ही भागीदार आहांतच. तुम्ही तालमी घेतां त्या घ्या. पण नारायणराव पात्रें ठरविणार." न्यायाधिशाच्या भूमिकेवरून पाहिल्यास या विक्षिप्त अटी अव्यवहार्य दिसत नाहींत काय? अशा माझ्या प्रश्नाला खाडिलकरांनीं "मी एकाच झरोक्यांतून पहाणारा आहें. नारायणरावांचा मी पक्षपाती आहें." असें मासलेवाईक उत्तर दिलें. तें ऐकून मी थंडच झालों. तरीहि मी "त्या झरोक्यांतला एखादा तरी किरण आमच्यावर येऊं द्या" असें म्हटलें. तेव्हां त्यांनीं "असें आहे. विचार करा आणि काय तें ठरवा." म्हटलें. मीहि "तें शक्य नाहीं. काय व्हायचें असेल तें होईल." असें सांगून टाकलें.

एक बार वायबार ठरला. पुनः तोफ ठासायचें काम सुरूं झालें. नारायणरावांनीं पातळें घेण्याचा मानस जाहीर केला. त्या बाबतींत नारायणराव व टेंबे यांचें कांहीं भाषण झालें. त्या प्रसंगीं मी नव्हतों. मंडळींना शिकविणें, तालमी घेणें याचें जूं माझ्या मानेवर असल्यामुळें रिकामा काथ्याकूट करायला मला वेळच नव्हता. रंगभूमीवर काम करण्यापलीकडे माझ्या दोन्ही भागीदारांना कांहीं काम नसेच.

पंडितांनीं आपल्या बिऱ्हाडीं मला नेऊन सांगितलें " नारायणराव पातळें घ्यायचीं म्हणाले. त्यावर गोविंदरावांनीं पातळें घेतलींत तर त्याचा खर्च तुमच्या नांवावर पडेल असें सांगितलें. टेंब्यांचें हें म्हणणें योग्य आहे का ?" मी म्हटलें " हें खरें असेल तर योग्य नाहीं." त्यापुढें पंडितानीं धमकीची भाषा ऐकविली. तेव्हां खरें खोटें करण्याकरितां मी गोविंदरावांना भेटलों. त्यांनींहि तें खोटें असल्याचें सांगून " इतकीं पातळें असतांना पुनः जास्त घेणें म्हणजे आपल्या नफ्यांतून पैसे जाताहेत " एवढें म्हटल्याचें सांगितलें.

## माझा साष्टांग नमस्कार

पुढें चारच दिवसांनीं खाडिलकर व पंडीत कंपनींत आले. खाडिलकरांनीं मला उद्देशून " गोविंदराव नारायणरावांना काय म्हणाले तें तुम्ही ऐकिलेंच आहे. एका सीनियर पार्टनरला तुम्ही अशीं उत्तरें देतां ह्याचा अर्थ काय ?" असा अंगाला कंप देत चढ्या आवाजांत प्रश्न केला त्याबरोबर माझें देहभान गेलें आणि त्यांच्याहिपेक्षां जास्त आवाज चढवून " कोण सीनियर ? कोण ज्यूनियर ? सर्वांचे हक्कसंबंध सारखे आहेत आणि नारायणाला पुढें करून तुम्ही आम्हांला धारेवर धरलें आहे त्याचा अर्थ काय ?" असें बोलून गेलों. तेव्हां खाडिलकरांचे शब्द " मानापमान नाटकापासून मी नारायणरावाबद्दल कृतज्ञ आहें." हे आले. तेव्हा " मानापमान नाटकासंबंधीं बोललांत तर मीहि तुम्हांला सांगतों कीं मानापमान नाटकाच्या यशस्वितेबद्दल तुम्ही माझ्याशींहि कृतज्ञ राहिलें पाहिजे गाण्याच्या भागाशिवाय बाकीचा भाग माझ्याच यशानें सजला आहे तुमच्यामुळें मला प्रसिद्धी मिळाली नाहीं. मानापमानाच्या अगोदरपासून

जनतेला माझी माहिती आहे. ज्यानें त्यानें नारायणरावांच्या हिताचें कोलीत हातांत धरून आम्हांला चटके द्यावेत! तुमचा इतका मुलाजा मी राखला. नाहीं, हें आतां मुळींच पचणार नाहीं." मी त्वेषानें बोलून टाकलें. या वेळीं भोवतालचीं सर्व माणसें अगदीं स्तब्ध राहिलीं होतीं. नंतर नारायणरावांचे हितकर्ते निघून गेले.

हा प्रकार होऊन गेल्यानंतर मनाला परिस्थितीची जाणीव झाली आणि दुसऱ्या दिवशीं खाडिलकर कंपनींत आले तेव्हां त्यांना साष्टांग नमस्कार घालून त्यांची क्षमा मागितली. त्यांनींहि औपचारिक कां होईना आपल्या मनांत कांहीं नाहीं असें म्हटलें.

## सांगाल तो दंड देईन

पुढें चार पांच दिवसांत कंपनीचे सावकार धारकर आले. त्यांचे कान पंडितांनीं भरले. रात्रीं नाटक संपल्यानंतर धारकरांनीं मला व टेंब्यांना थांबविलं आणि खाडिलकरांनीं आम्हांला नारायणरावांच्या वतीनें जें बंडल ऐकविलें होतें तेंच पुन्हां ऐकवलें. जास्त जें सागितलें तें हें नारायणरावांचा शब्द अखेरचा व्हावा हें आम्ही कबूल केलें नाहीं तर नारायणराव दुसरी स्वतंत्र नाटक कंपनी काढणार. प्रसंग बिकट आहे याची जाणीव त्यांनीं आम्हांला करून दिली. नाटकाच्या श्रमानें व रोजच्या निर्वाणीच्या निरोपांच्या त्रासानें माझें डोकें अगोदरच सणकलें होतें. त्यांत अशा विक्षिप्त निरोपाची भर पडली आणि मी अगदीं अश्लील शब्दांत नारायणराव गेले तर काय होईल याबद्दल धारकरांना सुनावलें. तेव्हां ते चमकलेच. आणखी मी म्हटलें "नारायणाच्या नांवानें कुंकू लावून फिरण्याचें मला कारण नाहीं. आयुष्यक्रमाची सुरवात नारायणरावांच्या भरंवशावर केली नाहीं. उद्यां नारायणराव गेले तर मला जें करावें लागेल तें करायची सुरवात आतांच करीन. नारायणरावाला खुशाल जाऊं दे. दिवसभर गाद्यांवर लोळणारांच्या आणि त्याच्या भोंवतालच्या कावळयांच्या हातून नाटक कंपनी निघत नसते. त्यांच्या हातून कंपनी निघाली तर सांगाल तो दंड देईन हें लिहून देतों."

या सर्व भानगडीच्या बुडाशीं कंपनीचे मॅनेजर पंडितांना करण्याचा हेतु होता. पंडीत मॅनेजर असल्याशिवाय आमचें कल्याण होणार नाहीं ही नक्कल नारायणरावांकडून पाठ करवून सॉलिसिटर वैद्य, लाड आणि आबासाहेब विंचूरकर यांच्या झालेल्या बैठकीपुढें त्यांच्याकडून वदविण्यांत आली होती.

## मॅनेजरकी फायदेशीर

पंडितांना मॅनेजर नेमायला खाडिलकरांनीं संमति दिली नव्हती. परंतु नारायणरावांच्या आग्रहावरून पेठ्यांनीं डॉ. तिलोकेकर, सॉलिसिटर लाड यांना भीड घातली आणि पंडीत मॅनेजर होणार असें ठरलें. रागरंग ओळखून आम्हीं त्याविरुद्ध गेलों नाहीं.

नंतर पंडीत बोर्डमध्यें राहून मॅनेजरहि होणार हें कसें शक्य आहे यावर वाटाघाट झाली. पंडिताचें हें दुहेरी नातें इष्ट नाहीं हें मंडळींना पटलें; तेव्हां पंडितांनीं फायदेशीर असणारी मॅनेजरकी पत्करून बोर्डाचा राजिनामा दिला.

## पंडितांच्या जागेवर

बोर्डांतील रिकाम्या झालेल्या जागेवर लाड सॉलिसिटर यांचें नांव मी व गोविंदरावांनीं सुचविलें व तें मंजूरहि झालें.

अशा रीतीनें कंपनीवर पहिल्याच वर्षी आलेलें गंडांतर कसेंबसें एकदांचें टळलें.

## हातचा घालवूं नका

कंपनीचा वाढदिवस झाला. नोकरांना आबासाहेब विंचूरकर यांच्या हस्तें सहाशें रुपये वांटले. धारकरांची रक्कम बहुतेक दिली. फक्त तीनशें रुपये बाकी राहिली. साठे यांच्या नोकरीची वर्षाची मुदत संपली. ते नगरहून जायचे व नवीन मॅनेजर पंडीत रुजू व्हायचे असें ठरलें.

किर्लोस्कर कंपनीशीं न पटल्यामुळें राम गणेश गडकरी पुण्यास याच वेळीं कंपनीकडे आले आणि पुण्यप्रभाव आम्हाला लिहून देणार असें म्हणाले. देवलांची आणि त्यांची भेट झाली. त्यांच्याबद्दल देवलांनीं

आम्हांला सांगितलें कीं अशा बुद्धिवान माणसाला हातचा घालवूं नका. नाटक लिहून घ्या. अडचणींत असतील तर त्यांना पैसेहि द्या. त्याप्रमाणें आम्ही गडकरी यांस नगरहून पैसे पाठविले.

## पंडीत दाखल झाले

तारीख २२ आगष्ट रोजीं पंडीत येऊन दाखल झाले. त्रिंबकराव साठे यांनीं ता. २३ ला कामाचा चार्ज मजकडे दिला. मी त्यांना पावती दिली. त्याच रात्रीं साठे पुण्यास रवाना झाले. नगरहून कंपनी जळगांवास गेली. तेथें पुनः मन बिघडण्यासारख्या आणखी पुष्कळ गोष्टी घडूं लागल्या. गैरशिस्त वाटल्या त्या गोष्टींबद्दल पंडितांना मोकळ्या मनानें बोललों. त्यांनींहि आपली मळमळ ओकून टाकली आणि तेवढ्यापुरत्या तरी उठणाऱ्या वावटळी मी मिटविल्या.

## दंडाचा भुर्दंड

पंडितांची मॅनेजरची कारकीर्द सुरू झाली. कंपनी जळगांवहून नागपूरला निघाली. आम्ही गाडींत बसलों. सेकंड क्लासमध्यें माझी नारायणरावांची, टेंब्यांची आणि पंडितांची कौटुंबिक मंडळी बसली. बाकीची मंडळी थर्ड क्लासमध्येंच होती. भुसावळच्या पुढील बोधवाड या लहानशा स्टेशनवर चेकर तिकिटें तपासायला आला. त्याबरोबर पंडितांनीं ओठावरून जीभ फिरवायला सुरवात केली. मी बुचकळ्यांत पडलों. प्लॅट-फॉर्मवर उतरून पंडीत चेकरला समजावूं लागले. पण उपयोग न होतां नागपूरला तिकिटकलेक्टरनें दंडासह पैसे वसूल केले.

पंडितांनीं कंपनीवर असा बेअब्रूचा प्रसंग आणला. पुनः तरी असा प्रकार होऊं देऊं नका असें मी पंडितांना बजावलें. दंडाच्या भूर्दंडामुळें नागपुरास पोंचलों त्या दिवशीं कंपनीच्या शिलकेंत फक्त एक पंधरा रुप-यांचा सावरीन उरला.

टेंबे आपल्या आवाजावर औषधोपचार करण्याकरितां मुंबईला गेले होते; त्यांनीं दीडशें रुपये पाठविण्याविषयीं तार दिली. ती आम्ही नागपूरला पोंचलों त्याच दिवशीं मिळाली. जळगांवाहून नागपुरास पोंचण्यापुरतेच पैसे शिल्लक होते आणि नागपुरास खेळ व्हावयाचा होता हें टेंबे यांना

माहीत असूनहि त्यांनीं विचार न करितां पैसे मागितले. ते पाठवितां आले नाहींत म्हणून आल्यानंतर त्यांनीं घुस्सा दाखविला.

## गरज संपली

नागपूरचे प्रेक्षक टेंबे यांच्यावर खूष नव्हते. तेव्हां आवाजासाठीं रजा घेण्याचें टेंबे यांच्या मनांत आलें. त्याप्रमाणें देवलांना तेथूनच त्यांनीं कळविलें. नागपूरला गुप्तमंजूषच्या तालमी सुरू होत्या. तालमीला टेंबे हजर नसत. त्याबद्दल त्यांना मी बोललों. तेव्हां ते मोठ्या कष्टानें दोन चार वेळां तालमीला हजर राहिले.

नागपुरासच पेठे यांच्याबद्दल पंडितांना हेवा उत्पन्न झाला. कारण पेठे नट असून शिवाय पंडितांपेक्षां प्रत्येक गोष्टींत हुषार आणि त्यांच्या तंत्रानें नारायणराव वागूं लागले असें पंडितांना दिसलें. तें त्यांना कसें सहन व्हावें ? तेव्हां त्यांनीं पेठे यांना कंपनींतून घालविलें.

यवतमाळला चार प्रयोग करून आम्ही उमरावतीस गेलों. तेथें देवल आणि गडकरी आले. गडकरी यांनीं त्या वेळीं पुण्यप्रभावाचे दोन अंक लिहिले होते.

उमरावतीस सौभद्राच्या दिवशीं टेंबे यांनीं आवाजामुळें काम होणार नाहीं असें सांगितलें. अर्जुनाचें काम दत्तू पेठकर याला द्यावें लागलें. त्याच दिवशीं " गोविंदराव, तुमच्यावर पंडीत तिलांजली घेऊन बसला आहे ! काम करावयाचें तुम्ही नाकारलेंत हें बरें केलेंत नाहीं. तुमचें काम दत्तू पेठकरानें केलें. आतां एका नाटकांत तुमची गरज संपली. " अशी सूचना मी त्यांना दिली. पण पुढेंहि टेंबे आपली मुलगी आजारी असल्यामुळें आले नाहींत. त्या अवधींत झालेलें विद्याहरण टेंबे यांच्याशिवाय पार पडलें. त्यामुळें त्यांची दोन नाटकांतली गरज संपली.

## माझी भावना

बडोद्यास राणीसाहेबांनीं कांहींहि न गाळतां शाकुंतल पाहण्याची इच्छा दर्शविली. तें त्यांना दोन हप्त्यांत करून दाखविलें. तेव्हां वर्षासनाशिवाय जादा पांचशें रुपये देण्याचा हुकूम झाला.

येथपासून गडकरी यांना कंपनींतील देवलांचें महात्म्य खुपूं लागून त्यांच्या धुसपुशीला सुरवात झाली.

आम्ही मुंबईस आलों. मुंबईच्या प्रातींतून सर्व देणें देऊन टाकलें. धारकरांचे सर्व पैसे दिले. परंतु त्यांची रक्कम कंपनीला यशोदायी झाल्या-मुळें त्यांचें खातें न काढतां तीन रुपये चौदा आण्याची रक्कम त्यांच्या खातीं जमा ठेविली. ती एक माझी भावना होती. मी कंपनींत असेपर्यंत तें खातें होतें. पुढें केव्हांतरी काढलें गेलें.

देवलमास्तरांना ठरल्याप्रमाणें सुमारें ७००।८०० रुपये गुरुदक्षिणा म्हणून दिले.

याहि मुक्कामांत प्रेक्षक टेंबे यांच्यावर नाखूष होते. तेव्हां पंडितांनीं टेंबे यांची कंपनींतून उचलबांगडी करण्याचा नागपूरपासून मनांत योजलेला बेत सिद्धीस नेण्याचा प्रयत्न चालविला.

## नबाबशाही आडवी आली

पंडीत यांनीं टेंबे हे एक रंगभूमीवर, अयशस्वी नट आहेत अशा तक्रारी सॉलिसिटर्स लाड, वैद्य आणि आबासाहेब विंचूरकर यांच्या कानीं घालण्याचा नित्यक्रम मुंबईच्या मुक्कामीं चालविला होता. तसेंच टेंबे यांच्याबद्दल माझ्याहिपुढें सवाल टाकून त्यांनीं टेंबे यांच्याविरुद्ध मला आपल्या गोटयांत घेण्याचा प्रयत्न केला. नंतर आबासाहेब विंचूरकर व सॉलिसिटर वैद्य यांनींहि तो प्रश्न मजपुढें आणला. मला कोणाचाच पक्ष-पात करायचा नव्हता. मी पंडितांजवळ "कंपनी सुव्यवस्थित राहील याकरितां सर्वानुमतें जें ठरेल त्यांत मी आहें" हें सांगितलें होतें तेंच वरील मंडळीनाहि सांगितलें. आणखी असेंहि म्हटलें कीं "टेंबे यांना भागीदारींत घेण्याच्या वेळीं त्यांच्याबद्दल खाडिलकरांनींहि आक्षेप घेतला होता, पण त्यांनींच खाडिलकरांची समजूत घालून टेंबे याना त्यांच्या आवाजाचें वैगुण्य माहीत असूनहि भागीदारींत घेतलें होतें."

## रंगभूमीवरच्या गुणाचेंच भांडवल

गंधर्व कंपनीच्या आरंभापासून गोविंदरावांना त्यांच्या आवाजांतील लंगडी बाजू ध्यानांत आणून देऊन ती अभिनयाकडे लक्ष्य देऊन भरून

काढावी अशी मित्रप्रेमानें सावधगिरीची सूचना मी देत असें. त्यांनीं माझें केव्हां ऐकावें पण पुष्कळदां दुर्लक्षच करावें. खरें म्हटलें तर किर्लोस्कर मंडळीपासून गोविंदराव व मी एकमताचे होतों. त्यामुळें गोविंदराव गंधर्व मंडळींत प्रभावशाली व्हावेत आणि त्यांच्यावर तिलांजली घेऊन बसणारांचीं नाकें त्यांनीं आपल्या पराक्रमाच्या जोरावर ठेंचावींत असें मला वाटत असें. परंतु टेंबे यांची नबाबशाही त्यांनाच पहिली आडवी आली. अंतर्मुख होऊन त्यांनीं आपल्यांतला कमकुवतपणा कधीं पाहिलाच नाहीं, आणि त्यामुळें टेंबे एकाकी पडले, ही गोष्ट खरी आहे. पण अखेर त्यांना मी स्वार्थ-बुद्धीनें कंपनींतून घालविण्याच्या कामीं पंडिताला सामील झालों असा त्यांनीं आपला ग्रह करून घेतला. संस्थेच्या दृष्टीनें विघातक होईल असें टेंबे वागूं किंवा बोलूं लागले म्हणजे मला जें वाटे तें मी सडेतोडपणानें नेहमीं सांगत असें. अशा बाबतींत टेंबे व मी यांच्यांत पुष्कळ वेळां खटका उडे.

नाशिक येथील सौभद्र, विद्याहरण, मृच्छकटिक या नाटकांतलीं टेंबे यांचीं कामें मुंबईच्या मुक्कामीं दत्तू पेठकरानें केलीं होतीं. त्याबद्दल टेंबे यांना मी त्याच वेळीं योग्य ती जाणीव दिली होती. नाशिकला सौभद्र लागलें त्या दिवशीं टेंबे नाशकास आले आणि रात्रीं नाटकाच्या वेळीं त्यांनीं मला २।३ महिन्यांची रजा द्याल काय? हा प्रश्न केला. मी त्यांना "माझी हरकत नाहीं; परंतु नारायणरावांस विचारून सांगतों" असें म्हटलें. नारा-यणरावांना विचारलें. त्यानंतर टेंबे व मी यांच्यामध्यें जो संवाद झाला त्यांतील मुख्य भाग पुढील प्रमाणें:—

टेंबे—डॉ. राव यांनीं माझा आवाज तपासून २।३ महिने पूर्ण विश्रांति घेण्यास सांगितलें आहे. पार्टनर या नात्यानें विश्रांति घेण्याचा मला हक्क आहे.

मी—डॉक्टरांच्या सल्याप्रमाणें विश्रांति घेणें इष्ट आहे. तुम्हाला ती मिळेलहि. पण रजा घेण्याचा हक्क आहे असें म्हणालात, तर तीच सवलत आपल्याला आहे असें समजून तो हक्क पदरांत पाडून घ्यावा असें प्रत्येक पार्टनरला वाटेल. आणि असें होऊं लागलें तर कंपनीची सुस्थिति कशी

राहील ? तसेंच तुमच्या गैरहजेरींत जो काम करील त्याला जादा पगार द्यावा लागेल त्या पगाराचें काय करावयाचें ?

**टेंबे**–तो पगार कंपनीनें सोसावा.

**मी**–तुमच्यासाठीं काम करणारास तुमच्या भागांतून पगार दिला पाहिजे. आपली नाटक मंडळी इतर व्यापारी मंडळ्यासारखी नव्हे. नाटक मंडळीच्या भागीदारीचें स्वरूप निव्वळ भांडवलशाहीचें नाहीं. आपल्या रंगभूमीवरच्या गुणांच्या भांडवलावर आपली भागीदारी अधिष्ठित आहे. मग तुमच्यासाठीं कंपनीनें नुकसान कां सोसावें ?

**टेंबें**–माझ्या भागांत एका पैचें नुकसान मी सोसणार नाहीं आणि असा भाव उत्पन्न झाला तिथलें स्वरूप मला कळलें. यानंतर माझी केस मी पंचाच्या पुढें माडतों. तुम्हीच कळवा.

**मी**–पंचांना तुमचें म्हणणें तुम्ही कळवा. कंपनीचें म्हणणें मी पत्रानें कळवितों. तेंच बरें होईल. म्हणजे लिहिल्या मजकुरावरून "मी असें म्हटलें नव्हतें." असा वाद पुनः उत्पन्न व्हायला नको.

नंतर दुसऱ्याच दिवशीं टेंबे मुंबईस गेले. तेवढ्या दोन दिवसांच्या अवधींत आपल्या वतीच्या मंडळींत माझ्याबद्दल नारायणराव व पंडीत यांनीं "तें टरलें होतें" म्हणून वेताबातांत निंदा केलीच.

सॉलिसिटर वैद्य यांची तार आल्यावरून मी व नारायणराव मुंबईस गेलों. टेंबे यांना सॉलिसिटर लाड यांनीं पुष्कळ समजावले परंतु "मला मोकळा करा" असाच हेका टेंबे यानीं धरला. तेव्हा सर्व पंचांना तसदी देण्यापेक्षां लवादनिवाडा देण्यासाठीं सॉलिसिटर्स वैद्य व लाड याना लवाद नेमून ऐकटपत्र लिहून तिघांनीं सह्या करून दिल्या.

टेंबे यांच्या सर्व हक्कसंबंधांबद्दल आम्ही दोघांनी टेंबे यांना साडेसात हजार रुपये द्यावे. ते एकावनशें रुपये रोख व बाकी चोवीसशें रुपये चोवीस महिन्यांत दरमहा शंभर रुपयेप्रमाणें द्यावे असा निर्णय पंचांनीं दिला तो आम्हांला मान्य झाला.

कंपनीजवळ रिझर्व्ह फंड होता. भागीदारांची वांटणी मे महिन्यांत झाली होती. रिझर्व फंडाच्या पांच हजार रुपयांच्या ग. प्रॉ. नोटा घेतल्या होत्या त्या विकून टेंबे यांचा पहिला हप्ता देऊन टाकला.

## तयार मालावर हात मारायचा प्रयत्न

टेंबे यांनीं स्वतःच्या मालकीची नवीन कंपनी काढण्याचें ठरविलें. गंधर्व कंपनीच्या तयार मालावर ( तयार असलेल्या पात्रावर ) हात मारावयाचा निश्चय त्यांनीं केला. कंपनींतच तयार झालेल्या एका भेद्यामार्फत त्यांनीं गंधर्व मंडळींत फितुरी सुरू केली. त्यांच्या बैठका भरूं लागल्या. रोज निरनिराळ्या बातम्या उठूं लागल्या. पंडितानीं टेंबे यांच्याकडे कुणी जाऊं नये अशा अर्थाची नोटीस काढण्याचें ठरविलें तेव्हां अशा नोटिशीनें मंडळी बिथरून मुद्दाम तिकडे जातील तर आपण त्याला महत्त्व देतों असें मुळींच दाखविलें नाहीं तर चागलें होईल असें माझें मत मी दिलें तेव्हां तशी नोटीस लागली नाहीं. मात्र सावध राहणें आम्हांला प्राप्त होतें.

## गडकऱ्यांचा चमत्कार

नाशकास नारायणराव पोहायला जात. नव्या पाण्याचा नारायणरावांच्या प्रकृतीवर परिणाम झाला. तो इतका कीं कल्याणच्या प्रथम प्रयोगाला एक अंकानंतरच त्यांचा आवाज साफ बसला. त्यामुळें तेथील खेळ बंद करून कंपनी पुण्यास आणावी लागली. नारायणरावांचा आवाज दुरुस्त होईपर्यंत कंपनीनें सुट्टी घ्यावी असें सर्वांनुमतें ठरलें. सुट्टी घेण्याविरुद्ध खाडिलकरांचें मत होतें. पण नारायणरावांकडून "रंगभूमीवर काम मला करायचें आहे. मला काम रेटणार नाहीं. मला सुट्टी पाहिजे" असें उत्तर खाडिलकरांना मिळालें आणि त्यावर सुट्टी कायम झाली.

याच वेळीं खाडिलकर कंपनींत बसले असतां गडकरी यांच्या पुण्यप्रभाव नाटकाचें वाचन होऊन तें कंपनीनें घ्यायचें ठरविलें. वृंदावनाची भूमिका माझ्यासाठीं लिहिली आहे असें गडकरी यांनीं मला सांगितलें. गडकरी माझे स्नेही. त्यांचा स्वभाव मला पुरा माहीत. त्यामुळें ते नाटक बसविण्यासंबंधीं ठराव मदार करतांना चमत्कार केल्याशिवाय रहाणार नाहींत असें वाटत होतें आणि शेवटीं त्यांनीं तें खरें करून दाखविलेंच.

कंपनीशीं पुण्यप्रभावाचा करार कशा प्रकारें व्हावा याबद्दलच्या अटींचा कच्चा कागद गडकरी यांनीं केला तो साधारण पुढीलप्रमाणें होता:—

१. पुण्यप्रभाव नाटक ज्या गांवीं लागेल त्या मुक्कामीं त्याला जें पहिल्या नंबरचें उत्पन्न होईल त्याच्या साडेतीन पट रक्कम गडकरी यांना मोनापली हक्काबद्दल मिळावी.

२. नाटकांतील पात्रांची निवड उभयतांच्या विचारें व्हावी. पण कालिंदीचें काम करणारें पात्र गडकरी यांनीं ठरवावें.

३. पदाच्या चाली गंधर्व मंडळीनें द्याव्या. पद्यें तयार झाल्यापासून तीन महिन्यांच्या आंत कंपनीनें नाटक रंगभूमीवर आणिलें पाहिजे.

गडकरी यांनीं वरील पाठविलेल्या दोन अटींसंबंधानें कंपनीचा व त्यांचा मतभेद झाला. आमच्याकडे केशव शिदे नांवाचा एक मुलगा होता. त्याचें स्वरूप व डोळे कालिदीच्या कामाला योग्य होते. म्हणून त्याला कालिंदीचें काम द्यावें असें गडकऱ्याचें मत. शिद्याचा आवाज फुटून निरुपयोगी झाला होता म्हणून त्याचें काम चांगलें वठणार नाहीं असें माझें मत. हा पहिला मतभेद.

पहिल्या नंबरच्या अटीप्रमाणें साडेतीन पट रक्कम द्यायला आम्हीं कबूल नव्हतों. कारण खाडिलकर तिप्पट रक्कम घेत. गडकरी यांना दोन्ही गोष्टी मान्य होईनात, त्यामुळें त्यांनीं पुण्यप्रभाव परत मागितलें. तें त्यांना आम्हीं परत दिलें.

माझी निराशा केल्याबद्दल गडकरी यांची मी कडक शब्दांत हजेरी घेतली. तसा त्यांचा माझा विशेष स्नेह होता. भावनेच्या भरात गडकरी यांनीं "मी तुम्हांला फुकट नाटक लिहून देणार" असें केवळ तोंडी म्हटलें इतकेंच नव्हे; त्यांनीं तसें लेखी लिहून मजजवळ दिलें होतें. गडकरी यांनीं तो कागद परत मागितला. गडकरी यांना पुण्यप्रभावाबद्दल किर्लोस्कर कंपनीची भीड पडली होती. म्हणून त्यांनीं नाटक परत घेतलें. आम्हांलाहि त्यांच्या अव्यवहार्य अटी मान्य होण्यासारख्या नव्हत्याच. त्यामुळें तें नाटक परत केलें आणि अशा रीतीनें "पुण्यप्रभाव" प्रकरणावर पडदा पडला.

# भाऊबंदकीपासून बचाव

टेंबे काढणार त्या कंपनींत आमच्याकडील पेठकर, पंढरपूरकर-बुवा, इनामदार, रानडे, मांडे ही मंडळी एकेक महिन्याची नोटीस देऊन, टेंबे यांना तीन तीन वर्षांचा लेखी करार करून देऊन, जाणार आहेत असें कळलें. मी ताबडतोब दत्तू पेठकर यास टांग्यांत घालून बंड गार्डन-वर नेलें आणि त्याला "टेंब्यांकडे जाणार आहेस काय ?" असें विचारलें, "जायचें ठरलेलें नाहीं. टेंबे बोलावित आहेत. त्यांची भीड मला तोडवत नाहीं. त्यांच्या आग्रहाला मान तुकविणें भाग पडतें. त्याकरितां तीन वर्षांचा मजकडून लेखी करार करून घ्या. म्हणजे मला त्यांनीं विचारलें तर करारानें बांधला गेलों आहे असें सांगतां येईल" असें तो म्हणाला. त्याला तयार करण्यासाठीं मला त्याला सांगावें लागलें, "टेंबे यांच्याकडे गेल्याने तुझा खरोखर फायदा होईल अशी तुला खात्री वाटत असेल तर तसें स्पष्ट सांगून जा. पण येथें तुला आतां मुख्य नायकाच्या जाग्यावर नेमलें आहे. उमरावतीस अर्जुनाचें काम तूं केलेंस तेव्हां तुला २५ रुपयांवरून ६० रुपये पगारावर नेलें. नंतर सात महिन्यातच तुझा पगार ७५ केला. मी किर्लोस्कर कंपनींत तुला जाऊं न देतां आमच्याकडे आणला. मेहनत घेऊन तुला तयार केला. आमच्या कंपनींतच पुढें यायला तुला पुष्कळ वाव आहे. नायकाचें काम देऊं असें टेंबे तुला आश्वासन देतील. पण एखाद्याच नाटकांत तिकडे तुला काम मिळेल. या गोष्टींचा तूं विचार कर."

मी दत्तू पेठकरकडून लगेच स्टँपावर करार करून घेतला. तसच पंढरपूरकर, सोनबा वालावलकर, देवधर, रानडे यांचेहि तीन तीन वर्षांचे करार झटपट करून टाकले. मांडे, इनामदार यांनीं करार करून द्यायला थोडा गुळमुळीतपणा दाखवितांच त्यांच्या कामांची दुसरी व्यवस्था करून आपला प्रयोग अडणार नाहीं असा बंदोबस्त करून बसलों. या प्रकारा-मुळें आयती तयार मंडळी काढून घेऊन कंपनी उभी करायचा टेंबे यांचा पहिला बेत फुकट गेला. तरीहि आमच्या कंपनींतील तब्बलजी आणि त्यांनीं गोव्याहून आणलेला गोविंदा मुळगांवकर हे दोघेहि गेले.

टेंबे यांनीं पेठे यांना मॅनेजर नेमिलें. टेंबे यांना श्रीशाहूमहाराजांचा आश्रय मिळवून देण्याच्या बाबतींत पेठे यांचा उपयोग झाला. एखाद्या ठिकाणीं काम फत्ते करण्यांत पेठे यांचा हातखंडा. दुर्भेद्य ठिकाणीं कोणता सुरुंग लावावा अगर घोरपड चढवावी हें पेठे यांस चांगलें साधलेलें. मॅनेजरला लागणाऱ्या इतर गुणांपेक्षां या गुणाची नाटक कंपनीला फार जरूर असते. तो गुण पेठे यांच्या ठिकाणीं उत्तमच आहे. त्यांना चढवून खुलवून, धूर्तपणानें त्याचा पूर्ण उपयोग अनेकांनीं करून घेतला आहे. काम संपतांच रसहीन झालेल्या उसाच्या चोयटीप्रमाणें पेठ्यांना सोडूनहि दिलें आहे. याला उभय पक्ष कारणीभूत असतील; पण वस्तुस्थिति अशी होती.

## कन्यारत्नाचा लाभ

दक्षिण हैद्राबाद येथील एक लोकप्रिय पोलीसअधिकारी रामराव प्रधान हे आमचे स्नेही. त्यांच्या आग्रहावरून आमची कंपनी हैद्राबादेस गेली. केशवराव कोरटकर, वामनराव नाईक या थोर थोर मंडळींशीं रामरावांची प्रेमाची वागणूक असे. त्यामुळें वामनराव नाईक यांच्याकडून आमच्या मंडळीकरितां 'विवेकवर्धिनी' नांवाचें कच्चें थिएटर रामरावांनीं बांधविलें. त्या थिएटरमध्यें गुरुवार तारीख ४ नोव्हेंबर १९१५ या दिवशीं आमचा पहिला प्रयोग झाला. प्रथम प्रयोगाच्या दिवशीं तेथील रिवाजाप्रमाणें हुकूम आला कीं मोहरममध्यें पंधरा दिवस नाटकें, गाणीं, वाद्यें वगैरे बंद रहावें. मोहरमच्या सुट्टीची कल्पना रामरावांनाच आली नाहीं, मग आम्हाला कोठून येणार? हुकमाप्रमाणें पंधरा दिवस प्रयोग बंद ठेवले.

दुसऱ्या दिवशीं म्हणजे तारीख ५ रोजीं संध्याकाळीं मला कन्यारत्नाचा लाभ झाला. नारायणरावांनीं आपलें कुटुंब प्रसूतीसाठीं मुंबईस ठेवलें होतें. त्याकरितां ते मुंबईस गेले. पंडीत पुण्यास गेले.

## कुजलेल्या भागाचें ऑपरेशन

टेंबे यांचे हस्तक अजून आमच्या कंपनींत होते. त्यांनीं फितुरी चालविली होती. त्याची दाद आम्हांला अचानक लागली. ऐन वेळीं कंपनीच्या खेळांचा खोळंबा करून अमुक अमुक मंडळी एकदम नक्की निघून जाणार आहेत अशा मजकुराचें पंडितांचें पत्र पुण्याहून अचानक

आलें. लगेच थिएटरमध्यें सर्वांना समोर बोलावून चौकशी केली. तेव्हां स्टेजमॅनेजर आणि एक न्हावी या दोघांखेरीज बाकीचे सर्व जाणार असें कळलें. तेव्हां " तुम्हाला रहायचें नसेल तर ती तुमच्या खुषीची गोष्ट आहे, पण आम्ही परदेशांत आहोंत. वेळेवर एकदम माणसें मिळणार नाहींत. म्हणून जशीं जशीं माणसें मिळतील तसे तसे जाईपर्यंतचा पगार देऊन जाणारांना मोकळें करूं. तुम्ही एक महिन्याची नोटीस द्या. " असें मी सामोपचारानें सांगितलें; पण कोणी ऐकेल असा रंग दिसेना. तेव्हां त्यांना " तुम्हांला एक महिना चौदा दिवसांचा पगार मिळणार नाहीं. आणि एक तासाच्या आंत कंपनीच्या जागेबाहेर पडलें पाहिजे. " असें बजावलें. घरच्या स्टाफपैकीं जे जातों म्हणाले त्यांनाहि तसेंच सांगितलें. कुजलेला एकेक भाग तोडीत बसण्यापेक्षां एकदमच ऑपरेशन करणें चांगलें असा विचार करून त्याच दिवशीं २५ माणसें काढून टाकलीं.

## मूक धूता

नंतर थिएटरच्या कामासाठीं तेथीलच भुई लोक मजूर ठेवले. पेटीवाले, तबलजी तारेनें आणविले. एका मृच्छकटिक प्रयोगाला धूतेचें पात्र नव्हतें तेव्हां माझें घरकाम करणारा गोरागोमटा गडी होता त्याला मूक धूता बनवून मोंगलाई मुलखांत नाटक पार पाडलें.

हैद्राबाद येथून वॉरफंडासाठीं मुंबईस क्रिकेट मॅच होती ती पहायला गेलों. क्रिकेटच्या मैदानांवर केशवराव भोसले भेटले. शंकररावांकडून मानापमान नाटकाची परवानगी मिळविली असें त्यांनीं सांगितलें, आणि " उद्यां कंपनींत येऊन मानापमानाची थोडी तालीम द्याल काय ? " असें विचारलें. मीहि आनंदानें कबूल केलें.

ठरल्याप्रमाणें दुसऱ्या दिवशीं ललितकलेंत गेलों. मानापमानाची थोडी तालीम घेतली. कांहीं पदांच्या चाली सांगितल्या. दत्तोबा भोसले यांना केशवरावांनीं चौथ्या अंकांतील लक्ष्मीधराचें आत्मगत भाषण माझ्याकडून ऐकविलें. झाली तालीम.

## उत्कर्षाचा कळस

हैद्राबाद, औरंगाबाद संपवून आम्ही बडोदें घेतलें. बडोद्याच्या पहिल्या सरकारी सौभद्राला म्हैसूरचे महाराज उपस्थित होते. त्या दिवशीं

भयंकर थंडी होती. ७।८ महिन्यांपासून दोन वेळ थंड पाण्यानें स्नान करण्याची संवय नारायणरावांनीं केली होती. हैद्राबादच्या विऱ्हाडीं असलेल्या हौदांत सांचलेल्या थंडगार पाण्यानें संध्याकाळपर्यंत ते केव्हांहि स्नान करीत. त्यामुळें बडोद्याच्या सौभद्र प्रयोगाच्या दुसऱ्या दिवशीं रात्रीं नारायणरावांना प्लूरसीच्या आजारानें गांठलें. फार हैराण झाले. त्या कारणानें प्रयोग बंद करावे लागले.

## फाल्गुनरावाचा नवा अवतार

त्याच सुमारास देवलमास्तर बडोद्यास आले आणि गद्य फाल्गुनरावाला संगीत पेहेराव चढविण्याच्या उद्योगास लागले. पात्रांच्या नकला पाठ करून घेऊन मी गद्य भाग अगोदरच बराच बसवीत आणला होता. देवलमास्तरांनीं आल्याबरोबर तालीम घेतली. नंतर पदें करायला सुरवात केली. आजारीपणामुळें नारायणराव स्वस्थच होते.

गायनाचार्य भास्करबुवा मास्तर कृष्णासह बडोद्यास आले. भास्करबुवांना विनंति करून मास्टर कृष्णास कंपनींत घेतला आणि शारदा नाटक बसवायचें असें ठरविलें. देवलमास्तरांचीं फाल्गुनरावांतील पदें तयार झालीं. फाल्गुनरावाचें संशयकल्लोळ असें नामकरण होऊन नवा अवतार कायम झाला.

## भाट्याचा घाट आणि गोवेकरणीचा थाट

मुंबईस संशयकल्लोळचे फोटो काढायचे ठरलें. पात्रांचे पोषाख कसे असावेत याचा विचार मी केला. तेव्हा मुंबईच्या पाठारे प्रभूंच्या डोक्यावरील पागोटीं मला हंसू येण्याइतकीं विचित्र वाटतात. तसें पागोटें यापूर्वी मराठी रंगभूमीवर कधीं दिसलें नव्हतें तें फाल्गुनरावाच्या डोक्यावर ठेवावें असें मी ठरविलें. तसेंच अश्विनशेटचा "भाट्या"चा घाट आणि रेवतीचा गोवेकरणीचा थाट उठवावा असें वाटलें. देवलमास्तरांना पोषाखांची मी काढलेली कल्पना मानवली. देवलमास्तरांचे थिऑसॉफिस्ट बंधु डॉ. त्रिलोकेकर यांना तशा तऱ्हेच्या पगड्या कोठें मिळतात तें विचारलें. त्या ठिकाणाहून पगड्या आणविल्या आणि त्यांच्या माहिती बरहुकूम सर्व पोषाख तयार केले.

## देवलमास्तर दिवंगत झाले

संशयकल्लोळाच्या तालमीची जबाबदारी माझ्यावर टाकून आणि रंगी तालमीच्या अगोदर आपण येऊन सफाईचा हात फिरवूं असें सांगून देवलमास्तर प्रकृति बिघडली असल्यामुळें सांगलीस गेले. पुढें बेळगांवास संशयकल्लोळच्या तालमी जोरांत चालू असतांना देवलमास्तर आजारी आहेत आणि मिरज हॉस्पिटलमध्यें डॉ. वॉनलेस यांनीं त्यांचें ऑपरेशन केलें आहे असें पत्र आलें. रंगाची तालीम करून दुसरे दिवशींच मी मिरजेस गेलों. आजारी स्थितींतहि गुरुवर्यांनीं रंगी तालीम कशी झाली असें विचारलें. संगीत थोडें कमी पडतें. बाकी सर्व उत्तम आहे असें मी सांगितलें. "चाली दिल्यास नारायणरावांकरितां आणखी एक दोन पदें करून देतों" असें ते म्हणाले. परंतु मी त्यांना तकलीफ दिली नाहीं.

मी बेळगांवीं परतलों. पुणें सोडल्यापासून दरमहा प्रपंचापुरती रक्कम घेण्यापलीकडे आम्हां भागीदारांना वांटणी करतां आली नव्हती ती येथें केली.

स्वयंवर नाटकाचे तीन अंक घेऊन खाडिलकर हुबळीस आले. पदांच्या चाली देण्याचें काम सुरूं झालें. भास्करबुवा बखले यांनींच स्वयंवरांतील चाली दिल्या.

संशयकल्लोळच्या तालमी चालू होत्याच. पुन्हां देवलमास्तर अत्यवस्थ झाल्याची बातमी आली. ताबडतोब मिरजेस गेलों. पोंचलों तेव्हां त्यांना सरासरी शुद्ध होती. मधुमेहानें पायाची जखम जास्त बिघडत चालली होती. त्याकरितां गुडघ्याखालीं पाय कापला पाहिजे असें डॉ. वॉनलेस यांचें मत पडलें. मंगळवारीं त्यांचा पाय कापण्याच्या वेळीं दुसऱ्या दिवशींच्या प्रयोगांत मला काम असल्यामुळें हुबळीस जाणें भाग पडलें. गाडी सुटण्याच्या वेळीं स्टेशनवरच ऑपरेशन झाल्याचें कळलें. परंतु दुसऱ्याच दिवशीं गुरुवर्य देवलमास्तर दिवंगत झाले.

## पात्रांच्या लहरीप्रमाणें पदें करणारा कवि मी नाहीं

देवलमास्तरांच्यासारखा त्यांच्यानंतर दुसरा नाट्यशिक्षक झाला नाहीं. त्यांचे गद्य व पद्यलेखन वाङ्मयाच्या दृष्टीनें सर्वश्रेष्ठ आहे असें

तज्ञांनीं अनेक वेळां म्हटलेलें आहे. नट या नात्यानें त्यांच्या गद्यपद्याकडे पहातांना मला असें वाटतें कीं नाटकांतील पात्रांच्या योग्यतेनुरूप अशी भाषा लिहावी त्यांनींच. त्यांची वाक्यरचना इतकी सुबोध, सुंदर असे कीं पात्राला ती सहज उच्चारतां यावी. क्लिष्ट पद अगर गद्यांत एकहि क्लिष्ट वाक्य त्यांच्या लेखणींतून कधींच बाहेर पडलें नाहीं. नाटक लिहितांना प्रथम ते पदें करीत. पदें म्हणजे लेखनाच्या खुणा होत असें ते म्हणत. गायकपात्राच्या लहरीप्रमाणें भानगडीच्या चालीवर त्यांनीं कधींहि पदें केली नाहींत. नारायणराव व भास्करबुवा यांचा आग्रह देवलमास्तरांनीं संशयकल्लोळमध्यें गायकी चाली घालाव्या असा होता. तशी एक त्यांनीं चाल दिली पण ती अशी विचित्र होती कीं त्यावर पद्यरचना करणें कष्टाचें तर होतेंच; पण कष्ट करूनहि मनासारखें पद होईल असें वाटत नव्हतें. तेव्हां देवलमास्तरांनीं पद करण्याचें नाकारलें. नारायणराव नाखूष झाले. तेव्हां गायकपात्राकरितां एखादें पद केलें तर बरें होईल असें मी निसुटतें मास्तराना सुचविलें. त्यावर मास्तरांनीं "पदाकडे लोक माझीं पदें म्हणून पहाणार आहेत. पात्रांच्या लहरीप्रमाणें पदें करणारा कवि मी नाहीं. नाटक करा अगर करूं नका. वाटेल त्या अवघड चालीवर मला पद करतां येणार नाहीं असें नाहीं. परंतु ऱ्हस्वदीर्घाच्या ओढाताणीसाठीं क्लिष्ट शब्द घालून पदाचा सांगाडा कसा तरी मी करणार नाहीं" असें त्यांनीं स्पष्ट सांगितलें.

देवलमास्तरांची नाट्यशिक्षणपरंपरा मी चालवीत आहें, यामुळें आपल्या शिक्षणाचें चीज झालें असे उद्‌गार त्यांनीं अनेकांजवळ काढलेले मला कळलें. माझ्यावर त्यांचें अत्यंत प्रेम होतें. माझें वय ३६ वर्षांचें, गंधर्व कंपनीचा मी एक भागीदार, लोकप्रिय झालेला मी एक नट, असें असूनहि मला देवलमास्तरांचा दरारा वाटे.

देवलमास्तर दिवंगत झाल्यानंतर संशयकल्लोळ प्रयोग हुबळीस झाला. तो सर्वांगसुंदर वठला. संगीताची वाण कुठेंही भासली नाहीं.

## बालगंधर्व–तरुणगंधर्व

हुबळीस आम्ही असतांनाच केशवराव भोसले एक दोन प्रयोगांसाठीं हुबळीस आले. किल्ल्यांतील लहान थिएटरांत त्यांनीं प्रयोग केले. केशवराव

स्पर्धेसाठीं आले असें लोक म्हणत. परंतु अडचणीच्या वेळीं धंद्यासाठीं कोणी कुठेंहि जावें असें आम्ही म्हणत होतों.

गदग येथें बल्लारीहून कांहीं सुशिक्षितांचें मंडळ आलें. त्यांना गंधर्व कंपनीस बल्लारीस न्यावयाचें होते. बल्लारी निव्वळ कानडीचा प्रांत. मराठी नाटकें तेथें समजणार कशीं ? हा प्रश्न पडला. परंतु त्या मंडळानें प्रवास व भोजनखर्च याशिवाय दोन हजार रुपये तीन खेळास द्यावयाचे कबूल केलें. यामुळें त्यांना विजापुराहून नक्की काय तें कळवितों, असें सांगितलें.

नक्की ठरविण्यासाठीं बल्लारीचें मंडळ पुन्हां विजापुरास आलें. पण या वेळीं त्या मंडळांत सुशिक्षित वर्ग व व्यापारी मंडळ अशी फूट पटली होती. व्यापारी मंडळानें आपल्यातर्फे येण्याकरितां सुशिक्षित वर्गापेक्षां ज्यास्त रकम देण्याचें आमिष दाखविलें. आमचा शब्द अगोदर सुशिक्षितांना गेल्यामुळें व्यापारी मंडळास नकार देणें आम्हास भाग पडलें. तेव्हां चढाओढीसाठीं बल्लारीस दुसरी कंपनी नेण्याकरितां तें व्यापारी मंडळ केशवराव भोसले यांजकडे मिरजेस गेलें. केशवरावांच्या मनांत गंधर्व कंपनीबद्दल स्पर्धा होतीच. त्यामुळें त्यांनीं व्यापारी मंडळाचें निमंत्रण स्वीकारलें आणि गंधर्व व ललितकला या दोन्ही नाटक मंडळ्या बल्लारीस एकाच वेळीं जाणार हें निश्चित झालें. बल्लारीस जाणारी आमची गाडी गदगहून सुटल्यावर पुढें प्रत्येक स्टेशनवर गंधर्व कंपनीची व ललितकलादर्श कंपनीचीं हस्तपत्रकें वाटलीं जात होतीं. वाटेंत एकानें "एनु बालगंधर्व, तरुणगंधर्व ?" मला विचारलें. त्याचा भाव मी ओळखला. क्षुल्लकपणा दाखविणारी मुद्रा करून "बालगंधर्व" असें उत्तर दिलें. त्याबरोबर विचारणारा माझ्याकडे पहातच गेला.

बल्लारीचे प्रयोग म्हणजे दोन तटांतली चढाओढ! प्रत्येकजण आपला जयजयकार झाला असेंच म्हणणार. प्रश्न वादग्रस्त खरा. तरीहि ज्या मंडळीनीं केशवरावांना नेलें होतें त्यांनीं त्यांच्या शेवटच्या प्रयोगाला तिकिटें कमी दरानें विकलीं आणि त्यावरून त्या मंडळीचें व केशवरावांचें भांडण झालें ही गोष्ट मात्र खरी आहे.

बाकी बल्लारी निव्वळ कानडी भाषेचें असूनसुद्धां आमच्या प्रयोगाला भयंकर गर्दी लोटत होती. निघण्याच्या वेळीं आमच्या कंपनींतील प्रमुख पात्रांना नेणाऱ्या मंडळीनीं पारितोषिकें दिलीं.

## खाडिलकरांचें एकपात्री नाटक

बल्लारीहून सोलापुरास आल्यानंतर खाडिलकरांच्या स्वयंवर नाटकाच्या तालमींना सुरवात झाली. त्या नाटकाचीं पात्रें ठरवितांना खाडिलकरांनीं मला कोणतें काम करतां 'असें विचारलें. त्या नाटकांत एका रुक्मिणी शिवाय बाकीचीं पात्रें भरतीचींच आहेत हें नाटक वाचलें त्या वेळींच माझ्या ध्यानांत आलें होतें. माझें व खाडिलकरांचें १९१४ मध्यें भांडण झालें ते तें विसरले नव्हते आणि त्याचाच परिणाम म्हणून त्यांनीं स्वयंवरांत एकट्या नारायणरावांनाच प्राधान्य देऊन एकपात्री नाटकाची रचना केली. अशा रीतीनें माझ्यावरील आपला राग व नारायणरावांवरील लोभ निदर्शनास आणला होता. मला विचारलें तेव्हां "एकपात्री नाटक असल्यामुळें मी त्यांत कोणतेंहि काम केलें तरी सारखेंच आहे." म्हटलें त्यांनीं "कृष्णाचें काम करतां काय?" असें विचारलें. "ठीक आहे" मी म्हटलें.

आम्ही मुंबईस आलों. संशयकल्लोळचा प्रथम प्रयोग नवंबरच्या पहिल्या आठवड्यांत लागला. प्रयोगाला सुरवातीपासून रंग चढूं लागला, अश्विनशेटची भाटिया जातीची पगडी पाहून प्रेक्षकानीं पसंतीची टाळी दिली. रेवती मूर्च्छित पडत असतां फाल्गुनराव तिला सांवरतो त्या प्रवेशांत पाठारे प्रभूच्या पगडीचें दर्शन होतांच थिएटर दणाणून गेलें. पुढें एकाहून एक असे प्रवेश चढत गेले. चौथ्या अंकांत पाठारे प्रभू एका बाजूला गोंडा असलेली टोपी रात्रीकरितां वापरतात ती टोपी घालून रंगभूमीवर मी प्रवेश करतांच हास्याच्या दणदणाटानें थिएटर कोसळून पडतें कीं काय असें झालें. प्रेक्षकांच्या हास्याची ऊर्मि संपेपर्यंत मी रंगभूमीवर नुसता उभा राहिलों. याप्रमाणें संशयकल्लोळनें मुंबई हालवून सोडली.

## गंधर्व कंपनीचें ट्रम्प कार्ड

स्वयंवरची रंगी तालीम झाली आणि १९१६ च्या डिसेंबर ता. १७ रविवार रोजीं स्वयंवरचा पहिला प्रयोग झाला. स्वयंवर नाटकांत गायनाचा

भाग विशेष. त्यामुळें तें नाटक म्हणजे गायनाची चमचमीत मेजवानीच मिळाली प्रेक्षकांना. प्रयोगांचा धूमधडाका सुरू झाला.

खाडिलकरांना स्वयंवराच्या मोनापली हक्काबद्दल तीन हजार चारशें रुपये द्यायचे ठरले आणि त्याबद्दल त्यांनींच सांगितल्याबरहुकूम हप्ते देण्यास सुरवात झाली. गुजराथी, मुलतानी, व्यापारी या सर्व लोकांत साऱ्या मुंबईभर स्वयंवर आणि स्वयंवरच होऊन कंपनीला पैसाच पैसा मिळूं लागला. हें स्वयंवर नाटक म्हणजे गंधर्व कंपनीचें ट्रम्प कार्डच झालें. स्वयंवर म्हणजे पैसा व पैसा म्हणजे स्वयंवर असेंच ठरून गेलें.

## आनंदाचा कळस

स्वयंवर रंगभूमीवर आलें त्याअगोदरच्या महिन्यांत माझ्या सहा आण्याच्या हिश्शाला एक महिन्याचा नफा १०५० रुपये मिळाला. त्या दिवशीं माझ्या आतापर्यंतच्या आयुष्यांतल्या आनंदाचा कळस झाला असेंच मला वाटलें. दरमहा १० रुपयांवर कंपनींत नोकर म्हणून राहिलों ती एकवीस वर्षांची तपश्चर्या आज फळाला आली. तपश्चर्येचें फळ आज आपल्याला पुरेपूर मिळालें असेंच मनापासून वाटलें. पुढें मला पुष्कळ पैसा मिळाला. पण त्या वेळीं झालेला आनंद पुनः केव्हांच वाटला नाहीं. मिळालेले रुपये माझ्या प्रिय मातोश्रीच्या पुढें नेऊन ठेवले आणि सद्गदित अंतःकरणानें मी आईला म्हटलें " आई, मी भडकलों असतां किर्लोस्कर कंपनींत तूं मला घातलेंस त्याचें हें फळ आलें बरें. " आईलाहि प्रेमाचा कढ आला. माझ्या तोंडावरून व डोक्यावर तिनें हात फिरवला. या वेळीं माझें घर, कुटुंबांतील आई, पत्नी व मी सर्वच भान विसरून कांहीं वेळपर्यंत त्या आनंदांत गर्क झालों.

माझ्याप्रमाणें ज्यांनीं अनुभव घेतला असेल त्यांनाच मी लिहिलेल्या वरील वर्णनानें आनंद होईल. ज्यांना हा प्रसंग नाहीं अगर ज्यांनीं आपली कमाई आपल्या मातृदेवतेपुढें अशी ठेवली नाहीं त्या अरसिकांना माझ्या या आनंदप्रसंगाचें कांहीं वाटणार नाहीं. कदाचित् उलट ते तिरस्कारानें माझी हेटाळणीहि करतील.

# रंगभूमीचा एकखांबी तंबू

स्वयंवर नाटक गंधर्व मंडळीला सांपत्तिक दृष्टीनें अत्यंत यशस्वी झालें ही गोष्ट खरी; पण हें स्वयंवर कलेच्या दृष्टीनें नाट्याच्या ऱ्हासाचें बीज पडल्याप्रमाणें झालें. स्वयंवरांतील गायकी चालीमुळें नाटकांतल्या अभिनयाची आवश्यकता वाटेनाशी झाली. रुक्मिणीचें संगीतपात्र नारायण-रावांसाठीं नटविलें तेवढ्यावरच झालें नाटक. खुद्द खाडिलकरांनीं पुढें नारायणरावांना मुख्य धरून त्यांच्यासाठींच एकखांबी तंबूसारखीं एकपात्री द्रौपदी, मेनका, सावित्री हीं नाटकें लिहून अनिष्ट प्रथा वाढीला लावली. मग गंधर्व कंपनी आणि खाडिलकर याचा कित्ता इतर कंपन्या व दुसरे नाटककार यांनींहि गिरवायला सुरवात केल्यास नवल काय? गायकी चालीचें खूळ स्वयंवरापासून सर्व नाटक मंडळ्यांत पसरूं लागलें. एकेक कंपनी एकेक उत्तम गवई धरूं लागली. त्यामुळें सर्वत्र गाणेंच गाणें होऊन गेलें. पदें गाण्याच्या वेळाची मर्यादाहि वाढूं लागली. जो जास्त वेळ पदें म्हणेल तो उत्तम गायक—चुकलों—उत्तम नट म्हणून मान्य होऊं लागला. स्वयंवराप्रमाणें ज्या ज्या कंपनीचीं नाटकें बाहेर पडलीं त्या त्या नाटकात नाटककार एक स्त्रीपात्र नटवूं लागला आणि स्त्रीपात्राचें कोडकौतुक करूं लागला. कंपनींतील नट नाटककाराला " फक्त माझेंच तेवढें उत्तम काम होईल अशी भूमिका लिहा म्हणजे इतर पात्राची पर्वा नाहीं. " असें गुप्त रीतीनें सांगू लागले.

परंतु एकाहि कंपनीला अशी सुबुद्धि सुचेना कीं गंधर्व कंपनीनें आपल्या नाटकांत गायनाचा विशेष ठेवला आहे तर आपण आपल्या कंपनींत प्रामुख्यानें अभिनयाचा ठेवूं आणि त्या जोरावर गंधर्व मंडळी-इतकेंच लोकरंजन करूं. गंधर्व कंपनीला किमया लाभल्यामुळें ती गेली—गाण्याच्या आहारीं गेली. परंतु तिच्याप्रमाणें आपण तरी गाण्याच्याच आहारीं जाऊं नये. परंतु तसें न होतां एकांगी, एकपात्री नाटकें रंगभूमीवर येऊं लागलीं. याचसाठीं स्वयंवरानें मराठी रंगभूमीच्या ऱ्हासाचें बीज टाकलें असें मी म्हणतों.

## एका होतकरू चांगल्या नटाचा अंत

स्वयंवर नाटक बसत असतां दत्तु पेठकर हलके हलके अशक्त होत होता. त्याला फारच खंगलेला पाहून त्याची डॉ. व्ही. बी. गोखले यांच्याकडून मी तपासणी करविली. त्याला परनिशस ॲनिमिया झाला होता. तीन महिन्यांची पूर्ण विश्रांति त्याला देण्याची सल्ला मिळाली. तेव्हां स्वयंवरांतील त्याचें काम बदलून औषधोपचारासाठीं मिरजेस डॉ. वॉनलेस यांच्याकडे, बरोबर मनुष्य देऊन, रवाना केलें. परंतु रंगभूमीच्या दुर्दैवानें दत्तू पेठकराचा मिरजेस पंधरा दिवसांनंतर शोचनीय अंत झाला.

## घाईघाईनें केलेला पिठलेंभात

दत्तू पेठकर वारल्यामुळें बडोद्यास कंपनीला नायकाच्या कामाची पुन: अडचण आली. पंढरपूरकरबुवांना तयार करण्याच्या कामास लागलों. बुवा अगदीं अशिक्षित. बुद्धिहि तशीच अद्वितीय. पण करणार काय ? रोज ८।१० तास त्यांची तालीम घेत असें. त्यांना पाठ करायला न सांगतां तालीम देतां देतां एकेक वाक्य पंचवीस पंचवीस वेळां म्हणून घेई. अशा रीतीनें बुवाचीं दोन तीन कामें, वडारानें काळा फत्तर जितक्या मेहनतीनें फोडावा तितकीच मेहनत करून बसविलीं. स्वयंवराचे तीन सरकारी प्रयोग तर पार पाडले. चौथा प्रयोग सौभद्र व्हावा अशी कारवाई केली. परंतु ऐन वेळीं श्रीमंत सौ. महाराणीसाहेबांचा मृच्छकटिक करण्याबद्दल हुकूम आला. तो खेळ तयार नाहीं असें पंडीत कळविणार होते; परंतु असें कळविणें नामुष्कीचें आहे, प्रयोग करतों असें कळवा, असें पंडितांना बजावून ताबडतोब मंडळी गोळा करून एकेकाला दोन दोन कामें वांटून दिलीं आणि सकाळीं ८ वाजतां जी तालमीला सुरवात केली ती संध्याकाळीं ६ पर्यंत चालू ठेवली. जेवणाकरितां फक्त एका तासाची सुट्टी दिली. त्या प्रयोगांत मी स्वतः सूत्रधार, शकार, शर्विलक हीं कामें केलीं. सातव्या अंकांत शर्विलक व शकार एका वेळीं येतात तेव्हां निराळाच एक शर्विलक तेवढ्यापुरता उभा केला आणि मृच्छकटिक प्रयोग पार पाडला. घाईघाईनें गांवाला जातांना केलेला पिठलेंभात जसा गोड लागतो त्याप्रमाणेंच श्रीमहाराणीसाहेबांनीं प्रयोग आवडल्याचें आम्हांला कळविलें.

## गोणपाट नेसूनहि काम करीन

बडोद्यानंतर आम्ही पुण्याचा मुक्काम घेतला. माझी संध्याकाळची बैठक गडकरी यांच्याकडे असे. एका बैठकींत गडकरी यांनीं आम्हांला एक नवें नाटक देणार असल्याबद्दल गोष्ट काढली. पुण्यप्रभावाच्या-बाबत झालेल्या व्यवहाराचा शेवट ध्यानांत असल्यामुळें गडकरी यांस त्यांचा आमचा नाटककार व नाटक कंपनी या प्रकारचा संबंध येऊं शकणार नाहीं असें मी त्यांना सांगितलें. कारण ते विलक्षण अटी घालणारे आणि आम्ही व्यवहारी अटीप्रमाणें वागणारे. मी त्यांना हें म्हटलें तेव्हां ते म्हणाले, "झालें तें गेलें. बोडस–बालगंधर्वांशिवाय माझें नाटक यशस्वी होतें कीं नाहीं हें मला पहायचें होतें." तेव्हां मीहि म्हटलें कीं "गडकरी यांच्या नाटकाशिवाय कंपनी चालूं शकते."

गडकरी यांनीं एकच प्याला व मिश्रविवाहाच्या विषयावरील 'तोडही माळ' अशा दोन नाटकांचीं कथानकें मला सांगितलीं. एकच प्याल्याचें कथानक मला उत्तम वाटलें. नारायणरावांना गडकरी यांच्याकडे नेऊन दोनहि कथानकें मी ऐकविलीं. नारायणरावांस एकच प्याल्याचें कथानक जास्त आवडलें. गडकरी यांनीं नारायणरावांस "तुम्हाला या नाटकाच्या चौथ्या अंकांत फाटक्या लुगड्यानें अंग विभूषित करून दळावें लागणार आहे" असें सुचविलें. नारायणरावांना नाटकाचें कथानक आवडलें असल्यामुळे त्यांनींहि "फाटकें लुगडेंच काय, पण गोणपाट नेसूनहि मी काम करायला तयार आहें" असें उत्तर दिलें.

एकच प्याला लिहिण्यास सांगितलें. प्रापंचिक देणें देण्यासाठीं गडकरी यांनीं लगेच दोनशें रुपये मागितले. ते त्यांना दिले. नाटक लिहून पुरें होईपर्यंत स्वास्थ्य मिळावें याकरितां घरांत सामुग्री भरण्यासाठीं पुन्हां गडकरी यांनीं १५० रुपयांची मागणी केली.

पुढें एक दिवस गडकरी कंपनींत आले आणि त्यांनीं मला म्हटलें मुहूर्त संपत आला आहे. अण्णासाहेब किर्लोस्करांच्या जुन्या पंचपदीपैकीं नांदीकरितां एकादी चाल द्या. त्यांना

"अमर वर नमित पदा गौरीमुख कमलरवि ।
सक्त भक्ता गमो शीघ्र वेंची" ॥

ही चाल लिहून दिली. ती चाल घेऊन गडकरी यांनीं चाल लिहिलेल्या अक्षरांखालीं, अगोदर पाठ केलेलें एखादें पद लिहावें तसें "शरण ते करुण तव" ही एकच प्याल्याची नांदी भराभर लिहून मला पहायला सांगितलें. मला तो अजब चमत्कार वाचून त्यांच्या बुद्धिमत्तेचें कौतुक वाटलें.

एकच प्याला नाटक गडकरी यांनीं उलट्या अनुक्रमानें लिहायला सुरवात केली. अगोदर पांचवा व नंतर अर्धाअधिक चौथा अंक तीन चार दिवसांतच त्यांनीं लिहिला आणि त्यांची पेन्सिल अडली.

द्वितीय विवाह करण्याची लहर गडकरी यांना आली. लग्नासाठीं पुन्हां तीनशें रुपये त्यांनीं मागितले. तेव्हां नाटकाबद्दल लेखी करार करून घेऊन त्यांना रक्कम दिली. द्वितीय विवाहामुळें गडकरी आनंदित दिसूं लागले.

## माझा अपचनाचा आजार

१९१० पासून मला मलावरोध व अपचन हे विकार जडले ते अधून मधून उद्भवत. १९१५ मध्यें तर एका प्रयोगांत काम करीत असतांनाच पोटांतील गॅसचा जोर होऊन मला रंगभूमीवर घेरी आली होती. डॉक्टर, वैद्य, पेटंट औषधें, पथ्यपाणी करीत होतों. स्वयंवराच्या तालमी चालू असता हा विकार जास्त बळावला. त्यामुळें निरुत्साही होऊन आपल्या कर्तबगारीलाच नव्हे तर जगायलाहि आपण लायक नाहीं असें वाटत असे. त्या विकारानें व त्यावरील औषधें घेण्यामुळें मी या वेळीं इतका वैतागलों कीं आतां मेलों तरी हरकत नाहीं पण औषध घ्यायचें नाहीं असा निश्चय केला आणि नैसर्गिक उपचारपद्धति सुरू केली. बाबासाहेब पटवर्धन यांच्यासारख्या देखरेखीखालीं डॉ. कुन्हे यांची बाथ सिस्टीम सुरू केली.

## गंधर्व मंडळीचा वाढदिवस

गंधर्व मंडळीचा वाढ दिवस साजरा झाला. त्या वेळीं कंपनीच्या चहात्यांनीं प्रो. पिंपळखरे यांजकडून माझें व नारायणरावांचें ऑइल पेंटिंग करवून आम्हांला प्रेझेंट केलें. आमच्याबरोबर पंडितांनींहि आपल्या चहा-त्यांकडून एक प्रेझेंट स्वतःसाठीं मिळविलें.

## शिवराज संगीत मंडळीची चित्रवंचना

आम्ही पुण्यास असतांना टेंबे यांची शिवराज संगीत मंडळी पुण्यास आली. त्या कंपनीचे मॅनेजर त्या वेळीं पेठे होते. टेंबे यांनीं गंधर्व कंपनींतील कोणी तिकीट काढून आलें तरी त्यांना नाटकास येऊं देऊं नये असें पेठे यांना फर्मान सोडलें होतें. आम्ही गांवांतील ओळखीच्या मंडळी-मार्फत तिकीटखरेदी करून चित्रवंचना पहायला गेलों. प्रयोग पाहिला. टेंबे यांच्या कामांत कांहीं बदल दिसला नाहीं. शंकरराव सरनाईक यांनीं मात्र प्रो. अबदुलकरीमखां यांच्याजवळून पैदा केलेल्या करुणरसात्मक गायकीनें व आपल्या मधुर आवाजानें लोकांना तल्लीन केलें. आम्ही सर्वजण खूष झालों. नारायणरावांनींसुद्धां माना डोलविण्याचा असा कांहीं सपाटा सुरू केला कीं सरनाईकांच्या गाण्याकडे लक्ष द्यावें कीं बेहोप होऊन हलणाऱ्या नारायणरावांच्या माना हालविण्याकडे पहावें याचीच प्रेक्षकांना पंचाईत पडली असावी. प्रतिस्पर्धी कंपनीच्या नायिकेच्या गाण्याला नारायणरावांनीं इतकें डुलावें हें त्यांच्या अज्ञानपालकास म्हणजे पंडितास हास्यास्पद वाटून त्यांनीं घरीं येतांना आपल्या अज्ञान नारायणरावांची चांगली हजेरी घेतली. नारायणरावांनीं "आपल्याला आवडलें म्हणून पसंती दर्शविली" असें पंडितांना उत्तर दिलें.

## पेठे यांचें पुनरागमन

टेंबे यांचें फर्मान पेठे यानीं तंतोतंत न पाळल्यामुळें त्या दोघांत वितुष्ट आलें. पेठे त्या कंपनींतून गंधर्व कंपनीच्या बिऱ्हाडीं आपल्या पंडीत-माउलीकडे आश्रयार्थ आले. अवघ्या दोन तासांनंतर पंडितांनीं टेंबे व पेठे यांचें भांडण होऊन ते आपल्याकडे आल्याचें मला सांगितलें. मी विचारलें तेव्हां त्यांनीं खुलासा केला कीं पेठे यांचा कंपनीशीं संबंध नाहीं. ते आपले गेस्ट म्हणून रहातील. आपल्याला कांहीं बिझिनेस करायचा असून त्यांत आपण त्यांचा उपयोग करून घेणार आहों. पेठ्यांचा आपल्या कंपनीशीं संबंध नाहीं असें कळल्यावर मी शांत झालों.

## माझ्याकरितां प्रयोग बंद ठेवूं नका

माझा अपचनाचा आजार जास्तच झाला. तेव्हां पंडितांना बोलावून "मला रंगभूमीवर काम करतांना घेरी येते त्यामुळें घाबरटपणा येऊन मनावर परिणाम होतो. अशक्तता वाढत आहे. याकरितां मला भागीदारींतून मोकळा करा." असें सांगितलें. पंडितांना जें इष्ट होतें तेंच मी सांगितलें; परंतु निदान त्या वेळीं तरी "असा धीर काय सोडतां? पथ्यपाणी नीट सांभाळत आहांत. प्रकृति चांगली होईल. असा विचार मनांत येऊं देऊं नका." असा उलट पंडितानीं मला धीरच दिला. असा धीर देण्याचें त्यांना प्रयोजन कां पडलें असावें हें मला कळलें नाहीं पण असें झालें खरें.

टब बाथ घेतां घेतां दहा बारा दिवसांनीं तापानें आजारी पडलों. चौदा दिवस ताप होता. तरी गार पाण्यांत बसण्याचा क्रम बाबासाहेब पटवर्धन याच्या सूचनेवरून सोडला नाहीं. चौदाव्या दिवशीं घाम येऊन ताप उतरला. चौदा दिवसांच्या त्या अवधींत बहुतेक स्वयंवराचे प्रयोग झाले. ताप आल्याच्या दुसरे दिवशींच स्वयंवराचा प्रयोग होता. समाचाराला खाडिलकर व पंडीत आले होते. त्यांनीं मला प्रयोग बंद ठेवायचा काय असें विचारलें. प्रयोग बंद ठेवायचा नाहीं. यशवंतराव ठकार यांना काम देऊन प्रयोग करा असें मी सांगितलें.

## कोल्हटकरांची सहचारिणी

आजारीपणात वि. सी. गुर्जर माझ्याकडे आले होते. तात्यासाहेब कोल्हटकरांनीं नवीन नाटक लिहिलें असून त्यांत हास्यरस उत्तम साधला आहे अशी त्यांनीं बातमी दिली. खाडिलकर पुनः माझ्याकडे आले तेव्हां कोल्हटकरांच्या नव्या नाटकासंबंधीं मी त्यांना सांगितलें. त्यांनींहि कोल्हटकरांसारख्या ग्रंथकाराचें नाटक बाहेर जाऊं देऊं नका असें मला सांगितलें.

## खाडिलकरांचे सद्गुणविशेष

खाडिलकरांमध्यें या विशेष गोष्टी आहेत कीं ते ग्रंथकाराबद्दल अवमानानें कधींहि बोलत नाहींत. कंपनीनें आपल्याखेरीज दुसऱ्या ग्रंथकाराचें नाटक घेऊं नये अशी क्षुद्र वृत्ति त्यांच्याजवळ नाहीं. पैशाच्या

बाबतींत नाटक मंडळीची पिळणूक त्यांनीं कधींच केली नाहीं. त्यांचा पैशांचा व्यवहार सीधा आणि चोख असतो. नवीन नाटककाराला उत्ते-जन देण्याचा त्यांच्या मनाचा मोठेपणा मोठाच आहे.

## कामाचें टॉनिक

मुंबईस प्रथम प्रयोगांत मी रंगभूमीवर न दिसल्यामुळें प्रेक्षकांत जरा चर्चा झाली. बुधवारच्या मच्छकटिकमध्यें मी काम केलें. अंगांत शक्ति नव्हती. पाय थरथर कांपत होते. चालतांना तोल जात होता. कसा बसा रंगभूमीवर गेलों. काम केलें. निसर्गोपचार चालू होतेच. एका प्रयोगांत काम करून पार पडलें त्यामुळें तें मला एक प्रकारचें टॉनिकच मिळालें.

आम्ही जळगांवास गेलों. तेथून तात्यासाहेब कोल्हटकरांकडे खाम-गांवास जाऊन त्यांचें सहचारिणी नाटक वाचलें. सहचारिणींत एक हास्य-कारक पात्र निर्माण झालें होतें. परंतु कोल्हटकरांची लेखनशक्ति आणि चमक हीं कमी झालीं असें वाटलें. नारायणरावांना नेऊन नाटक ऐकविलें. माझ्याप्रमाणेंच त्यांना तें आवडलें असें दिसलें नाहीं. तरीहि बडोद्या-करितां नवें नाटक पाहिजे म्हणून सहचारिणी नाटक घ्यायचें असें आम्ही उभयतांनीं ठरविलें. कोल्हटकरांनीं सहचारिणीच्या मोनापलीबद्दल चार हजार रुपये मागितले. शेवटीं तेहेतीसशें रुपयांस तें ठरविलें. हेहि नाटका-तल्या गुणांच्या मानानें जास्तच होतें. परंतु खाडिलकरांनीं पुण्यास दिलेली सूचना लक्षांत घेऊन तें नाटक घेतलें.

## ग्वाल्हेरचा मुक्काम

जळगांवहून अकोला आणि अकोल्याहून ग्वाल्हेरला जायचें ठरलें. ग्वाल्हेरचा लांब पल्ला गांठण्याचें कारण ग्वाल्हेर येथील मिलिटरीचें कॉन्ट्रॅक्ट मिळविण्याचा पंडितांचा हेतू. कंपनीचें हित त्यांत नव्हतें. ग्वाल्हेरचा मुक्काम ठरविला त्या वेळीं मी पुण्यास आजारी होतों.

अकोल्यास पंडितांनीं पेठे यांना कंपनींत सामील करून घेण्याबद्दल मजकडे गोष्ट काढली. मी त्यांना स्पष्ट नकार दिला.

माझ्या कुटुंबाच्या प्रसूतीचा काळ जवळ आल्यामुळें मी कुटुंबास जळगांवास ठेवून एकटाच कंपनी बरोबर ग्वाल्हेर येथें गेलों.

## राजवाड्यांत स्वयंवर

हुकमावरून राजवाड्यांत स्वयंवरचा खास प्रयोग झाला. तो दरबार हॉलमध्ये सरक पडदे लावून केला. त्या दिवशींचें नाटक म्हणजे काय दिव्यच होतें. मधल्या हॉलमध्यें आमचें नाटक. बाजूच्या दालनांत नायकिणीचें गाणें. दुसऱ्या दालनांत भांडाचा तमाशा. तिसरीकडे गवयाची मैफल. अशा सर्व करमणुकी एकदम सुरू होत्या. आमच्या समोरचे प्रेक्षक पात्रांशीं समरस होऊन बोलत. एकंदरींत गोंधळ घालतात तसें नाटक घातलें. नाटक अडीच वाजतां संपलें. परवानगी विचारली तों महाराजांचा हुकूम झाला कीं मृच्छकटिक पांचवा अंक सुरू करा. भूमिकेची रंगरचना बदलून मृच्छकटिकचा पांचवा अंक केला. त्यानंतर संशयकल्लोळचा दुसरा अंक करा असा निरोप आला. उजाडेपर्यंत निरनिराळे नाटक प्रयोग आम्हाकडून करून घेणार असें वाटूं लागलें. परंतु संशयकल्लोळचा दुसरा अंक संपण्याच्या वेळीं महाराजांना निद्रा लागली असें पाहून जनरल राजवाडे यांनीं आम्हाला जाण्याची परवानगी दिली. पडत्या फळाची आज्ञा घेतली. रंग घरीं धुतां येईल या विचारानें तसाच रंग ठेवून कसेबसे कपडे उतरून गाडींतून ताबडतोब आम्ही घर गांठलें. न जाणो महाराज जागे झाले आणि पुनः एखादें नाटक सुरू करा अशी आज्ञा झाली तर करा काय? आणि तें कांहीं खोटें नव्हतें. घरीं आम्ही पोंचलों असूं नसूं तेवढ्यांत जागे झालेल्या महाराजांनीं नाटक मंडळीची चौकशी केली. रंग पुसून मंडळी घरीं गेल्याचें त्यांना सांगण्यांत आलें. नंतर आम्हाला हुकूम मात्र आला नाहीं. तेवढा प्रसंग टळला.

## रेस ग्राऊंडवर

ग्वाल्हेरला सरकारी ग्राउंडवर रेसीस होत्या. त्यासाठीं आम्हांला आमंत्रण होतें. गांवांतले लोक आम्हाला ग्राउंडवर बेटिंग केलें पाहिजे असें सांगूं लागले. मी त्या गोष्टीला नकार दिला. नकार देण्याला कारण होतें.

याच वर्षाच्या जानेवारी महिन्यांत मुंबईच्या एका गृहस्थांच्या आग्रहावरून रेस ग्राउंडवर जाऊन बेटिंग करून मी पैसे घालविले होते. ग्राउंडवर अशाच विचारानें मी जातांना गेलों होतों कीं लोक इतके धडपडत जातात, बेटिंग लावायला पैसे नसले म्हणजे दुसऱ्याजवळ गयावया करून मागतात, ती मौज तरी एकदां आयुष्यांत पाहून घ्यावी. खिशांत पन्नास रुपये टाकले. ते सर्व गेले. एकाहि रेसला माझा इच्छित घोडा पुढें आला नाहीं. शेवटच्या रेसच्या वेळीं बरोबरच्या रेसरनें मला उसनवार पैसे देऊन ते लावण्याची सल्ला दिलीच. मी म्हटलें बजेट संपलें. इत्ता बस.

मात्र रेस सुटल्याबरोबर पैसे लावणारांच्या पहाण्यासारख्या होत असलेल्या लीला पाहून मौज वाटली. एका दिवसांत श्रीमंत होण्याची लोकांची कोण प्रबल इच्छा ही! झाडूवाल्यापासून क्रोडोपती-पर्यंत सर्व लक्ष्मीच्या लीलांनीं भारून जाऊन बेभान झालेले पाहिले. त्यामुळ त्या दिवशीं मी बेटिंग केलें तेंच माझ्या आयुष्यांतलें पहिलें व शेवटलें. माझें सुदैव, कीं त्या दिवशीं सर्व शर्यतींत मला अपयशच आलें. दुर्दैवानें एखादी रेस मी जिंकून पांचाचे पन्नास झाले असते तर हाव सुटून कदाचित् मी पट्टीचा रेसर बनलों नसतों कशावरून? परंतु परमेश्वराची माझ्यावर कृपा. संकटाच्या ऐन वेळीं त्याच्या रक्षणाचा हात असाच नेहमीं मला साह्यकारी होत आला आहे.

## विरोधी वाऱ्याची पहिली झुळूक

ग्वाल्हेरला कंपनी नुकसानीच्या खड्ड्यात आली. परंतु पंडितांनीं मात्र आपला बिझिनेस जमविण्याचा बेत रंगारूपाला आणून ठेवला. ग्वाल्हेरला कोल्हटकरांनीं लिहिलेलें नवें नाटक परिवर्तन वाचण्यासाठीं पाठवून दिलें. तें नाटक सहचारिणीपेक्षां सर्वांना आवडलें. सहचारिणीऐवजीं परिवर्तन द्या अशी कोल्हटकरांकडे आम्ही मागणी केली. परंतु सहचारिणी आमच्या कंपनीनें नाकारल्यास दुसरी कंपनी सहचारिणी घेणार नाहीं अस कोल्हटकरांनीं पेंच टाकला. तेव्हा पंडितांनीं दोन्ही नाटकें कोल्हटकर सह हजार रुपयांस देत असतील ध्यावीं असा सल्ला दिला. कोल्हटकरांनीं

कबूल करून पहिला चार हजार रुपयांचा हप्ता मागितला. डिसेंबरच्या आंत ती रक्कम पाठविण्याच आम्ही कबूल केलें. रिझर्व फंड शिल्लक होताच.

हें सर्व ठरल्यानंतर एक दिवस नारायणरावांनीं दोन नाटकाला रक्कम जास्त ठरविली असा वाद काढला. तेव्हां त्यांना मी उत्तर दिलें कीं तुमच्या कारभारी बाळासाहेबांनींच दोन नाटकें घेण्याचा बूट काढला. बाळासाहेबांची इच्छा तीच नेहमीं तुमची असते. तेव्हां तो दोष आपल्या बाळासाहेबांना द्या. आपल्याला बाळासाहेबांनीं विचारलें नाहीं असें नारायणरावांनीं म्हटलें. त्यांच्या त्या बोलण्याची मला चीड आली. मी नारायणरावांना सांगितलें कीं कोल्हटकरांना पत्र लिहून सहा हजार कबूल केले आहेत तेव्हां तुम्हाला द्यावेसे वाटतील तेवढे कंपनीच्या नावें खर्ची घालूं. बाकीची रक्कम मी आपल्या हिश्शांतून देईन. परंतु शब्द मागें घेण्याचा निर्लज्जपणा मी करणार नाहीं.

नंतर नारायणराव कबूल नसतांना त्यांच्या विचाराशिवाय दोन नाटकें घेण्याचा सल्ला तुम्ही मला कां दिलात असें पंडितांना मी छेडलें. ते बेफिकीरीनें म्हणाले "मी नारायणाला सांगतों. त्याला काय कळतें?" आणि तें खरेंच होतें. ज्यानें उठावें त्यानें म्हणावें नारायणराव खुळे आहेत. त्यांना व्यवहार कळत नाहीं. कंपनींत आल्यापासून नारायणरावांच्या कानावर सारखे हे शब्द पडत होते तर त्यांना कळणार कसें ?

ग्वाल्हेरहून मी एक दिवस कांहीं मंडळी बरोबर घेऊन दिल्ली शहर पहायला गेलों. दिल्ली पाहून परत आलों त्या दिवशीं मला द्वितीय कन्या-रत्नाचा लाभ झाल्याचें जळगांवहून पत्र आलें.

माझ्या पहिल्या मुलीचें नांव सुशीला ठेविलें होतें. या नव्या कन्येचें नांव प्रमिला ठेवावें असें पत्रांतून मी घरीं कळविलें.

## किर्लोस्कर कंपनींत दुसरी फाटाफूट

ग्वाल्हेरासच गडकरी यांचें एकच प्याला नाटक लिहून पुरें झाल्या-बद्दलचें पत्र आलें. आम्ही चार आठ दिवसांत मुंबईस जाणार होतों म्हणून गडकरी यांना एकच प्याला घेऊन मुंबईस येण्याबद्दल उत्तर लिहिलें. वाटेंत जळगांवास नूतन कन्यारत्नाच्या मुखदर्शनासाठीं उतरलों.

मुंबईस आम्ही दाखल होण्याच्या आधींच गडकरी आपल्या एकच प्याला नाटकाची वही घेऊन आले होते. त्यांनीं किर्लोस्कर कंपनींत पुनः फाटाफूट होत आहे अशी ऐकलेली बातमी सांगितली.

रिझर्व फंडापैकीं चार हजार रुपये ठरलेल्या कराराप्रमाणें मुंबईला येतांच कोल्हटकरांना पाठविले.

कंपनीनें ठरल्या दिवसांच्या मुदतींत अगदीं योग्य वेळीं रुपये पाठविल्याबद्दल आनंद व्यक्त करून आभारप्रदर्शक पत्र कोल्हटकरांनीं पाठविलें. त्यांतच नाताळच्या सुट्टींत पदें करून देण्यास येत असल्याबद्दल लिहिलें.

किर्लोस्कर कंपनींतील फुटलेले मास्टर दिनानाथ, कोल्हटकर, कोल्हापुरे, भडकमकर, मास्टर सदाशिव नेळरेकर वगैरे मंडळी मुंबईस ग. ना. ऊर्फ तात्यासाहेब परांजपे यांजकडे आली. या मंडळीबद्दल तात्यासाहेब परांजपे यांचें मत अत्यंत जिव्हाळ्याचें होतें.

त्या मंडळीनीं याच वेळीं राम गणेश गडकरी यांना "मास्तर, तुमच्याशिवाय आम्हांला त्राता नाहीं." अशी गळ घालून घेतलें. त्यांच्या विनंतीकडे लक्ष देऊन त्यांच्याबद्दल आपल्याला काय करिता येईल याचा विचार गडकरी करूं लागले.

## अपिलेट कोर्टाचा निकाल

तात्यासाहेब कोल्हटकर कंपनींत आले आणि सहचारिणी नाटकांतील पदें करायचें काम सुरूं झालें.

गडकरी यांच्या एकच प्याला नाटकाचें कंपनींत वाचन झालें. नाटक सर्वांसच आवडलें. गडकरी माझे मित्र, त्यांनीं आमच्याकरितां नाटक लिहिलेलें, तेव्हां त्या नाटकांत नारायणरावांच्यापेक्षां माझ्या कामाला गडकरी यांनीं जास्त उठाव दिला होता. आपल्या नारायणरावांचा प्रभाव रंगभूमीवर कमी होईल कीं काय अशी शंका पंडितांना जाचूं लागली. त्यांनीं त्या शंकेबद्दलचा खल अपिलेट कोर्टांत केला. न्यायाधीशांनीं पंडितांच्या शंकेचा निर्णय "नाहीं, नारायणाचें काम कोणत्याहि रीतीनें फिकें पडणार नाहीं" असा देऊन पंडितांना निर्धास्त केलें.

आपल्या कर्तबगारीची बढाई मारीत असतां माझ्या स्नेह्यांच्या समक्ष पंडितांनीं ही गोष्ट सांगितलेली आहे.

कोणत्याहि शोकपर्यवसायी नाटकांत ज्या सात्विक भूमिकेचा छळ होत असतो त्या भूमिकेला छळाच्या वेदना अगर त्रास सोसावा लागत असतो. त्यामुळें त्या भूमिकेकडे छळ करणाऱ्या भूमिकेपेक्षां प्रेक्षकांची सहानुभूति साहजिकच आकर्षित होत असते. मानवी मनाची ठेवणच अशी आहे. परंतु दरवाजावर तिकिटें फाडणाऱ्या मॅनेजराला नाटकलेखनांतील हें मर्म कसें कळावें ? आणि मग अशानें आपल्या खात्रीच्या न्यायाधीशाकडे शंका निवारून घेण्यासाठीं धांव न घ्यावी तर काय करावें ?

## दोष पायांतून डोक्यांत गेले

एकच प्याला बसवायचें नक्की ठरलें. मात्र तें नाटक योग्य मुदतींत हातीं न आल्यामुळें सहचारिणी रंगभूमीवर आल्यानंतर तें आणायचें असें उभयताच्या संगनमतानें ठरलें. रोज कोल्हटकर व गडकरी याचा संवाद चाले. त्याच्या कोट्या ऐकून मोठी मजा वाटे. सहचारिणी नाटकांतील काहीं मोठालीं पाल्हाळीक भाषणें व लांबच लांब प्रवेश ऐकून एक दिवस गडकरी कोल्हटकरांना म्हणाले, " तात्या, प्रेमसंन्यासमधल्या अर्पणपत्रिकेंत आपणांला मी गुरु मानित असल्यामुळें माझे दोष मी आपल्या पायांवर अर्पण केले होते. परंतु त्या दोषांनीं पायांपासून निघून डोक्यावर परिणाम केलेला दिसतो." ही कोटी ऐकून कोल्हटकर मनापासून हंसले. पदें करिताना गडकरी कांहीं सूचना करीत, योग्य वाटल्यास कोल्हटकर त्यांचा आनंदानें स्वीकार करीत. पदें तयार झालीं. तालमीला मुहूर्त झालेलाच होता. तालमी मी घेत असें.

## सापत्नभाव

किर्लोस्करमधून फुटून आलेल्या मंडळींनीं जानेवारी १९१८ मध्यें तात्यासाहेब परांजपे यांच्या पूर्ण आर्थिक मदतीनें " बलवंत संगीत मंडळी " हें नामाभिधान घेऊन नवीन कंपनी स्थापन केली. आपल्या भरंवशावर स्थापन झालेल्या कंपनीकरितां देण्यासाठीं म्हणून गडकरी यांनीं भावबंधन नाटक लिहायला घेतलें. पुण्यप्रभाव कंपनीला मिळालेलेंच होतें. त्याच्या

जोडीला कांहीं उर्दू प्रयोगहि त्यांनीं मिळविले. कंपनीचा मुक्काम बोरिवलीस होता. मला या कंपनीबद्दल प्रेम वाटे. त्याहि मंडळीना माझें अगत्य वाटे. म्हणून दर सोमवारीं बोरिवलीस जाऊन योग्य ती सल्ला मसलत मी देत असें. त्यायोगानें गडकरी यांचा सहवास आठवड्यांतून एक दिवस तरी मला लाभत होता. शिवाय त्या मंडळीशीं मी बंधुप्रेमानें वागेन असें तात्यासाहेब परांजपे यांस वचन दिलें होतें.

सहचारिणी नाटक घेतल्यापासूनच नारायणरावांच्या मनांत त्यांच्या-बद्दल सापत्नभाव उत्पन्न झाला होता. या नाटकांतील पदांसाठीं एकादी चागली चाल कोणी काढली कीं लागलीच ती द्रौपदीसाठीं राखून ठेवण्याची खबरदारी घेण्यांत येई. कोल्हटकरांना जास्त दिवस कंपनींत रहायला सवड नव्हती. त्यामुळें गायकीच्या दृष्टीनें सामान्य, परंतु प्रसंगाला व रसाला बऱ्याचशा चागल्या, अशा चाली मिळाल्या. स्वयंवर रंग-भूमीवर आल्यापासून रागदारीच्या गाण्यानें प्रेक्षकांचे कान भारलेले होते. त्यामुळें सहचारिणींतील पदांनीं त्यांच्यावर छाप पाडली नाहीं. बडोद्याच्या मुक्कामांत महाराजांना लाइट कॉमेडी पहायची होती म्हणून सहचारिणीचा शेवटचा प्रयोग केला. महाराजाना प्रयोग आवडला; पण महाराणी-साहेबांना आवडला नाहीं असें मागाहून कळलें.

## पक्ष कां उत्पन्न होतात ?

बडोद्यास मुक्काम असतांना पंडितांच्या एका स्नेह्यानीं कंपनीला हुंडी देऊन पैसे घेण्याची कारवाई केली; परंतु हुंडी घेऊन पैसे द्यायचे मी नाकारलें. त्यामुळें आपली मानहानी झाली असें पंडितांना वाटलें. याच वेळीं कंपनींत दोन पक्ष आहेत असा भास उत्पन्न करण्यांत आला. माझ्याशीं प्रेमानें आणि पूज्यबुद्धीनें वागणारी जी मंडळी होती ती माझ्या पक्षांतली ठरली. आपल्या उपकाराखालीं मारून पंडितांनीं जी मंडळी मिंधी करून ठेविली होती ती पंडितांच्या पक्षांतली ठरली. माझा पक्ष असा नव्हताच व तो उत्पन्न करण्याचें कारणहि मला नव्हतें. माझी धंद्यांतली लायकी मी पूर्णपणें जाणून होतों. ज्यांच्या अंगीं ती लायकी नाहीं; पण नसती लुगबुड करण्याची

हांव असते. त्यांना तशी संधि मिळावी आणि आपली अडणी शाबूद रहावी एवढ्याकरितां पक्ष उत्पन्न करण्याची इच्छा होते. रानडे, देवधर हे माझ्या शिक्षणामुळें लोकप्रियतेस पात्र झालेले होते म्हणून माझ्याबद्दल त्यांच्या मनांत सहाजिकच पूज्यबुद्धि वसत होती. तेव्हां रानडे यांना कंपनींतून काढून टाकण्याचा डाव पंडितांनीं टाकला. त्या वेळीं लोकमान्य नाटक मंडळींत अभ्यंकर या नांवाचा मुलगा होता त्याला गंधर्व कंपनींत आणण्याचा विचार सुरू झाला. अभ्यंकराची वाणी चांगली होती; पण एका सुरांत बोलणें आणि दिसायलाहि साधारणच. तेव्हां रानड्यांना घालवून अभ्यंकराला आणण्यांत विशेष फायदा नव्हता. पंडितांनीं तो विषय मज-जवळ काढतांच मीं तसें स्पष्ट सांगितलें. त्यावर त्यांनीं समर्थन केलें, " रानडे अलिकडे फार उर्मट व बेपर्वा झाला आहे. नारायणरावांचें त्याच्याबद्दलचें मत बिघडत चाललें आहे. तरी अभ्यंकराला घेऊं या. " " एकाला दुसरा माणूस ठेवून पहिल्याची वृत्ति अस्थिर ठेवायची हें मला पसंत नाहीं. शिवाय नवीन पात्र तयार करितांना मला किती रक्त ओकावें लागतें याची कल्पना तुम्हांला कशी येणार ? आपण तयार केलेल्या पात्राचा उपयोग स्वतःच्या धंद्याकरितां करून घ्यायचा सोडून त्याचा फायदा दुसऱ्याच्या पदरांत टाकायची बुद्धि आपण कां धरावी ? बाळासाहेब, हें धोरण आणि हा मार्ग यशदायी होणार नाहीं " मी निक्षून बजावलें. तेव्हां तो बेत जेथल्या तेथें जिरला.

## रामबाण उपाय

सहचारिणीच्या तालमीच्या वेळीं पंढरपूरकरबुवा म्हणायला लागले, " मला नक्कल पाठ होत नाहीं. " लागलीच कारकुनास मी हांक मारली आणि मी पुन्हां सांगेपर्यंत बुवांच्या नांवावर रोज एक रुपया दंड मांडीत जा असें सांगितलें. या माझ्या रामबाण उपायाचा गूण पांचव्या दिवशींच आला. बुवांनीं नक्कल पाठ झाली म्हणून कळविलें. पंढरपूरकरबुवांच्या या हालचालींची कळ फिरविणारी व्यक्ति निराळीच होती.

## सामान बाहेर फेंकलें

माझे स्नेही डॉ. व्ही. बी. गोखले यांचा पाहुणचार घेण्यासाठीं कंपनी मुंबईस यायच्या अगोदर दोन दिवस मी आलों. कंपनीच्या बिऱ्हाडीं

सामान टाकून कुटुंबासह डॉक्टरांच्या बिऱ्हाडीं गेलों. कंपनी आल्यानंतर कंपनीच्या बिऱ्हाडीं गेलों; तों माझें सामान बाहेर व्हरांड्यात फेंकून दिलेलें होतें व त्या खोलींत नारायणरावांच्या कुटुंबांतील मंडळीनीं आसन ठोकलेलें होतें. चौकशीअंतीं असें कळून आलें कीं नारायणरावांच्या समक्ष त्यांच्या कुटुंबानें सामान बाहेर फेकविलें. या प्रकारामुळें मला अतिशय चीड आली. पण ती दाबून मी पंडितांस म्हणालों, "हें बरें दिसतें ना? नारायणरावांस जागा पाहिजे होती तर मला तसें कळवायचें होतें." पंडितांनीं नेहमींच्या पद्धतीनें सारवण घातलें व मलाच माघार घ्यायला सांगितली. मनास अत्यंत खेद झाला. एकंदर वारे कसे वहात आहेत याचा अंदाज येऊन चुकला.

## इतिहासाची पुनरावृत्ति

मुंबईच्या मुक्कामांत बलवंत संगीत मंडळींत मी वरचेवर जात असें तें पाहून "गणपतरावांना बलवंत कंपनी आपलीशी वाटते. स्वत:च्या कंपनीवरचें लक्ष उडत चाललें आहे." अशी बोलवा ऐकूं येऊं लागली. टेंबे कंपनींतून निघण्याच्या पूर्वी जो इतिहास घडला त्याचीच पुनरावृत्ति होणार असें अनुमान निघू लागलें.

सहचारिणी नाटक मुंबईस साफ पडलें. कारण नारायणरावांचें मन त्या नाटकाबद्दल कलुषित झालें होतें. स्वयंवर नाटकाच्या वेळीं नारायणरावांनीं जितक्या मेहनतीनें, काळजीनें आणि उत्सुकतेनें काम केलें ती मेहनत, काळजी आणि उत्सुकता सहचारिणी नाटकाच्या वेळीं त्यांच्या मनांत नव्हती. गाण्यांतलें वैशिष्ठ्य राखणेंच भाग होतें म्हणून एक दोन पदें रंगवून म्हणत असत. अशा स्थितींत नाटक रंगावें कसें? पण मी काय करणार? नाइलाज म्हणून स्वस्थ बसलों होतों.

## धंद्याची गांठ

पुण्यास आल्यापासून तालमीपुरता व जमाखर्च पहाण्यापुरता मी कंपनींत असें. बाकीचा वेळ गडकरी यांच्या येथें काढीत असें. हा माझा कार्यक्रम पाहून काटदरे यांनीं माझ्या अशा वागणुकीचा परिणाम काय होईल याचें चित्र माझ्या नजरेसमोर उभें केलें. मी खेदानें हंसून म्हणालों,

" नारायणरावांच्या बरोबर धंद्याची गांठ बांधली आहे. काय होईल तें खरें. सहन होत आहे तेथपर्यंत करीन. असह्य झाल्यावर परमेश्वर जशी बुद्धि देईल तसें करीन. "

## हेवा वाटला मला !

वाढदिवसाच्या दिवशीं पुण्याजवळ चार हजार रुपयांला एक जमीन खरेदी केली. लहानपणीं स्नेह्यासोबत्यांच्या शेतांत हुरडा खायला जात असें तेव्हां आपलें स्वतःचें असें शेत असतें तर असाच मजा आला असता असें मनाला वाटे. स्वतःची अशी थोडी तरी शेती असावी अशी मनाची उत्कट इच्छा. अनुकूल परिस्थिती येतांच वर सांगितलेली जमीन घेऊन ती तृप्त केली. मातोश्रीला व कुटुंबाला नेऊन ती जमीन दाखविली. थोडी कां होईना आपली स्थावर जिंदगी झाली म्हणून त्यांना आनंद झाला.

पुण्यास प्रयोग चालू असतांना इन्फ्लुएंझाचा आजार सुरू झाला. सांथ सौम्य स्वरूपाची होती. तरी गंधर्व मंडळींत एक दोन दिवसांत सुमा चाळीस बिछाने पडले होते. नारायणरावांनाहि तापानें गांठलें. रविवारचा प्रयोग सुरू असतांनांच अंग मोडून आलें; आणि घरीं जातांच ताप भरला. बुधवारीं सौभद्र लागलें. नारायणरावाना काम करितां येण्यासारखें नव्हतें. तेव्हां प्रयोग बंद ठेवायचा कीं मास्टर कृष्णाला सुभद्रेचें काम करायला सांगायचें हें त्यांना मी विचारलें. त्यांनीं पंडितांच्या तोंडाकडे पाहिलें आणि पंडितांची अनुमति मिळतांच मास्टर कृष्णाला सुभद्रेच्या कामाची तालीम द्यायला आरंभ केला. ठरल्याप्रमाणें बुधवारीं सौभद्राचा प्रयोग झाला. दोन दिवसांच्या मेहनतीच्या मानानें मास्टर कृष्णाचें काम ठीक झालें. विशेषतः तीन चार पदें त्यानें उत्तमच म्हटलीं आणि वाहवा घेतली. दुसऱ्या दिवशीं खाडिलकर कंपनींत आले. बुधवारच्या सौभद्राचा विषय निघाला. कृष्णानें काम बरें केलें असें ऐकतांच त्यांनीं आपला अभिप्राय व्यक्त केला, " गंधर्व कंपनींत नारायणराव हजर नसतील त्यावेळीं कंपनीचा प्रयोग होतांच कामा नये " हे शब्द माझ्या कानीं पडले. मनांत आलें, नारायणरावांच्या ठिकाणीं खाडिलकरांची काय ही भक्ति ! नारायणरावांच्या मोठेपणाला यत्किंचित्‌हि धक्का बसूं नये म्हणून कोण ही काळजी !! हेवा वाटला नारायणरावांचा

मला. अशी काळजी वहाणारा आपला कोणी नाहीं. सांथीचा जोर कमी झाला आणि पुण्याचा मुक्कामहि संपला. कंपनी निघून स्टेशनवर आली.

## कंपनीला डाग लागला

सेकंड क्लासच्या एका कंपार्टमेंटमध्यें माझी आई, कुटुंब, सुशीला आणि प्रमिला या दोन मुली यांना बसविलें. प्रमिलेला इन्फ्लुएंझामध्यें न्यूमोनिया झाल्यामुळें खिडक्या वगैरे बंद करून बंदोबस्तानें तिला न्या असें डॉक्टरांनीं सांगितलें होतें. त्याप्रमाणें व्यवस्था करून डब्याच्या दरवाजाजवळ येतों तोंच रेल्वेचे दोन युरोपियन अधिकारी माझ्याजवळ आले आणि तिकीटें कोठें आहेत म्हणून विचारूं लागले. मॅनेजरजवळ आहेत असें सांगून मी पंडितांकडे बोट दाखविलें. काय होते हें लावून लक्ष देऊन मी पहात होतों. उत्तर देताना पंडिताची बरीच तारांबळ उडाली. माणूस तिकिटें काढायला गेला आहे म्हणून त्यांनीं अधिकाऱ्यांना सांगितलें. पण तें खोटें होतें. चेकिंगला येतांना त्यांनीं सेकंड क्लास तिकिटाची विक्री बंद करून टेविली होती. अधिकाऱ्यांनीं सर्व माहिती लिहून घेऊन गाडी जाऊं दिली. दुसऱ्या दिवशीं रेल्वे सबइन्स्पेक्टर माझ्याकडे आले आणि रेल्वेला फसविण्याचा तुमचा इरादा नव्हता हें तुम्ही सिद्ध करून द्या असें सांगूं लागले. जमाखर्चाची वही उघडून त्यांत रेल्वे खर्चासाठीं मॅनेजरला तसलमात रुपये सातशें दिले ते पुण्याहून निघाल्या तारखेस खर्ची टाकलेले दाखविले. अर्थात् त्या केसची जबाबदारी मॅनेजरवर पडली. कंपनीचा व्यवहार चोख असताना कंपनीला निष्कारण डाग लागला याबद्दल वाईट वाटलें. पंडितावर केस लागू होऊन त्यांना पाऊणशें रुपये दंड झाला.

## निराळ्या जागीं बिऱ्हाड केलें

सकाळीं मुंबईस पोहचतांच नाना शंकरशेटच्या देवळांत जाऊन मी माझ्या कुटुंबांतल्या मंडळीसह खालींच बसून राहिलों. मुलगी आजारी आहे तिला वर नेऊन निजवा असें पंडितांनीं सांगितलें. नारायणरावांच्या कुटुंबीयांनीं व्यापून जी जागा राहील त्यांत आपण व्यवस्था करावी असें माझ्या मनांत. नाहीं तर उगाच सामान बाहेर फेकलें जायचें. तसें

पंडितांना मी सांगितलें. त्यांना तें झोंबलें. शब्दाला शब्द वाढूं लागला. कंपनींतील नोकरलोकांसमक्ष जास्त शोभा होऊं नये म्हणून मी आवरतें घेतलें. दोन दिवसांनंतर मुगभाटांत जागा पाहून बिऱ्हाड तेथें नेलें.

या वेळीं महाराष्ट्र नाटक मंडळी सोडून नारायणरावांचे बंधु बापूराव गंधर्व कंपनींत आले होते. आतां तरी बापूराव कंपनींत रहातील अशी मला कल्पना होती. पण बापूराव गाणें शिकले तर कंपनीला त्यांचा उत्तम उपयोग होईल असा सल्ला पंडितांनीं नारायणरावांना दिला आणि बापूरावांना भास्करबुवांकडे गाणें शिकायला पाठवून दिलें.

## गवतानें तोंड झांकलेली विहीर

मुंबईंत प्रयोग चालू असताना तापाची सांथ उद्भवली. हजार हजार माणसें रोज मरूं लागलीं. त्यामुळें खेळ बंद ठेवून सुट्टी घेणें कंपनीस भाग पडलें. शेवटच्या प्रयोगाच्या दिवशीं पंडितांनीं मला गांठलें आणि दहा हजार रुपये मागितले. पुढच्या तारखेचे चेक दिलेले आहेत ते जर स्वीकारले नाहींत तर प्रसंग कठीण येणार आहे असें त्यांनीं सांगितलें. एवढी रक्कम मजजवळ कोठून असणार? कंपनीच्या पैशांतून द्या. असा त्यानीं मला आग्रह केला. कंपनीजवळ तरी एवढी रक्कम कोठून शिल्लक असणार? रिझर्व फंडातून त्यांनीं मागितले. रिझर्व फंडाला हात लावायचा नाहीं असें मी स्पष्ट त्यांना सांगितलें. शेवटीं डोळयांत अश्रू आणून पंडीत म्हणाले, "माझी अब्रू जाईल; विष खाऊन मला मरावें लागेल." तेव्हां माझें मन विरघळलें. शिल्लक होती त्याची हिश्शेरशी करून नारायणरावांचा सर्व हिस्सा व माझ्या हिश्श्यापैकीं ३३०० रुपये मी त्यांना दिले. मी न मागतां त्यांनीं नारायणरावांच्या व आपल्या सहीची प्रॉमिसरी नोट करून दिली. सुट्टी झाली. पंडीत बडोद्यास गेले. नारायणरावांच्या हिश्शाचे सर्व पैसे त्यांनीं नेल्यामुळें नारायणरावांच्या घरीं उन्हाळा पडला. नारायणरावांच्या हातीं एक पैसाहि नव्हता. त्यांनीं काटदरे यांना कोठून तरी पांचशें रुपये आणून द्या म्हणून केंविलवाण्या मुद्रेनें गळ घातली. दादा काटदरे यांना अत्यंत वाईट वाटलें. महिना हजारों रुपये मिळवून नारायणरावांची ही दशा असावी!

नारायणरावांना फिरायला म्हणून बाहेर काढलें आणि काटद्र्यांनीं मोठ्या कळकळीनें त्यांना चार शब्द सांगितले. " अशा उधळपट्टीनें पंडीत स्वतः भिकेला तर लागेलच पण तुम्हांलाहि लावील. तुमचा भागीच्या हिश्याची देखील वाट लावायला कमी करणार नाहीं. तुम्हांला प्रपंच आहे. विचार करा. " नारायणरावांनीं एकाद्या भाविकाप्रमाणें काटद्र्यांचें सगळें पुराण ऐकून घेतलें; पटलें असें दाखविलें. भोळा बिचारा काटदरे ! ज्या भाविक मुद्रेवर विश्वास ठेवून आपण पाऊल टाकीत आहोंत ती गवतानें तोंड झांकलेली विहीर आहे हें त्यांना कळलें नाहीं.

सुट्टी संपायच्या अगोदर पांच सहा दिवस पंडीत माझ्या बिऱ्हाडीं आले. सकाळीं नऊ वाजल्यापासून दुपारीं एक वाजेपर्यंत त्यांनीं आसन ठोकलें होतें. काखेंतून एकादा बॉम्ब गोळा त्यांनीं आणला आहे हें मी हेरलें होतेंच. काटदरे विश्वासघातकी आहेत; त्यांना उपकाराची जाणीव नाहीं अशी प्रस्तावना करून तुम्ही त्यांच्यावर विश्वास ठेवूं नका म्हणून मला बजावलें. आपण काटद्र्याना काढून पेठे यांना असिस्टंट म्हणून घेणार अशीहि घोषणा केली. या सूचनेला माझी हरकत आहे; पेठे यांना कंपनींत घ्यायला मी तयार नाहीं असें माझें मत स्पष्टपणें त्यांना सांगितलें. माझ्या मताचा कांहीं उपयोग होणार नाहीं हें मी जाणून होतोंच. नंतर " लाडसाहेब, वैद्यसाहेब यांजपाशीं नारायणरावांनीं तसा हट्ट धरला आहे " हें ठराविक अस्त्रहि सोडलें. बरीच भवति न भवति होऊन एक वर्ष टेम्पररी म्हणून चाळीस रुपयांवर पेठे यांची वर्णी कंपनींत पंडितांनीं लाविली.

## डर्बीची लॉटरी

सुट्टी संपून प्रयोग सुरू झाले. एकच प्याल्यांतील मदिरामंडळा-प्रमाणें कर्जमंडळहि कंपनींत स्थापन झालें. हजारांच्या गोष्टी चालायच्या. त्या ऐकून मला वाटे कीं, या लोकांना डर्बीची लॉटरी आली कीं काय ? डर्बीची काय जरूरी होती म्हणा. नारायणरावांच्या हिश्शाची लॉटरीच होती. पांच हजार, दहा हजार, बिझिनेस, फर्म, कमिशन वगैरे मोठमोठे शब्द कानीं पडत. मला वाटे किती कमनशिबी आहें मी ! हे शब्द मला

उच्चारतांदेखील येऊं नयेत ! एवढ्या मोठ्या कंपनीचा मी भागीदार असून उपयोग काय ?

एकच प्याल्याची तालीम सुरूं झाली. पदें केलेलीं नव्हतीं म्हणून मी पुण्यास गेलों. अंगाला सूज येऊन गडकरी आसन्नमरण झालेले होते. त्यांच्या संमतीनें त्यांच्या वडील बंधूकडून परवानगी लिहून घेऊन वि. सी. गुर्जर यांच्याकडून पदें करून घेतलीं. सिंधूच्या पदांच्या चाली सुप्रसिद्ध रेडिओ गायिका सुंदराबाई यांच्या आहेत; बाकीच्या कांहीं पंढरपुरकरबुवा व कांहीं मास्टर कृष्णा याच्याकडून घेतल्या.

## आकाशाला गवसणी घालीन

या वेळीं दोन मालक व मॅनेजर यांच्या गाडीखर्चाचें बजेट ठरवून टाकलें. मॅनेजरला पगाराशिवाय प्रवासखर्च पंचाहत्तर रुपये; मालकांनां प्रत्येकीं पंचवीस रुपये. त्याप्रमाणें महिन्याच्या पहिल्या तारखेस ती रक्कम खर्ची टाकायची. खर्चाचा तपशील कोणी कोणाला द्यायचा नाहीं. या गोष्टीमुळें मॅनेजरांची कुचंबणा होऊन त्याना माझी अडचण वाटूं लागली.

डिसेंबर अखेरीला गडकरी सावनेर येथें आपल्या बंधूकडे जायला निघाले. बोरीबंदरावर ते उतरले आणि मला बोलवायला एका मुलाला त्यांनीं पाठविला. मी गेलों. असा प्रतिभावान् कवि आणि आपला एक मित्र शरपंजरीं पडलेला पाहून मला गहिवर आला. पण तो दाबून त्याच्या जवळ चार धीराचे शब्द बोललों. त्यानीं मागितले तितके पैसे मी पाठवून दिले. ते सावनेरला रवाना झाले.डोळ्यांतून पाणी आलें. गडकरी परत दृष्टीला पडतील अशी आशा वाटेना. गंधर्व कंपनींत माझी जी कुचंबणा चालली होती ती त्याना समजत होती. आजारी असतांना एकदां ते मला म्हणाले, “ गणपतराव, नालायक माणसांकडून अशी मानहानी कां सोसतां ? चला, पडा बाहेर. वर्षाला चार याप्रमाणें मी तुम्हांला नाटकें देतों. तुम्हीं आणि मी भागीदार होऊं.” मी उत्तर दिलें,“मास्तर बरे व्हा.मग खात्रीनें या गोष्टीचा विचार करीन. तुमच्यासारखा खंदा लेखक मिळाल्यावर मी आकाशाला गवसणी घालीन. लवकर बरे व्हा. ” पण भवितव्य निराळें होतें. १९१८

जानेवारी ता. २३ रोजीं सावनेर येथें हा प्रतिभावान् कवि व नाटककार दिवंगत झाला. सगळा महाराष्ट्र हळहळला.

## प्रकाशकाची कारवाई

एकच प्याला या नाटकाचा पहिला प्रयोग तारीख २० फेब्रुवारी रोजीं बडोद्यास श्रीमंत महाराजांसमोर झाला. सरकार स्वाऱ्या खूष झाल्या. वर्षासनाशिवाय एक हजार रुपये जास्त द्यायचा हुकूम झाला.

नाटकाचें पुस्तक छापायचें होतें. त्याच्या हजार प्रतींच्या प्रथम आवृत्तीच्या प्रकाशनाचा हक्क गडकरी यांनीं १२५० रुपयांस एका प्रकाशकास दिला होता. प्रकाशकाच्या कारवाईबद्दल गडकऱ्यांच्या बंधूंना मी अगोदरच सूचना दिली होती. त्यांनीं प्रकाशनाची सर्व व्यवस्था आपुलकीनें माझ्याकडे सोंपविली. पांच हजारांच्या ऐवजीं सात हजार प्रती काढायचा प्रकाशकाचा बेत मला कळला. जास्त प्रती काढतां येणार नाहींत; काढल्यास कायदेशीर व्यवस्था केली जाईल असा धाक मी त्याला घातला. पुस्तक सर्वांगसुंदर झालें पाहिजे हें त्याला बजावलें. प्रकाशकाच्या फायद्याकडे लक्ष देऊन पुस्तक प्रसिद्ध होईपर्यंत नाटकाचा प्रयोग लावायचा नाहीं हें मी कबूल केलें. इतकेंहि करून प्रकाशक हातचलाखी करूं लागले. त्या भानगडींत वेळ गेल्यामुळें पुस्तक वेळेवर प्रसिद्ध झालें नाहीं. प्रयोग जाहीर केलेला होता म्हणून गडकरी यांचा फोटो घालून गुर्जर व पेठे यांनीं पद्यावली प्रसिद्ध केली. त्या वेळीं गुर्जरांच्या बोलण्यांत असें आलेलें आठवतें, कीं गडकरी यांचा व माझा जिव्हाळयाचा ऋणानुबंध होता. सबब खर्चवेंच वजा जातां या पद्यावलीचें जें उत्पन्न राहील तें गडकरी यांच्या स्मारकास देईन. पद्यावलीची पहिली आवृत्ति संपून दुसरी निघाली होती. त्यांनीं त्याप्रमाणें केलें कीं न केलें हें त्यांचें त्यांना किंवा गडकरी-स्मारक–मंडळास माहीत.

मुंबईत पहिला प्रयोग झाल्यावर भयंकर खळबळ उडाली. गुजराती लोकांना नाटकांतील शोकरसानें हालवून सोडलें. चवथा, पांचवा अंक लोकांना पहावेनात. सुधाकर मुलाला काठी मारतो हें दृश्य दिसूं नये म्हणून कांहीं हळव्या मनाचे लोक उठून बाहेर जात.

पहिल्या प्रयोगाला गडकरी यांचे धाकटे बंधू शं. ग. गडकरी व गडकऱ्यांचे एक शिष्य न. ग. कमतनूरकर हे आले होते. गडकरी यांचे बंधू सर्व व्यवहार संपवा असें म्हणूं लागले. मुंबईचा मुक्काम संपतांना सर्व हिशेब पुरा करूं असें आश्वासन दिलें आणि त्यांना जरूर असलेली रक्कम त्या क्षणीं पावती घेऊन दिली. गडकरी यांना वेळोवेळीं ज्या रकमा दिल्या होत्या त्याच्या पावत्या माझ्याजवळ होत्याच. बंधूजवळ नुकत्याच दिलेल्या रकमेसह गडकरी यांस बावीसशें रुपयांची पोंच झाली होती.

## बासुंदींत बोंबील

गडकरी यांचें अपुरें राहिलेलें राजसंन्यास नाटक आपण व मंजू पुरें करणार आहोंत असें गडकऱ्यांचे मावसबंधू म्हणाले. मला हंसूं आलें. प्रेमानें त्यांना म्हणालों, " तेवढें करूं नका. तुम्हीं राजसंन्यास पुरें केलेंत तर लोकांना बासुंदींत बोंबील पडल्यासारखें वाटेल. " माझ्या स्पष्टोक्तीबद्दल त्यांना राग आला नाहीं.

मुंबईचा मुक्काम संपवून कंपनी पुण्यास आली. कंपनी रास्ते पेठेंत आणि मॅनेजरचें आफीस सदाशिव पेठेंतल्या हौदाजवळ. थिएटर व घर ठरविण्यासाठीं पंडितांनीं पुण्यास दोन खेपा घातल्या होत्या; त्याबद्दलच्या जमाखर्चांत तांगाभाड्याबद्दल सोळा रुपये खर्ची घातलेले होते. तसलमातीचा हिशेब कोणाकडूनहि आला तरी मला दाखविल्याशिवाय तो जमाखर्चाच्या वहींत दाखल करायचा नाहीं अशी माझी सक्त ताकीद होती. त्याप्रमाणें वरील तांगाभाड्याचा खर्च माझ्यासमोर आल्यावर तो खर्च पंडितांच्या स्वतःच्या नांवें लिहायला सांगितला.कारण प्रवासखर्चासाठीं रक्कम ठरून गेलेली होती; व ती त्यांना मिळतहि होती.

## दडपेगिरी चालूं द्यायची नाहीं

आमचा एक नियम होता कीं पन्नास रुपयांपासून जे पगारदार असतील त्यांना सेकंड क्लासनें न्यायचें. बडोद्याच्या खर्चांत पेठे यांचें जाण्यायेण्याचें तिकीट सेकंड क्लासांतलें काढून खर्चांत समाविष्ट केलें होतें. मी तें मंजूर न करितां थर्ड क्लास तिकिटाचे पैसे वजा घालून बाकीचे पंडितांच्या नांवें घालायला सांगितलें. वास्तविक सेकंड क्लासनें जाण्याची

पेठे यांची योग्यता नव्हती अगर एवढी लहान रक्कम देण्याची कंपनीची ताकद नव्हती असें नाहीं. पण तत्त्वाचा प्रश्न होता. पेठ्यांना चाळीस रुपये पगार होता तर नियमाप्रमाणें त्यांनीं थर्ड क्लासनेंच जाणें प्राप्त होतें. मला पंडितांनीं विचारलें असतें तर मीहि सेकंड क्लासच्या तिकिटाला संमति दिली असती. परंतु अशी दडपेगिरी चालूं द्यायची नाहीं असें मी ठरवून टाकलें होतें. पेठे यांनीं माझ्याशीं निष्कारण शत्रुत्व धरलें.

पुण्यास आल्यावर बडोद्याची बिदागी आली. सहा हजार रकमेंतून बडोद्याचा इन्कम् टॅक्स वजा करून बडोदा बँकेवर चेक मिळाला होता. तो कॅश करण्यासाठीं शिलोत्री बँकेकडे गेला. त्याला बरेच दिवस झाले. कॅश होऊन चेक आला कीं नाहीं याची चौकशी रोज करीत असें. शेवटीं एक दिवस कारकूनास आपल्या कचेरींत बोलावून त्याजपाशीं आलेल्या रकमेचा खर्च विल्हेवारीनें पंडितांनीं दिला. कारकुनानें मला तो दाखवितांच मी पंडितांना बोलावून आणलें आणि खर्चाच्या तपशीलाची छाननी सुरू केली.

**मी**–बडोद्याची रक्कम परस्पर घेऊन मला विचारल्याशिवाय तिची विल्हेवाट कां लाविलीत?

**पंडीत**–'कंप्नी'चीं कांहीं बिलें दिलीं व नारायणरावांचीं कांहीं खाजगी बिलें भागवायचीं होतीं तीं देऊन टाकलीं.

**मी**–ती रक्कम एकट्या नारायणरावांच्या मालकीची नव्हती. माझाहि भाग तिच्यांत होता. मला विचारल्याशिवाय त्या रकमेची विल्हेवाट लावण्याचा अधिकार तुम्हांला अगर नारायणरावांना नव्हता. त्याचे हिस्सेरशीप्रमाणें भाग करून नंतर नारायणरावांच्या भागांतून त्यांचीं बिलें भागवायचीं होतीं. मला ती रक्कम पाहिजे, घेऊन या.

**पंडीत**–रक्कम खर्च झाली; आतां कोठून आणायची?

शब्दांत जरा उर्मटपणा दिसला तेव्हां मीहि तितक्याच तीव्रतेनें "कर्ज काढून आणा. काय वाटेल तें करा पण मला ती रक्कम पाहिजे."

थोडी मुदत मागून घेतली. तेवढ्या अवधींत कुंटे यांजकडून कर्ज काढलें आणि मागें घेतलेले ३३०० रुपये व बडोद्यापैकीं माझ्या वांटणीचे पैसे आणून दिले.

## जबर व्याजाची लालूच

ही रक्कम मजजवळ जमलेली पहातांच ती कर्जाच्या निमित्तानें उपटण्याकरितां एक गृहस्थ माझ्याकडे आले. दुहोत्रा व्याज देतों म्हणून ते सांगूं लागले. पण एका तोळ्याचे सोन्याचे सल्ले गमावून धडा शिकलों होतों; जबर व्याजाच्या आशेनें मुद्दल गमविण्याची माझी तयारी नव्हती. त्या गृहस्थांना मी धुडकावून लावलें. मजजवळचे पैसे निराळ्या मार्गानें उपटण्याचा हा डाव होता हें मागाहून मला कळलें. जमाखर्चावर माझें बारीक लक्ष असे त्यामुळें कोणालाच हातचलाखी करतां येईना. त्यामुळें माझ्याबद्दल नारायणरावांकडे तक्रारी गेल्या; पण त्या पुढें आल्या नाहींत. शेवटीं रा. ब. अण्णासाहेब खोपकर यांच्याकडे फिर्याद गेली.

इतक्यांत मुंबईहून मला खलिता अला, दादा काटदरे यांस कमी करावें. त्याप्रमाणें त्यांचा पगार चुकता केला; बक्षिसफंडहि दिला. वाढदिवस उजाडला. त्या दिवशीं बक्षिसफंडाचें प्रॉव्हिडंटफंडांत रूपांतर करण्यांत मी गुंतलों होतों त्यामुळें आलेल्या पाहुणे मंडळीशीं बोलाचालायला मला मिळालें नाहीं; ही संधि साधून पाहुण्यांच्या कानांत माझ्या बेपर्वाईचें विष ओतलें.

## मलमपट्टी

खोपकरांनीं त्र्यंबकराव साठे यांच्याबरोबर मला निरोप पाठविला. मी गेलों. माझ्याविरुद्ध त्यांच्याकडे गेलेल्या तक्रारी माझ्या कानांवर घातल्या. मीहि कंपनींत चाललेले प्रकार त्यांच्यापुढें पुराव्यानिशीं मांडले. त्यावरून माझ्या म्हणण्याची सत्यता त्यांना पटली. कंपनीचा मुक्काम हालायच्या वेळीं "झालें तें झालें. तुम्हीं विसरा, आम्हींहि विसरतों" अशी खोपकरांच्या घरीं भाषा होऊन मलमपट्टी बसविली; परंतु त्या मलमपट्टीनें गळूं जिरलें तर नाहींच पण पिकवणीस मात्र आलें.

मुंबईस गेल्यावर सोमवारीं एका कारकुनाबरोबर मुखत्यारपत्राचा मसुदा लिहून सहीसाठीं माझ्याकडे पाठविला. मी तो वाचला, आणि पंडितांना मला समक्ष भेटायला सांग असा त्या कारकुनाबरोबर निरोप पाठविला. नंतर तो मसुदा घेऊन वैद्य सॉलिसिटरना भेटलों. त्यांनीं त्वयार्धे

मयार्थ असा सल्ला दिला. नंतर लाड सॉलिसिटरांकडे गेलों. तेथें त्यांनींच आपल्या गळयांत कसले तरी शेअर्स पंडितांनीं बांधल्याचा पाढा वाचला. त्यांनीं मला धीर दिला. " जें जें होईल तें तें वेळोवेळीं मला कळवा. मी तुमचें नुकसान होऊं देणार नाहीं " असें त्यांनीं सांगितलें. " पंडीत यास आम्हीं उभयतां भागीदारांनीं बँकेंत पैसे ठेवण्याचा व बँकेंतून पैसे काढण्याचा अधिकार देत आहों " असा मजकूर त्या मुखत्यारपत्रांत होता. खातें शिलोत्री बँकेंत उघडण्याचा पंडितांचा विचार होता.

## वारा कसा वहात होता ?

प्रयोग चालूच होते. तिसऱ्याकडून माझा कंपनींतला शेअर विकत घेण्याची खटपट चालू झाली तिचाहि प्रतिध्वनि माधवराव सप्रे यांच्या येथें सहज बोलतां बोलतां उमटला. त्यामुळें कंपनींत वारा कोणत्या दिशेनें वहात आहे याची बरोबर कल्पना आली.

वैद्यसाहेबांच्या घरीं आम्हीं सर्वजण जमलों असतां मुखत्यारपत्राचा प्रश्न निघाला. त्या मुखत्यारपत्रावर सही करायला मी तयार नाहीं असें स्पष्ट सांगितलें. व्यवहारांत थोडा तरी विश्वास दुसऱ्यावर टाकल्याशिवाय भागत नाहीं अशी माझी समजूत सॉलिसिटरद्वयांनीं घातली. पंडितांवर माझा तिळमात्र विश्वास नाहीं असें साफ सांगितलें. नंतर नारायणरावांनीं माझ्या विरुद्ध असलेल्या आपल्या तक्रारी पुढें आणल्या. त्यांचेंहि निराकरण मी स्पष्ट भाषेंत केलें. त्यामुळें प्रकरण चिडीस गेलें. सर्वांनीं हो हो करून दोघांनाहि शांत केलें. नंतर वैद्यांनीं एक तोड काढली. चेक देतांना चेकच्या काउंटरवर माझी सही असल्याशिवाय चेक फाडला जाऊं नये आणि आतां तरी मान्यता द्या अशी गळ घातली. पण त्याच वेळीं कंपनी सोडायचीच असा मनांत निश्चय करून मूक संमति मी दिली.

## कंपनी सोडण्याचा ठाम निश्चय

" झालेलें भांडण येथल्या येथें विसरायच आणि नंतर बाहेर जायचें " असें वैद्यांनीं सुचवितांच " आपण विसरलों बुवा " असें नारायणरावांनीं प्रांजलपणें म्हटलें. पण मला तें शक्य नव्हतें. आंत एक आणि बाहेर एक

दाखविण्याची कला मला व्यवहारांत साधत नाहीं. रंगभूमीवर साधते पण ती अभिनय म्हणून. नारायणरावांना तें साधलें असेल कारण ते थोर मनाचे आहेत. पण मला झालेला प्रकार विसरणें शक्य नव्हतें. तेथल्या तेथेंच माझा स्वभाव मी स्पष्ट करून ठेवला. एकाच मोटारींतून नारायणरावांच्या घराजवळ येतांच ते खालीं उतरले. जास्त बोलणें ऐकून घेण्याच्या मन-स्थितींत नारायणराव नव्हतेच. मी एवढेंच म्हटलें, "नारायणराव, दूरवर विचार करा. चाललेला प्रकार तुम्हांला पसंत आहे ना?" उत्तर न देतां त्यांनीं आपली मूक संमति दर्शविली. कंपनी सोडण्याचा निश्चय ठाम झाला. घरीं आलें.

## "राजहंस" कंपनी काढतील

नारायणरावांची आणि माझी तोंडातोंडी होण्याचा प्रसंग होतां होईल तों टाळण्याचा प्रयत्न धोरणानें बगल देऊन, प्रसंगीं मानहानी सोसूनहि, मी करीत होतों पण अखेर तो प्रसंग आलाच. त्यामुळें मनाला खेदहि झाला आणि रागहि आला. दोघां भागीदारांत मर्यादेचा जो पडदा होता तो फाटला. आतां समोरासमोर खटके उडण्याचे प्रसंग वारंवार येणार हें निश्चित. नंतर माधवराव सप्रे यांच्या तोंडून मला धमकी देण्यांत आली. मी जर कंपनी सोडली नाहीं तर नारायणराव कंपनींतून निघतील आणि ते "राजहंस" कंपनी काढतील. माझ्या पथ्यावरच तें पडणार होतें. नारायणरावांचेंच नुकसान त्यांत. नारायणरावांशिवाय कंपनी चालविणें मला अशक्य होईल, असें मला बजावण्यांत आलें. पण माझा आत्मविश्वास दांडगा होता. कसेंहि पात्र माझ्या हाताखालीं आलें तरी त्याला मी नांवारूपास आणलें असतें. स्वयंवरसारखें एकादें गायनाच्या जलशाचें नाटक करतां आलें नाहीं तर तें बंद ठेवून गायनेच्छु नाटक कंपन्यांना प्रयोगाचा हक्क विकीत राहिलों असतों. एकच प्याला नाटक माझ्याजवळ होतें. त्यांत गाण्याला प्राधान्य नाहीं. त्यामुळें त्या एका नाटकावर मला कंपनी चालू ठेवतां आली असती. पुढें माझ्या नटांना पेलतील व त्यांच्या गुणांचा उत्कर्ष होईल अशीं नाटकें मी लिहून घेतलीं असतीं. दरवाजावरची व्यवस्था पहाणें, परवानगी काढणें, प्रवासाची व्यवस्था करणें अशा बाहे-

रच्या कामांकरितां एक उत्तमसा माणूस या वेळच्या मॅनेजराच्या पगाराच्या एक तृतीयांश पगारांत मी ठेवूं शकलों असतों. बाकीची व्यवस्था पहायला मी समर्थ होतों. इतकेंहि करून दुर्दैवानें कंपनी चालली नसती तर लिलांवानें ती विकून टाकली असती आणि जे काय त्यांत दहा पंधरा हजार मिळाले असते ते घेऊन हरी हरी म्हणत स्वस्थ बसलों असतों. हे माझे विचार निर्भीडपणें माधवराव सप्रे यांच्या समोर मांडले आणि म्हणालों, "नारायणरावांनीं आपखुषीनें कंपनी सोडली तर भागीपत्रांतील कलमाप्रमाणें कंपनीच्या मालमत्तेवर त्यांचा कोणत्याहि तऱ्हेचा हक्कसंबंध रहाणार नाहीं. उलट नुकसानीबद्दल नारायणरावांकडून मला दोन हजार रुपये मिळतील. तेव्हां त्यांत माझें नुकसान तिळमात्र नाहीं. नारायणाला मात्र नवीन कंपनी काढतांना पहिल्या रुपयापासून कर्ज काढावें लागेल.

हें माझें व्याख्यान पंडीतकंपूच्या कानांपर्यंत गेलें. याच वेळीं कुरुंदवाड येथील कांहीं मंडळी मुंबईस आली आणि कंपनीस कुरुंदवाड येथें न्यायची असें ठरविलें. चौदा हजाराला अकरा प्रयोग करायचे असा करार झाला. या बाबतींत पंडितांनीं माझें मत घेतलें नाहीं. कदाचित् मी या कराराला विरोध करीन म्हणून सॉलिसिटर लाड यांच्यामार्फत समजासमजीचा विधि झाला. त्यांत तीन महिनेपर्यंत मी कांहीं एक पाहायचें नाहीं, फक्त नाटकांत काम करायचें; बाकीची व्यवस्था नारायणरावांच्या मार्फत पंडितांनीं पहावी; तीन महिन्यांनंतर सॉलिसिटर्स लाड व वैद्य यांनीं हिशेबतपासणी माझ्या समक्ष करावी; व्यवहार उधळपट्टीचा आहे, खर्ची पडलेल्या रकमा रास्त नाहींत असें जर मी सिद्ध करून दाखविलें तर मग पुढें काय व्यवस्था करायची तें ठरवायचें. शेवटपर्यंत आपण चुकायचें नाहीं असें धोरण मी ठेविलें होतें.म्हणून त्यांच्या म्हणण्याला मान्यता दिली.

## नौकाविहार

मुंबई ते कुरुंदवाड हा प्रवास कोल्हापूर संस्थानची हद्द टाळण्याकरितां मिरजेपासून कुरुंदवाडपर्यंत नावेनें करायचा असा बेत ठरला. कारण काय तर श्रीमंत शाहूमहाराजांचा कंपनीवर राग झालेला आहे, तेव्हां त्यांच्या हद्दींत आपण गेलों तर आम्हांला ते पकडतील. मला हें

खरें वाटेना. आमच्या हातून तसें कांहींच घडलेलें नव्हतें. नंतर श्रीमंत शाहूमहाराजांची जेव्हां भेट झाली तेव्हां खरें कारण मला कळलें. नारायणराव पंडिताच्या अर्ध्या वचनांत आहेत व ते कर्जबाजारी झाले आहेत ही बातमी महाराजांच्या कानांवर गेली होती. त्याबद्दल नारायणरावांना त्यांनीं परोक्ष रीतीनें सूचना दिली होती. सोलापूर बँक लिक्विडेशनमध्यें गेलेली होती. त्या बँकेच्या डायरेक्टर मंडळींपैकीं बरेच जण पंडितांचे आप्त होते. पंडीत त्याच बँकेंत तीस रुपये पगारावर एक क्लार्क होते; पण हें माहित नसणाराला आपण बँकेचे मॅनेजर आहोंत असें सांगत असत. नारायणरावांपासून गंधर्व कंपनींतील कोणासहि बँकेंतून प्रामिसरी नोटवर कर्जाऊ रक्कम मी देऊं शकेन अशी प्रौढी पंडीत मिरवीत. कांहीं लोकांना बँकेकडून कर्ज त्यांनीं देवविलेंहि होतें. या सर्व हकिगती महाराजांना कळलेल्या होत्या. हें पंडितांना माहित असल्यामुळें कोल्हापूर होतां होईल तों टाळायचें म्हणून त्यांनीं प्रवासाच्या बाबतींत द्राविडी प्राणायाम केला.

## हा आमचा मूर्खपणा आहे

कंपनी कुरुंदवाडास आली.तेथल्या भालचंद्र थिएटरचा उद्घाटन समारंभ झाला. चार प्रयोग झाले. शेवटच्या प्रयोगाच्या दिवशीं अभिनंदनपर भाषणें झालीं. पण त्यांत माझ्या नांवाचा उल्लेख बुद्धिपुरःसर केला नव्हता. कंपनी मला सोडायचीच होती त्यामुळें मला त्याबद्दल कांहींच वाटलें नाहीं.

कंपनी कुरुंदवाडहून मिरजेस आली आणि तिनें खेळ सुरू केले. उत्पन्न भयंकर होऊं लागलें. पंडीत पुण्यास गेले होते. त्यांनीं नारायणरावांस तार दिली. श्रीमन्महाराज रायबागहून पुण्यास येत आहेत, तरी मिरज स्टेशनवर जाऊन त्यांना भेटावें.' तारेंत माझा उल्लेख नसल्यामुळें मी स्वस्थच होतों. सायंकाळीं म्हैसकर फौजदार नारायणरावांना स्टेशनवर न्यायला आले. "गणपतरावांना घेऊन जा." म्हणून नारायणरावांनीं त्यांना सांगितलें. म्हैसकरांनीं मला बोलावलें. तेव्हां त्यांना तारेची हकीगत सांगितली आणि मला येण्याचें प्रयोजन नाहीं असें म्हणालों. "नारायणरावांना बोलतां येणार नाहीं. तूं चल. नाहीं आलास तर वाईट दिसेल."असें म्हैसकरांनीं सांगि-



कंदन–( प्रेमशोधन )



शुक्राचार्य–( विद्याहरण )



कै. श्री. राम गणेश गडकरी



श्री. यशवंत लक्ष्मण ठकार



श्री. सदाशिव गणेश रानडे



कै. श्री. दत्तोपंत पेठकर

श्री. गणपतराव बोडस यांचे नाटककार मित्र—कै. राम गणेश गडकरी व शिष्य—(१) श्री. यशवंत लक्ष्मण ठकार (२) श्री. सदाशिव गणेश रानडे (३) कै. श्री. दत्तोपंत पेठकर.

तलें तेव्हां मला जाणें भागच पडलें. मिरज स्टेशनवर महाराजांच्या सलूनसमोर बाहेरच मी उभा राहिलों. नारायणराव आंत गेले. सरकारांनीं त्यांना बसायला सांगितलें. बाहेर नजर जातांच आणखी कोण आहे असा प्रश्न महाराजांनीं म्हैसकरांना केला. म्हैसकरांनीं माझें नांव घेतलें. मला हांक मारतांच मुजरा करून महाराजांसमोर बसलों. महाराजांनीं हंसत हंसत विचारलें, “ बोडस, मी तुम्हांला पकडणार म्हणून कुणी सांगितलें ? पकडायचें कारण काय ? तुम्ही माझा काय गुन्हा केला आहे ? कुणी तरी तुम्हांला सांगितलें आणि तुम्हांला तें खरें वाटलें. खरें ना ? ” नेमकें मलाच विचारलें म्हणून मला बोलणें भाग आलें. “ सरकार, त्या बातमी-वर आम्हीं विश्वास ठेवला हा आमचा मूर्खपणा आहे. माफी असावी. वास्तविक इतके दिवस सरकारांचें अत्यंत प्रेम आमच्यावर आहे हें माहीत असून अशी शंका घेणें रास्त नव्हतें. बुद्धिभेद केला खरा आमचा.” नंतर कोल्हापुरास केव्हां येणार म्हणून महाराजांनीं मला विचारलें. हुकूम झाला कीं सेवेला हजर आहोंत, असें उत्तर दिलें. पुण्याहून जाऊन आल्यानंतर कळवीन असें महाराज बोलले. मुजरा करून मी सलूनच्या बाहेर पडलों.

## तीनशें रुपयांचीं फ्री तिकिटें

सरकारस्वारी कोल्हापुरास परत आल्यानंतर दर्शनाकरितां सोनतळीवर गेलों. सरकारांनीं जाग्रण करायचें नाहीं म्हणून डॉक्टरनें सल्ला दिली होती. दिवसा प्रयोग करायचे असें ठरलें. तेथें सार्वजनिक तीन व सरकारी तीन असे सहा प्रयोग झाले. उत्पन्न उत्तम झालें. तिकिटें लावून तीन प्रयोग झाले, त्यांत पंडितांनीं स्वतःसाठीं म्हणून तीनशें रुपयांचीं फ्री तिकिटें घेतलीं. तिकीटविक्रीचा हिशेब लिहिलेले तीनहि तक्ते मी आपल्या ताब्यांत घेऊन ठेवले. मला त्यांचा पुढें उपयोग करायचा होता. या मुक्कामांत पंडीत यांच्यावर सोलापूर बँकेच्या बाबतींत एक वारंट येऊन कांहीं खटपटीनें त्या वेळेपुरतें तें परत गेलें असें ऐकलें. त्याच्यापूर्वी कंपनी कोल्हापुरास आल्यावर पंडीत एक दिवस पुण्याहून आपल्या दोन आप्तांसह बिनतिकिटानें फर्स्टक्लासमधून प्रवास केल्याबद्दल मिरज स्टेशनवर त्यांना सुमारें तेसष्ट

रुपये दंडासह भरावे लागले अशी बातमी लागली. मी चौकशी केली. तेव्हां ते पैसे केशवराव भोसल्यांना भरावे लागले असें पिकविलें. पण तें खोटें आहे अशी माझी चिरचिर चालू होतीच.

## भांड्याला भांडें लागायचें

कोल्हापुरच्या मुक्कामात नारायणराव श्रीमन्महाराजांकडे नित्य जात असत. नारायणराव बरोबर असल्यानें आपला बचाव होईल या आशेनें पंडीतहि त्यांच्याबरोबर जात. या दोघांनीं महाराजांसमोर नित्य गाऱ्हाणीं सांगावीं, "नारायणरावांना कलेच्या वृद्धीसाठीं खर्च करायला पाहिजे आणि त्याला भागीदार या नात्यानें गणपतराव अडथळा करतात; त्यामुळें नारायणरावांची कुचंबणा होत आहे." म्हैसकर ऐकत होते सगळें. म्हैसकरांचा व माझा अठ्ठावीस वर्षांचा उत्तम स्नेह. त्यांनीं मला सूचना दिली. कंपनी येथून निघायच्या अगोदर माझी आणि महाराजांची भेट होईलसें करा असें म्हैसकरांना विनविलें. त्याप्रमाणें व्यवस्था करून मला ते बोलवायला आले. मी गेलों. सरकारस्वारी एक मोठ्या गाडीला (तिला 'ब्रेक' म्हणतात) सहा घोडे जोडायला सांगून स्वतः गाडींत बसून सहा घोडे कसे हांकवायचे हें कोचमनला शिकवित होते. आम्हां दोघांना गाडींत बसायला सांगितलें. कोचमनला वरचेवर इशारा देत देत महाराज आमच्याशीं बोलूं लागले. माझें आणि नारायणरावांचें बरें नाहीं असें ऐकल्याचें महाराजांनीं सांगितलें. भांड्याला भांडें लागायचेंच; भागीदारी आली कीं भाऊबंदकी आलीच; त्यांत विशेष कांहीं नाहीं असें मी म्हटलें. "हा पंडीत सोलापूर बॅंकेकडून कशाला आणलात?" "सरकार, मी कुठें आणला? आला तो टाळतां आला नाहीं हें खरें." "नारायणाला विश्वासांत घेऊन तंटा तक्रारी मिटवून टाका." "नारायणरावांना विश्वासांत घेण्याचें दुर्घट काम माझ्या आटोक्याबाहेरचें आहे. नारायणरावांच्या नांवावर कर्ज उभारतां येणें मला अशक्य आहे. ती कला पंडितांना साधली आहे" हें ऐकून महाराज हंसले. त्यांना मुजरा करून आम्हीं परतलों.

आदल्या दिवशीं माझ्या विश्वासाची कंपनींतील मंडळी विद्याधर गुंडो जोशी यांच्या घरीं बोलावली आणि कंपनींत चाललेल्या लढ्याची

साद्यंत हकिगत सांगितली. पंडिताच्या गमजा अधिक काळ आपण सहन करायच्या नाहींत; कंपनीचीं सर्व सूत्रें तुमच्या बळावर मी आपल्या हातीं घेणार आहें; तेव्हां तुमचा विचार काय आहे तो सांगा असें त्यांस म्हटलें. त्या मंडळीनें मला आश्वासन दिल्यावर पंडितांना कंपनींतून काढायच्या विचारास लागलों.

## लेखी पुरावा पाहिजे

सुट्टी झाली. इंदूर येथून श्री. सत्यबोध हुदलीकर यांनीं मला पत्र पाठविलें, त्यांत श्रीमंत होळकर सरकारांनीं यशवंत कंपनी स्थापन केली आहे तेव्हां त्या कंपनींतील नटांना शिक्षण देण्याकरितां सुट्टींत या असें लिहिलें होतें. मंडळी घेऊन कोल्हापुराहून निघालों. मुंबईस सॉलिसिटर्स वैद्य व लाड यांची चौकशी केली तों ते लोणावळ्यास गेले आहेत असें समजलें. मंडळी नाशकास ठेवून लोणावळ्यास गेलों आणि त्यांना भेटलों. त्यांना माझी कर्मकहाणी सांगितली. पंडितांच्याविरुद्ध लेखी पुरावा त्यांनीं मागितला. कंपनी तुम्ही चालवित असाल तर मी खात्रीनें कंपनींत राहीन असें मास्टर कृष्णानें अभिवचन दिलें होतें म्हणून त्याला पुण्यास जाऊन भेटलों आणि माझे पुढचे बेत त्याला कळविले.

## जुन्या आठवणींचे कढ

नंतर अकोल्याहून बलवंत मंडळीचे कोल्हटकर यांचें भावबंधन पहाण्यास या असें आग्रहाचें निमंत्रण आलें. दिवंगत झालेल्या आपल्या प्रिय मित्राची शेवटची कृति पहाण्याची अतिशय उत्कंठा लागली म्हणून अकोल्यास गेलों. भावबंधन पाहिलें. रंगभूमीवर गडकरी यांची छाया-प्रतिमा हार घालून बसविलेली पहातांच त्यांच्या सहवासांत घालविलेल्या काळाची आठवण झाली आणि भडभडून आलें. भावबंधनचा प्रयोग चालू असतांना प्रेक्षकांतून हास्य व करुण या रसाचे फवारे उडत होते. हें पहायला गडकरी हयात नाहींत म्हणून फारच वाईट वाटलें. डोळ्यांतलें पाणी थांबेना म्हणून कांहीं वेळानें आंत उठून गेलों.

बलवंत कंपनींतसुद्धां भांडवल देणारे व कामें करणारे यांच्यामध्यें भागीदारीच्या वाटाघाटी चालू होत्या. योग्य वाटला तो सल्ला मी त्यांना

दिला. त्या वेळचे कंपनीचे मॅनेजर हर्डीकर यांना भागींत घेण्याचें तिघा मालकांनीं कबूल केलें होतें असें हर्डीकरांचें म्हणणें होतें व त्याप्रमाणें त्यांनीं मागणी केली होती. मला आलेला कटु अनुभव मी त्यांना सांगितला. मॅनेजर नोकरच असला पाहिजे; मालक असतां कामा नये. मॅनेजर जर मालक झाला तर बरोबरीचें नातें उत्पन्न होतें. त्यामुळें गैरव्यवस्थेबद्दल अगर अंदाधुंदीबद्दल जाब मागायचा झाला तर भीड पडते आणि चाललेली गैरव्यवस्था निमूटपणें पहावी लागते, याची जाणीव मी त्यांना दिली.

नंतर इंदुरास गेलों. पण मी जायच्या अगोदर आमचे चिंतोबा दिवेकर यांना तालीम देण्यास आणल्यामुळें माझें कारण पडलें नाहीं. किरकोळ चर्चेपलीकडे मी लक्ष्य घातलें नाहीं. यशवंत मंडळीचा पहिला प्रयोग पुण्यप्रभाव लागला.

## यशवंत संगीत मंडळीचा दरबारी थाट

श्रीमंत होळकरसरकारांनीं शिवराज मंडळींतून फुटलेल्या, शंकरराव सरनाईक, भाऊराव जाधव, विसूभाऊ भडकमकर यांना प्रमुख धरून कंपनी स्थापन केली होती. सरकारी पैशानें निघालेली कंपनी. सरकारी वाण्याकडून सदा भरलेली कोठी, दरबारी पद्धतीनें ठेवलेले हिशेब, इंदुरी तऱ्हेचें पागोटें घातलेलें पोक्त हिशेबतपासनीस, पेंटर पडदे तयार करीत आहेत, सरकारचा खर्च आणि पेन्शनची नोकरी यामुळें तालीम झाली न झाली, दगदग कमी, म्हणून कंपनींतले लोकहि मजेंत आहेत, गव्हर्निंग बॉडी, मॅनेजिंग कमिटी, काळे बंद कॉलरचे कोट, रंगवलेले तलम मलमलीचे पटके, पंप शू, सुरवार असा कंपनींत जिकडे तिकडे थाटमाट पाहून गंमत वाटली. काय हा कलेच्या उद्धाराचा प्रयत्न! असे उद्गार माझ्या तोंडांतून निघाले. सरकारांची खरोखरी सदिच्छा होती परंतु कंपनीची घटना बरोबर नव्हती, कंपनींतल्या माणसांत शिस्त नव्हती. हें सांगावें कोणी? मी पाहुणा म्हणून आलेला. व्यवस्था उत्तम आहे असेंच म्हणणें भाग होतें.

# भिकेचे डोहाळे

सुट्टीनंतर गंधर्व कंपनीचा सुरवातीचा प्रयोग ता. १५।११।१९ रोजीं ठरला होता. मी तारीख १३ रोजीं मुंबईस गेलों. आमची भागीदारीची भानगड माझ्याकडून हुदलीकरांना कळली होती म्हणून इंदूरहून निघतांना गाडी सुटायच्या अगोदर "गंधर्व कंपनी वैभवशाली आहे, शक्य तों तुम्ही भागी सोडूं नका. दुर्दैवानें सोडावी लागली तर यशवंत कंपनीचा पहिला हक्क तुमच्यावर राहील" असें त्यांनीं सांगितलें. मुंबईत आल्यावर प्रथम सॉलिसिटर वैद्य यांना भेटलों. त्यांनीं प्रश्न केला, "गणपतराव, स्वतःच्या कंपनीला शिक्षण द्यायचें सोडून तुम्हीं दुसऱ्या कंपनीला शिक्षण देतां यांत स्वतःच्या कंपनीचें नुकसान नाहीं का करीत?" त्यांचा हेतू ओळखून मी म्हटलें "आपल्या कंपनीला शिक्षण देण्यासाठीं श्रीमंत होळकर सरकारांचें मला आमंत्रण येतें याचा अभिमान माझ्या भागीदाराला नको का वाटायला? शिवाय कोणत्याहि तऱ्हेचा मोबदला घेऊन कांहीं मी शिक्षण दिलें नाहीं. नारायणराव नाटकांतल्या पदांचें रेकॉर्ड्स् देऊन पैसे मिळवितात. वास्तविक तक्रार करायला जर कुणाला जागा असेल तर ती मलाच." हें ऐकून वैद्य खूप हंसले आणि म्हणाले, तुमच्याविरुद्ध पुष्कळच तक्रारी आहेत त्यांपैकीं कांहीं ह्या—

(१) गणपतरावाचें लक्ष कंपनींत नाहीं. कारण ते दुसऱ्या कंपनींत शिकवायला जातात.

(२) रंगभूमीच्या सजावटीकरितां खूप खर्च करण्याची नारायणरावांना इच्छा आहे. पण गणपतरावांमुळें त्यांची कुचंबणा होत आहे.

(३) भडक सीनसीनरी, कपडे वगैरे करण्यासाठीं हजारों रुपये घातले पाहिजेत त्यासाठीं कर्ज काढणें जरूर आहे. पण कर्ज काढण्याच्या बाबतींत गणपतराव आमचे पाय मागें ओढतात. तेव्हां कसें करतां?" "पोट भरत असतांना त्यांना भिकेचे डोहाळे आठवले आहेत. दुर्दैव! परंतु आतां यांच्याबरोबर नशीब घांसायची माझी तयारी नाहीं. माझा एक पाय मी कंपनीच्या बाहेर ठेवलाच आहे." मी उत्तर दिलें. त्यावर

" असें करूं नका. निराश कां होतां ? ती वेळ येऊं द्या मग पाहूं. " असें वैद्य म्हणाले.

शनिवारपासून प्रयोग सुरू झाले. माझें काम प्रामुख्यानें ज्यांत आहे अशीं लोकप्रिय नाटकें लावायचीं नाहींत अशा हेतूनें नाटकें लाविलीं होतीं. प्रथम मानापमान, रविवारीं; स्वयंवर, बुधवारीं; विद्याहरण, शनिवारीं; पुन्हां स्वयंवर, रविवारीं सौभद्र, असा खेळांचा क्रम होता. एक दिवस कंपनींत फूट पडूं नये व माझी व नारायणरावांची जोडी कायम टिकावी या सदिच्छेनें श्री. दादासाहेब कुंटे यांनीं असा निरोप पाठविला कीं कंपनीच्या हिशेबाची तपासणी करण्याचा अधिकार तुमच्याकडे राहील. पण व्यवहार नारायणराव अगर त्यांच्यातर्फे पंडीत पहातील; तुम्ही नुसती तालीम घ्यावी व नाटकांत कामें करावीं. मी त्यांना उलट निरोप पाठविला, " नारायणरावांनीं प्रेमानें ही मागणी केली असती तर मी आनंदानें कबूल झालों असतों. पण अटीला पेटून ज्या अर्थी ही गोष्ट करण्याचा त्यांचा बेत आहे त्या अर्थीं त्यांच्या नादाला लागून मी आपलें नुकसान करून घेणार नाहीं. "

## मालकाची आणि नोकराची लढाई

तिसऱ्या प्रयोगाच्या अगोदर सोमवारीं पंडीत माझ्याकडे आले आणि म्हणाले, " नारायणरावांचें आणि तुमचें ऐक्य रहायला एकच उपाय आहे, आणि तो म्हणजे तुम्हीं पैसे घेण्यापुरते भागीदार रहाणें." हा उपाय ऐकून माझें डोकें उसळलें. त्यांना सांगितलें, " बाळासाहेब, तुमचे बेत मला कळत नाहींत, असें समजूं नका. भागीदाराला बुडविण्यासाठीं कंपनी कर्जांत घालण्याचे धंदे कांहीं लोक करतात त्यांतलाच हा डाव आहे. " " ही तुमची आमची लढाई आहे " " बाळासाहेब, तुम्हीं माझे नोकर आहांत. मालकाची व नोकराची लढाई होत नसते. लढाईत सामनेवाला बरोबरीचा असावा लागतो. आपल्या राजीखुषीनें आणि अक्कलहुशारीनें नारायणराव जर स्वतः लढाईला तयार झाले असते तर त्यांचें आव्हान मी आनंदानें स्वीकारलें असतें. आजपर्यंत तुम्हीं नारायणरावांना पुढें करून वाटेल तसा सांवळागोंधळ घातलात परंतु आता

माझ्या परवानगीवांचून एक पैहि तुम्हांला खर्च करतां येणार नाहीं." यावर पंडीत म्हणाले, "हें ठरलें तर मग. पुन्हां आतां समेटाची भाषा राहिली नाहीं." "आतां समेट एकदम आणि एकच."

## समेटाचीं ठिगळें

नंतर एक दिवस जाऊं दिला आणि दुसऱ्या दिवशीं नारायणरावांस नोटीस देऊन पंडिताना मॅनेजरच्या जाग्यावरून काढून टाका अशी मागणी भागीदार या नात्यानें मी त्यांच्यापाशीं केली. त्या दिवशीं रात्रीं विद्याहरण नाटक होतें. पहिला अंक संपतो तोंच लाड व वैद्य सॉलिसिटर मला बाजूला घेऊन विचारूं लागले, "गणपतराव, हें हो काय? तुम्हीं पंडितांना कमी करण्याबद्दल नारायणरावांना नोटीस दिलीत? परंतु पंडितांना कमी करणें म्हणजे नारायणरावांना कमी करणें अशी परिस्थिती आहे हें तुम्हांला माहीत आहे ना?" मी उत्तर दिलें, "आज सहा वर्षें पुष्कळ सहन केलें. आतां तोंडांत पाणी जायची वेळ आली आहे. माझ्या नोटिशीचे जे काय परिणाम होतील ते भोगायला मी तयार आहे." माझा हा निर्धार पाहून ते म्हणाले, "उद्यां आमच्याकडे या. समेटाचा कांहीं मार्ग निघतो का पाहूं." "आतां हीं समेटाचीं ठिगळें लावण्याचा मला अगदीं वीट आला आहे." मी स्पष्ट सागितलें.

## पांगुळगाडा

दुसऱ्या दिवशीं वैद्य सालिसिटरच्या घरीं आम्हीं तिघे व दोघे सालिसिटर जमलों. सहा वर्षांचा इतिहास मी त्यांच्यासमोर मांडला. दुसऱ्याच्या खांद्यावर बसून चालण्याची नारायणरावांची प्रवृत्ति त्यांच्या निदर्शनास आणली. ज्याच्या खांद्यावर नारायणराव सध्यां बसले आहेत तो मनुष्य कसा आहे हें तुम्ही जाणतां. तेव्हां ह्या पांगुळगाड्याबरोबर चालणें मला अशक्य आहे, असें निक्षून सांगितलें. परंतु नारायणराव पंडितांच्या मुठींत असले तरी धंद्यासाठीं मी तें पत्करावें असें त्यांचें मत पडलें. नारायणराव स्वतः भागीदार पण व्यवहारांत नारायणरावांऐवजीं नोकराला भागीदार समजून त्याच्याशीं वागायचें अशा भागीदाराच्या दोन स्वरूपाशीं मला कसें वागतां येणार? तेथून उठल्यावर "खरेंच, गणपतराव

तुम्ही कंपनी सोडणार काय ?" असा लाडांनीं मला प्रश्न केला. "कसेंहि करून गणपतराव गेलेच पाहिजेत असा नारायणरावांना सगळ्यांनीं बार भरलेला आहे. बोर्डांतील गृहस्थ या नात्यानें आपण विचारित असाल तर मी कंपनी सोडणार नाहीं. मित्र या नात्यानें विचारीत असाल तर मी या महारवाड्याला अगदीं कंटाळलों आहें. तेव्हां लवकर माझी मोकळीक झाली तर तें मला पाहिजे आहे." असें उत्तर दिलें.

रविवारीं ता. २३ रोजीं सौभद्र होतें. माझें तिसऱ्या अंकांतील काम संपल्यावर लाडसाहेबांनीं आंत येऊन मला शाबासकी दिली. मला खुलविण्याचा प्रयत्न होता हें मी जाणून होतों. मला विश्वासांत घेतल्यासारखें करून किती रक्कम घेऊन कंपनी सोडायला तयार अहांत असा प्रश्न त्यांनीं केला. "चाळीस हजार तरी मला मिळाले पाहिजेत. प्रत्यक्ष देवाण घेवाण करण्याच्या वेळीं थोडे कमी झाले तर मी फारसा विचार करणार नाहीं." नारायणरावांनीं तोड करायचें काम आपल्याकडे सोंपविलें आहे असें सांगून माझें मत त्यांनीं विचारलें. मी हरकत घेतली नाहीं. तेव्हां आमच्या दोघांच्या सहीचें ऐकटपत्र लिहून मागितलें. परंतु सहीनें कोणालाहि गुंतायचें नाहीं असा माझा निश्चय होता. ज्या अर्थी मी त्यांच्यावर विश्वास टाकला त्या अर्थी त्यांनींहि माझ्या बोलण्यावर विश्वास ठेवला पाहिजे, याची जाणीव त्यांना मी करून दिली. निःपक्षपातीपणानें ते जो निकाल देतील तो मी मान्य करीन असें त्यांना सांगितलें. दुसऱ्या दिवशीं सकाळीं आठ वाजतां त्यांनीं मला आपल्या घरीं बोलावलें.

## मुकाट्यानें पदरांत घे

सोमवार ता. २४।११।१९ रोजीं सकाळीं लाडांच्याकडे जातांना मातोश्रीच्या पायांवर डोकें ठेवलें. वत्सलतेनें अंगावरून हात फिरवून आई म्हणाली, "कसेंहि करून या त्रासांतून मोकळा हो. आज तीन महिने सारखा विचार करतो आहेस. झोंपसुद्धां पुरी घेतली नाहींस. बाबारे, आपण गरिबी अनुभवलेली आहे. काय मिळेल तें मुकाट्यानें पदरांत घे आणि परत ये. सरासरी अन्नाच्छादनाची तजवीज झाली म्हणजे पुरे. आपणांला गाडीघोड्याची इच्छा नाहीं." मातोश्रीची आज्ञा शिरसावंद्य

मानून निघालों. लाडांच्या घरीं पोहचलों तों ते माझी वाटच पहात होते. माझी समजूत घालण्याचा त्यांनीं पुष्कळ प्रयत्न केला. " अजून वेळ गेली नाहीं. हातांतून बाण एकदां सुटला म्हणजे तो परत येणार नाहीं. जोडा-यच्या ऐवजीं तोडायचें काम माझ्यावर आलें याबद्दल वाईट वाटतें. " त्यांच्या डोळ्यांत किंचित् पाणी चमकल्यासारखें मला वाटलें.मी निग्रहानेंच गेलों होतों. " तोडण्यासाठीं जितका जास्त वेळ जाईल तितका वेळ मला वेदना होत रहातील. काय ठरवायचें तें ठरवून मला मोकळा करा. " त्यांनीं सांगितल्याप्रमाणें रकमांचे आंकडे घालायच्या जागा सोडून मसुदा मी मराठींत लिहिला. ठरलेल्या कार्यक्रमाप्रमाणें दुक्कल येऊन खालीं बसलेली होतीच. त्यांना बोलावून आणलें. नारायणराव आनंदानें भरलेले दिसले. " आतां गंधर्व कंपनीचा उपभोक्ता मी " असा भाव पंडिताच्या चेहऱ्यावर उमटलेला दिसत होता. फारकत लिहून तयार आहे पण तुम्ही जमवून घेत असाल तर अजूनहि ती फाडून टाकतां येईल असें लाडांनीं नारायणरावांना सांगितलें. त्यावर नारायणरावांनीं नकारार्थी मान हालविली. त्यांची नजर जमिनीकडे लागलेली होती. " मीच नको अशी बोडसांची मागणी आहे तेव्हां मी काय बोलणार ? " पंडीत बोलले. नंतर माझ्याकडे वळून " अजून अहांत तसे यापुढेंहि रहा " असें लाडांनीं मला सांगितलें. मीहि नकार भरला. मला द्यायच्या रकमेचा आंकडा लाडांनीं २७००० लिहिला. मला त्यांनीं तो दाखविला आणि म्हणाले, " माझ्या सदसद्विवेकबुद्धीला जें वाटलें तें मी लिहिलें आहे. यांत नारायणरावांचें नुकसान केलें नाहीं अगर तुमचा फायदाहि केला नाहीं. रास्त वाटला तो आंकडा घातला. वाटल्यास कबूल करा नाहीं तर तुम्हां दोघांनाहि पुढचा मार्ग मोकळा आहे. " निमिषमात्र मी विचार केला. मातोश्रीच स्मरण केलें. वाढून आलेली लक्ष्मी झिडकारायची नाहीं असें मनांत आणून मी त्याला संमति दिली. नारायणरावांनींहि कबूल केलें. नंतर पहिला हप्ता केवढा देतां असें विचारतांच पंडीत म्हणाले पांच हजार; लाडांनीं सांगितले दहा हजार. नंतर बाकीचे सतरा हजार दरमहा एक हजार याप्रमाणें द्यायचे ठरले. नंतर मला शंका आली आणि मी म्हणालों, " माझ्या सतरा हजाराला तारण काय ? मला बुडविण्यासाठीं

उद्यां कंपनी विकली तर ? माझ्या रकमेची पूर्ण फेड होईपर्यंत कंपनी माझ्याकडे तारणगहाण पाहिजे." माझी मागणी कायदेशीर होती. त्या दोघांवर माझा विश्वास नव्हता. दरमहा दर शेंकडा दहा आणे व्याज तुट-मितीनें द्यायचें, लागोपाठ दोन हप्ते चुकल्यास कंपनीचें सामान लिलांव करून मी पैसे वसूल करायचे असें लिहून दोघां भागीदारांच्या सह्या झाल्या. लागलीच लाडांना नमस्कार करून मला मोकळा केल्याबद्दल मी त्यांचे आभार मानले. नारायणरावांनाहि नमस्कार केला. त्या वेळीं स्वतः थोडे कष्टी झालों आहों असें मला वाटलें. नारायणरावांनीं नुसता रुक्ष नमस्कार केला.

फारकत झाली. नंतर तारीख ३० पर्यंत तुम्ही काम कराल ना ? असें लाडांनीं विचारलें व तेथपर्यंत काम करीन असें आश्वासन मी दिलें.

## चिखलांतून बाहेर पडलों.

घरीं आलों. आईच्या पायांवर सद्गदीत होऊन मस्तक ठेवलें. आणि सगळी हकिकत तिच्या कानांवर घातली. आईनें माझ्या तोंडावरून हात फिरविला. त्यामुळें मला किती आनंद झाला, याची कल्पना ज्यांनीं अशी आपली कमाई मातृदेवतेच्या चरणांवर वाहिली त्यांनाच होईल. भागीदारीं-तून मोकळा होऊन गुंता गेला या आनंदांत स्नान केलें. भोजन वगैरे झाल्यावर हुदलीकरांचा निरोप आला होता म्हणून त्यांच्याकडे गेलों. त्यांनीं यशवंत नाटक मंडळीचा हक्क आतां तुमच्यावर प्रस्थापित झाला आहे असें सांगितलें. मी चौरंगी सामना पाहून इंदुरास येतों; मग काय तें पाहूं असें सांगून घरीं आलों. रात्रौ मातोश्री व पत्नी यांच्याबरोबर कुठें रहायचें, मुख्य ठिकाण कुठें करायचें वगैरेबद्दल चर्चा केली. धंद्याच्या जबाबदारीचा डोक्यावरचा भार उतरला. पण त्या दिवशीं रात्रीं श्रमाचा ताप येतो तसा ताप सुमारें १०४ डिग्रीपर्यंत भरला. दुसऱ्या दिवशीं डॉक्टरांनीं तपासून बुधवारच्या खेळांत काम करूं नका असें सांगितलें. त्याप्रमाणें मी लाडांना चिठी लिहिली. बुधवारीं मानापमान होतें. सकाळीं लाड आले. त्यांनीं माझ्या अंगाला हात लावून पाहिला तों ताप होताच. रात्रौ घाम येऊन ताप उतरला. गुरुवारीं दुपारीं श्री. दादासाहेब कुंटे समाचारास आले. मला म्हणाले, "इतक्या तडकाफडकी फारकत झाली ? मला कळलें असतें तर कांहीं

तरी तोंड निघाली असती" माझ्याजवळ असलेले कोल्हापुरच्या तिकिट-विक्रीचे तक्ते मीं त्यांना दाखविले आणि विचारलें "ही माझ्या डोळ्यां-देखत चाललेली लूट किती दिवस सहन करूं? याबद्दल चौकशी करायची म्हणजे नारायणरावांच्या कलिजाला हात घालण्यासारखें आहे. माझी अशी कुचंबणा चालली होती. तुम्हांला ही लूट सहन झाली असती का?" त्यांनीं ते तक्ते पाहिले. त्यांनीं आश्चर्य व्यक्त केलें आणि विचारलें, "आतां तरी मनानें मोकळे झालांत ना?" "माझ्या मातापित्याची पुण्याई पुष्कळ म्हणूनच या कंपनीच्या चिवड्यांतून, चिखलांतून बाहेर पडलों. आतां मनाला समाधान वाटत आहे." कुंटे निघून गेले तों केशवराव भोंसले भेटायला आले. मी कंपनी सोडली म्हणून त्यांनीं खेद प्रदर्शित केला व नारायणरावांनीं मोठी चूक केली असें म्हणाले.

## शपथ घे

नंतर कंपनींतील सुमारें दहापंधरा मंडळीनीं "गणपतरावांनीं कंपनी सोडली म्हणून आम्हीहि जाणार" असें नारायणरावांना नोटिसा देऊन कळविले होतें. ती मंडळी माझ्याकडे आली. त्या मंडळींनीं माझ्याकरितां कंपनी सोडली म्हणून त्यांची कांहीं तरी व्यवस्था करणें हें नैतिक दृष्ट्या माझें काम होतें. मला मिळालेल्या पैशांपैकीं दहा हजार रुपये मी देतों; त्याच्यावर तुम्हीं नवीन कंपनीची उभारणी करा असें सांगितलें. मात्र त्या रकमेपेक्षां जास्त एक पैहि मला देतां येणार नाहीं हें बजावून ठेवलें. त्या वेळीं ठकार, बोरकर प्रभृति मंडळींनीं "आमच्याकरितां एवढी रक्कम नाटकाच्या जुगारांत घालूं नका. आमची सोय कुठेंहि लागेल." असें म्हटलें. त्या मंडळीकडे प्रेमाश्रूंनीं भरलेल्या डोळ्यांनीं पाहिलें. मनांत आलें, "यांच्या तोंडानें परमेश्वरच बोलत असावा. हेच माझे खरे प्रेमी, खरे हितचिंतक." नाहीं तर नवीन कंपनीचें नांव निघतांच होहोहोचा गजर झाला असता. कंपनी काढली असती. काढली असती तर खात्रीनें चालली असती. पण नाटकाचा धंदा पडला परावलंबी. तरीसुद्धां नवीन कंपनी काढण्याचे विचार आठ पंधरा दिवस सारखे थैमान घालीत होते. मी स्वतः काम करणारा; तालीममास्तर; दगड तयार करीन हा अभिमान;

भांडवलासाठीं याचना करण्याची जरूर नव्हती. मिळतील त्या पात्रांना शोभून दिसतील अशीं नवीं नाटकें लिहून घेऊन कंपनी कां काढूं नये असें वाटे. हे माझे विचार पाहून आई म्हणाली, “ आतां तूं कंपनी काढूं नये आणि भागीदारीहि करूं नये अशी माझी तुला सांगी आहे. ” मी ठीक आहे म्हणालों. तेवढ्यावर तिचें समाधान झालें नाहीं. ती शपथ घ्यायला सांगूं लागली. “तुझी आज्ञा मला मान्य आहे असें मी सांगतों ही शपथच नाहीं का ? ” त्यानंतर नवीन कंपनी काढण्याचा विचार मनांतून अजिबात काढून टाकला.

शनिवारीं स्वयंवरांत काम केलें. रविवारीं मृच्छकटिक होतें. या शेवटच्या खेळांत काम केलें म्हणजे संपलें, अशा विचारानें थिएटरवर सुमारें दुपारीं अडीच वाजतां गेलों. तों एक मनुष्य बोर्ड रंगवीत होता. “ बाल-गंधर्व तापानें आजारी आहेत सबब आज पावसाचा सीन होणार नाहीं.” अशी सूचना होती. नंतर मी कपडे काढून रंगायला बसणार इतक्यांत घामाघूम झालेले पंडीत आले आणि म्हणाले, “ नारायणरावांना डॉक्टरांनीं काम करूं नका असें सांगितलें आहे म्हणून प्रयोग बंद आहे.” हें ऐकून मी कपडे चढविले. मनानें गंधर्व कंपनीच्या बाहेर पडलोंच होतों; परंतु आतां शरिरानें बाहेर पडलों.

बुधवारच्या प्रयोगाला थिएटरच्या भिंतीवर बाहेर जाहीर घोषणा केली होती—

**गंधर्व कंपनीच्या रंगभूमीवर आतां यापुढें गणपतराव बोडस कधींहि दिसणार नाहींत.**

———

# ५

# मिरास



## डायरेक्टर व जनरल मॅनेजर

शिलोत्री बँकेंतून पहिला दहा हजारांचा हप्ता घेतला. चौरंगी सामना पाहून एकटाच इंदुरास गेलों. तेथें गेल्यावर यशवंत मंडळीचें चालकत्व घ्यावें म्हणून बोलावलें आहे असें सांगण्यांत आलें. ज्या मंडळीच्या आधारावर कंपनी काढलेली आहे त्यांना अगोदर मी पाहिजे कीं नको तें विचारा मग विचार करूं, असें हुदलीकरांना सांगितलें. नंतर आम्हीं कंपनींत गेलों आणि त्यांनीं सरनाईक, जाधव, भडकमकर वगैरे सर्व मंडळींना, माझा उपयोग कसा होईल, माझें नाट्यशिक्षण घेणें किती जरुरीचें आहे हें समजावून सांगितलें. मंडळींनींहि आनंदाची गोष्ट आहे असें म्हणून पसंती दर्शविली. नंतर मी त्यांना कोणाच्याहि भिडेखातर हो हो म्हणूं नका, नीट विचार करा आणि सांगा, असें बजावलें. परंतु त्या वेळीं प्रत्येकानें अलभ्य लाभ झाला असेंच दर्शविलें. त्याप्रमाणें श्रीमंत होळकरांच्या समोर माझी सुनावणी झाली आणि "गणपतराव बोडस यांना दरमहा तीनशें रुपये पगार द्यावा, डायरेक्टर व जनरल मॅनेजर म्हणून हुद्दा असावा, आणि नफ्यांतूनहि भाग मिळावा" असा हुकूम झाला. वास्तविक या संस्थानी कारभारांत मी पडायला नको होतें. पण महाराज विलायतेला लवकरच जाणार आहेत तेव्हां मलाहि यूरोपच्या सफरीला जाण्याचा योग येईल असें मला भासविण्यांत आलें. त्या आमिषाला बळी पडून मी यशवंत मंडळींत सामील झालों. रंगभूमीवर काम करणें न करणें माझ्या इच्छेवर ठेवलेलें होतें. केलेंच पाहिजे अशी सक्ती नव्हती. तशी असती तर मी गेलोंच नसतों. याप्रमाणें लेखी हुकूम

गव्हर्निंग बॉडीकडून मला मिळाला. मी मुंबईस परत आलों आणि ता. १२।१।२० रोजीं मुंबईहून निघून ता. १३ जानेवारीला इंदूर येथें पोहचलों.

## बाजारबुणग्यांची भरती

इंदुरास प्रथम मी छावणींत रहात होतों. तेथून रोज कंपनींत येत असें. प्रथम नुसत्या तालमीलाच सुरवात केली. कंपनीचे जे आधारस्तंभ होते त्यांना भरभक्कम पगार होते. शिवाय त्यांचीं खासगी बिऱ्हाडेंहि कंपनींतच होतीं. त्यामळें त्यांची बरदास्त उत्तम रहात असे. परंतु मंडळीच्या जेवणाची मात्र फार अव्यवस्था होती. तीस तीस शेर रोज दुधाचा रतीब असून मंडळींच्या वांट्याला पारदर्शक ताक येत असे.

संशयकल्लोळ बसलें. फाल्गुनरावाचें काम पांडोबा क्षीरसागर यांस शिकवलें. प्रयोग लागला. प्रयोगाच्या अगोदर शंकरराव गावडे यांचा निरोप आला कीं सरकारांना बोडसांचें काम पहायचें आहे तेव्हां त्यांनीं फाल्गुनरावाचें काम करावें. मी नाहीं म्हटलें. पण सरकारांची अवज्ञा केल्यासारखें होईल असें हुदलीकरांनीं सांगितलें. एर्वी तेवीं आलोंच आहें तेव्हां काम करायचें कबूल केलें. त्याप्रमाणें जाहिरातींत प्रसिद्ध झालें. शुक्रवारीं रात्रौ सरकारांची तब्बेत बिघडली आहे असें कळलें, व शनिवारीं सकाळीं प्रकृती नादुरुस्त असल्यामुळें सरकार नाटकाला येऊं शकत नाहींत असा निरोप आला. जाहिरातींत प्रसिद्ध केल्याप्रमाणें मला मात्र काम करावेंच लागलें. एकदां केलें काय आणि अनेकदां केलें काय सारखेंच. सारांश, वरचेवर रंगभूमीवर येऊं लागलों. सरनाईकांकडे भोजनखातें; जाधवांकडे थिएटर; भडकमकरांकडे पैशाची देवघेव; अशीं कामें वांटलेलीं होतीं. जनरल मॅनेजर या नात्यानें प्रत्येक खात्याची तपासणी करूं लागलों, पण त्यांना तें आवडेना. विचारलेल्या प्रश्नाचीं सरळ उत्तरें देईनात. कित्येकांचीं कुटुंबें कंपनीच्या जागेंत होतीं तीं बाहेर काढलीं. त्यामुळें कंपनीच्या कोठीचा फायदा त्यांस मिळेनासा झाला. प्रत्येक खात्यांत आपआपले हस्तक स्वतःच्या सोयीसाठीं ठेवण्याचा सपाटा सुरू होता. हजेरीपटावर एकंदर सत्तर माणसें होतीं. त्यांत नाटकाच्या उपयोगाचीं

अशीं वीस. बाकीचे बाजारबुणगे गोळा केले होते. गव्हर्निंग बॉडीनें विचारलेंच तर इतकीं माणसें लागतातच हें उत्तर ठेवलेलें.

## बारभाई कारभार

सरकारांनीं माझ्यावर जनरल मॅनेजर नेमून जो विश्वास टाकला त्याप्रमाणें माझें कर्तव्य करणें भाग होतें. तें कर्तव्य करतांना इतर मंडळींना अप्रिय अशा गोष्टी कराव्या लागत. त्यामुळें माझ्या हातीं असलेला कारभार इतरांच्या डोळयांत सलूं लागला. उघड तक्रार करायला तोंड नव्हतें. त्यामुळें गुप्त खलबतें सुरू झालीं. अशा रीतीनें कंपनींत बेदिली उत्पन्न झाली. माझ्या ध्यानांत तें आलें. त्याप्रमाणें मी गव्हर्निंग बॉडीला कळविलें. नंतर त्यांची बैठक झाली. तेव्हां मला त्यांनीं विचारलें, "या चौघांच्या बरोबर तुमचें कां जमत नाहीं हें कळलें तर त्याचा योग्य विचार होईल." मी साध्या शब्दांत सांगितलें, "मी कंपनी सोडून जातों. आपण त्या तिघांकडे व्यवस्था सोंपवा. माझी जरूरच असेल तर तेवढ्यापुरता मी वेतनाशिवाय राहीन. ते होतकरू तरुण आहेत. त्यांना आतां तोच धंदा करायला पाहिजे आहे. माझें तसें नाहीं. पण या तिघांनीं एकमेकांच्या इतक्या कागाळ्या सांगितल्या आहेत त्यावरून या तिघांचेंहि एकमेकांशीं कितपत पटेल ही मला शंका येते." मग कशी व्यवस्था करावी असें विचारल्यानंतर मी त्यांना सुचविलें, "ही तुमची बॉडी, मॅनेजिंग कमिटी यांच्या मार्फत चाललेली व्यवस्था कुचंबणा करिते. तेव्हां सर्व व्यवस्था एक त्या तिघांच्या तरी स्वाधीन करा किंवा माझ्या एकट्याच्या तरी करा." त्या तिघांना माझ्या हाताखालीं काम करायला तयार आहांत का असा गव्हर्निंग बॉडीनें प्रश्न केला. त्यांनीं नाहीं म्हणून उत्तर दिलें. तेव्हां तुम्हीं राजीनामे द्या, असें त्यांना सांगतांच विचार करून उत्तर देऊं असें त्यांनीं म्हटलें. नंतर बैठक संपली. दुसऱ्या दिवशीं त्यांनीं माझ्या हाताखालीं वागण्याचें कबूल केलें व कंपनीचीं सर्व सूत्रें माझ्या हातीं देण्यांत आलीं. इतक्यांत इंदुरांत तापाची सांथ सुरू झाली म्हणून प्रयोग बंद करून सुट्टी घेतली.

## धंद्यांतलें तत्त्व

सुट्टीच्या अवधींत जीं अगदीं निरुपयोगी माणसें होतीं तीं काढून टाकलीं. कंपनीच्या उत्पन्नावर कंपनीचा योगक्षेम चालला पाहिजे हें धंद्यांतलें तत्त्व गव्हर्निंग बॉडीच्या गळीं आतां उतरलें होतें. पेन्शनेबल नोकरी, इनामें वगैरे भाषा कमी झाल्या.

## सरकारी कंपन्यांतील दोष

गंधर्व नाटक मंडळींत असतांना " निव्वळ सरकारी कंपनी काढली तर कसें ?" असें एका बडोद्याच्या गृहस्थांनीं मला विचारलें होतें. त्या वेळीं माझें असें मत मी प्रदर्शित केलें होतें. निव्वळ सरकारी अशी कंपनी चालणें शक्य नाहीं. कारण नाटकें व पात्रें लोकप्रिय असतील तरच कंपनी उत्तम चालेल. सरकारी पगार चालू असल्यावर लोकप्रिय व्हावें अशी महत्वाकांक्षा नटाच्या मनांत कशी उत्पन्न होणार ? धंदेवाल्या कंपनींत जर पात्रें चुकारतट्टूपणा करतात तर मग सरकारी कंपनींत विचारायलाच नको. शिवाय सरकारी कंपनीला सरकारांना आवडतील असेच खेळ करावे लागणार. सरकारची व लोकांची अभिरुचि जुळती रहाणें शक्य नाहीं. तेव्हां नाटक कंपन्यांना राजाश्रय असावा, पण तो प्रोत्साहनाकरितांच. बडोदें सरकारच्या वर्षासना इतकाच !

## कंपनी तुमची असती तर—

सुट्टीनंतर कंपनी बाहेरगांवीं न्यावी असा शंकरराव गावड्यांनीं हेतू प्रदर्शित केला. मी त्यांना समजावून सांगितलें, " मुंबईपुण्याकडे नेण्या-इतकीं पात्रें तयार नाहींत. नाटकें जुनीं. शिवाय मुंबईतील सर्व थिएटरें गुंतलेलीं आहेत. आडवाराकरितां भलतें भाडें द्यावें लागेल. तेव्हां लहान लहान गावें घेऊन एक दोन नवीन नाटकें बसवून मग मुंबईला कंपनी न्यावी. त्यावर ते म्हणाले, " उत्पन्न व खर्च याचा मेळ बसला नाहीं तर आम्हीं आहोंत. पाहून घेऊं. " " तुमचा पाठिंबा असेल तर कंपनी विला-यतेलादेखील न्यायला माझी हरकत नाहीं. " सुट्टींत मी मुंबईस गेलों आणि बाम्बे थिएटर जून व जुलै महिन्यांतील आडवारांकरितां ठरवून आलों. दर

आडवाराला दीडशें रुपये एवढें जबर भाडें त्या वेळीं द्यावें लागलें. शंकरराव मुजुमदार यांच्याकडून मानापमान नाटकाच्या प्रयोगाचा हक्क साडेसातशें रुपयांस घेतला. विद्याहरणाच्या परवानगीसाठीं पुण्यास खाडिलकरांच्याकडे गेलों होतों. "कंपनी तुमची असती तर गोष्ट निराळी. तुम्हीं राजाच्या कंपनीकरितां म्हणून परवानगी मागायला आलां आहांत तेव्हां त्या दृष्टीनें मला मिळकत झाली पाहिजे." असें त्यांनीं सांगितलें. "कंपनी तुमची असती तर–" हे शब्द ऐकून मला हंसूं आलें. राजानें काय द्यावें हें खाडिलकरांकडून कळलें नाहीं म्हणून परवानगी न घेतांच परत आलों.

इंदुरास हिंदी नाटकें बसवावीं असा या वेळीं बूट निघाला. त्याप्रमाणें एक मुसलमान कवि व यू. पी. मधले एक कनोजी गृहस्थ हे आले होते. मला स्वतःला हिंदी नाटकें आवडत नव्हतीं व अजूनहि आवडत नाहींत. त्यामुळें त्या कवींच्या बाबतींत मी लक्ष घातलें नाहीं.

सुट्टी संपल्यानंतर मानापमान रंगभूमीवर लागलें. मानापमानांतील कपडे करायला कापड घेण्याकरितां शंकरराव गावड्यांनीं जानकीलालच्या दुकानांत जायला सांगितलें. कापड घेऊन झाल्यावर दुकानदार माझी सही मागूं लागला. मी तें नाकारलें त्यामुळें कापड त्यानें दिलें नाहीं. गव्हर्निंग बॉडीला मी सर्व हकिकत कळविली. अखेरीस गावडे यांच्या चिठ्ठीनें कापड मिळालें. यशवंत कंपनीचें सामान माझ्या ताब्यांत दिलें त्या वेळीं चार्जपट्टीवर मी सही दिली होती.

## जूनामां जूना माल

इंदूरहून कंपनी मुंबईस आणली. संशयकल्लोळच्या पहिल्या दोन खेळांस मिळून १९०० रुपये उत्पन्न झालें. पहिल्या महिन्यांत सुमारें सात हजार रुपये मिळाले. दुसऱ्या महिन्यांत गडकरी यांचें भावबंधन घेऊन बलवंत मंडळी दक्षिण हैद्राबादहून मुंबईस आली. त्यांचे व आमचे प्रयोग एकाच वारीं होत. आमच्याजवळ नाटकांचा जूनामां जूना माल असल्या कारणानें उत्पन्न कमी होऊं लागलें. पंडीत व बलवंत मंडळी यांचें रहस्य या वेळीं फार जमलें होतें. बलवंत मंडळीच्या चालकांच्या मनांत निष्कारण स्पर्धा उत्पन्न झाली.

## देव पावला

गंधर्व कंपनी सोडल्यानंतर एक महिनाभर मुंबईस असलों म्हणजे 'निरनिराळे नाट्यप्रेमी लोक गंधर्व कंपनी कां सोडलीत, पंडितांनीं तुम्हांला कां काढून टाकलें असें विचारीत. पंडितांनीं मला खरोखरच काढून टाकलें आहे म्हणूनच मी कंपनीच्या बाहेर आहें. माझा कंपनीशीं असलेला संबंध तुटला नाहीं.पूर्वी भागीदार होतों; आतां सावकार आहें; गंधर्व कंपनी माझ्याकडे गहाण आहे असें सांगत असें. हें शल्य पंडितांना असह्य झालें. तुटमितीनें दोन हप्ते आल्यानंतर राहिलेले पंधरा हजार रुपये एका रकमेनें मला दिले. देव पावला !

## सुदामदेवाचें काम माझ्याकडे !

मुंबईहून यशवंत मंडळीचा मुक्काम हालवायच्या वेळीं बाहेरगांवीं प्रयोग करायला, फर्निचर, किटसनचे दिवे वगैरे साहित्य पाहिजे होतें. म्हणून वेळोवेळीं इंदुरला पत्रें लिहीत होतों. परंतु लवकर दाद लागेना. कंपनींत आलेल्या कनोजी कवींनी सुदामचरित्रावर नाटक लिहिले होतें. ते सुदाम्याचें काम माझ्यासारख्या लठ्ठ माणसाला करायला सांगत होते. हो हो म्हणून वळ मारून नेत असें. सदर कवींना किरकोळ खर्चाला म्हणून रोज तीन रुपये देण्याबद्दल गव्हर्निंग बॉडीची सांगी होती. मला स्वतःला गव्हर्निंग बॉडीच्या मंजुरीशिवाय पन्नास रुपयापेक्षां जास्त खर्च करायला अधिकार नव्हता. सोळा दिवस त्यांना तीन रुपयेप्रमाणें अठ्ठेचाळीस रुपये दिले. आणि सतराव्या दिवशीं माझ्या अधिकाराप्रमाणें दोनच दिले. अठराव्या दिवशीं आजची रक्कम द्यायला मला अधिकार नाहीं असें कवींना सांगतांच त्यांचें डोकें भडकलें. निघून जाण्याची त्यांनीं धमकी दिली. त्यांना वाटलें या शेवटच्या अस्त्रानें तरी रोज तीन रुपये मिळत रहातील. परंतु "जैसी आपकी इच्छा" असें मी त्यांना हंसत हंसत म्हणालों. तेव्हां ते थंड झाले.

कंपनींतला एक कारकून माझी इंदुरला जाणारीं पत्रें वाचून पहात असे. त्याला कारण विचारतांच त्यानें कुऱ्यांत उत्तर दिलें. तावडतोब

त्याला काम करूं नको म्हणून सांगितलें आणि गव्हर्निंग बॉडीला मी तें कळविलें.

या सर्व प्रकाराला कंटाळून राजिनामा लिहून पाठविला आणि कंपनीचा चार्ज कोणाकडे देऊं तें गव्हर्निंग बॉडीला विचारलें. राजिनामा परत घ्या; सर्व व्यवस्था करीत आहोंत अशी त्यांची तार आली.

मुंबईच्या मुक्कामांत सुमारें दहा हजार रुपये उत्पन्न झालें. दुसऱ्या महिन्यांत शनिवारीं दिवसा खेळ लावण्याची नवी टूम सुरू केली होती. त्यामुळें उत्पन्नाची घसरगुंडी सांवरली होती. मुंबईस येतांना इंदुराहून दोन हजार रुपये आणलेले होते. जळगांवचा मुक्काम गांठून पंधरा दिवसांचा रोजचा खर्च भागेल इतकी शिल्लक होती. मुंबईहून कंपनी रवाना केली आणि सर्व गोष्टींचा शहानिशा करून घेण्याकरितां इंदुरास गेलों. तों मातोश्रीची तब्बेत अगदीं ढांसळलेली होती. शक्तिपातहि बराच झाला होता.

## थोरांचा पोरखेळ

इंदुरास जाऊन हुदलीकरांच्या समवेत शंकरराव गावडे यांना भेटलों. कंपनी बंद करावयाची असा सरकारांचा दुसऱ्या दिवशीं तोंडी हुकूम आला. “ ठीक आहे. परंतु कंपनी बंद करून मंडळींची व्यवस्था करायला पांच ते सहा हजार रुपये लागतील ” असें मी सांगितलें. तिसऱ्या दिवशीं कंपनी चालू करा असा दुसरा हुकूम आला. तेव्हां “ मुंबईस न नेलेले पडदे, सीन वगैरे सामान येथें एक वॅगन राहिलें आहे तें जळगांवास पाठविलें पाहिजे असें सांगितलें. तें पाठवावें असें मला सांगण्यात आल्यावरून मी मॅनेजर यशवंतराव ठकार यांजकडून वॅगन भरून रवाना केली. त्याला ५।६ तास होतात न होतात तोंच कंपनी बंद करा असें फर्मान आलें.

या पोरखेळाची मला चीड येऊन तसाच जस्टिस कीर्तने यांजकडे गेलों. त्यांनीं “ गणपतराव, हें संस्थान आहे आणि गावड्यांच्या या सर्व कारवाया आहेत. ” असें सांगून कंपनी बंद करायला लागणाऱ्या खर्चाचें बजेट देण्यास सुचविलें. बजेट करून त्यांना दिलें. आणि मी आमच्या कुटुंबांतील मंडळींना घेऊन जळगांवास रवाना झालों.

जळगांवास पंधरा दिवस खेळ लागले नव्हते. इंदुरहून येतांच मी यशवंत कंपनी बंद होईल असें वाटतें असें मंडळींना सांगितल्यामुळें मंडळी हवालदील झाली होती. सर्व मंडळी माझ्या भोंवतीं जमली. सर्वांचीच गुरमी उतरलेली दिसली. मंडळींत "पुढें काय?" या प्रश्नावर खल सुरू झाला. सर्वांना मी आश्वासन दिलें होतें त्याप्रमाणें एक महिना पुरेल इतकें जेवणाचें साहित्य कोठींत भरायला सांगितलें. आणि त्यांना असा धीरहि दिला कीं तुम्हांला दुसरी कंपनी काढून चालवायची हिंमत असेल तर तुमच्यासाठीं विनामोबदला सहा महिनेपर्यंत मी राहीन. तुमच्या कंपनीची सर्व जुळणी करून देईन आणि तुम्हाला व्यवस्थित मार्गाला लावून नंतर मला जेथें जायचें असेल तेथें जाईन.

## स्वतःला मोकळें करून घेतलें

श्री. हुदलीकर दुसऱ्या दिवशीं आले. त्यांनीं मंडळींना "यशवंत कंपनी बंद करूं नये" असा सरकारना तारेनें अर्ज करून करुणा भाका असें सांगितलें. जनरल मॅनेजर म्हणून त्या तारेवर सही करण्याचा मला आग्रह करण्यांत आला. परंतु संस्थानच्या घडी घडी येणाऱ्या उलट्या-सुलट्या हुकमानें मी विटलों होतों. त्यामुळें अर्जावर सही करण्याचें मी नाकारलें. तेव्हां यशवंत कंपनी या नांवानेंच शेवटीं तार केली.

कंपनीची तार रवाना झाली त्याच दिवशीं दुपारीं तारेनेंच हुकूम आला कीं खर्च झालेल्या पैशाबद्दल जबाबदारी घेतली जाईल, तर कंपनी पुढें चालू करा. अशी जबाबदारी मला नको होती. भरमसाट पैसा खर्च करून काढलेली कंपनी घेण्यांत कोणताच फायदा नव्हता.

माझ्याशिवाय इतर सर्व मंडळींच्या सह्यांचा अर्ज पुनः कंपनी सुरू करण्याबद्दल हुजूरकडे गेला, आणि कंपनीचे खेळ सुरू झाले.

या कंपनींतील जबाबदार नटांना माझ्या हुकमतीखालीं वागणें कठीण वाटूं लागलें. मी येण्यापूर्वी कोणावर कसलेंच बंधन नव्हतें. मी आल्यामुळें माझें नियमबद्ध काम सुरू झालें. त्याचा परिणाम मंडळींत गट होऊन बेदिली उत्पन्न झाली. हें पाहतांच हुदलीकरांकडून संस्थानच्या

जबाबदारींतून मी स्वतःला मोकळें करून घेतलें. हुदलीकर संस्थानला जबाबदार आणि मी हुदलीकरांना जबाबदार असें लिहून घेतलें.

नंतर वरेरकरांना आणवून त्यांचें नरकेसरी हें जुनें गद्य नाटक ' लयाचा लय ' नांव देऊन संगीत करून बसविण्याचें ठरविलें.

## अनाहूत आमंत्रण

याच सुमारास एक दिवस ललितकलेचे मॅनेजर जळगांवास मजकडे आले. त्यांना केशवराव भोसल्यांनीं गदगहून माझ्याकडे रवाना केलें होतें. मी ललितकलेस मिळावें अशी केशवरावांनीं इच्छा प्रदर्शित केली होती. शितूतांच्या जवळ त्या वेळीं मी एवढेंच सांगितलें, " माझी आई आजारी आहे तेव्हां तिला बरें वाटेपर्यंत मला कसलाच विचार करतां येणें शक्य नाहीं. करतां केशवरावांची समक्ष गांठ पडल्यावर या विषयावर आपण बोलूं. नंतर शितून निघून गेले.

## मातृदेवतेला कायमचा पारखा झालों

इंदुरास असतांच माझ्या आईची तब्बेत अगदींच ढांसळली. शक्तिपातहि फार झाला. पुढें जास्त जास्तच खंगत जाऊन १९ सप्टेंबर १९२० रोजीं ती मला सोडून कायमची देवाघरीं गेली. त्या दिवशीं सकाळपासून ती सारखी मला बजावीत होती, " आज मला माझा भरंवसा वाटत नाहीं. कंपनींत जाऊं नकोस. माझ्यासमोर रहा." मरणापूर्वी दोन दिवस अगोदर माझ्या पत्नीला जवळ घेऊन पोटाशीं धरून ती पुष्कळ रडली आणि तिच्या अंगावरून हात फिरवून म्हणाली, " मी तुला छळलें, फार त्रास दिला. पण त्यांत माझी सून उत्तम व्हावी हाच हेतू होता. माझा संताप मला आवरत नसे. पण तूं आतां कांहीं मनांत आणू नकोस. तुला कांहीं कमी पडायचें नाहीं. हा माझा तुला आशीर्वाद आहे."

मरायच्या अगोदर एक तास आईनें खाटेजवळ मला बसवून घेतलें. माझ्या गळयांत हात टाकला. तिच्या डोळयांत पाणी आलेलें पाहून मी तिला म्हटलें " आई, तूं स्वस्थ पडून रहा. भिऊं नकोस." तेव्हां ती मला म्हणाली " मला कसलीहि भीति वाटत नाहीं. समोर दत्तमहाराजांची

तसबीर लाव. समोर दत्तात्रय आणि बाजूला तूं आहेस. आणखी मला आतां कोण पाहिजे ? तुला मुलगा असता तर मरतांना माझ्या आनंदांत कमतरता राहिली नसती. असो. दत्ताची इच्छा. ईश्वर तुला सुखांत ठेवील. रंगभूमीवर तूं कसाहि बोललास तरी लोक तुझ्यावर प्रेमच करतील हा तुला माझा आशीर्वाद आहे. ”

यानंतर अर्ध्या तासानें म्हणजे रात्रीं अकरा वाजतां माझी आई स्वर्गवासी झाली. तिचें और्ध्वदेहिक तेरा दिवसपर्यंत नाशकास केलें आणि तिच्या वर्षश्राद्धापर्यंत एकूण एक हजार रुपये खर्च करायचा संकल्प केला. त्याप्रमाणें वर्षश्राद्ध होईपर्यंत सातशें रुपये खर्च करून बाकीचे तीनशें १९२२ मध्यें अनाथ विद्यार्थीगृहास देऊन टाकले.

## माझी आई

माझी आई अतिशय तापट, करारी, तेजस्वी होती. संतापली म्हणजे काय आणि किती वेळ बोलत राहील याचा सुमार नसे. माझ्या द्वितीय पत्नीला कमी दिसतें त्यामुळें तिच्याकडून चुका होत. पण आई म्हणे ती मुद्दाम करते. आईचा करारीपणा, तापटपणा आणि हिशेबीपणा माझ्यांत पूर्णपणें आलेला आहे. लहानपणीं दरवर्षी मी सुट्टींत घरीं आलों म्हणजे वर्षाच्या पगाराचा हिशेब मला तिला द्यावा लागे. तिला बेरीज वजाबाकी येत नसल्यानें खर्चाची बेरीज करून दाखवितांना मी तिची गंमत करीत असें. १०१५ रुपयांचा दिलेला हिशेब तिला पटणार नाहीं असें वाटलें म्हणजे मी तिला म्हणे बारा सात एकवीस, एकवीस आणि दोन तेवीस, तेवीस आणि आठ पस्तीस, अशा रीतीनें आंकड्यांची गल्लत करून इष्ट बेरीज करून मी तिला दाखवावी.

परंतु पुढें तिनें मला सांगून टाकलें कीं आतां मला तुझा हिशेब नको. तुझी जबाबदारी तुला कळूं लागली आहे.

आई दर नाटकाला येई आणि पेंगूं लागे. तेव्हां झोप घेतेस तर थिएटरमध्यें कशाला येतेस असें मी तिला म्हटलें, म्हणजे तिनें मला म्हणावें “ रंगभूमीवर तुला पहावें म्हणून येतें रे. ” मलाहि त्यामुळें संवय झाली होती. रंगभूमीवर प्रवेश केल्याबरोबर मी माझ्या मातृदेवतेकडे

पहाव. लोक मला पाहून आनंदित झालेले दिसले म्हणजे तिच्या मुखावर हास्य व वत्सलता मला दिसे; मग काम करायला मला हुरूप येई.

आईचें प्राणोत्क्रमण झाल्याबरोबर "रंगभूमीवर मी गेल्यावर आतां कोण माझ्याकडे कौतुकानें प्रेमळ दृष्टि लावील असें मनांत येऊन दुःखाश्रूंचा पूर लोटला. माझ्यावरचें छत्र गेलें. माझ्या वयाच्या ४० वर्षां पर्यंत मातेचा प्रेमळ हात माझ्या अंगावरून फिरत होता. नाटक प्रयोग करून घरीं आल्यावरसुद्धां रोजच्याप्रमाणेंच आईजवळ बसून मी तिचे पाय चेपीत असें. पाय चेपूं लागलों म्हणजे "दमलास बाबा. आतां नीज जा" असें आईनें म्हणावें. आईनें "दमलास बाबा" असें म्हटलें म्हणजे माझे सगळे श्रम परिहार होत असत.

माझी आई अत्यंत सुग्रण होती. त्यामुळें खाण्याच्या बाबतींत मी चिकित्साखोर आणि खादाड झालों. अपचनाचा विकार मला झाला तेव्हां मी तिला म्हणे "तूं मला खादाड बनविलास. तुझ्या हातच्या बेसुमार खाण्यानें माझें पोट बिघडतें." त्यावर ती हंसे व म्हणे "बेतानें खावें." तेव्हां उत्तर देई "तूं चांगलें करतेस. त्याची रुची एकदां लागली कीं खातांना मला सुमार रहात नाहीं, त्याला मी काय करूं?"

माझ्या पत्नीलाहि माझ्या आईनें उत्तम शिक्षण देऊन सुग्रण बनविलें असल्यामुळें अजूनहि माझ्या स्नेह्यांसोबत्यांत खादाड या पदवीनें मी विभूषित आहें. प्रेमळ मातेच्या कितीहि आठवणी लिहिल्या तरी तृप्ति होणार नाहीं. जगांत मातेसारखें दैवत नाहीं. ज्यान आपल्या मातेला संतोष दिला त्याला जन्मभर कांहींच कमी पडणार नाहीं असा माझा विश्वास आहे.

माझी आई जुन्या काळची असल्यानें विधवा बायांनीं उपदेश घ्यावा या विधवाचाराच्या रूढीप्रमाणें तिनें एका सत्वस्थ ब्राम्हणाचा उपदेश घेतला होता. परंतु येईल त्या साधूच्या दर्शनाला किंवा सारखें पुराणकीर्तनाला जा असें कधींहि ती करीत नसे. व्रतें वैकल्यें करण्याची, ब्राम्हण भोजन घालण्याची तिला इच्छा असे आणि मनांत आलें कीं ती केल्याशिवाय रहात नसे.

माझे वडील वारले त्यावेळीं आईचें वय तीस वर्षांचें होतें. वडिलांच्या पश्चात् मरेपर्यंत ती एकदांच जेवीत असे.

आईच्या तेजस्वीपणाची एकच गोष्ट लिहितों. ती पुण्यास एका सधन घरांत स्वयंपाकास राहिली होती. माझी बहीण बिऱ्हाडीं बाळंत असतांना तिचें पथ्यपाणी करून ती नोकरीवर जाई. मालकीणबाईनीं "काशीबाई, आतांशा स्वयंपाकाला उशीर होतो. मुलांना शाळेंत जायचें असतें. त्यांना जेवण वेळेवर मिळत नाहीं. असें कसें चालणार?" असें एक दिवस आईला म्हटलें. मऊपणानेंच आईनें मालकीणबाईना सांगितलें "माझी मुलगी बाळंतीण आहे. क्वचित् उशीर होतो मला यायला. परंतु संभाळून घ्या." मालकांनीं माझ्या आईचे शब्द ऐकून "उद्यांपासून उशीर झाला तर दंड करूं" असे शद्ब आईला ऐकविले. त्याबरोबर "ठीक आहे', म्हणून लागलीच आईनें हात धुतले, दांडीवरचें लुगडें ओढून घेतलें आणि घरीं जायला ती निघाली. मालकीणबाईनीं विचारलें "जातां कुठं? स्वयंपाक अर्धाच राहिला आहे." त्यावर आईनें त्यांना उत्तर दिलें "मी लेकुरवाळी आहें. इतकें घड्याळाकडे पाहून मला काम जमणार नाहीं. कबूल केलेल्या कामापेक्षां दिवसभर तुमच्या घरांत जास्त काम करतें तें लक्षांत न घेतां मला दंड होईल म्हणतां तर अतःपर तुमच्या घरांत नोकर म्हणून जन्मांत कधींहि येणार नाहीं."

पुढें मालकांच्या मातोश्रींनीं येण्याबद्दल आईला पुष्कळ निरोप पाठविले. परंतु ती गेली नाहीं.

नंतर माझी स्थिति सुधारल्यावर माझ्या आईला जेवायला बोलावून त्या बाईनीं आपल्या बरोबरीनें पाटावर बसविलें. नेहमींच त्या अशा रीतीनें वागूं लागल्या. आईनें त्यांना म्हणावें "आपल्या शेजारीं पाटावर बसण्याची माझी योग्यता नाहीं." पण त्या प्रेमळ मालकिणीनें आईला उलट उत्तर द्यावें "काशीबाई, प्रसंगानें तुम्ही करीत होतां. पण आतां तुमचा बाबू लौकिकवान होऊन पुष्कळ पैसे मिळवितो आहे. माझ्या शेजारीं बसायला अगदीं संकोच करूं नका."

अशा माझ्या मातृप्रेमाला जळगांवास कायमचा पारखा होऊन कंपनी घेऊन नागपुरास गेलों.

# माझ्यावर मारेकरी

नागपुरास यशवंत मंडळीच्या रंगभूमीवर 'लयाचा लय' हें वरेरकरांचें नाटक मी आणिलें. प्रयोग चांगला झाला. मी मेहेनतीनें तो उत्तम बसविल्यामुळें प्रयोगावर आणि माझ्या नाट्यशिक्षणावर खुद्द वरेरकर बहाल खूष झाले. त्या मुक्कामांतल्या त्या प्रयोगाच्या पहिल्या नंबराचें उत्पन्न ६२७ रु. वरेरकरांना ठरविल्याप्रमाणें मी एका रकमेनें दिलें. त्या वेळीं "आपल्या नाटकाच्या हक्काबद्दलचा मोबदला एका रकमेनें असा आपल्या आयुष्यांत हा पहिल्यानेंच आपल्यामुळें मिळाला. आजपर्यंत बाकीच्यांनीं दमडी टोल्या करून पैसे दिले" असें वरेरकर सद्गदित होऊन मला म्हणाले.

वरेरकराच्या मतानें त्या वेळीं मी उत्तम तालीममास्तरहि ठरलों होतों; परंतु पुढे एकदां कारण नसतांना त्यांनीं मला निर्बुद्धहि ठरविलें होतें. वरेरकरांच्या स्वभावधर्माचा मला जो अनुभव आहे तो असा. ते ज्या कंपनीची ज्या वेळीं पोळी खात असतील त्या वेळीं तिची टाळी वाजवितील. ज्या चालकांच्या सहवासाला असतील तोच तेवढा त्यांना नमुनेदार चालक वाटेल. दुसरीकडे त्यांची वर्णी लागली कीं पहिल्याला ते लगेच नालायक ठरवितील. ज्या कंपनींत तळ ठोकतील त्या कंपनींतील नोकर लोकांनीं दांत ओंठ चावावे असेंच वर्तन ठेवतील; परंतु एकेकाचा स्वभावच तसा असतो त्याला काय उपाय ?

यशवंत कंपनींतील ज्या मंडळींना माझ्या शिस्तीखालीं वागायचें जमेना त्यांतील कांहीं अप्रबुद्धांनीं नागपुरांतील कांहीं गुंडांना गांठून, त्यांना पैसे चारून मला बेदम बडविण्याचा बेत केला होता. परंतु तो बेत सिद्धीला जाण्याच्या अगोदरच यशवंतराव ठकार यांनीं धोरणानें उघडकीस आणला. या बाबतींतील गुंडांनीं दिलेले कबुलीजबाब अजून माझ्यापाशीं आहेत. त्यांच्या मूर्खपणाची कींव करून ती गोष्ट मी सोडून दिली.

ज्या नोकरांना कंपनींत जेवायचें नसेल त्यांना पगाराशिवाय जेवणाचे वीस रुपये देण्याची रीत नागपुरास मी अमलांत आणिली.

# आकर्षक प्रलोभनें

मुंबईस जायच्या अगोदर हुदलीकरांना मला डिसेंबर अखेर मोकळा करण्याविषयीं निर्वाणीचें पत्र पाठविलें. याच सुमारास केशवराव भोसले यांनीं मी मुंबईस येण्याचा कांहीं संभव आहे काय ? असें विचारलें होतें. चौरंगी सामन्यास मी जाणार होतोंच. म्हणून तसें त्यांना कळविलें.

दादासाहेब कुंटे यांच्या घरीं केशवराव मला येऊन भेटले. केशवरावांनीं मला म्हटलें "इतके दिवस तुमचा फायदा नारायणरावांनीं घेतला. आतां तुम्ही आपला फायदा मला कां मिळूं देऊं नये ?" केशवरावांची कंपनी उत्तम चालली असतांना त्यांना माझी अवश्यकता कां वाटावी ? मी त्यांच्याजवळ माझ्या मनांत आलेला विचार बोललों. तेव्हां आपली सांपत्तिक स्थिति चांगली आहे परंतु आपली कंपनी लोक सेकंड क्लास समजतात, ती मी त्यांना मिळालों तर फर्स्ट क्लास होईल असा त्यांना भरंवसा वाटत असल्याचें त्यांनीं सांगितलें. त्यांनीं चिकाटीच धरली. मी कबूल होईना. तेव्हां त्यांनीं मला भागीदारी देण्याची गोष्ट काढली. पुनः आयुष्यांत भागीदारीनें धंदा करावयाचा नाहीं हें त्यांना मी हात जोडून सांगितलें. परंतु केशवराव पुरे चिकट. त्यांनीं "आपल्याला झेपेल असा पगार सांगा. पगारी राहिलां तरी तुमच्या माझ्या मानमरातबांत कसलेंहि अंतर राहणार नाहीं असें लेखी देतों. पण आमच्याकडे याच. हेंहि कबूल नसेल तर माझी कंपनी तुमच्या स्वाधीन करतों. सर्व जबाबदारी तुमच्यावर सोपवितों. मी तालमीला येईन. नाटकांत कामें करीन. मला जो पगार द्याल त्यावर मी संतुष्ट राहीन. कांहींहि करा परंतु नाहीं म्हणूं नका." अशा तऱ्हेचीं आकर्षक प्रलोभनें केशवरावांनीं माझ्यासमोर मांडलीं.

परंतु भागीदारीचा एक कटु अनुभव घेतलेला. त्यामुळें पुन्हां कोठेंच कोणाचा भागीदार व्हावयाचें नाहीं असा मी निश्चयच केला होता. शिवाय नारायणरावांच्या अगोदर केशवरावांनीं स्वतःचे सर्व भागीदार कमी करून ते एकटे मालक झालेले होते ही गोष्ट माझ्या नजरेआड झालेली नव्हती. तसेंच गंधर्व कंपनीच्या स्पर्धेसाठीं मी त्यांना पाहिजे होतों हें उघड होतें.

समजा मी त्यांच्याकडे गेलों असतों तर त्यांच्या भोंवतालच्यांनीं त्यांच्या कानांत कांहीं दिवसांनीं तरी विष ओतायचा क्रम सुरू केला नसता कशावरून? आणि गंधर्व कंपनीची पुनरावृत्ति केशवरावांच्या ललितकलेंत अनुभवावी लागली नसती हें तरी कोण सांगणार?

बरें. मी पगारी राहिलों असतों आणि केशवराव मालकच असल्यामुळें त्यांनीं माझ्याविषयीं कांहीं कारणामुळें एखाद्या वेळीं असंतोष दाखविला नसता याला तरी आधार काय? तसें झालें असतें तर मला मरणप्राय दुःख होऊन पगारी राहण्याचा मूर्खपणा मी कां केला असें माझें मलाच वाटलें असतें. मन अस्वस्थ झालें असतें. आणि मग माझ्याकडून उत्तम काम तरी कसें वठलें असतें?

याशिवाय केशवरावांची स्वतः पगारी राहण्याची केवळ एक भपकी आहे हें न समजण्याइतका मी असमंजस नव्हतों. आणि कंपनीच्या त्या वेळच्या स्थितीवरून ती व्यवहार्य नव्हती. आणि पहिल्यापासून माझी किर्लोस्कर कंपनीची परंपरा असल्यामुळें स्वदेशहितचिंतकच्या परंपरेंत मला रुळतां येण्यासारखें नव्हतें. किंवा त्यांची परंपरा मला रुळणारी नव्हती. या सर्व गोष्टी लक्ष्यांत घेऊन केशवरावांना नाखूष न करतां यशवंत कंपनीचें जूं माझ्या मानेवर आहे. त्या खालून मी मोकळा होतों आणि मग पुनः आपण एका ठिकाणीं बसून विचार करूं असें सांगून त्यांना वाटेला लावलें.

## गंधर्वांची द्रौपदी

भयंकर कर्ज काढून कपड्याच्या भपकेबाजपणाची हौस ज्या नाटकांत गंधर्व मंडळीनें पुरवून घेतली तें खाडिलकरांचें द्रौपदी नाटक कुंटे यांच्या आग्रहावरून पहायला गेलों. द्रौपदींतील पात्रांची भाषणपद्धति ऐकून जुन्या पौराणिक नाटकांतील पात्रांची आठवण झाली. लांब हेल काढून रडण्याची नवी कला नारायणरावांनीं आत्मसात् केलेली पाहून गंमत वाटली.

## देशभक्त अच्युतराव यांच्या हस्तें मानपत्र

नागपुरास वेरेरकरांच्या मदतीनें सर्व हिशेब नीट नेटके केले. कॉंग्रेसच्या धामधुमीनें व वऱ्हाडांतील देशभक्त नागपुरास व्याख्यानांची

झोड उठवीत असल्यामुळें नाटकाचीं थिएटरें रिकामीं पडूं लागलीं. पैसा मिळत नाहीं म्हणून मुक्काम हालविण्याबद्दल कंपनींतील मंडळींची टुमणी लागली. परंतु कॉंग्रेसच्या आठवड्यांत कंपनीला चांगलीच प्राप्ति होणार ही मला खात्री होती. अनुभवानें ती खरी ठरली. कॉंग्रेसच्या आठवड्यांत रोज प्रयोग केले. सहा हजारांचीं तुंबलेलीं बिलें भागविलीं. सर्व मंडळींचे राहिलेले पगार चुकते केले. दुकानदार थिएटरवाले यांचींहि बिलें दिलीं.

फुकट नाटक पहाणाऱ्या नागपूरच्या गुंडाबद्दल फार प्रसिद्धि आहे. त्या गुंडांतील एक गुंड आपलासा करून घेऊन बाकीच्या गुंडांचा बंदोबस्त केला.

रेल्वे स्टेशनवरच्या मंडळींना फुकट नाटकें दाखविण्याची खंडणी द्यावी लागते. त्याप्रमाणें रीतसर मी नागपूरच्या स्टेशनवरील लोकांना कांहीं खुर्चीचे, कांहीं इतर जागांचे पास पाठविले. परंतु अन्नछत्रात जेवतांना मिरपूड मागणाऱ्या वृत्तीचें अनुकरण करून खुर्चीचे पास मिळतील तरच नाटकाला येऊं असा मुर्दाडपणाचा निरोप स्टेशन मंडळीकडून आला. सध्यां ही पिडा टळली असें म्हणून तीन महिने मीहि स्वस्थच राहिलों. अखेरच्या आठवड्यांत स्टेशनवरचे एक गृहस्थ आम्हाला सूचना देऊन गेले, कीं मुक्काम हालवतांना स्टेशन स्टाफ कंपनीला त्रास देणार आहे. सूचना देणाऱ्यास मी उलट स्टेशन स्टाफला कळण्याकरितां सांगितलें कीं होळकर सरकारांची ही नाटक मंडळी आहे. त्रास झाला तर होळकर सरकार व रेल्वे कंपनी पाहून घेतील. तुम्ही दिलेली सूचना इंदुरास सरकारकडे कळवून ठेवतों.

माझी ही निश्चयपूर्ण दमदाटीची मात्रा लागूं पडून माझा कार्यभाग झाला. दुसऱ्या नाटकाला स्टेशनचे लोक आले आणि प्रकरण वाढवूं नका असें मलाच सांगूं लागले.

नाटक कंपन्यांना गुंडगिरीचा त्रास किती होतो हें जगजाहीर आहे. तरीपण १९०७ सालापासून ४–५ वेळां मी नागपूरच्या प्रेक्षकांसमोर गेलों. त्या सर्व वेळीं नागपूरकरांनीं माझें कौतुकच केलें आहे. गुंडांचा त्रास मला केव्हांहि झाला नाहीं.

नागपुराहून इंदुरास जातांना शंकरराव सरनाईकांच्या स्वाधीन कंपनी करण्याविषयीं मी शिफारस करावी अशी त्यांनीं इच्छा प्रगट केली. आणि ता. १ जानेवारी १९२१ रोजीं ते माझ्याबरोबर इंदुरास आले. गव्हर्निंग बॉडीकडून शंकररावांना चार्ज देण्याबद्दल व त्यांनीं माझ्याकडून चार्ज घेण्याबद्दल पत्रें मिळवून ता. ४।१।२१ रोजीं नागपुरास परत आलों. त्या दिवशीं चार्ज देऊन शंकररावांच्या सहीची पावती घेतली. महिन्याच्या वरच्या दिवसांचा पगार घेऊन त्याचीहि पावती दिली.

यशवंत कंपनीचें फक्त २६० रुपयांचे बिल राहिलें होतें तें देण्याचा हवाला शंकररावांनीं घेतला. आणि मी यशवंत कंपनीच्या जबाबदारींतून मोकळा झालों. सामान आवरून ७ जानेवारी १९२१ रोजीं स्टेशनवर आलों. शेवटच्या प्रयोगाच्या वेळीं दे. भ. अच्युतराव यांच्या हस्तें मंडळीनें मानपत्र दिलें आणि निघतांना हार घालून गौरवपूर्वक मला निरोप दिला.

## मनोरथ निष्फळ कां झाले ?

नागपूरहून निघाल्यानंतर रस्त्यांत माझ्या मनांत विचार येत होते. यशवंत कंपनींतील सहकाऱ्यांनीं शिस्तीनें वागून मला साथ दिली असती तर मी उत्तम नाटकें मिळविलीं असतीं; अभिनयाचें शिक्षण मनासारखें देऊन उत्कृष्ट नट बनविले असते. यशवंत मंडळी सर्व दृष्टींनें नमुनेदार अशीच बनवून दाखविली असती. परंतु नाट्यकलेचें दुर्दैव असें कीं नाट्याचा धंदा स्वीकारणाऱ्या नटाच्या मनांत स्वतःच्या योग्यतेचा फाजील विश्वास, एकमेकांना नामोहरम करण्याची प्रबल प्रवृत्ति, दुसऱ्या नटाबद्दल मत्सर, इतरांबद्दल अविश्वास, आपण नाटकांत असलों तरी समाजाचे एक घटक आहोंत या जाणिवेचा पूर्ण अभाव, आणि बेदरकार व बेफाट वृत्ति या गुणांचा सुळसुळाट जेथें आहे तेथें माझ्यासारख्या एकट्याच्या तळमळीचें तुणतुणें कोण ऐकणार ? दरिद्र्याच्या मनोरथाप्रमाणें माझ्या मनांत विचार आले व शेवटीं ते निष्फळ झाले. चालू नाटक कंपन्यांचा असा सत्य अनुभव मी घेतला.

# पुनः गंधर्व नाटक मंडळी

मुंबईस कुंटे यांच्याकडे उतरलों. पंडितांचें बिऱ्हाड कुंटे यांच्या घरांतच त्या वेळीं होतें. गंधर्व कंपनी कर्जाचें उच्च शिखर गांठण्याचा मार्ग आक्रमीत होती.

एका वर्षाखालीं यशवंत मंडळी मी चालवायला घेतली. तेव्हां गंधर्व कंपनी प्रत्येक महिन्याचें आपलें कॅलेंडर काढूं लागली होती. त्यांत गत महिन्यांतील उत्पन्नाचे भरभक्कम आंकडे व पुढील महिन्याच्या प्रयोगांचा प्रोग्राम असे. अशीं एकदोन कॅलेंडरें कंपनीकडून मजकडे आलीं होती. उद्देश हा कीं मी कंपनींतून गेलों तरी उत्पन्नाचें मान वाढतेंच आहे हें मला कळावें. दुसरें कॅलेंडर मला मिळालें, तेव्हां नारायणरावांना मी एक पत्र पाठविलें तें पुढील आशयाचें:

> " आपलें वाढतें उत्पन्न पाहून मी आपलें अभिनंदन करितों. उत्तरोत्तर तुमचें वैभव वाढत राहो. परंतु तुमच्या वैभवाच्या कोठारांत उंदीर घुशी फार झाल्यामुळ तें रिकामेंच राहील अशी भीति वाटत आहे. "

माझे पत्र गेल्यानंतर मात्र कॅलेंडर आलें नाहीं. परंतु पुढें तें बंदच झालें. कारण कळलें तें असें कीं इन्कमटॅक्स फार बसेल, सबब भरमसाट आंकडे प्रसिद्ध करूं नका अशी कोणी तरी कंपनीला कानपिचकी दिली.

कुंटे यांनीं मला स्वतःची प्रॉमिसरी देऊन माझ्याकडून वीस हजार रुपये कर्जाऊ पंडितांना देवविले. दोन महिन्यांनीं ते सव्याज मला परतहि मिळाले.

पंडितांनीं मला पुनः कंपनींत बोलावण्याविषयीं कुंटे यांच्याशीं कारवाई सुरू केली. माझ्याजवळ विषय निघाला. मी स्पष्ट नकार दिला. नंतर दोघांनीं कांहीं अटींचा करार करून माझ्यापुढें ठेवला. त्या अटींशीं पूर्ण विसंगत अशा अटी मी लिहून दाखविल्या. तेव्हां कुंटे म्हणाले "जुळविण्याच्या दृष्टीनें या तुमच्या अटी दिसत नाहींत." मला जुळवायचेंच नाहीं असें उत्तर मी दिलें. तरीहि लाड, कुंटे, पंडीत आणि मी अशी बैठक झालीच. त्यांत भागीदार म्हणून आपल्याला बोलावीत असाल तर

पुढें बोलूं असें मी म्हटलें. "आम्हांला खोटे यांचें साठ हजार कर्ज आहे." या त्यांच्या सांगण्याला "तुमचें तुम्ही फेडा" असेंच उत्तर द्यावें लागलें. आणखी कांहीं वाटाघाटी झाल्या. नफ्यांत वांटणी देतों असा प्रश्न त्यांच्याकडून आला. नफा झाला अगर तोटा झाला हें कोण ठरविणार? मला हिशेब दाखवायचे नसतील तर लाड, कुंटे, वैद्य सॉलिसिटर यांनीं हिशेब तपासणी करावी, आणि त्यांनीं सांगावें असें उत्तर मी दिलें. त्याबरोबर मात्र "आमच्या हिशेबाच्या लगामाच्या दोऱ्या माझ्या हातांत आहेत त्या कायदेशीर रीतीनें कोणाच्याहि हातांत द्यायला तयार नाहीं. गणपतरावांचें व माझें (गणपतरावांचें व नारायणरावांचें नव्हे) याच बाबतींत बिनसलें. पैशांची देवघेव पूर्णपणें माझ्या हातांत यायला पाहिजे होती......" पंडितांनीं आपलें खरें स्वरूप प्रकट केलें. त्या वेळीं मी लाड व कुंटे यांना "पहा हें असें होतें—असें आहे" हें तेथेंच पटवून दिलें. ती बैठक उठली.

मी मिरज गांठली. भाड्यानें घर घेऊन राहिलों. परंतु एका महिन्यानें अचानक एक दिवस कुंट्यांनीं तार करून मला मुंबईस बोलाविलें. मी गेलों. पुनः २।३ दिवस वाटाघाटी झाल्या. कुंटे व लाड यांनीं माझ्याबद्दलची सर्व जिम्मेदारी पत्करली. "आमच्यासाठीं एक वर्ष या. पुढें नारायणराव चांगले वागले तर पहा. नाहीं तर मोकळे व्हा. आमचें कांहीं म्हणणें नाहीं."

मी कबूल केल्यावर तुम्हांला काय द्यायचें असें विचारण्यांत आलें. तेव्हां मी उत्तरादाखल सांगितलें "गंधर्व कंपनीच्या बोलावण्यानें मी येत नाहीं. तुमचा मनुष्य म्हणून येणार आहें. अशा स्थितींत मला काय पाहिजे असें विचारतां तर मला कांहीं नको. तुम्ही जें द्याल तें इतकेंच कां असें म्हणणार नाहीं. मुळींच कांहीं दिलेत नाहीं तर कां दिलेंत नाहीं म्हणूनहि विचारणार नाहीं. नाटकांत काम करण्यापलीकडे गंधर्व कंपनीशीं माझा कांहीं संबंध राहणार नाहीं. तालमी घेण्यास त्यांनीं बोलावलें तरच जाईन."

उभयतांच्या विचारें गंधर्व कंपनींत माझें जाण्याचें ठरलें. मिरजेहून मंडळीना घेऊन मार्चच्या सुरवातीस मुंबईस आलों. दुसऱ्या आठवड्यांत रविवारीं संशयकल्लोळ प्रसिद्ध झाला.

प्रयोगाच्या अगोदर दोन दिवस पंडीत बाहेर लोकांना " गणपतराव नोकर म्हणून कंपनींत आणले " असें सांगत असल्याची बातमी मला समजली. तें कळतांच माझें काय ठरलें आहे याबद्दल पंडितांनीं जाहीर खुलासा करायला पाहिजे असें कुंटे यांना सांगितलें. त्यांनींहि पंडितांना खुलासा करण्यास सूचना दिली आणि त्याप्रमाणें पंडितांनीं " गणपतरावांचा गंधर्व कंपनीशीं सेव्यसेवकभावाचा संबंध नसून त्यांना नारायणरावांनीं कलाप्रेमामुळें बोलावल्यावरून ते कंपनीस मिळाले आहेत " अशा तऱ्हेचा मजकूर आपल्या सहीनें 'संदेश' वर्तमानपत्रांत प्रसिद्ध केला.

मी गंधर्व कंपनी सोडल्यानंतर थिएटरच्या भिंतीवर " गणपतराव बोडस गंधर्व कंपनीच्या रंगभूमीवर दिसणार नाहींत " हीं लिहिलेलीं अक्षरें पहिल्या प्रयोगाच्या दिवशीं पंडितांनाच पुसणें भाग पडलें आणि गंधर्व कंपनीनें आपण होऊनच पुनः मला बोलाविलें.

## पगडी मोडली आहे

संशयकल्लोळ प्रयोगाला प्रेक्षकांची तुफान गर्दी झाली. माझ्यावरचें नेहमींचें प्रेम प्रेक्षकांनीं पूर्णपणें व्यक्त केलें. प्रयोगाच्या सुरवातीस पंडितांनीं मला " नेहमीं घालतां ती पाठारे प्रभूशाही पगडी न घातल्यास चालणार नाहीं का ? कारण डॉ. त्रिलोकेकर कपनीचे प्रेमी आहेत. त्यांच्यासारखा तुमचा सर्व वेष दिसतो. त्यामुळें ती आपली थट्टा आहे असें त्यांना वाटण्याचा संभव आहे." अशा तऱ्हेची विनंति करून ती पगडी न घालण्याविषयीं सुचविलें. मी " उत्तम आहे. पगडीवर काम अवलंबून नाहीं." असें म्हणून दक्षिणी ब्राह्मणी पागोटें घालून काम केलें. पहिला अंक झाल्यावर मधल्या वेळांत ५।२५ मंडळीनीं ती पगडी कां नाहीं याबद्दल मला विचारलेंच. मी त्यांना " ती मोडली आहे " असें हंसून सांगितलें.

अशा रीतीनें मी गंधर्व कंपनींत प्रेक्षकांच्या समोर येण्यास पुनः प्रारंभ झाला.

## अस्तोदय

तारीख १५ एप्रिल रोजीं माझी प्रमिला ही द्वितीय कन्या गोवराच्या आजारानें मृत्युमुखीं पडली आणि मे महिन्यांत मला पुत्ररत्नाचा लाभ झाला.

## नाटकांतला नट शेतकरी कसा झाला?

मला मुलगा झाला तेव्हां आपल्याजवळ रोकड असली तर नफ्याच्या इच्छेनें कुठेंतरी गुंतविण्याची आपल्याला बुद्धि होईल. नाटकाशिवाय दुसऱ्या धंद्याची माहिती नसल्यामुळें त्या धंद्यांत नफ्याच्या आशेनें मुद्दलहि गमावलें जाईल असा विचार आला. जमिनीची हौस लहानपणापासून होतीच म्हणून जमिनी घ्यायला प्रवृत्त झालों. सहा महिन्यांत जमिनींत वीस हजार रुपये गुंतविले. मिरज मळा संस्थानांतील बोरगांव येथें जमिनी खरेदी केल्या. लोकांकडून सावधगिरीबद्दल व शहाणपणाबद्दल आजपर्यंत धन्यवाद मिळविले होते त्यामुळेंच स्थावरांत पैसे गुंतविण्याची सुबुद्धि मला झाली. माझ्या शेतीबद्दलची हकीगत मनोरंजक व हास्यरस उत्पन्न करणारी आहे; ती लिहायला फारच पानें अडतील अशी भीति वाटते. सबब त्याबद्दल थोडक्यांतच लिहितों.

जास्त नफ्याची आशा धरली तर नफाहि नाहीं व मुद्दलहि नाहीं असा प्रकार झाला असता. आतां स्थावरांत नफा नाहीं परंतु मुद्दल मात्र शाबूत आहे.

ब्राह्मणवर्गाला शेतकी धंदा म्हणून करणें कधींहि लाभदायक होणार नाहीं. जो शेतींत घरचें भांडवल खर्ची घालतो त्याला माझ्या अनुभवाप्रमाणें एवढाच फायदा कीं पाऊस पाणी वेळेवर पडलें तर लागवडीकरितां घातलेलें भांडवल निघून घरखर्चापुरतें धान्य पदरांत पडतें. शेतीच्या मालाचे भाव मंदावल्यामुळें सध्यां अशी परिस्थिति आहे. शिवाय अशा परिस्थितींत दलालांचीं दुकानें चालविणारे व दुकानाशिवाय दलाली करणारे लोक शेतकऱ्याला किती नाडतात याची कल्पना दुसऱ्याला येणार नाहीं.

तें कसेंहि असलें तरी मी नट असूनहि लहानपणापासूनच्या हौसेमुळें व आपल्या झालेल्या मुलाला आपण मिळविलेलें निश्चित रहावें म्हणून वीस हजार रुपये जमिनींत गुंतवून शेतकरी झालों खरा.

## कर्जवैभवाचा कळस झाला

गंधर्व कंपनी मी सोडली त्या वेळीं खुद्द गंधर्व कंपनीला एक पैचेंहि कर्ज नव्हतें. परंतु सव्वा वर्षानें मी कंपनींत पुनः आलों तों कर्तबगार मॅने-

जर आणि कलासंवर्धनाचा इष्ट पुरवून घेणारे हौशी मालक कर्जवैभवाच्या शिखरावर बसलेले. माझ्या सहा वर्षांच्या कारकीर्दीत कंपनी काढण्यासाठीं धारकरांचें सहा हजार सातशें पंचाहत्तर रुपयांचें काढलेलें कर्ज अवघ्या सुरवातीपासूनच्या दहा महिन्यांत फेडलें होतें. इतकेंच काय परंतु रंग सीलींग खरेदीसाठीं १९१६ मध्यें एकदां लाड व वैद्य यांच्याकडून उसनवार घेतलेले दोन हजार रुपये तीन महिन्यांत परत केले होते. सहा वर्षांच्या माझ्या कारकीर्दींत कर्जाचा डाग कंपनीला लागला नव्हता. कारण कर्ज म्हणजे मानहानी, लाचारी असें मला स्वतःला वाटतें. म्हणून मी कर्जाचा डाग असें लिहिलें.

कंपनी सोडण्याच्या वेळीं एकदां कर्जाच्या गोष्टी निघाल्या असतां " गंधर्व कंपनीसारख्या कंपनीला पांच पन्नास हजार कर्ज म्हणजे तें कर्जच नव्हे. एवढा बिझिनेस आहे. तेथें इतकें कर्ज असणारच. कारण कर्ज ही धंद्यांतली पत आहे. " असें एक गृहस्थ म्हणाले होते.

कंपनी लाडांनीं ताब्यांत घेतली ही बातमी मला कळल्यानंतर प्रथम मी बाहेर बाहेर शोध घेतला. ता. ४ जून रोजीं दिवसा प्रयोग होता. सकाळीं १० वाजतां लाडाच्या घरीं मी गेलों, तों सोलापुराहून नुकते पंडीत आलेले. त्यांना कंपनींत जाऊं न देतां स्टेशनवरून परस्पर आपल्या घरीं लाडांनीं आणविलें. मी गेलों तों त्यांच्याशीं ते बोलत बसले होते. मला पहातांच ते बाहेर आले आणि म्हणाले " तुम्ही दिलेली कर्जाची बातमी खरी आहे. " मी त्यांना पंडितांच्या हालचाली पाहून व ऐकून वरचेवर कर्ज वाढत आहे म्हणून सांगत असें. परंतु त्या वेळीं त्याना तें खरें वाटत नसे. ते पुढें म्हणाले, " गणपतराव, तुम्ही दिलेली कर्जाची बातमी खरी आहे. आणखी किती लोकांचीं कर्जे आहेत कळत नाहीं. आतां तुम्ही जा. मग सावकाशीनें मी तुम्हांला बोलावून घेईन. "

नाटकाच्या वेळीं दुपारीं मी नारायणरावांना विचारलें " मी हें काय ऐकतों ? " तेव्हां " बाळासाहेबांच्या मांडीवर मी विश्वासानें मान ठेवली आणि बाळासाहेबांनीं केसानें ती कापली " असें नारायणराव म्हणाले. मी नारायणरावांना " झालें तें झालें. घाबरूं नका. आतां तरी कंबर कसून

कर्ज फेडा. " अशा शब्दांनीं धीर दिला. वास्तविक माझा धीर उगीचच होता. कारण कर्जाची रक्कम ऐकून धीर सोडणारे नारायणराव खात्रीनें नव्हते.

कंपनीला कर्ज कां व्हावें याबद्दल चौकशी करितां मला जें समजलें तें असें.

(१) कंपनीच्या उत्पन्नाचा व खर्चाचा मेळ बसत नव्हता. खुद्द कंपनीच्या खर्चापेक्षां नारायणरावांचा आणि पंडितांचा खासगी खर्च कंपनीच्या उत्पन्नाला झेपणारा नव्हता.

(१) कंपनीच्या उत्पन्नापैकीं शनिवारचें व रविवारचें उत्पन्न पंडीत आपल्यावर सोलापुरास चाललेल्या कज्जाच्या खर्चासाठीं उचलून नेत असत. त्यामुळें मंडळीचे पगार तुंबले होते.

(१) कंपनींतून एकंदर पाऊण लाख रुपये पंडितांनीं उचलले होते आणि तसे ते नेत असतांना नारायणरावांनीं त्यांना एका शब्दानेंहि अडथळा केला नाहीं.

(१) कंपनीवर आणि खर्चावर देखरेख नसल्यानें बाजारमास्तर व कारकून या दोघांनीं एक वर्षांत भोजनखर्चांत सुमारें दहा हजार रुपये खाल्ले.

(१) नारायणरावांचें ग्रहमान ठीक नाहीं असें मद्रासी ज्योतिषाकडून त्यांच्या मनावर बिंबवून पंडितांनीं एक घर स्वतःच्या नांवानें मुंबईस खरेदी करण्याचा करार फक्त दहा हजार बयाणा देऊन केला. घर बिझिनेसच्या नांवाखालीं घेऊन त्यावर नफा मिळवून त्यांतून नारायणरावांचें कर्ज हलकें करायचें होतें. परंतु दोन लक्ष पांच हजाराला घेतलेल्या घराला दीड लाख कोणी देईना. तेव्हां दहा हजार बयाण्यावर आणखी पांच हजार दक्षिणा देऊन आणि हातापाया पडून तो करार कसाबसा रद्द केला. हाहि पैसा प्रामिसरी नोटवर नारायणरावांच्या सह्या घेऊन काढलेला होता.

( १ ) जबर व्याजानें मुलतानी व्यापाऱ्यांकडून कर्ज काढून मनोती ब्रोकरेज, ह्यापायीं पैसा नाहींसा केला. १०००० कर्ज काढायचें. सर्व दलाली जाऊन सरासरी ९००० रु. पदरांत घ्यायचे. पुढच्या तारखांचे

चेक लोकांना दिलेले असायचे. त्या तारखा चुकूं नये म्हणून वाटेल त्या व्याजानें रकमा काढून याचें काढून त्याला, त्याचें काढून तिसऱ्याला, असें चक्र चालविण्यांत कमिशनच्या रूपानें हजारों रुपये गडप झाले.

( १ ) कंपनींतून गणपतराव जातील कीं नाहीं हें सांगणाऱ्या ज्योतिषाला एक हजार रुपये दिले होते.

( १ ) कोल्हापुरास जातांना मिरज स्टेशनवर रेल्वेच्या लोकांनीं पंडितांना पकडलें. ती केस पुनः होणार आहे अशी उठलेली हूल दब-विण्यासाठीं एक हजार रुपयांची खैरात करण्यांत आली असें ऐकलें.

( १ ) मी कंपनी सोडल्यानंतर पंडितांना दीडशें रुपये पगार पुरत नाहीं म्हणून त्यांना नारायणरावांनीं पांचशें रुपये पगार घेण्याची परवानगी दिल्याचेंहि ऐकिलें.

पेट्रोल महाग झालें होतें. परंतु गंधर्व कंपनीच्या मोटारीच्या पेट्रोलचें बिल महिना ७००–८०० रुपये होत असे म्हणे. कंपनींतील तिकीटविक्री करणारे, डोअरकीपर यांच्यावर कोणाचच नियंत्रण नसल्यानें ती मंडळी मनसोक्त चरत होती.

या एकंदर बातम्या ऐकून एवढें कज होण मुळींच अशक्य नाहीं असें वाटलें. या कर्जाशिवाय माझें २७००० देणें, द्रौपदी नाटकासाठीं भरजरी सामान, सोन्याचा मुलामा चढविलेले चांदीचे मुगूट वगैरेंच्या ७२००० रुपयांची भर. शेवटीं गंधर्व कंपनी कर्जबाजारी होऊन सावका-राकडे ताबेगहाण पडली. कंपनीच्या सामानावर 'मॉर्गेजी इन पझेशन' अशा पाट्या फडकल्या आणि गंधर्व कंपनीचा कर्जवैभवाचा कळस झाला.

कंपनी लाडांनीं ताब्यांत घेतल्यानंतर आपण कंपनी सोडावी हें बरें असा विचार येऊन कुंटे यांना तो सांगितला. मी आल्यापासून मला कुंटे यांच्यामार्फत लाड दर महिना तीनशें रुपये देत असत आणि मुंबईच्या खर्चासाठीं मी न मागतां ते पाठवून देत. अशा वेळीं मी कंपनी सोडूं नये असा कुंटे यांनीं मला सल्ला दिला. त्यामुळें तो बेत त्या वेळीं रहित केला. नारायणरावहि मोकळेपणानें बोलून मला सल्लामसलत विचा-रीत असत.

# केशव नारायण यांचे संयुक्त प्रयोग

जूनपासूनच गंधर्व कंपनी पुण्यास जाणार होती. परंतु खोटे यांच्या साठ हजार कर्जाशिवाय आणखी कोणाकोणाचें किती कर्ज आहे याची छाननी करून त्याबद्दलची पुढील सर्व व्यवस्था लावण्यासाठीं कंपनीला मुंबईसच तीन महिने मुक्काम वाढवावा लागला. या वेळींच टिळक स्वराज्य फंड सुरू झालेला होता. तो फंड गोळा करणारांपैकीं कांहीं सद्-गृहस्थांनीं गंधर्व व ललितकला यांचा संयुक्त प्रयोग करण्याबद्दल नारायण-रावांना गळ घातली. नारायणरावांनीं त्या गोष्टीला मान्यता दिली.

जुलै महिन्यांत संयुक्त मानापमान नाटकाचा प्रयोग झाला. त्या प्रयोगाला पंधरा हजारांवर उत्पन्न झालें. हा प्रयोग स्वदेशकार्यासाठीं होता. त्यानंतर सौभद्र हा दुसरा संयुक्त प्रयोग ठरविला. त्यांत काम करावयाला मी नकार दिला. त्या बाबतींत लाडांनीं मला विचारलें असतां मी त्यांना उत्तर दिलें कीं नैतिकदृष्ट्या एक वर्षभर गंधर्व कंपनींत काम करायला आपण शब्दानें बांधले गेलों आहों. गंधर्व व ललितकला या संयुक्त कंपनींत काम करायला मी बांधलेला नाहीं. पहिला प्रयोग राष्ट्र-कार्यासाठीं होता. त्यांत काम करणें हें माझें कर्तव्य होतें. परंतु आतांचा प्रयोग दोन कंपन्यांच्या चालकांनीं आपल्या स्वतःच्या फायद्यासाठीं लावला आहे. तेव्हां त्या फायद्यांत मला अंशभागी करतील तरच आपण काम करूं; नाहीं तर नाहीं.

एक वर्ष काम करीन अशा मी दिलेल्या आश्वासनाच्या शब्दांत पकडून लाडांनीं मला दुसऱ्या खेळांत काम करण्यासाठीं केलेल्या प्रश्नाला माझें वरील व्यवहार्य उत्तर लाडांनाहि मान्य करावें लागलें. तरीसुद्धां "साल अखेर तुमचा विचार करूं. परंतु आतां हा विषय बोलूं नका. कारण बाकीची मंडळी बिथरतील" असें लाडांनीं सांगितलें. माझें बोलणें त्यांनीं ऐकलें एवढ्यावरच मी समाधान मानून घेतलें. परंतु पुढें करूं, पुढें विचार होईल, माझ्यावर भरंवसा ठेवा, अशी गोडगोड भाषा बोलणारे म्हटल्याप्रमाणें कधींच व्यवस्था करीत नसतात असा मला अनुभव होता.

# तें वर्ष कसें गेलें ?

सप्टेंबर सुरवातीला गंधर्व कंपनी पुण्यास आली. मी आपल्या मंडळीस मिरजेस रवाना करून खाणावळींत जेऊं लागलों. दोन तीन प्रयोग झाल्यानंतर मला ताप येऊं लागला. खोकलाहि सुरू झाला. १९१५ पासून मी तंबाखू खाणें अजिबात सोडून दिलें होतें. परंतु इंदुरास १९२० पासून गमतीनें चिरूट, सिगारेट अधून मधून ओढायला लागलों. खोकला यायला आपलें धूम्रपान कारण झालें असें ध्यानांत येतांच सिगारेट हातांतून टाकली, ती कायमचीच.

अंगांत ताप असतांना एका प्रयोगाच्या वेळीं रंगभूमीवर काम करतांना प्रत्येक वाक्य उच्चारते वेळीं भयंकर ठसका येऊं लागला. तेव्हां नारायणरावांना सांगून दुसऱ्या दिवशींच सकाळच्या पहिल्या गाडीनें मिरजेस रवाना झालों.

मूळव्याधीनें ऑक्टोबर महिन्यांत अत्यंत बेजार झालों, तेव्हां डॉ. वॉनलेसकडून मूळव्याधीवर ऑपरेशन करून घेतलें. खोकला मात्र अजून पहिल्यासारखाच होता.

कंपनीकडून काटदरे यांचीं "दोन प्रयोगांसाठीं तरी या, उत्पन्न अगदीं कमी होत आहे" अशीं पत्रें येत होतीं.

माझा मुलगा नोव्हेंबरमध्यें वारला त्या वेळीं घरांतल्या घरांत या खोलींतून त्या खोलींत कष्टानें जावें लागे इतकी अशक्तता मला आली होती.

तशाहि स्थितींत मला बोलावून नेण्याकरितां दादा काटदरे स्वतः मिरजेस आले. त्यांना आठ दिवसांनीं नक्की कळवितों असें सांगून पत्र पाठविलें. त्याप्रमाणें दोन संशयकल्लोळ प्रयोगासाठीं गेलों. रंगभूमीवर उभें रहावत नव्हतें, पाय कांपत होते, अशक्ततेनें आवाज ओढला होता तरीसुद्धां पुण्याच्या प्रेक्षकांचें माझ्यावरील प्रेम पहिल्यासारखेंच दिसून आलें. दोन प्रयोगाला सव्वीसशें रुपये उत्पन्न झालें. ते प्रयोग करून मिरजेस परतलों.

आठच दिवसांनीं " बडोद्यास कंपनी जाणार आहे. बडोद्यास या." अशी नारायणरावांची तार आली. बडोद्यास गेलों. तेथील सर्व प्रयोगांत काम केलें. शेवटच्या दिवशीं बडोद्याच्या मंडळींना गंधर्व मंडळीनें मेजवानी दिली. तेव्हां मलाहि भोजनास बोलावलें. या खेपेस कंपनीकडे काम करण्यास गेल्यापासून कंपनींत जेवायला मी कधींच गेलों नव्हतों. मी निश्चयच केला होता. म्हणून मेजवानीस जाण्याचें प्रथम मी नाकारलें. परंतु फारच आग्रह झाला तेव्हां आपण आपला निश्चय वर्षभर पाळला. घरीं जाण्याचे दिवस जवळ आले. थोडक्याकरितां आतां कशाला अढी ठेवा, असा विचार करून मेजवानीस गेलों.

लाड यांच्यातर्फे दादा काटदरे यांना गंधर्व कंपनीवर देखरेख करण्यासाठीं मुखत्यार नेमिलें होतें. म्हणून काटदरे यांच्यामार्फत बडोद्यासच लाडांनीं " एक वर्षानंतर पुढें तुमचा विचार काय आहे " असा माझ्या कडील भेद काढायला सुरवात केली होती.

" मी वर्षभर राहीन या शब्दांतून आणखी १८ दिवसांनीं मी मोकळा होणार आहें. आज १० तारीख आहे " असें मुंबईस जातांच लाडांना सांगून विचारलें, कीं " प्रथम प्रयोगापासूनच मी नसलों तर माझ्या आजारीपणाची सबब तुम्हाला सांगतां येईल. कांहीं प्रयोगांत काम करून मध्येंच सोडून गेलों तर धंद्याच्या दृष्टीनें तें ठीक नव्हे असें मला वाटतें. तेव्हां आपल्याला जसें ठरवावेंसें वाटेल तसें ठरवा. " लाड माझ्याविषयीं काढीत असलेल्या भेदाला मी वरीलप्रमाणें उत्तर दिलें होतें. परंतु लाडांनाहि माझें म्हणणें पटून त्यांनीं १० तारखेपासूनच मला मोकळें केलें.

मी निरोप मागितल्यानंतर लाड व कुंटे हे एकत्र बसले आणि मी कंपनीकडे एकंदर नऊ महिने काम केलें. तीन महिने आजारी होतों. म्हणून महिना ५०० प्रमाणें ९ महिन्यांचे साडेचार हजार रुपये मला द्यावयाचे असें त्यांनीं ठरविलें. दरमहा तीनशें रुपयांप्रमाणें २४०० रुपये मला पोंच झाली होती. बाकीचे २१०० रुपये दरमहा हप्त्यानें फेडले जातील असें मला सांगण्यांत आलें.

कंपनींत रहाण्याविषयीं लाडांनीं मला पुष्कळ आग्रह केला. परंतु प्रकृति ठीक नाहीं या सबबीवर मी रहाण्याचें नाकारलें. आणि फेब्रुवारी

मध्याला नाटक कंपनीचा धंदा सोडून शेतीवर राहून विश्रांतिसुख घेण्या-साठीं मिरजेस आलों.

दिपवाळीपर्यंतचा दोन महिन्यांचा काळ मिरजेस काढला. नंतर दोन महिने शेतीवर जाऊन राहिलों. पाण्याच्या हलाखीमुळें मिरज गैर-सोईची वाटून कबजेगहाणानें एक घर घेऊन १९२३ च्या जानेवारी १ तारखेपासून सांगलीस राहूं लागलों.

मिरजेस असतांना ललितकलादर्श संगीत मंडळीचे केशवराव भोसले पुण्यास ऑक्टोबर महिन्यांत निवर्तल्याचें वर्तमान आलें. त्या वेळीं गंधर्व कंपनी पुण्यासच होती.

## नारायण श्रीपाद राजहंस ऊर्फ बालगंधर्व

किर्लोस्कर कंपनीमध्यें १९०५ सालीं नारायणराव आले. त्या वेळीं हा एक साधा भोळा अव्यवहारी मुलगा आहे अशीच लहानापासून थोर ा पर्यंत सर्वांची त्यांच्याविषयीं समजूत झाली. अर्थातच नारायणरावांबद्दल प्रत्येकाला असें वाटूं लागलें कीं असा गुणी मुलगा आणि त्याचा असा भाबडा स्वभाव तेव्हां याचें जगांत व्हायचें कसें ? यामुळें येणाऱ्या जाणाऱ्या प्रत्येकानें नारायणरावांची चौकशी करावी.

नारायणराव कंपनींत ज्या वेळीं आले त्या वेळचे कंपनीचे मालक व व्यवस्थापक नारायणरावांचें निष्कारण कौतुक करणारे नव्हते. इतकेंच काय परंतु प्रत्येक जाणता माणूस नारायणरावांचें निष्कारण भलतेंच कौतुक करण्याच्या भानगडींत कधींच पडला नाहीं.

आणि कदाचित अशामुळेंच कौतुक करणारी बाहेरचीं माणसें नारायणरावांना भेटत गेलीं. आणि त्या मंडळींच्या काळजी वाहण्याच्या बोलण्यानें नारायणराव त्यांच्या भजनीं लागले. याचा परिणाम असा झाला कीं नारायणरावांच्या भोंवतीं त्यांच्या दोस्तांचीं मंडळामागून मंडळें जमूं लागलीं.

माझ्या कल्पनेप्रमाणें नारायणरावांच्या भोंवतीं एकामागून एक अशीं पुढीलप्रमाणें मंडळें जमलीं—

**पहिलें मंडळ**—गोविंदराव टेंबे आणि कोल्हापूर येथील त्यांच्या छायेखालील कांहीं मंडळी. यांतच बाळासाहेब पंडीत सामील होतात.

**दुसरें मंडळ**—पंडीत, धारकर, गोपाळराव पेठकर आणि यांची अनुषंगिक इतर मंडळी.

**तिसरें मंडळ**—लाड, पंडीत, माधवराव सप्रे, गोविंदराव जोशी वगैरे मंडळी.

**चौथें मंडळ**—पुण्याचे खाडिलकर बंधु, वसंतराव देसाई, पापा चिपळूणकर, सातपुते बंधु वगैरे मंडळी.

**पांचवें मंडळ**—नारायणरावांची आपल्या आईबद्दल प्रथम पूज्य बुद्धि होती तेव्हांची त्यांची आई. पंडितांनीं नारायणरावांना मंत्र दिल्यावर आईबद्दल तिरस्कार उत्पन्न झाला तेव्हां ती मंडळांतून वगळली. नंतर नारायणरावांची पत्नी आणि तिच्या अनुषंगानें आप्तांतील इतर मंडळी.

या सर्व मंडळींनीं प्रथमपासून नारायणराव भोळा, मूर्ख आहे; रंगभूमीवर त्यानें फक्त काम करावें, गावें आणि आम्ही सर्वांनीं त्याची काळजी वहावी. अशाच प्रकारचा नारायणरावांच्या मनावर एकसारखा परिणाम करण्याचें काम ते कंपनींत गेल्यापासूनच चालविलें होतें. आणि तें खरेंच धरून नारायणरावांनीं आपल्या सर्व कारभाराचीं सूत्रें कंपनीबाहेरच्या माणसांच्या हातीं दिलीं.

नारायणराव भोळे आहेत असा कयास बांधून ज्यांनीं त्यांचें हितचिंतन यथाशक्ति यथामति चालविलें होतें त्या सर्वांना नारायणरावांनीं शेवटीं सपशेल तोंडघशीं पाडिलें आहे.

नारायणराव आहेत तोंपर्यंत तुमच्या मुठींत राहतील. परंतु बिथरले कीं एकदम इतकी उलट खातील कीं तुमची आणि त्यांची ओळख तरी होती कीं नाहीं असें दाखवतील.

नारायणरावांच्या स्तुतिपाठकांनीं पुष्कळ वेळां ते उदार आहेत अशी बिरुदावली गायिली आहे. परंतु एकाद्या सत्कृत्याला त्यांची मदत झाली आहे असें एखादें तरी उदाहरण दाखविता येईल कीं नाहीं याबद्दल प्रश्न आहे. भरमसाटपणें उधळपट्टी करून, गैरहिशेबी राहून नारायणरावांनीं

आपलें औदार्य प्रकट केल्याचीं उदाहरणें दाखविलीं गेलीं आहेत. एखादा होतकरू विद्यार्थी नारायणरावांच्याकडे गेला आणि मदत मागूं लागला तर ते गरीबीच्या लाचारीचा चेहरा करून "तुम्हाला मदत करण्यासारखी माझी परिस्थिति नाहीं. मला कर्ज आहे." असें म्हणायला त्यांना कांहींहि वाटणार नाहीं.

मदत मागण्यास आलेल्या विद्यार्थ्यास तोंड वेंगाडून ज्या नारायणरावांनीं परत लावावें तेच नारायणराव त्याच बैठकींत त्यांच्याकडे एखादा कापडवाला, अत्तरवाला अगर त्यांची साथ करणाऱ्यापैकीं एखादा त्यांचा नोकर आला म्हणजे एखाद्या जहागीरदारानेंहि लाजावें अशा प्रकारचीं हजारों रुपयांचीं अत्तरें घ्यावींत. तशीच कपड्यांचीहि कारण नसतांनासुद्धां खरेदी करावी अगर त्या नोकरास लोक तोंडांत बोट घालतील इतकी देणगी सहज द्यावी.

ज्यामुळे आपल्या नांवाचा जयजयकार होईल, नांव लौकिक वाढेल अशा एखाद्या ठिकाणीं देणगीचा हात मुक्तपणें सोडण्यांत महशूर असलेले पूर्वीचे काशीनाथपंत छत्रे, त्यांचाच कित्ता गिरविणारे ललितकलेचे केशवराव भोसले आणि या दोघांच्या पावलावर पाऊल टाकून चालणारे आपले बालगंधर्व होत.

धर्मार्थ प्रयोग करून त्याचें उत्पन्न नारायणरावांनीं मनाचा प्रेमळपणा दाखवून पुष्कळ वेळां पुष्कळ संस्थांना दिलें आहे ही गोष्ट खरी. परंतु अशा तऱ्हेचे धर्मार्थ प्रयोग म्हणजे जनता आणि नाटक मंडळी यांच्यामधील एक प्रकारची देवाणघेवाण असते. यामुळें नारायणरावांचें तशा प्रकारचें दातृत्व बावनकशी ठरूं शकत नाहीं. टांगेवाल्याला सहा आणे भाडें ठरविलें असलें तरी त्या टांगेवाल्यास नारायणराव रुपया देतील. त्यांतले पैसे परत मागणार नाहींत. अशाबद्दल कोणी त्यांना विचारलें तर ते टांगेवाल्याच्या बायकापोरांच्या गरीबीबद्दल कळवळा दाखविल्याखेरीज रहावयाचे नाहींत. सारांश नारायणरावांच्या देणगीचें लक्षण अशा प्रकारचें असे.

माझ्या मतें दातृत्वाचें खरें लक्षण म्हणजे देणगी देतांना कीर्तीची इच्छा न बाळगतां देणगी देणें. तें दान पुनः सत्पात्रीं असेल तरच तें दातृत्व ठरेल. नाहींपेक्षां प्रत्येक उधळा माणूस कर्णासारखा दानशूर ठरेल.

एखाद्या माणसाबद्दल प्रेम उत्पन्न झालें कीं त्या मनुष्याबद्दल मग एवढी आपुलकी आणि भक्ति नारायणराव आचरणांत आणतील कीं नारायणरावांकडे पहाणारा अचंब्यानें तोंडांत बोट घालील. पुनः ती भक्ति, तें प्रेम, तो आदर केव्हां आणि कां नष्ट होईल त्याचाहि भरंवसा नाहीं. म्हणजे एकदां हें टोंक तर दुसऱ्या वेळीं अगदीं विरुद्ध टोंक अशी नारायणरावांची वागणूक नेहमीं दिसेल.

मनांत एखादी गोष्ट आली आणि ती खर्चाची तशीच नुकसानीचीहि आहे असें कोणी नारायणरावांना सांगितलें तर ते त्या गोष्टीपासून मागें न येतां उलट हट्टाला पेटून ती गोष्ट ते करणारच करणार. अशीच नारायण-रावांच्या मनाची ठेवण आहे.

ज्याच्या गळ्यांत नारायणराव आतां गळा घालतील त्याची एक घट-केनेंच उचलबांगडी कांहींहि खेद न दाखवितां निर्विकार मनानें करतील.

ज्योतिषी, साधुसंत, बुवा, व्रतें, वैकल्यें यांमध्यें नारायराव यांनीं स्वतः, त्यांच्या पत्नी आणि मातोश्री या सर्वांनींच एखाद्या जहागीरदाराला खालीं पहायला लावण्यासारखे हजारों रुपये उधळले आहेत.

१९३० मध्यें गंधर्व कंपनीचा महिन्याचा खर्च आठ ते नऊ हजार असे. परंतु त्याच वेळीं नारायणरावांचा स्वतःच्या कौटुंबिक मंडळीसाठीं वैयक्तिक खर्च दरमहाचा अडीच ते तीन हजार रुपये असे. इतका करून-सुद्धां पुनः उत्पन्न पुरत नाहीं अशी ते ओरड करण्यांत कसूर करीत नसत!

नारायणरावाचें शिक्षण अगदींच सामान्य असल्यामुळें त्यांना स्वतः वाचून नाटकांतील मर्म समजत नसे. तरीहि बहुतेक नाटककारांना आपलें नाटक नारायणरावांनीं वाचून पाहून पसंत करावें अशी इच्छा असे. तसें ते करीतहि तें काहीं अंशीं बरोबर आहे. नारायणराव कंपनीचे मालक. त्यांच्यावर लक्ष्मीची पूर्ण कृपा. ज्याच्याजवळ द्रव्य तो सर्वज्ञ, सर्व गुणांनीं युक्त हा जगन्मान्य सिद्धांत तर आहेच. परंतु कळो अगर न कळो नाटक-

काराच भाग्य उघडण्याचा कौल नारायणरावांनीं द्यायचा असल्यानें नाटककार त्यांच्या पसंतीची इच्छा धरीत यांत नवल असें कांहींच नाहीं.

स्वतःची कल्पना चालवून एकहि भूमिका नारायणरावांनीं कधींच केली नाहीं. दुसऱ्यांनीं शिकविल्याखेरीज भूमिका त्यांना समजतच नाहीं. परंतु दुसऱ्यानें त्यांना कोणतीहि भूमिका एकदां समजावून दिली, आणि तें नाटक त्यांना आवडलें असलें म्हणजे मात्र नारायणराव न कंटाळतां पूर्ण नादीपणानें, मनोभावानें ती भूमिका बसवून रंगभूमीवर उठावदार करतील.

नाटक कंपनी हा धंदा आहे. नाट्य ही कला आहे. असा विचार न करतां नाटक कंपनी ही आपल्या वैयक्तिक चैनीसाठीं आहे अशाच विचारानें खर्च चालवून ही कामधेनू शेवटचा रक्ताचा थेंब येईपर्यंत तिचें आंचळ ओढल्यामुळें हैराण होऊन गेली, यांत काय नवल ?

**व्यवस्थेशीर केला तर नाटकाच्या धंद्यासारखा राजस धंदा नाहीं. पण तोच गलथानपणानें केला कीं यासारखा पाताळांत नेणारा दुसरा एकहि धंदा नाहीं.**

नारायणरावांच्यामधील स्वभावदोषामुळें गंधर्व नाटक मंडळीची दुर्दशा झाली. याशिवाय दुसरें कारण कोणतें असणार ?

## दुसरी बाजू

नारायणरावांचें गायन ही अलीकडील काळांतील एक अलौकिक गोष्ट आहे. असा सुरेलपणा, असा लाडकेपणा, सरळ तानेचा असा स्वच्छपणा भाऊराव कोल्हटकरांच्या पश्चात् एका नारायणरावाशिवाय एकाहि गाणाऱ्या पात्रांत आजपर्यंत आला नाहीं हें अगदीं सत्य आहे. भाऊराव कोल्हटकरांचा आवाज पल्लेदार, गोड, मोठा, बारीक, हवा तसा लवचीक; दाणेदार तान कीं जशी वीज चमकली असा होता.

नारायणरावाचा आवाज–पल्लेदार नसला तरी कानाला अवर्णनीय आनंद देणारा अशा तऱ्हेचा गोड. त्यांच्या आवाजांत तंबोऱ्यासारखी एक जव्हारी वाजते तोच गोडपणा. आवाज लहान जातीचा, तान दाणेदार.

भाऊरावांचें गाणें रसानुकूल तर नारायणरावांचें गाणें बैठकीसारखें; श्रोत्यांच्या भावना उद्दीपित करण्याची शक्ति भाऊरावांच्या गाण्यांत तर

आनंदानें झुलत ठेवण्याची करामत नारायणरावांच्या गाण्यांत. पदांतील शब्दांचे भाऊरावांचे उच्चार स्पष्ट तर नारायणरावांचे शब्द चावीत चावीत अस्पष्ट. भाऊरावांच्या काळांत जें गाणें महाराष्ट्रांत लोकप्रिय होतें त्या गाण्यांत भाऊराव परिपूर्ण होते. नारायणरावांच्या ऐन ज्वानींत मलकाजान, गोहरजान, मोजुद्दीन यांसारख्या कलावंतांचें गाणें लोकप्रिय असे. तें गाणें नारायणरावांनीं आत्मसात् केलें आणि त्या जोरावर महाराष्ट्राला पंचवीस वर्षेपर्यंत अखंडपणें झुलविलें आणि झुलवीतहि आहेत.

नारायणराव सर्व गाणीं शास्त्रशुद्ध गात नाहींत. एका रागांत दुसऱ्या रागाच्या सुरांची भेसळ होते. परंतु एका रागांत दुसऱ्या रागाचे सूर मिसळतांना इतका सुंदर मिलाफ आणि गोडी उत्पन्न होते कीं शास्त्रशुद्ध गाणारांनींसुद्धां राग बिघडला हें विसरून जाऊन नारायणरावांची वाहवाच केली आहे. त्यांना ही ईश्वरदत्त देणगीच आहे. बेढंगी अगर बेसूर आवाज शक्य तों ते कधींच लावीत नाहींत. नारायणरावांच्या गाण्याला " रसगुल्ला " या पक्वान्नाची अगर साखरेच्या पाकांतल्या रसरसीत पाक ठिबगत असलेल्या जिलबीची उपमा शोभेल.

मला पुष्कळ लोकांनीं भाऊराव व नारायणराव यांची तुलना करण्याच्या इच्छेनें विचारलें कीं दोघांत श्रेष्ठ कोण ? त्याचें उत्तर मी थोडक्या शब्दांत इतकेंच देतों कीं भाऊराव आवाजदार, त्यांच्या तानेची फेक प्रभावी, रसानुकूल. गाण्यानें ते प्रेक्षकांवर अशी छाप टाकीत कीं केव्हांहि स्मरण केलें तर अजून गाणें ऐकतों आहोंत असा भास उत्पन्न होई. नारायणरावांचें गाणें, आवाज लहान, परंतु गाण्यांत लाडकेपणा, आवाजांत तंबोऱ्यासारखा एक जव्हारीसारखा झणत्कार अशा तऱ्हेचें आहे. भाऊरावांच्या गाण्याला तडफदार झाशीच्या राणीची तर नारायण-रावांच्या गाण्याला हळुवारपणानें, लाडीकपणानें खुलविणाऱ्या अशा कुल-स्त्रीची उपमा सार्थ होईल. दोघेहि आपापल्या काळांत प्रभावी नट अशाच मानानें चमकले यांत शंका नाहीं.

निरलसपणानें रंगभूमीवर काम करायचें हा नारायणरावांचा विशेष भाग आहे.

---

# ६

# निरास

## रंगभूमीवरील माझी स्वतंत्र शिलेदारी

१९२१ मध्यें गंधर्व कंपनींतील एका वर्षाची मुदत संपवून १९२२ मध्यें मिरजेस आणि १९२३ च्या जानेवारीमध्यें सांगलीस येऊन स्थायिक झाल्याचें मागें आलेंच आहे. तेथें आल्यानंतर भरमसाट पैसे मी शेतींत ओतले.

सांगलीस माझे परिचित व गडकरी यांचे शिष्य सरस्वतीकुमार म्हणजे नरहर गणेश कमतनूरकर हे बी. ए. ची परीक्षा पास झाल्यानंतर मे महिन्यापासून येऊन राहिले होते. त्यांना मी वारंवार नाटक लिहिण्याविषयीं आग्रह करूं लागलों. ते गडकरी यांचे शिष्य म्हणून गडकरी यांच्याप्रमाणच उत्तम नाटक लिहूं शकतील असें मला वाटे. लेखनाचा ज्याला नाद आहे असा कोणीहि माझ्या सहवासांत आला म्हणजे त्याला नाटक लिहिण्याविषयीं प्रोत्साहन द्यावें हा मला नाद. या नादामुळेंच पूर्वी गडकरी व मी किर्लोस्कर कंपनींत सहवासांत आलों आणि गडकरी कवि, लेखक आहेत असें पाहून त्यांनाहि नाटककार होण्यास प्रवृत्त केलें होतें. त्याप्रमाणें ते नाटककार झाले. तसेच कमतनूरकर नाटककार व्हावेत अशी माझी इच्छा व होतील अशी खात्री वाटूनच मी कमतनूरकरांच्या पाठीशीं लागलों आणि आग्रह करून त्यांच्याकडून 'श्री' नाटक लिहविलें. त्यांनीं लिहिलें. परंतु आपण नाटकाच्या चोपड्या खाकोटीस मारून नाटक कंपनीकडे जाणार नाहीं अशी घोषणा केली. हीहि कामगिरी मी आपल्या शिरावर घेऊन नोव्हेंबरमध्यें मुंबईस जाऊन ललितकलेमध्यें

बापुराव पेंढारकरांना सदर ‘श्री’ नाटक वाचून दाखविलें. बापुराव पेंढारकरांनीं तें घेतलें. त्यांच्या रंगभूमीवर तें १९२६ मध्यें आलें.

त्याच वर्षी मला आणखी एका कन्यारत्नाची प्राप्ति झाली.

## नाटक धंद्यांत मी एक नवें दालन उघडलें

‘श्री’ नाटक वाचण्याच्या वेळीं पेंढारकरांनीं आपल्या कंपनीमध्यें काम करण्याविषयीं मजजवळ गोष्ट काढिली. ते त्या वेळीं नाताळांत दोन प्रयोग करण्यासाठीं मुंबईस येणार होते. त्या दोन प्रयोगांत मी काम करावें अशी त्यांनीं इच्छा प्रकट केली. काम करण्याची अजूनहि मला इच्छा होतीच. आणि १९१९ मध्यें मी गंधर्व मंडळींतून निघाल्यावेळीं तात्यासाहेब कोल्हटकर यांनीं मला रंगभूमि सोडूं नये अशी प्रेमाची सूचना देऊन ठेविली होती. तेव्हांपासून आपल्याला कोणी तरी बोलावील अशी वाटच पहात होतों. तो योग जुळून आला आणि ललितकलेपासून दर प्रयोगास अडीचशें रुपये घेऊन प्रयोगांत काम करायला सुरवात केली. ललितकलेच्या ज्या दोन प्रयोगांत मी काम केलें त्या प्रयोगांत कंपनीला सुमारें ३६०० रुपये उत्पन्न झालें.

याच सुमारास यशवंत मंडळी मुंबईस असून तिचें श्रीपतराव उपरे यांनीं कॉन्ट्रॅक्ट घेतलें होतें. श्रीपतरावांचे पोटहिस्सेदार पंडीत होते. ललितकलेचें उत्पन्न पाहून यशवंत मंडळीसाठीं पंडितांनीं मला सांगलीस तार करून बोलावून नेलें. चार प्रयोगांत काम करण्याबद्दल किती पैसे मी घेणार असा पंडितांनीं प्रश्न टाकून कांहीं कन्सेशनहि मागितलें. प्रयोगास २५० या दराप्रमाणें ४ प्रयोगांचे १००० हजार रुपये मी मिळविणार. त्यांत पंडितांना कमिशन हवें होतें. पंडितांऐवजीं दुसरा कोणी असें कमिशन मागता तर कदाचित विरघळून जाऊन मी कमिशन देण्यास तयार झालों असतों. परंतु जे पंडीत माझ्याजवळ आतां कमिशन मागत होते त्याच पंडितांनीं मी गंधर्व कंपनी सोल्यानंतर माझ्याविषयीं “नारायणरावांच्या जोडीनें म्हणून बोडसांना इतके रुपये मिळाले. एरवीं त्यांना बाहेर महिना पन्नास रुपयेहि कोणी देणार नाहीं.” असें हेटाळणीनें काढलेले हलकटपणाचे उद्‌गार माझ्या मनाला भिनलेले असल्यामुळें

पंडितांना कमिशन देणें तर राहोच परंतु इतरांकडून चार खेळांचे हजार रुपये तर पंडितांकडून १२०० रुपये घ्यायचे असें ठरवून त्यांना तसें सांगितलें.

आणि शेवटीं, त्यांचा मनांतला हलकट हेतू साधूं तर दिला नाहींच, परंतु बाराशें रुपये जरी घेतले नाहींत तरी अकराशें रुपयाना चार प्रयोगांत काम करीन असें ठरविण्यांत मात्र कसूर केली नाहीं. अशा रीतीनें पंडितांकडून जास्त पैसे घेण्याचा संतोष मिळविला. माझ्या अशा वागण्यावरून कोणी मला "काय दीर्घद्वेषी आहे हा!" म्हणेल, परंतु हेटाळणीनें मला कोणी दुखवलें म्हणजे संधि सांपडली असतां त्या हेटाळणीचें उसनें फेडायला मी कधींहि चुकत नाहीं, हा माझा स्वभावधर्म आहे.

## पुन्हां एकदां किर्लोस्कर कंपनी

१९२१ मध्यें गंधर्व मंडळीकडे एक वर्षाच्या करारानें राहिलों असतां शंकरराव मुजुमदार माझ्याकडे आले होते. मी त्यांचें आनंदानें स्वागत केलें. आग्रहावरून ते माझ्याकडे जेवायलाहि आले होते. त्या वेळीं त्यांच्या माझ्यामध्यें पूर्वीच्या पुष्कळ गोष्टी निघाल्या. चर्चा झाली. किर्लोस्कर कंपनींतून माझ्या जाण्यानें कंपनीचें पुष्कळच नुकसान झालें, हें त्यांनीं म्हटलें तेव्हां मीहि भावनावश होऊन त्यांना म्हटलें कीं सध्यां मी गंधर्व कंपनीस एक वर्षाकरितां बांधला गेलों आहें. यांतून मोकळा होतांच मला मातृस्थानीं असलेल्या कंपनीचें ऋण श्रम घेऊन फेडण्याचा अंशतः तरी मी प्रयत्न करीन, आणि माझ्यामुळें किर्लोस्कर कंपनीचें जें नुकसान झालें आहे, त्याची कांहीं तरी भरपाई करीन. मी तुमचाच आहे. शंकररावांनाहि माझ्या वरील बोलण्यानें बरें वाटलें आणि गहिंवरून येऊन त्यांनीं मला आपल्या शब्दाची आठवण ठेवण्यास सूचना दिली.

१९२३ च्या सप्टेंबरांत शंकररावांनीं माझ्या दोन वर्षांपूर्वींच्या वरील वचनाची आठवण देणारें पत्र पाठविलें. त्या पत्रांत "बोलणें खरें करण्याची वेळ आली आहे" असें लिहिलें होतें.

त्यांच्या त्या पत्राला मी अनुकूल असेंच उत्तर पाठविलें होतें. परंतु प्रत्युत्तर म्हणून त्यांनीं जें लिहिलें त्यांत त्यांच्या स्वभावधर्माप्रमाणें मी गरजू आणि ते बिनगरजू असाच ध्वनि मला वाटला आणि त्यामुळें स्वस्थच बसलों.

पुढें ललितकलेंत मी काम केल्याची जाहिरात त्यांनीं वाचली आणि पुढील मजकुराचें पत्र मला पाठविलें:

"इतर कंपन्या तुमचा जो फायदा घेतात, तसा आम्हीं घेण्याचें ठरविलें आहे. परंतु पुणें, मुंबईशिवाय इतर ठिकाणीं दर प्रयोगास २५० रुपये देणें परवडणार नाहीं. आणि म्हणूनच वरचेवर तुमचा फायदा घेणें सोईचें होईल कीं नाहीं याबद्दल साशंक आहें. शिवाय निरनिराळ्या कंपन्यांत कामें करीत गेल्यानें लोकप्रियता कमी होईल कीं कसें ? याबद्दलहि शंका वाटते..."

शंकररावांना त्या पत्राचें उत्तर दिलें आणि माझ्या वतीचा खुलासा केला तो असा—

"ईश्वरकृपेनें माझी स्थिति हलाखीची नाहीं. त्यामुळें मला एखाद्या नाटक मंडळीनें बोलावलें तरच माझें चालेल, नाहीं तर नाहीं; असें नाहीं. तेव्हां नाटक कंपनीच्या कायम जंजाळांत राहण्यापेक्षां, स्वतंत्र राहून, मानानें आपलीं लोकप्रिय कामें करतां आलीं तर जास्त चांगलें अशा समजुतीनें नाटक धंद्यांत मी एक नवीन दालन उघडीत आहें. ज्या कंपन्या बोलावतील, त्यांच्याकडे जावें अशाच हिशेबानें मी धंद्याला सुरुवात केली आहे......"

यानंतर शंकररावांनीं मला कारंजास बोलावलेंच. त्याप्रमाणें मी गेलों. कारंजास किर्लोस्कर कंपनीचा बाह्यदेखावा इतका हलाखीचा वाटला कीं कांहीं पुसूं नये. कंपनीचें बिऱ्हाड असें मला वाटेनाच ! भडकमकरांशिवाय सर्व चेहरे नवीनच दिसले. कंपनीची दुर्दशा पाहून वाईट वाटलें.

मला जाऊन दोन तीन दिवस झाले तरी शंकररावांनीं कां बोलावलें त्याबद्दल ते कांहींच गोष्ट काढीनात, तेव्हां मीच त्यांना मला

बोलावण्याचें प्रयोजन काय आहे, याबद्दल विचारलें; तेव्हां मग त्यांनीं कंपनीच्या सर्व भानगडी सांगून शेवटीं कंपनीचें चालकत्व माझ्याकडे देण्याविषयीं आपला विचार माझ्यापुढें मांडला. मी कंपनी ताब्यांत घेतल्याशिवाय कंपनींत सुधारणा होणें अशक्य आहे, असें त्यांचें म्हणणें पडलें. शंकररावांचें सर्व म्हणणें ऐकून घेतल्यानंतर ते अजून पूर्वींच्याच विचाराला चिकटून आहेत कीं काय हें अजमावून पहाण्याकरितां मी खडा टाकून पाहिला. मी विचारलें " तुमच्या पश्चात् तुमची किर्लोस्कर कंपनीची मालकी वारसाहक्कानें जाणार असेल तर मी कांहींहि करूं इच्छित नाहीं. किर्लोस्कर मंडळीच्या पूर्वपरंपरेप्रमाणें रंगभूमीवर काम करणाऱ्या प्रमुख पात्राकडे मालकी देण्यास तुम्ही तयार असाल तर कंपनीच्या कर्जाचें नक्की टिपण मला द्या म्हणजे मी त्यांत लक्ष घालीन. मी कंपनींत लक्ष घातल्यास माझ्या अटी अशा आहेत कीं आपण कंपनीचे मालक रहावें. परंतु कंपनीची सर्व व्यवस्था पूर्णत्वानें माझ्या देखरेखीखालीं चालली पाहिजे. त्यांत आपली ढवळाढवळ चालायची नाहीं. कर्जदारांना कंपनीचा खर्च भागून उरेल त्यांतून पैसे देण्यांत येतील. आपणांस दरमहा सव्वाशें रुपये पोंचतील. मला स्वतःला मी कांहींहि घेणार नाहीं. हें आपण मला लेखी करून दिलें पाहिजे."

शंकररावांनीं त्या वेळीं माझें वरील सर्व म्हणणें कबूल केलें. नंतर शंकररावांच्या इच्छेवरून तेथें दुसऱ्या दिवशींच्या मानापमान नाटकांत मी मोठ्या आनंदानें काम केलें.

## पन्नास रुपयांचा आईकडून खाऊ

दुसऱ्या दिवशीं शंकररावांनीं मी काम केल्याबद्दल माझ्यापुढें अडीचशें रुपये ठेविले. परंतु मी ते घेतले नाहींत. कारण माझ्या घरीं काम करण्याची संधि पुनः मला मिळाली या आनंदांत मी होतों आणि धंदा करण्यासाठीं म्हणून मी गेलों नव्हतों. तेव्हां भाडें खर्चून मी कांरजापर्यंत गेलों त्या भाड्याच्या पोटीं किंवा निदान मी कांहीं खाऊ म्हणून तरी घ्यावें. असेंहि मान्य न केल्यास आपल्याला वाईट वाटेल असें शंकररावांनीं आग्रहपूर्वक म्हटल्यावर त्यांनीं खट्टू होऊं नये म्हणून फक्त पन्नास रुपये

मी स्वीकारले. बाकीचे दोनशें रुपये त्यांच्याकडे परत केले आणि तेथून परतलों.

## शंकररावांचें पुनः येरे माझ्या मागल्या

नाशिकच्या मुक्कामास जुलै महिन्यांत शंकररावांचें मला पुनः बोलावणें आलें. तेव्हां विचित्रलीलाकर्ते शं. प. जोशी यांच्यासह मी नाशिकास गेलों. त्या वेळीं तेथें मलकापूरचे शेंबेकर वकील व बनारसचे गोविंदराव जोगळेकर वकील भेटले. त्या सर्व मंडळीसह शंकररावांनीं माझ्याबद्दल खल सुरू केला. कारंजास शंकररावांनीं घातलेल्या अटी व मीहि कबूल केलेल्या अटी त्या मंडळीपुढें मांडल्या. त्या मंडळीनीं मी कंपनीकरितां श्रम करतांना आपल्या घरांतून खर्ची आणावी हें ठीक नव्हे त्याकरितां दरमहा दीडशें रुपये कंपनीनें मला द्यावे असें ठरविलें. शंकररावांनीं माझ्या देखरेखींत ढवळाढवळ करवयाची नाहीं हें कबूल केलें; परंतु ते लेखी करारानें गुंतण्यास तयार होईनात. तसेंच ऐन वेळीं बऱ्याच अव्यवहार्य वाटाघाटी त्यांनीं सुरू केल्या. त्यांत आपल्या चिरंजिवांना कंपनींतून केव्हांहि कमी न करण्याची व त्यास दरमहा पंचाहत्तर रुपये द्यावे अशी अट घालून माझ्याकडूनच शंकररावांनीं उलट लेखी करार मागितला.

शंकररावांच असें येरे माझ्या मागल्या हें धोरण कायम असलेलें पाहून मी तें सर्व तेथेंच संपलें असें समजून तेथून काढता पाय घेतला.

## शंकररावांच्या लोभाला आलेलीं कटु फळें

ज्या किर्लोस्कर कंपनीची आरंभापासून शंकरराव भरभराट पहात आले त्याच शंकररावांनीं आपल्या हयातींत त्या कंपनीचे दुर्दैवाचे दशावतार पाहिले. हा खरोखर दैवदुर्विलास होय. कंपनीची कितीहि विपन्नावस्था झाली तरीहि शंकररावांनीं आपला कंपनीविषयींचा लोभ सोडला नाहीं हेंच एक त्याला कारण म्हणावें लागतें. ज्या कंपनींतून गंधर्व कंपनी निघाली, ज्या कंपनींतून बलवंत कंपनी निघाली त्या कंपनीचीं हीं छकलें होण्यास शंकररावांचा लोभच कारणीभूत झाला असेंच म्हणावें लागतें.

त्यांनीं मला नाशिकला बोलाविलें त्या वेळीं त्यांनीं माझ्याकडे कंपनीची व्यवस्था देतों म्हटलें, मीहि कबूल झालों; त्या वेळीं कंपनी वैभवाच्या शिखरावर ठेवीन अशी भपकेदार हमी मीहि दिली नव्हती. ज्या कंपनीला मी मातृस्थानीं समजत होतों तिच्या ऋणांतून अंशतः तरी मुक्त होण्याच्या इच्छेनेंच मी ती जबाबदारी स्वीकारणार होतों,परंतु शंकररावांनीं इजेबिजे तिजे करून याहि वेळीं आपलाच हट्ट चालू ठेविला आणि पुढच्या एकाच वर्षांत त्यांनीं कंपनीचे चांगलेच धिंडवडे केले. पहिल्या प्रयोगापासून अखेर जागोजाग गळून पडलेल्या अवयवांप्रमाणें कंपनीचें सामान सोडीत सोडीत कंपनी एकदा बाबू गाडे यास विकली. त्यानेंहि चाफेकरास विकली. परत आपण पुनः ती चालविण्याचा चंग बांधून अथणीस सामान टाकून थांबविली. शेवटीं १९३४ मध्यें कृष्णा कोल्हापुरे यास सत्राशें रुपयांना शंकररावांनीं कंपनीचें नांव विकलें. १९३५ अखेर कोल्हापुरे यांच्या हातून कंपनीची पुरी वाताहात झाली. आणि अशा रीतीनें किर्लोस्कर कंपनी शंकररावांच्या लोभीपणानें कायमची नामशेष झाली.

## मातोश्रीच्या चरणीं अर्पण

१९२४ च्या ऑक्टोबरमध्यें सोलापूरच्या किर्लोस्कर कंपनीच्या कांहीं प्रेमी मंडळींनीं कांहीं नाटकांत काम करण्याकरिता मला आग्रहानें बोलाविलें. तेथें दोन प्रयोगात मी काम केलें.

दुसऱ्या प्रयोगाच्या दिवशींच कंपनीवर जप्ती आली. तेव्हां शिद्राम अप्पा मोहरे व बाबू गाडे यांनीं रक्कम भरून कंपनीवरील जप्ती उठविली. त्या दोघांना शंकररावांनीं शर्ती खरेदीपत्र करून दिलें. जप्ती उठविली याबद्दल शंकररावांनीं त्या दोघांशीं कृतज्ञ न राहतां कायद्याचा श्लेष काढून साह्य करणारासच त्रास देण्यास कमी केलें नाहीं.

शंकररावांनीं सोलापुराहून पुण्यास कंपनी नेली. पुण्यास तीन प्रयोगांत मी कामें केलीं. किर्लोस्कर कंपनींत मी पांच प्रयोगांत काम केलें त्यांपैकीं पहिल्या एका प्रयोगाचे पैसे मला मिळाले. बाकी मातोश्रीच्या चरणीं अर्पण.

## माझे धन्वंतरी डॉ. भडकमकर

१९२५ मध्यें ताप, खोकला या आजारानें मला सात महिनेपर्यंत चांगलेंच छळलें. भर म्हणून पुण्याला १९२६ च्या फेब्रुवारींत मला दम्यानें चांगलेंच दटावलें. त्या वेळीं प्रसिद्ध धन्वंतरी डॉ. भडकमकर यांनीं दम्यावर गाईच्या दुधाचें इंजेक्शन दिलें. त्यानें दमा बरा झाला तो कायमचाच. या वर्षी मला आणखी एक कन्या झाली. १९२५ पासून २५० रुपये घेऊन काम करण्याच्या उद्योगांत माझी चांगलीच प्रगति झाली.

१९२६ मध्यें गोविंदराव टेंबे यांनीं हिराबाई बडोदेकर हिला घेऊन एक नवी कंपनी काढण्याचें ठरविलें. त्या कंपनींत मी सामील व्हावें अशीहि खटपट त्यांनीं केली. परंतु त्यांतल्या कांहीं अव्यवहारिक अटींमुळें तो धंदा यशस्वी होईल असें वाटलें नाहीं. तेव्हां ती गोष्ट तशीच जिरली.

## माझा नैतिक विजय

गंधर्व कंपनीकडे एक वर्षाकरितां गेलों. त्या बाबतींत लाड यांनीं प्रामुख्यानें भाग घेतल्यानें त्यांच्यावर विश्वास ठेवून गेलों. हें मागें एकदां आलेंच आहे. त्या वेळची गंधर्व कंपनीकडे माझी २१०० रु. बाकी होती. त्यापैकीं १००|१०० रुपयांच्या दोन हप्त्यांच्या रकमा कुंटे यांजकडे लाडांनीं जमा केल्या होत्या. पुढें लाड व कुंटे यांचें वांकडें आलें. त्यानंतर माझे पुढचे हप्ते कुंटे यांजकडे अगर माझ्याकडे यायचे बंद झाले. लाडांना मी बरींच पत्रें पाठविलीं. एकाहि पत्राचें उत्तर आलें नाहीं. तेव्हां नोव्हेंबरमध्यें मुंबईस जाऊन मुद्दाम लाडांना भेटलों. त्यांनीं रुपये देतां येत नाहींत असें सांगून न्यायकोर्टाकडे दाद मागण्यास सांगितलें. लाडांचे आभार मानून स्मॉल कॉज कोर्टांत १९०० रुपयांची फिर्याद गंधर्व कंपनीवर मी दाखल केली. ती लॉंग कॉजेसमध्यें हायकोर्टांत लाड यांनीं बदलून घेतली.

त्या फिर्यादीची सुनावणी ता. १८ ऑगष्ट १९२७ रोजीं होती. हायकोर्टांतच आपापसांत समजी करा अशी लाड यांनीं गोष्ट काढून मला सातशें रुपये दिले. मी ते तसेंच आमच्या सॉलिसिटरला दिले. या दाव्याच्या

कामीं ११०० रुपये मला कोर्टखर्च आला होता. शिवाय मुंबईस १० खेपा झाल्या त्याकरितां ३०० रुपये खर्च झाला होता. १९०० रुपयाच्या फिर्यादीला पदरचे १४०० रुपये घालून मी मिळविलें काय? परंतु लाड यांनीं माझे रुपये न देतां मला कोर्टाचा मार्ग दाखविला त्याची मला चीड आली होती, आणि म्हणूनच मी कोर्टाची पायरी चढलों होतों. माझ्या व्यवहारी वृत्तीनें पाहिलें तर १९०० रुपयांच्या वसुलीसाठीं ७०० रुपये घेऊन बाकीच्या ७०० रुपयांवर मी पाणी सोडलें हें हिशेबी नव्हतेंच. परंतु पैशांपेक्षां मला स्वाभिमान बहुमोल वाटला आणि १४०० रुपये खर्चून मी एक प्रकारें नैतिक विजय मिळविला.

याच वेळीं सहा वर्षांनंतर गंधर्व मंडळीच्या थिएटरमध्यें जाऊन मी मेनका नाटक पाहिलें.

## सांगलीस देवलक्लबची स्थापना

देवलमास्तरांच्या स्मृतीसाठीं सांगलीस देवलक्लब नांवाचा एक क्लब सांगलीचे सुप्रसिद्ध वकील गणेश कोंडो गोडबोले, रामचंद्र गोविंद देवल, एस्. ए. कुलकर्णी व मी अशा आम्हां चौघांनीं स्थापन केला होता. निधि जमविण्यास आम्ही सुरवांत केली होती. देवलक्लबास ललितकला कंपनीनें एक खेळ देऊं केला त्या प्रयोगांत विनामूल्य काम करण्यासाठीं मी गेलों होतों.

## गंधर्व कंपनीचें अनपेक्षित पत्र

१९२७ नवंबर सोळा तारखेस गंधर्व कंपनीचे बापुराव राजहंस यांच्या सहीचें एक अनपेक्षित पत्र आलें. पत्र पुढील आशयाचें होतें.—

"**कांहीं महत्त्वाच्या कामीं आपली सल्ला पाहिजे आहे.** तरी आपण उमरावतीस यावें अशी आपल्याला नारायणरावांची विनंति आहे." त्या पत्राप्रमाणें ता. २० रोजीं मी गंधर्व कंपनीकडे उमरावतीस गेलों. तेथें त्या वेळीं विधिलिखित नाटकाचे कर्ते वसंतराव देसाई होते. त्यांचें विधिलिखित नाटक कंपनींत बसवायला सुरवात होणार होती. मी उमरावतीस गेल्यावर तिसऱ्या दिवशीं नारायणराव, बापुराव, मी व वसंतराव देसाई असे सर्वजण बसलों असतां मला ज्या महत्त्वाच्या कामा-

करितां नारायणरावांनीं पाचारण केलें होतें त्या विषयासंबंधीं आमचें बोलणें झालें. जें बोलणें झालें तें असें:—

**मी**—मला कां बोलावलें होतें नारायणराव ?

**नारायणराव**—तुम्ही आणि मी पुन्हां एके ठिकाणीं व्हावें अशी माझी इच्छा आहे.

**मी**—तुमची इच्छा ठीक आहे. परंतु तुमचें आतां व्यवस्थेशीर चाललें आहे. मग माझी गरज कोठें आहे ?

**नारायणराव**—हल्लीं आमचीं नाटकें विस्कळीत होतात. शिवाय मागें जें काय झालें तें झालें. बाळासाहेबांच्या नादीं लागून सर्व घोटाळा झाला, परंतु तो आतां मला सुधारायचा आहे.

**मी**—नारायणराव, तुमची ही एक क्षणिक लहर आहे आणि या लहरीला बळी पडावें असें मला वाटत नाहीं. शिवाय तुमच्या व माझ्या वयाकडे पहातां यापुढें तुमच्या आमच्या वागणुकींत पोरकटपणा दिसला तर तें जगांतहि चांगलें दिसणार नाहीं. तसेंच गणपतराव नाहींत म्हणून तुमचें काहीं अडलेलें नाहीं. अडीच लाखांचें कर्ज फेडून तें तुम्हीं सिद्ध केलें आहे. बरें, बालगंधर्वांचें साहचर्य नाहीं म्हणून मलाहि कांहीं कमी पडलेलें नाहीं. बालगंधर्वांशिवाय माझें स्वतःचें स्वतंत्र अस्तित्त्व म्हणून मला आहेच. आतां तुम्हांला जरूर वाटल्यास कोणत्याहि मोबदल्याची अपेक्षा न बाळगतां केवळ आपुलकीनें मी तुम्हांला मदत करायला केव्हांहि तयार आहे. तुमच्या मनोवृत्तींत फरक झाला व आपुलकीनें तुम्ही मला बोलावतां यांतच मला आनंद आहे.

**नारायणराव**—माझ्या पूर्वीच्या वागणुकीवरून तुम्हांला शंका येणें साहजिक आहे. परंतु मला अद्दल घडून आतां माझ्यांत सुधारणा झाली असल्याचें तुम्हांला आढळून येईल. माझ्या हल्लींच्या कर्जबाजारी स्थितींत मला तुमच्या योग्यतेप्रमाणें काय देतां येणार आहे ? परंतु कांहीं असलें तरी आतां तुम्ही नाहीं म्हणूं नका.

**मी**—नारायणराव, धंदा या दृष्टीनें माझा अवतार संपला आहे. हल्लीं अडीचशें रुपये घेऊन रंगभूमीवर मी काम करितों याचें कारण अंगांत

चमक आहे तोंपर्यंत जगाच्या दृष्टीसमोर राहिलें पाहिजे हेंच आहे आणि याच हेतूनें मी रंगभूमीवर राहिलों आहें. जे लोक मला धंद्यासाठीं बोलावतात त्यांच्याकडून मी पैसे घेतों. धर्मार्थ प्रयोग असेल त्याला पैसे घेत नाहीं. तेव्हां त्या दृष्टीनें माझ्या बाबतींत पैशांचा प्रश्न दुय्यम दर्जाचा आहे. तेव्हां त्याबद्दल तुमच्या इच्छेला येईल तसें तुम्ही करूं शकतां.

मला तुम्ही बोलावतां त्यांत पैशाशिवाय दुसऱ्याहि कांहीं अडचणी मला दिसतात त्या मी तुमच्यापुढें मांडतों. त्यांचा विचार केला पाहिजे. खाडिलकरांचें व लाडांचें वजन तुमच्यावर आहे. माझ्याविषयीं त्या दोघांचेंहि मन शुद्ध नाहीं. अर्थात् माझेंहि त्यांच्याविषयीं नाहीं. तेव्हां त्यांचा या गोष्टीला विरोध येईल कीं काय तें पहा. तसेंच तुमच्या कुटुंबांतील माणसांचा जर विरोध दिसला तर त्यांतहि त्यांचें कांहीं गैर नाहीं. कारण सर्व व्यवस्थेशीर चालत असतांना खर्चाची आणखी धोंड कशाला ? असें त्यांना वाटल्यास तें योग्यच आहे. तेव्हां शांतपणानें या सर्व गोष्टींचा सर्व बाजूंनीं दूरपर्यंत सर्वांशीं विचारविनिमय करून मग मला पत्र लिहा. मीहि मग विचार करून तुम्हांला उत्तर लिहीन.

**नारायणराव**–आतां माझा निश्चय ठाम ठरला आहे. माझ्या धंद्यांतील अडचणी बाकीच्या मंडळींच्या काय लक्षांत येणार ? तुम्ही आतां जाऊंच नका.

**मी**–मी आतां जातों. मी सांगितलेल्या सर्व गोष्टींचा एक महिनाभर विचार करा. तुमच्या उतावळेपणाचा फायदा गणपतरावांनीं घेतला असें व्हायला नको.

या प्रकारची आमची बैठक झाली. नंतर मी सांगलीला परतलों. पुढें डिसेंबरमध्येंच नारायणरावांचें पुन्हां पत्र आलें. त्या पत्रांत येतांना लाडांना भेटून यायला लिहिलें होतें. त्याप्रमाणें मी मुंबईला जाऊन लाडांना भेटलों.

## सन्मानाचा स्वीकार

पूर्वीचें सर्व नारायणरावांनीं विसरून जाऊन मला सन्मानपूर्वक बोलाविलें या गोष्टीचा मला खरोखर आनंद झाला. या माझ्या आनंदांत परमेश्वरानें या वर्षीच्या मे महिन्यांत मला पुत्ररत्न देऊन भर घातली.

लाडांनीं भेटींत "एक वर्षाचा लेखी करार करायला तुमची कांहीं हरकत आहे काय" असें विचारलें. माझी हरकत नसल्याचें सांगितल्यानंतर मला मासिक वेतन न ठरवितां नारायणरावांच्या नफ्याच्या मानानें वर्षाला साडेपांच हजार देण्याचें ठरलें. आणि एका वर्षानंतर उभयतांच्या संमतीनें दोघांनाहि जरूर वाटल्यास तो करार पुढें अंमलांत रहावा असें करारांत कलम घातलें गेलें व १९२८ च्या जानेवारीच्या १ ल्या तारखेस गंधर्व कंपनींत मी पाऊल ठेविलें.

## वसंतरावांचें 'विधिलिखित'

वसंतराव देसाई यांचें विधिलिखित नाटक बसवायला मी कंपनींत गेल्यानंतर सुरवात झाली. ग्रंथकारांनीं हें नाटक प्रथम तीन तासांत प्रयोग होईल अशा बेतानें लिहिलें होतें. कंपनीनेंहि तें तशाच स्वरूपांत बसविण्याकरितां घेतलें होतें. परंतु नाटक प्रत्यक्ष बसविण्याच्या वेळेस नारायणरावांच्या इच्छेवरून मूळ लिहिलेल्या नाटकांत फेरफार करून वाढवितांना त्याचें स्वरूप अगोदरच विकृत झालें. इंजिनियरनें प्लॅन करून इमारत बांधावी व मागाहून पैसेवाल्या घरमालकानें आपल्या आवडी व पसंती त्यांत घालून निरनिराळ्या दुरुस्त्या सुचवून इंजिनियरकडून त्या अंमलांत आणाव्या असें झालें म्हणजे इमारतीची दुर्दशा झाल्याशिवाय रहात नाहीं. त्याप्रमाणेंच नारायणरावांच्या इच्छेला बळी पडून त्यांचें मन मोडलें तर नाटक बसणार नाहीं ही भीति मनांत बाळगून अगोदरच "नारायणरावांनीं नाटक मागितलें" या आनंदानें हुरळून जाऊन नाटक लिहिणाऱ्या नाटककारांनीं आपल्या नाटकांत वाटेल ते फेरफार केले. त्यामुळें अगोदरच मूळच्या सामान्य असलेल्या नाटकाचें स्वरूप अधिकच विकृत झालें. त्या नाटकाच्या तालमी मी घेतल्या. कंपनीनें तें नाटक रंगभूमीवर आणिलेंहि. परंतु तें नाटक यशस्वी कसें होणार ?

## एक वर्ष संपलें—पुढें ?

कराराप्रमाणें एक वर्ष पुरें होत आलें. त्याचें स्मरण नारायणरावांना देऊन पुढें कसें नांदायचें याबद्दल विचारलें. नारायणरावांनीं "तुमच्या येण्यामुळें आम्ही फायद्यांत आहोंत. तेव्हां पुढें असेंच चालायचें. आतां

तुम्ही आम्ही बरोबरच नाटक धंद्यांतून निवृत्त होऊं." असें सांगितलें आणि दुसरें वर्ष सुरू झालें.

या कालांत गंधर्व कंपनीला पैशाची प्राप्ति खरोखरच चांगली होत होती. नारायणरावांनीं आठ वर्षांत अडीच लाख रुपयांच्या कर्जाची फेड केली होती. आतां यापुढें नारायणरावांनीं कांहींतरी संग्रह करावा व उतार वयांत त्यांच्या मनाला स्वास्थ्य लाभावें असें मला मनापासून वाटे. त्याबद्दल मी त्यांना वारंवार सूचनाहि देत असें. परंतु नारायणरावांना कर्जाची फिकीर कांहींच वाटावयाची नाहीं. वेळप्रसंगीं कर्जाच्या गोष्टी निघाल्या म्हणजे ते काळजीच्या अभिनयाचा चेहेरा मात्र उत्कृष्ट करीत हें मी पूर्वीपासूनच ओळखिलें होतें. ती त्यांच्या अभिनयाची गंमत १९३० मध्यें उमरावतीस कंपनी असतांना उघड झाली ती अशी.

नारायणरावांना पुनः हलके हलके कर्ज होऊं लागलें होतें. मी त्यांना म्हणे "काय नारायणराव, तुम्हाला कर्ज केल्यावांचून चैनच का पडत नाहीं? तसें असेल तर मी सांगतों असें एकदां करा. एक दिवस कर्ज शून्य होऊं द्या. तें तुम्हाला शक्यहि आहे आणि नंतर कर्जावांचून तुम्हाला करमलें नाहीं तर मग कुठून तरी एक हजार कर्ज काढून ठेवा व त्याकडे पहात जा." त्या वेळीं ते कांहींच बोलत नसत. अशा स्थितींत उमरावतीच्या मुक्कामीं मी, कान्होपात्राकर्ते नारायणराव कुलकर्णी व नारायणराव असे बसलों असतां नारायणरावांच्या कर्जाचा विषय निघाला. नारायणराव स्नानाला जाण्याकरितां उठले होते. त्यांना आपल्या होत असलेल्या नव्या कर्जाची आठवण होऊन ते म्हणाले "होय देवा, आम्हाला पुनः कर्ज होऊं लागलें आहे. त्याच्या फेडीची काळजी वाटूं लागली आहे." हें म्हणतांना नारायणरावांनीं जी मुद्रा केली होती तिच्याकडे बोट करून मी नारायणराव कुलकर्णी यांना दाखवीत म्हटलें "कर्जाच्या काळजीच्या अभिनयाचा हा चेहेरा बरें का. किती छान अभिनय नारायणरावांना साधतो पहा!" माझें बोलणें नारायणरावांना पटलें. मी त्यांना ओळखलें हें त्यांच्या लक्षांत आलें आणि "हें काय गणपतराव," असें म्हणत ते खूब मोठ्यांदा हंसले. हंसत हंसत खालींच बसले.

# समाधानाचा श्वास आणि दुःखाचा निःश्वास

१९२९ आणि १९३० या दरम्यानच्या दोन वर्षांच्या कालांत मी गंधर्व कंपनीमध्यें असतांना मला समाधान वाटेल अशा जशा कांहीं गोष्टी घडल्या त्याप्रमाणें दुःखाचे निःश्वास सोडण्यासारखे कांहीं क्षणहि आले.

मी जुन्या नाटकांच्या तालमी नाटक नसेल त्या दिवशीं दुपारीं नियमित घेत असें. त्यामुळ माझ्या आणि माझ्यापेक्षांहि नारायणरावांच्या कल्पनेप्रमाणें प्रयोग व्यवस्थेशीर होऊं लागून त्याचा सुपरिणाम आर्थिक प्राप्ति वाढण्यांत दिसून येऊं लागला होता.

नारायणराव मोकळेपणानें व खेळीमेळीनें वागण्यांत कसूर मुळींच करीत नव्हते. मी बुद्धिपुरःसर आपल्या अधिकाराचें अतिक्रमण चुकूनहि न होईल अशा धोरणानें वागत होतों. परंतु माझ्यावरील नारायणरावांची भक्ति दर दिवशीं वाढत होती आणि ते कंपनीसंबंधींच्या लहान मोठ्या कोणत्याहि गोष्टीसंबंधीं सल्लामसलत मला विचारूं लागले होते. नाटकाच्या तालमीच्या वेळीं ते मला गादीवर बसवून माझ्या समोर नम्र शिष्याप्रमाणें बसत असत. इतका माझा मान ठेवीत.

नारायणराव पूर्वीचें सर्व विसरून वर लिहिल्याप्रमाणें माझ्याशीं वागत असल्याचें पाहून मला खरोखर समाधान वाटे. आम्ही रात्रीच्या रात्री जाग्रण करून पूर्वीच्या किर्लोस्करपासूनच्या भल्याबुऱ्या गोष्टी करण्यांत आनंदानें काळ घालवीत होतों.

परंतु एकीकडे आमचे दिवस असे आनंदानें आणि समाधानानें चालले असतां दुसरीकडे त्याच वेळीं नारायणरावांच्यावर त्यांच्या पत्नीचें सर्व प्रकारचें वर्चस्व स्थापन झालें होतें. त्यामुळ आपले पति एवढ्या मोठ्या नाटक कंपनीचे मालक असून ते गणपतरावांना गादीवर बसवून आपण त्यांच्यासमोर कंपनींतील इतर नोकरांप्रमाणें साध्या बैठकीवर बसतात ही गोष्ट नारायणरावांच्या पत्नीला बरी वाटत नव्हती हें एक व मॅनेजर या नात्यानें बापुराव राजहंस यांनीं कंपनीसंबंधीं कोणतीहि गोष्ट नारायणरावांना विचारली म्हणजे तिचा निर्णय नारायणराव माझा सल्ला

घेऊन त्याप्रमाणेंच ठरवीत, यामुळें माझें वजन नारायणरावांवर वाढत आहे ही गोष्ट बापुरावांना लागत होती.

परंतु मला या वरील दोन्ही गोष्टींची दाद किंवा कल्पना मुळींच नव्हती. कारण कंपनींत पाऊल ठेवल्यापासून जाणिवेनेंच पायाशुद्ध निर्मळ मनानें मी वागत होतों. त्यामुळें मजविरुद्ध कांहीं कल्पना उद्‌भूत असाव्यात याविषयीं माझ्या मनांत चुकूनहि विचार येण्याचें कारण नव्हतें.

## नारायणराव भजन करूं लागले

आम्हीं रात्रभर गप्पा करण्यांत व्यर्थ वेळ दवडतों त्यापेक्षां नारायणरावांनीं देवाचें नांव घ्यावें, भजन करावें अशी कल्पना कोणीतरी काढली असावी. त्यांचीहि लहर लागली आणि त्यांनीं कंपनींत कृष्णाप्पा भांडारकर यांच्या गळ्यांत तंबोरी अडकवून व आपल्या हातांत टाळ घेऊन कंपनींतच भजनाचा फड उभा करण्यास सुरवात केली.

त्यांच्या या जाहीर भजनामुळें नारायणरावांचें गाणें लोकांना मुक्त-द्वार मोफत ऐकावयाला मिळूं लागलें. याबद्दल त्यांना सांगण्याची सोय नव्हती व भलत्या अधिकारानें सांगण्याच्या भरीस मी पडलोंहि नाहीं. केव्हां केव्हां थोडीशी थट्टा मात्र करीत असें.

## वाईटांतून चांगलें

परंतु पुष्कळ वेळां वाईटांतून चांगलें निघतें असें म्हणतात. त्याप्रमाणें नारायणरावांच्या भजनांतून एक गोष्ट पुढें चांगली निर्माण झाली असें म्हणायला हरकत नाहीं. त्याची सुरवात मात्र झाली ती अगदीं निराळ्या तऱ्हेनें.

नारायणरावांनीं मध्यंतरीच्या काळांत नंदकुमार, आशानिराशा, विधिलिखित हीं नाटकें रंगभूमीवर आणिलीं होतीं. परंतु तीं त्यांना लाभ-दायक झालीं नाहींत. त्यामुळें व त्यांच्याकडे जीं नाटकें येत तीं गडकरी यांच्या भाषेच्या पावलावर पाऊल ठेवून लिहिलेलीं असत. परंतु गडकरी यांच्या लेखणींतील तेज अशा एकाहि नाटकांत नसे. क्लिष्टपणा मात्र भरपूर असे. अशा नाटकाला नारायणराव अगदीं कंटाळून गेले होते.

माझ्या सहवासामुळेंहि असेल कदाचित्; नारायणरावांना देवलमास्तरांच्या साध्यासुध्या रसाळ लेखनाचें स्मरण होई व त्याबद्दल ते वारंवार बोलत. यवतमाळ मुक्कामीं आम्ही असतांना अशाच एकदां गोष्टीवरून गोष्टी निघून नारायणराव मला म्हणाले, "गणपतराव, आजकाल जो उठतो तो गडकरीमास्तरांचें अनुकरण करून लिहितो. गडकरीमास्तरांचा प्रभाव कोणांत नसतो; त्यामुळें पहावी त्याची भाषा क्लिष्टच असते. सध्यांच्या काळीं देवलमास्तरांच्या सारखी साधीसुधी घरगुती भाषा लिहिणारा नाटककार मराठींत नाहीं का हो?" मी त्यांना म्हटलें, "नाहीं कां? तुम्ही पाहतां कोठें? आपण पाहिल्याशिवाय तसा लिहिणारा कोणी आहे कीं नाहीं हें आपल्यास कसें कळणार?" त्यांनीं असा कोण आहे म्हणून प्रश्न केला. त्या वेळीं माईसाहेब नाटकाचे कर्ते नारायणराव कुलकर्णी यांचेंच स्मरण मला नेमकें कसें झालें कोण जाणे! माझा व नारायणराव कुलकर्णी यांचा परिचय १९२५ मध्यें मुंबईस ललितकलेच्या बिऱ्हाडीं कोणी तरी करून दिला होता. त्यांचे माईसाहेब नाटक माझ्या वाचण्यांत किंवा पहाण्यांतहि नव्हतें. परंतु परिचयाच्या वेळीं त्यांनीं मला आपली नुकतीच प्रसिद्ध झालेली मजूर कादंबरी दिली होती. ती मी वाचली होती. त्यावरून आणि त्यानंतर १९२७ मध्यें त्यांच्या 'अडला नारायण' या सामाजिक नाटकाचें हस्तलिखित त्यांनीं मला वाचावयाला दिलें होतें त्यावरून ते देवलमास्तरांच्या वळणाचें लेखन लिहितात असा माझा ग्रह झाला होता. त्यामुळेंच मला नारायणरावांनीं विचारल्यावेळीं त्यांचें स्मरण होऊन मी नारायणरावांना म्हटलें, "माईसाहेब नाटक तुम्ही पाहिलें आहे काय? त्या नाटकाचा लेखक देवलमास्तरांच्या पद्धतीचें लिखाण लिहितो असें मला वाटतें."

नारायणरावांनीं तें नाटक पाहिलें होतें. आवडल्याचेंहि त्यांनीं सांगून नारायण कुलकर्णी यांच्याकडून नाटक वाचण्यास मागवा असें मला सुचविलें. मी पत्र पाठविलें. नाटक आलें. नारायणरावांनीं वाचलें त्यांना आवडलें. त्यांनीं तें बसविण्याचें ठरविलें.

पुढें गंधर्व मंडळी जळगांव, बडोदा करून पुण्यास गेली. ह्या वेळपर्यंत नारायणरावांच्या भजनाला चांगलें रंगरूप आलें होतें. त्यामुळें

त्यांना आतां एखादें संतचरित्रावरील नाटक घ्यावें असें वाटूं लागलें आणि पुण्यास नारायणराव कुलकर्णी यांच्या समक्ष भेटींत त्यांना संत चरित्रावर नाटक लिहिण्यास सुचविलें. त्यावरून नारायणराव कुलकर्णी यांनीं संत कान्होपात्रा नाटक लिहून नारायणरावांना दिल. मला नाटकाला संतचरित्राचे विषय आवडत नाहींत. माझी इच्छा नारायणराव कुलकर्णी यांनीं गंधर्व कंपनीस एखादें सामाजिकच नाटक द्यावें अशी होती. तसें मी कुलकर्णी यांस सुचविलें होतें. परंतु नारायणरावांना सुचविण्याचा अधिकार न गाजवितां तटस्थ राहिलों.

## मनाला सलणाऱ्या गोष्टी

१९३० मध्यें मला झालेला मुलगा वारला.

नारायणराव कुलकर्णी यांच्यासारख्या पदवी नसलेल्या सामान्य नाटककाराचें नाटक गंधर्व कंपनीनें घेणें अशी कांहीं कावळ्यांनीं कावकाव सुरू केली. शिवाय तें टाळकुट्याचे नाटक म्हणून ओरड चालविली. परंतु स्वतः नारायणरावांनाच संतचरित्रावरील नाटक पाहिजे होतें. त्यांनीं संत कान्होपात्रा पसंत केलें होतें. त्यामुळें अलबत्या गलबत्यांची कावकाव हवेंत विरून गेली. या गोष्टीशीं माझा विशेष संबंध नव्हता म्हणून मला त्याचा विचार करण्याचें कारणच नव्हतें.

## कान्होपात्रा नाटक गळ्यांत बांधलें

परंतु नारायणरावांच्या गळ्यांत संत कान्होपात्रा नाटक मी बांधलें अशी कांहीं कावळ्यांनीं काव काव केल्याचें मी ऐकिलें. त्याचें निराकरण नारायणरावांच्या समोर चार मंडळींच्या देखत मी करून टाकिलें. मला ती काव काव ऐकून बरें मात्र वाटलें नाहीं.

कान्होपात्रा नाटक यशस्वी रीतीनें रंगभूमीवर आलें, कंपनीला आर्थिक फायदा उत्तम झाला. या नाटकाच्या तालमी मी घेतल्या. तालीम चालू असतां नारायणराव तर माझ्या नाट्यशिक्षणावर पूर्वीप्रमाणें बेहद्द खूष असत. परंतु विनायकराव पटवर्धन आणि माधवराव वालावलकर यांना मी जें शिक्षण दिलें त्यामुळें तेहि फार खूष झाले. विनायकराव

पटवर्धन यांनीं आपल्या कंपनींतील नऊ वर्षांच्या कारकीर्दींत विलासची भूमिका शिकतांना नाट्याभिनय म्हणजे काय हें या वेळीं गणपतरावांच्या शिक्षणामुळें खरें समजलें व थोडेसें तरी आपणांत उतरलें असें पुष्कळांच्या-जवळ उद्‌गार काढल्याचें मला कळलें. आणि माधवराव वालावलकर यांनीं त्यांना मी कान्होपात्रेंतील चोखामेळ्याची भूमिका शिकविली त्याबद्दल मी गंधर्व कंपनींतून निघून गेल्यानंतर जेव्हां वालावलकरांना नारायणरावांनीं काढून टाकलें आणि त्यांच्या चोखामेळ्याच्या भूमिकेशिवाय कंपनीचें अडतें असें पाहून पुनः परत बोलावलें तेव्हां त्या गोष्टीचा उल्लेख करून मला लिहिलेल्या पत्रांत वालावलकर यांनीं स्पष्ट कबूल केलें होतें कीं चोखा-मेळ्याची भूमिका तुम्ही मला शिकविल्यामुळें नारायणरावानीं मुद्दाम बोला-विलें. हें श्रेय तुमच्या शिक्षणाचें होय.

१९३० अखेर माझ्या वयाच्या वाढीमुळें शरीराला व मनाला दौर्बल्य येऊं लागलें आहे असें वाटूं लागलें. त्याकरितां आगष्टअखेर नारायण-राव व बापुराव यांना बोलावून येत्या डिसेंबरमध्यें मला मोकळा करा असें मी होऊनच त्यांस सुचविलें.

१९३१ च्या आरंभापासून गंधर्व कंपनींत दोस्त भगताचीं खलबतें सुरू झालीं होतीं. उत्पन्न कमी व्हायला लागलें आहे. कंपनीचा खर्च कमी करायला पाहिजे अशा आरोळ्या उठत होत्या. त्याबद्दल मी एकदां नारा-यणरावाना म्हटलें होतें "खर्च वाढला, उत्पन्न पुरत नाहीं म्हणतां. परंतु तुमचा कौटुंबिक खासगी खर्च बेसुमार होऊन चैनीची रहाणी जास्त प्रमा-णांत झाली आहे तिला आळा घाला."

परंतु सुखासीनतेंत व कर्जवाढ होत असली तरी त्याबद्दल बेदरकार राहणाऱ्यांना माझा सल्ला कसा पटावा ?

मला कंपनीकडून मिळत असलेल्या मोबदल्यांत कांहीं तरी कमी करावें अशी विचारसरणी उमरावतीच्या १९३१च्या आरंभींच्या मुक्कामा-पासून परस्पर कंपनींतील कांहीं मंडळींत उत्पन्न झाली होती. मी इंदूरच्या मुक्कामाहून फेब्रुआरीमध्यें माझ्या ज्येष्ठ कन्येच्या लग्नाकरितां १५।२० दिवस

पुण्यास गेलों असतां माझ्या गैरहजिरींत इंदुरास कंपनीमध्यें नारायणराव, बापुराव, त्यांच्या पत्नी, उमरावतीचे पं. भगुरकर ज्योतिषी, नारायणराव कुलकर्णी, सदाशिव रानडे ही मंडळी बसली असतां नारायणरावांच्या पत्नी व बापुराव यांनीं नारायणरावांच्या मनावर "गणपतरावांना कमी मोबदला घेऊन रहायला लावावें" असें बिंबविण्याचा आग्रहपूर्वक प्रयत्न चालविला होता. त्या वेळीं नारायणरावांनीं माझा उपयोग लक्षांत घेऊन माझी बाजू धरली होती, आणि विरुद्ध बाजूचा जास्तच आग्रह होऊं लागला तेव्हां "चार सहा महिने तरी आपण आपल्या मनासारखें करणार. त्यानंतर माझ्या दुर्दैवानें फासा उलटाच पडला तर तुमचें म्हणणें ऐकेन." असें नारायणरावांनीं आपल्या मंडळीना सांगून त्या वेळीं तात्पुरतें गप्प बसविलें.

वर लिहिलेली हकीगत मी इंदुरास परत गेल्यानंतर नारायणराव कुलकर्णी यांनीं त्यांना माहीत असूनहि प्रथम मला सांगितली नाहीं. भगुरकर ज्योतिषी व सदाशिव रानडे यांनीं झालेल्या बैठकीची कल्पना मला दिली. नंतर पडताळा पहाण्याकरितां आम्ही फिरायला गेलों तेव्हां नारायणराव कुलकर्णी यांना मी विचारलें. तेव्हां ते भिऊनच गेले. आपण झालेली खरी गोष्ट सांगितल्यास गणपतराव त्रिथरून आतांच कंपनी सोडून निघाले तर आपल्या कान्होपात्रा नाटकाच्या तालमीची गत काय होईल याबद्दल त्यांना धास्ती पडूनच त्यांनीं बैठकींत झालेला प्रकार सांगण्याचें टाळलें होतें, असें नंतर सर्व हकीगत सांगून त्यांनीं मला पडताळा पटविला.

खरोखरच कंपनीची हलाखीची स्थिति असती तर नारायणराव माझ्याशीं सध्यां मोकळेपणानें वागत होते त्यामुळें मी मोबदला न घेतांहि कंपनींत मोठ्या आनंदानें राहिलों असतों.

आणि मी होऊन जेव्हां मला मोकळा करा असें नारायणराव बापुरावांना म्हणत होतों तेव्हां मला "जाण्याची गोष्ट काढूं नका ज्या वेळीं धंद्यांतून निवृत्त व्हायचें त्या वेळीं तुम्हीं आम्ही मिळूनच होऊं." असेंच ते मला उत्तर करीत. परंतु त्यांचें तें सर्व मानभावीपणाचें होतें हेंच शेवटीं माझ्या प्रत्ययास आलें.

जेव्हां माझ्यापुढें " तुमच्या मोबदल्यांत कांहीं कमी करा " असा प्रश्न आला तेव्हां मी त्यांना स्पष्टच उत्तर दिलें, " खरोखरीच तुमची इलाखीची स्थिति असेल तर मी मोबदल्याशिवाय राहीन. कंपनींत आलों त्या वेळीं मी अगोदर सर्व प्रकारचा खुलासा केला होता. मी होऊन मला इतका मोबदला पाहिजे असें म्हटलें नव्हतें. त्यांच्यातर्फे लाडांनीं जो आंकडा मला सांगितला होता तो कांहींहि विचार न करतां मी एकदम कबूल केला होता. कंपनीला उत्पन्न चांगलेंच होत होतें. शरीर व मन थकत चालल्यामुळें मोकळा करा असें आपण होऊन मी वेळोवेळीं सांगत होतों. अशा स्थितींत मी कमी मोबदल्यावर रहायला अकारण कबूल व्हावें अशी माझी मनोदेवता मला सांगत नव्हती.

कंपनींतील इतर नोकरांच्या पगाराला काट लावावा असा प्रश्न जेव्हां उपस्थित झाला तेव्हां मी " हें नैतिकदृष्ट्या योग्य नाहीं. मंडळींच्या साहचर्यानें हजारों रुपये मिळत आहेत त्याचा फायदा त्या मंडळींना दिला आहे काय ? तुमच्या वैयक्तिक चैनी चालण्यासाठीं नोकर लोकांचे पगार कमी करणें हा नैतिक अधःपात नव्हे काय ? " असें म्हटलें. तेव्हां तो प्रश्न कान्होपात्रा नाटक रंगभूमीवर येईपर्यंत मागें पडला.

## राम राम ठोकला

तारीख १९ नोव्हेंबर १९३१ रोजीं गंधर्व मंडळीनें कान्होपात्रा प्रयोग मुंबईस केला. त्या वेळीं कंपनीचा मुक्काम ग्रँटरोडवरील नाना शंकरशेटच्या देवळांत होता. माझें स्वतंत्र बिऱ्हाड गांवदेवीस गिरणीच्या समोरील इमारतींत होतें. त्या वर्षी मला आणखी एक कन्या झाली होती.

उमरावतीस ८।९ महिन्यांखालीं " आपलें नाटक स्टेजवर आल्याखेरीज मी कंपनींतून मोकळा होणार नाहीं." हें नारायणराव कुलकर्णी यांना दिलेलें वचन आतां पूर्ण झालें होतें. त्यामुळें मी विशेष समाधानाच्या स्थितींत होतों.

कान्होपात्रा रंगभूमीवर येण्याच्या सुमारास पंडित विष्णु दिगंबर पलुसकर हे निवर्तल्याचें कळलें. कंपनींतील हीरोचें काम करणार विनायकराव पटवर्धन नाटकाचा धंदा सोडून आपल्या गुरूचें कार्य पुढें चाल-

ण्याच्या उद्योगास लागण्याचा विचार करीत होते. त्यांनीं नारायणरावांस आपला विचार कळविला होता.

त्याच सुमारास ललितकलेंतून रिकामा झालेला गंगाधर लोंढे, विनायकराव पटवर्धनाच्या जागीं हीरोचें काम करण्यास नारायणरावांनीं नेमणें जरूर होतें. त्याप्रमाणें त्यांनीं त्याला नक्की केलें.

कंपनींतील माझें चौथें वर्ष चालू डिसेंबरच्या अखेरीस संपत असल्यामुळें मला मोकळा करण्याविषयीं नारायणरावांना याहि वेळीं मी होऊन सुचविलें. तेव्हां त्यांनीं " कंपनी सोडण्याची गोष्ट काढूं नका. आपण दोघे बरोबर निवृत्त होणार आहोंत ना ? " या आपल्या आपुलकीच्या ठराविक गोड शब्दांनीं माझें तोंड बंद केलें.

हौस, जरुरी, कर्तव्य व आपल्या कंपनीची जबाबदारी यामुळें नारायणरावांना माझ्यासारखें सहजासहजीं धंद्यांतून निवृत्त होणें शक्य नव्हतें हें मला दिसत होतें. मला मात्र यापुढें धंद्याची नेहमींची दगदग एकसारखी सोसण्यासारखी नव्हती. म्हणूनच मी वारंवार मोकळा होण्याबद्दल नारायणरावांना सुचवीत होतों.

## अशिष्ट प्रकार

तारीख ११ डिसेंबर रोजीं दुपारीं मी जेवण झाल्यानंतर माडीवर गंगाधर लोंढे यास धैर्यधराच्या भूमिकेची तालीम देत होतों. नारायणराव, बापुराव व कंपनीची भगत मंडळी खालच्या मॅनेजरच्या बैठकींत बसली होती. अशा वेळीं माझ्या बिऱ्हाडाकडून आमचे श्वशुर दादा काळे मजकडे आले आणि त्यांनीं मला " कंपनीचें आपल्या नांवें एक रजिस्टर पत्र बिऱ्हाडाच्या पत्त्यावर आलें आहे तें मी आपल्याकरितां सही करून घेतलें. " असें सांगून तें रजिस्टर्ड पत्र त्यांनीं माझ्या हातीं दिलें. तालीम घेण्याचें थांबवून रजिस्टर्ड पत्र मी फोडून वाचलें. पत्र खालील मजकुराचें होतें.—" कंपनीच्या खर्चाला उत्पन्न पुरत नसल्यानें खर्च कमी करणें अवश्य झालें आहे. तेव्हां कंपनीशीं असलेला आपला संबंध ता. ३१ डिसेंबर १९३१ इसवी रोजीं संपला आहे असें समजावें. कांहीं दिवसांखालीं आपलें व आमचें बोलणें झालें तेव्हां मोबदल्याशिवाय काम कर-

ण्याची आपण इच्छा दर्शविली होती. परंतु आपल्या त्या थोरपणाचा फायदा घेणें इष्ट वाटत नाहीं म्हणून हें विनंतिपत्र लिहिलें आहे."

ज्या गोष्टीबद्दल मी होऊनच वरचेवर सांगत होतों व जी गोष्ट समक्ष एका जागीं बसून सहज होण्यासारखी होती त्या गोष्टीकरितां घरांतल्या घरांत नारायणरावानीं रजिस्टर्ड पत्र पाठविलें. या त्यांच्या अशिष्ट प्रकाराबद्दल मला अत्यंत वाईट वाटलें आणि चीडहि आली. कंपनींत मला बोलावतांना नारायणरावांनीं "मला अद्दल घडून माझ्यांत सुधारणा झाली असल्याचें तुम्हांला आढळून येईल." असें म्हटलें होतें. मीहि त्यांना "मला बोलावण्याची तुमची एक क्षणिक लहर आहे. त्या लहरीला मला बळी पडावयाचें नाहीं." असें म्हटलें होतें. असें असता नारायणरावांनीं अखेर निष्कारण घरांतल्या घरांत रजिस्टर्ड पत्र पाठविण्याचा अशिष्ट प्रकार केला. तेव्हां मनांत आलें, आपल्यांत सुधारणा झाल्याचें नारायणरावांनीं मला दाखविलें. परंतु नारायणराव बोलले तें विसरले आणि त्यांना त्यांची क्षणिक लहर आहे हें मी म्हटलें तें मीहि विसरून नारायणराव मोकळ्या मनानें माझ्याशीं वागतांना दिसत तें खरेंच मानून चाललों. त्याचा परिणाम जो व्हावयाचा तोच झाला.

नारायणरावांनीं सन्मानानें मला बोलावलें तसें सन्मानानच आम्ही दूर व्हावयास कांहींच हरकत नव्हती. नारायणराव त्याप्रमाणें वागतील असेंच वाटत होतें. किर्लोस्करांच्या मोरोबा, भाऊराव यांच्या आधुनिक भरतभेटीचें मी पूर्वी वर्णन केलें आहे. तशी मी व नारायणराव यांच्यांत गोष्ट घडेल अशी माझी कल्पना होती. गुरूचा मान नारायणराव देत होते. मोकळ्या मनानें व खेळीमेळीनें नारायणराव माझ्याशीं वागत असल्यानें कांहींहि न घेतां मोबदल्याशिवाय मी राहीन, नटांना शिकवीन असें मी मनापासून म्हणत होतों. तें खरें करून दाखविण्याची धमक व इच्छा माझ्यांत प्रांजळपणानें होती.

## माझी छाती नव्हती

नारायणराव मला जसें भासवीत होते तें त्यांचें खरेंच खरें असतें तर मला त्यांनीं मोबदल्याशिवाय रहा असें सांगून वर्षअखेर फूल नाहीं फुलाची

पाकळी या दृष्टीनें गुरुदक्षिणा म्हणून त्यांनीं जेवढें माझ्यापुढें ठेवलें असतें तें नाकारण्याची माझी छाती नव्हती. आनंदानें मी त्यांच्या देणगीचा स्वीकार खात्रीनें केला असता. कारण तो प्रकार अशिष्टपणाचा, ढोंगी, नाटकीपणाचा, माझ्या अभिमानाला निष्कारण धक्का देणारा नव्हता. परंतु नारायणरावांनीं आपलें थोर अंतःकरण न दाखवितां क्षणिक लहरच खरी करून दाखविली.

माझ्यानें स्वस्थ रहावलें नाहीं. मी त्यांनीं केलेल्या अशिष्ट प्रकाराबद्दल बापुरावांची चांगलीच हजिरी घेतली. झालें ती चूक झाली असें त्यांनीं कबूल केलें. परंतु तेंहि नाटकीच.

कंपनी सोडण्याच्या वेळीं कंपनीकडे माझी चार हजार बाकी होती त्यांतील एक हजार रुपये मला कंपनी सोडतांना मिळाले. बाकीच्या तीन हजारांचे निरनिराळ्या तारखाचे चेक मला देण्यांत आले. त्यांतील शेवटच्या हजार रुपयांच्या रकमा मला भागशःच मिळाल्या. परंतु मिळाल्या म्हणण्यापेक्षां निरनिराळ्या कारणांनीं मला त्या वसूल कराव्या लागल्या हेंच जास्त खरें आहे.

तारीख ४ जानेवारी १९३२ रोजीं गंधर्व कंपनीला पुनः रामराम ठोकून मी सांगलीस परत आलों.

———

# ७

# संन्यास



## घर बांधलें

सन १९३२च्या जानेवारींत मी सांगलीस आलों. नारायणरावांनीं केलेल्या अशिष्ट प्रकारानें, मनाचा धर्म बदलून पुनः रंगभूमीचें दर्शन घ्यावयाचें नाहीं, असा निर्धार केला व येतां क्षणीं माझ्या शेतीची पहाणी करून निर्वेधपणें निव्वळ शेतीवर निर्वाह करायचा असा मनांत विचार आला. फेब्रुवारी महिन्यांत शेतांतच घर बांधून तेथेंच रहावें असें ठरविलें व घराचा पाया घातला. शेतांत शेतीच्या उपयोगासाठीं घर बांधायची परवानगी मिळून घराला सुरवात झाली. प्रथम २०×१०च्या दोन खोल्या व पुढें मागें व्हरांडा असाच बेत ठरला; परंतु नंतर ती जागा पुरेशी होणार नाहीं म्हणून चौफेर व्हरांडा काढून घर बांधायचें असें ठरविलें. तीन तीन वर्षांच्या थकलेल्या बाक्या कुळांकडून वसूल करण्याचा सपाटा सुरू केला. मी घर बांधायला सुरवात केल्यामुळें कुळांना वाटलें "आतां ह्यो बामन इतच घर बांधूनशान न्हाइला." म्हणून बिनतक्रार, निरनिराळ्या स्वरूपांत, धान्य, जनावरें, रोखीनें सुमारें १७००।१८०० रुपये हातीं आले. मे महिन्यांत ७ तारखेला घराची वास्तुशांत केली. इतक्यांत उरलेल्या सामानांत शंभर रुपये जास्त खर्च केले तर माडी होत आहे असा सुतारानें बेत सुचवितांच दुमजला बांधायला सुरवात केली. दुमजला गच्ची थाटाचें घर होऊन संकल्पित रकमेपेक्षां घराकडे तिप्पट पैसे खर्च झाले. मे महिना तेथेंच काढला.

## दागिन्यांची चोरी

एप्रिल महिन्यांत माझी मुलगी सौ. सुशीला हिला सासरीं पोंचती केली. सांगलीहून सोलापुरास गेली. दुर्दैवानें एवढ्या प्रवासाच्या दरम्यान,

अथवा सोलापुरास गेल्यावर घरीं मुंज होती त्या गर्दीत, कुठें तरी तिचे दागिने चोरीस गेले. पुष्कळ शोध केला तरी तलास लागला नाहीं. परंतु तिच्या सासरचीं सर्व माणसें सालस वृत्तीचीं असल्यामुळें त्यांनीं तिला धीर देऊन सांत्वन केलें.

जुलै महिन्यांत सांगलीस प्लेगचें आगमन झाल्यामुळें शेतांतलें घर तयार होतेंच; म्हणून सर्व मुलेंमाणसें घेऊन बोरगांवास गेलों. तो मार्च १९३३ अखेर परत आलों. दहा महिने शेतीची मोकळी हवा, स्वच्छ निर्मळ निरोगी पाणी व उत्तम अन्न, यामुळें कंपनीबरोबर हिंडून निरनिराळ्या ठिकाणचें हवापाणी, जाग्रणें वगैरे जी म्लानता आली होती ती जाऊन ताजातवाना झालों. १९३३ जानेवारींत मला कन्यारत्नाचा लाभ झाला व हानीहि झाली.

## आगामी संकट

त्या दहा महिन्याच्या अवधींत नाटक कंपन्या घसरणीला लागलेल्या ऐकूं येऊं लागल्या. १९३३ च्या जानेवारीच्या सुरवातीस हिराबाई बडोदेकर यांच्या कंपनीला कमतनूरकरांनीं लिहिलेलें "स्त्री-पुरुष" नाटक शिकवायला गेलों होतों. त्या वेळीं मुंबईस एकंदर परिस्थिति पाहिली तों बोलपटाचें जें संकट नाट्यकलेवर आलें होतें त्याचा परिणाम नाटक मंडळ्यांवर स्पष्ट दिसूं लागला होता. १९३० सालीं डिसेंबरमध्यें नारायणराव व मी मुंबईस गेलों होतों. त्या वेळीं एक "लव्ह परेड" हा इंग्रजी बोलपट पहावयास गेलों होतों. बोलपट पाहिल्यावर मी नारायणरावांना म्हटलें होतें कीं नाटक मंडळ्यांवर हें आगामी संकट आहे. आणि तेंच प्रत्ययाला येऊं लागलें होतें. १९३२ सालीं प्रभातचा पहिला बोलपट "अयोध्येचा राजा" हा निघाला व त्यानें थिएटरें रिकामीं पाडावयास सुरवात केली होती. मी तो बोलपट पाहिला होता. नाटकासारखाच सर्व प्रकार दिसला. नाटक मंडळ्या आतां चालावयाच्या असतील तर नाटक मंडळ्यांनीं जुना जमाना सोडल्याशिवाय यश मिळणें दुरापास्त असें या दोन वर्षांच्या अवधींत दिसूं लागलें. मनाला एक तऱ्हेचा खेद होऊं लागला. परंतु बोलपट सृष्टीची कांहींच माहिती नाहीं त्यामुळें कांहीं लक्षांत येईना.

१९३४ सालीं एप्रिलमध्यें "मेनका" पिक्चर कंपनी निघाली व तिच्या चालकांपैकीं एक श्री. रांगणेकर हे सांगलीस आले. माझी त्यांची गांठ पडल्यानंतर औपचारिक बोलणें संपून मुख्य विषयाला सुरवात झाली. मी त्यांना येण्याचें कारण विचारतां त्यांनीं "सुवर्णमंदीर" या बोलपटांत काम करण्यासाठीं बोलावण्यास आलों असें सांगितलें. मी त्यांना म्हटलें तुमची ही यांत्रिक सृष्टी मला अगदींच अपरिचित आहे. तेव्हां मला तें जमणार नाहीं. नंतर कथानकाची चौकशी केली. त्यांनीं त्यांतील सूत्र सांगितलें. परंतु सिनारिओ वाचायला मिळाला असता तर बरें झालें असतें असें सांगतांच, त्यांनीं सांगितलें 'स्टोरी फारच चांगली आहे. तुम्हांला योग्य अशीच भूमिका आहे.' नंतर मोबदल्याबद्दल तात्पुरतें बोलणें होऊन दोन तीन दिवसांनीं त्यांनीं तीन हजार रुपये तीन महिन्यासांठीं देऊं असें कबूल केल्यावर मी मुंबईस जाऊन लेखी करार करून रुपये आगाऊ घेऊन आलों व ता. ५ मे रोजीं कराराप्रमाणें दाखल झालों.

## सिनेमासृष्टि

फिल्म सिटीमध्यें पिक्चर निघायला सुरवात होणार होती. रोज अकरा वाजतां फिल्म सिटींत जायचें. सायंकाळीं पांच वाजेपर्यंत बसायचें. फिल्म सिटींत त्या वेळीं चित्रपटांची सांथच उद्भवली होती. एका स्टुडिओंत पांच बोलपट कंपन्या होत्या. प्रत्येकाचा तालीम हॉल निराळा. खालीं निरनिराळे कठडे घालून त्या पिंजऱ्यांत एकेका कंपनीचें ऑफिस होतें. नट व नटी यांची सारखी ये, जा, सुरू असे. सिनेमासृष्टींतल्या नटाचा पोषाख म्हणजे, एक परकरी विजार, पोलो शर्ट, पायांत चप्पल अगर स्लीपर, डोक्याचे केंस चापून बसविलेले अगर इतस्ततः मोकळे सोडून प्रदर्शनीय केलेले. मुद्रा बेफिकीर. जणूं काय समाजांतल्या इतर माणसांपेक्षां आपण फार निराळे आहोंत. इंग्लिश चित्रपट पाहून इंग्लिश नटांची सर्व हालचाल उचललेली. एखाद्याला हांक मारतांना अगर एखाद्याला अभिवादन करतांना नुसता हात उचलून झोंकांत हलवतांना पाहिला म्हणजे या गांवठी साहेबांची कींव येई. सिनेमा नटी म्हणजे चित्रपटाचा प्राण. त्यांचीं तीं रंगीबेरंगी पातळें; कोरून बारीक केलेल्या भिंवया; हातां-

तील मनगटी घड्याळें; रंग लावून लालभडक केलेले ओंठ; मानेला झटके देत आकर्षकपणा आणण्याचा प्रयत्न व त्यांचा तो लाडीकपणा पाहून मी माझ्याकडे पाहूं लागलों, तों त्या स्टुडिओंत मी भूमिका करायला आलेला नट भटजीसारखा माझा मलाच वाटूं लागलों. मेनका पिक्चर-मधील वातावरण एकंदर संभावित होतें असें म्हणायला हरकत नाहीं.

## दोन दिवस कसे तरी काढले

प्रथमचे दहाबारा दिवस तालमींत गेले. नंतर कांहीं मंडळी बरोबर घेऊन डायरेक्टर आउटडोअर सीन घेण्यासाठीं जाऊं लागले. बाकीच्यांनीं अकरा ते सायंकाळीं सहापर्यंत स्टुडिओंत आलेंच पाहिजे. दोन दिवस स्टुडिओच्या आढ्याकडे पहात, सोडा लिंबू पीत, कसेतरी काढले. तिसऱ्या दिवशीं डायरेक्टरांना मी सांगितलें कीं, स्टुडिओंत उद्यांपासून मी येणार नाहीं. काम असेल तर वाटेल तितका वेळ बसेन. रोज हजिरी लावण्यास पाहिजे तर येत जाईन व काम नसल्यास परत जाईन. सर्व स्टुडि-ओंत माझ्या मतें ही वाईट रीत आहे कीं काम नसतांना माणसें उगीच डांबून बसवायचीं.

## माझा देह अस्वलासारखा दिसेल

आमचें सेटिंग तयार होत आलें. पोषाखाचें सामान पाहिलें. माझ्यासाठीं सिंहाच्या आयाळीसारखा टोप, पोटावर बकऱ्याचें कातडें, लठ्ठ लठ्ठ मण्यांचे अलंकार, दाढी मिशा, असा थाट पाहिला. टोप पाहिल्याबरोबर मी सांगितलें, “ माझें शरीर जाडजूड आहे, उतारवया-मुळें पोट खालीं लोंबत आहे; तरी माझ्या शरीराला साजेल असा पोषाख द्या. कारण एकंदर पोषाख घातल्यावर माझा देह अस्वलासारखा दिसेल. नंतर जरा बऱ्यापैकीं केंसांचा टोप आणविला. परंतु बकऱ्याचें कातडें छातीवर बसलेंच. करारानें बांधल्याकारणानें नशिबाला हात लावून व स्वतःच्या मूर्खपणाबद्दल स्वतःला शिव्या घेत रंग लावून तयार झालों. ”

## सिनेमांतील नट म्हणजे एक यंत्रच

माझी नक्कल मला लिहून दिलेली होती. त्यांत कोण, तिथें, हें फार उत्तम, अशीं तुटकीं वाक्यें लिहिलेलीं होतीं. माझी भूमिका नास्तिक



शेतकरी–श्री. गणपतराव बोडस



श्री. गणपतराव बोडस याचे बोरगावातील घर

मनुष्याची होती. सिनारिओ अर्धाच लिहिलेला. त्यामुळें चंडवर्मा (माझ्या भूमिकेचें नांव) नास्तिक कां झाला? पुढें त्याचा देवावर विश्वास कां बसला, हें डायरेक्टरनांहि समाधानकारक सांगतां येईना. तरी हा सिनारिओ थोडा तरी लिहिला होता. दुसरे एक डायरेक्टर नामांकित प्रसिद्ध असलेले होते. ते म्हणे सिनारिओ लिहितच नाहींत. आयत्या वेळीं वाक्यें लिहून सेटिंगवर पात्रांना देऊन म्हणायला लावतात. म्हणजे इतर यंत्रांप्रमाणें पात्र हेंहि एक यंत्रच अशी त्यांची समजूत असावी. नाटकांत वापरलेल्या पात्रांना कथाभाग सर्व कळतो. आपली भूमिका काय तें समजलेलें असतें. करामत काय करायची हें तालीम करून बसविलेलें असतें. काम उत्तम करूं असा आत्मविश्वास आलेला असतो. परंतु सिनेमांत फिरणें, हालचाल कॅमेरामनच्या हुकमतींत, आवाज साऊंड-इंजिनिअरच्या कब्जांत, अभिनय व भाषण डायरेक्टरच्या पंजांत, गाणें यूझिक डायरेक्टर म्हणून एक बैदा उत्पन्न झालेली असते तिच्या कक्षेंत, वेषभूषा मेकअप करणाऱ्याकडे, अशा जखडबंदांत काम व्हायचें असतें. याच्या उलट नाटकांत नाटक बसवितांना जो कांहीं त्रास होईल, अगर मेहेनत होईल तोंपर्यंतच योग्य परिणामासाठीं परिश्रम व बंधन असतें. परंतु रंगभूमीवर प्रयोग सुरूं झाल्यावर पात्राला त्याचें क्रीडांगण मोकळें असतें. त्यामुळें केवळ उदरभरणासाठींच ज्याला जायचें असेल त्या नाटकांतल्या नटानें सिनेमांत जावें.

## शकारी विश्वकर्मा

सिनेमाचे डायरेक्टर हे स्वतःला विश्वकर्मे समजतात. अभिनयाची यांची तयारी म्हणजे इंग्लिश फिल्म पाहून योग्यायोग्यतेचा विचार न करतां त्यांतले अभिनय आपल्या चित्रपटांतील पात्रांना शिकविण्याचा ते आव आणतात. त्यांना स्वतःला अभिनयाची तोंडओळखसुद्धां नसते. परंतु जाहिरातीच्या या युगांत वर्तमानपत्रांना मलिदा चारून हे स्वतःचा बोलबाला करून घेतात. ज्या वर्तमानपत्रांना यांचा मलिदा चालू असतो, त्या वर्तमानपत्रानें "अस्मादिकांची स्तुतीच केली पाहिजे. अस्मादिक स्तुतीला पात्रच आहेत." ही शकारी वृत्ती सर्व बोलपटांच्या चालकांत दिसून

येते. परंतु आहे हें असें आहे. एखाद्या वर्तमानपत्रांत निर्भीड आणि अगदीं खरीखरी अशी गुणदोषांची चर्चा आली कीं वर्तमानपत्रांच्या पाठींत जाहिरातीचा मलिदा बंद होण्याचा दंडा बसलाच. अशा स्थितींत कुठलें दोषाविष्करण नि कुठलें काय ? कांहीं हातांच्या बोटावर मोजण्याइतकीं दैनिकें, साप्ताहिकें सोडून दिलीं तर बाकीच्या वर्तमानपत्रांचें जीवन जाहिरातींवरच अवलंबून असतें. जाहिरात देणाऱ्यांच्याकडून वर्तमानपत्रांना गुप्त सूचना असते कीं "अमुक अमुक पात्रांचीच खूप प्रसिद्धी करा, व अमुक पात्रें पडद्याआड टाका." या गुप्त घातामुळें नटांना तरी डायरेक्टर अगर मालक यांच्यावरच नजर ठेवून जीवन कंठावें लागतें. मग अशा परावलंबी व पारतंत्र्याच्या स्थितींत मनाचे धर्म साशंकित राहिल्यामुळें नटांकडून कलेची वाढ तरी कशी होणार ? तात्पर्य, सिनेमासृष्टीचें हें थोडें निरीक्षण लिहिलें आहे.

## सिनेमांतील कवाईत

प्रथम माझ्या प्रवेशाचें शूटिंग सुरू झालें त्या दिवशीं डायरेक्टरांनीं सांगितलें, "तुम्हीं या भागांत इकडून तिकडे जा, परत तिकडून इकडे या, नंतर शेजारच्या पात्राकडे पाहून पुन्हां दुसऱ्या बाजूला जाऊन तेथें टेकून उभे रहा." या सर्व हालचाली कां ? कशासाठीं ? प्रसंग कोणता ? अगोदरचा कथाभाग काय ? या सीनमध्यें काय वठवायचें ? परिणाम कोणता उत्पन्न करायचा ? याबद्दल माहिती नसतांना, पात्रानें जें काम करायचें त्याला यंत्रापेक्षां कोणती किंमत आहे ? तेव्हां इतर यंत्रांपैकीं आपण एक यंत्र बनून काम करायचें व पोट जाळायचें. माझ्यासारख्यानें एखादा अभिनय केला तर ? तर ताबडतोब "हें नाटकांतल्यासारखें होतें" असा टोमणा यायचा. परंतु सिनेमांत नाट्य नसतें म्हणावें तर नाटकांतल्या चालीबरहुकूम सर्व चाललेलें असतें. नाटकांतल्या ज्या वाक्यानें अगर अभिनयानें प्रेक्षकांना आनंद होतो व त्यांच्यावर परिणाम होतो, त्याच वाक्यानें यंत्रासमोर उभें राहून तसेंच केलें असतां या विश्वकर्म्यांनीं हेटाळणी कां करावी ?

माझ्या मतें उत्तर एकच आहे; तें हें कीं, या लोकांचें ज्ञान यथातथाच असतें. त्यामुळें नाटकांत वापरलेल्या माणसानें जर शंका काढली तर समाधान करण्याचें सामर्थ्य त्यांच्यांत नसतें आणि तें वैगुण्य इतरांच्या दृष्टोत्पत्तीस आल्यास आपलें वजन व बोज कमी होईल अशी त्यांना भीति वाटत असावी. शेवटीं सांगायचें हेंच कीं नाटकांत मनोभावानें काम करणाऱ्या व लोकप्रिय झालेल्या नटाला या यंत्रासमोर काम करणें मनापासून आवडत नाहीं. परिस्थितीनें अगर नाइलाजानें काम केलें पाहिजे. मला सिनेमाला नालायक म्हणून कुणी म्हटलें तर त्याचा विषाद वाटत नाहीं; कारण नालायकांच्या मेळयांत आपण नालायक झालों तर झालों.

इंग्रजी नट कामें करतात; परंतु इंग्लिश व अमेरिकन बोलपटगृहांचें सर्व वातावरण तज्ज्ञांचें असतें. यंत्रसामुग्री भरपूर असते. परंतु आमच्याकडे ? कॅमेरा एकच असायचा. रेकॉर्डिंग मशिनवरचा माणूस आवाजाच्या बाबतींतला सर्वाधिकारी असतो. त्वेषानें बोलावयाचें वाक्य जसें म्हणावयाचें तसें म्हटलें तर रेकॉर्डिस्ट लागलीच ओरडतो " हलके बोला. खडखड आवाज होतो. " पुन्हां बोलल्यावर म्हणतो " आवाज बाजूला गेला. " एकंदरींत काय हालचाल, अभिनय, ध्वनि काढणें या जखडबंदीनें मनुष्य अगदीं हैराण होतो. एक वाक्य उच्चारतांच डायरेक्टरांना ' ॲंगल ' बदलायची लहर आली कीं अर्धे वाक्य एका ॲंगलमध्यें उच्चारून बाकीचा अर्धा भाग निराळ्या ॲंगलमध्यें उच्चारायचा. पहिला अर्धाभाग झाल्यावर फिल्म कट व्हायची. नंतर कॅमेरा, दिवे, मायक्रोफोन यांची योग्य जागीं हलवाहलवी होईपर्यंत व पुन्हां फोकस, पुनःपुन्हां फोकस, पुन्हां आवाजाची तालीम; पुनःपुन्हां आवाजाची तालीम; नंतर पुन्हां सर्व गोष्टींची फायनल ट्रायल व्हायची आणि मग " रेडी फटमार्क " झाल्यावर सुरवात करावी तर कांहीं तरी कारण होऊन डायरेक्टरमहाशय " कट् " म्हणून ओरडले कीं, पुनःपुन्हां तेंच तेंच करायचें. एका सबंध रात्रींत मेहेनत करून करून एकाद्या वेळीं एकाद्या रात्रीं दोनच वाक्यें झालेलीं मी पाहिलेलीं आहेत. अगोदर कसें घ्यायचें याची योग्य तालीम. नंतर सेटवर गेल्यावर पुनःपुन्हां सफाईदार येईपर्यंत

सर्व तालीम घ्यायला पाहिजे. तीसुद्धां रेकॉर्डिस्टसुद्धां हजर राहून. नाहीं तर पुन्हां आवाजाचा व्हॉल्यूम बरोबर नाहीं म्हणून रेकॉर्डिस्ट हाडें घुसळतोच.

हें सिनेमापुराण पुरे. मी सुवर्णमंदीरमध्यें काम करून पैशानें समाधानी, परंतु कामाच्या तृप्तीच्या दृष्टीनें असमाधानी होऊन परत आलों.

## निश्चय मोडला

नंतर १९३६ सालीं बलवंत कंपनीच्या प्रेमळ विनंतीवरून पुनः रंगभूमीवर काम न करण्याचा माझा निश्चय मला मोडावा लागला. याचें कारण नाटक कंपनी पेंचप्रसंगांत आहे, तिला मदत होते आहे हा पवित्र हेतू. उत्पन्नापैकीं चवथाई मला देण्याचा तोंडी करार होता. परंतु ऐनवेळीं पाऊस येऊन मनासारखें उत्पन्न झालें नाहीं म्हणून मी कांहींहि घेतलें नाहीं. नंतर २।३ महिन्यांनीं मास्टर कृष्णराव यांनीं भारत गायन समाजाच्या मदतीसाठीं प्रयोग ठरवून मला काम करण्यासाठीं पाचारण केलें. मा. कृष्णरावांचा प्रेमळ आग्रह व कै. भास्करबुवांचा समाज यामुळें मला काम करावें लागलें. प्रयोग संशयकल्लोळ झाला. पांचसहा वर्षांचा खंड पडूनहि पुण्याच्या प्रेक्षकांनीं माझें उत्तम स्वागत केलें व अजूनहि प्रेक्षकांना माझें काम पहिल्याइतकेंच आवडतें हें पाहून अतिशय आनंद झाला.

१९३७ सालीं श्री. बेडेकर, कमतनूरकर, तलगेरी यांनीं स्थापिलेल्या आर्टिस्ट कंबाईन या फिल्म कंपनींत " मराठ्याची मुलगी " या बोलपटांत मला आग्रहानें काम करावें लागलें. तलगेरी पी. एस्. यांनीं मुंबईहून तुटपुंजें भांडवल आणलें. माझा व तलगेरींचा ३।४ वर्षें चांगलाच परिचय व ऋणानुबंध होता. त्यांना मी केलेलें काम करायला कुणीहि मिळेना. तेव्हां त्यांनीं मला काम करायचा आग्रह करून शेवटीं असेंहि सांगून विनविलें कीं, तुम्हीं जर काम केलें नाहीं तर माझी आयुष्यांतील एक संधि जात आहे तेव्हां ती विनंति मी मान्य केली. संबंध फिल्मला ३० ते ३५ हजार रुपये खर्च झाले. मला द्यायच्या मोबदल्याबद्दल प्रश्न काढतांना तलगेरी यांनीं मला पत्रानें कळविलें कीं " तुमच्या बाबतींत मी तुम्हांला ब्लॅन्क चेक दिला आहे. " नंतर फिल्म पुरी होईपर्यंत

पैशाच्या अडचणी पाहून मी दयार्द्रबुद्धीनें माझ्या पदरचे दोनशें सव्वा दोनशें रुपये त्यांना दिले. शेवटीं तळगेरी गांवांतील देणें ठेवून निघून गेलें. नंतर नट व प्रमुख नटी हीं एक दिवस पळून गेलीं. गांवभर छिः थूः झाली. नंतर १९३८ सालीं माझ्या खासगी येण्याबद्दल व फिल्मच्या मेहनतान्याबद्दल त्यांना समक्ष भेटून विचारलें. पितापुत्रांनीं मला तोंडावर चक्क सांगितलें कीं "तुम्ही फुकट काम करतां याच कल्पनेंत आम्हीं आहों" "मग चिरंजिवांनीं ब्लॅन्क चेक दिला आहे तो कशासाठीं ?" या प्रश्नावर इतर कर्जबाजारी लोकांप्रमाणें "जा फिर्याद करा. आम्ही कांहीं देणें नाहीं" असा रोकडा जबाब त्यांनीं दिला. फिल्ममध्यें कामें केलेल्या पुष्कळ लोकांच्या तोंडास पानें पुसलीं गेलीं. मी फिर्याद केली असती तर खात्रीनें पैसे वसूल केले असते. परतु तितका त्रास आणि दगदग सोसण्याची शरीराची तयारी नसल्यामुळें सिनेमासृष्टींतल्या फसव्या माणसांचा एक अनुभव मिळाला म्हणून स्वस्थ बसलों.

## माझें सांसारिक आयुष्य

माझें प्रथम लग्न १९०५ सालीं होऊन माझी प्रथम पत्नी व झालेला मुलगा सन १९०८ च्या मे महिन्यांत दिवंगत झालीं. १९०८ सालच्या मार्गशीर्ष महिन्यांत माझें द्वितीय लग्न झालें व हल्लीं तीच माझी विद्यमान पत्नी आहे. तिचें नांव वास्तविक अन्नपूर्णा ठेवलें आहे. परंतु ती आपल्या माहेरच्या बनूताई या नांवानेंच प्रसिद्ध आहे. पहिल्या पत्नीचा व माझा प्रत्यक्ष सहवास एक वर्षच झाला; त्यामुळें तिच्या स्वभावाचें पूर्ण वर्णन काय देऊं ? परंतु ती अतिशय सुशील आणि गरीब होती. तिचा एक सख्खा भाऊ म्हणजे डॉ. शंकर विष्णू देवधर, एम्. डी. (व्हियेन्ना) हे क्षयरोगाचे पारंगत डॉक्टर असून ते नाशकास आहेत.

माझी द्वितीय पत्नी अत्यंत सुशील समाधानी व सहनशील आहे. सुशीलता आणि समाधानवृत्ति ही तिची उपजत देणगी असून माझ्या करारी आईच्या करड्या अमलाखालीं पुरें एक तप काढल्यामुळें सहनशीलता हा गुण तिनें पैदा केला. अशा प्रेमळ भार्येच्या सहवासांत माझीं तीस वर्षे आतांपर्यंत अत्यंत सुखांत गेलीं आणि खरोखरी मी भाग्य-

वान म्हणूनच मला असें कौटुंबिक सुख लाधलें. मला तापटपणानें आई-पासून मिळालेल्या संस्कारामुळें एकदम संतापण्याची खोड आहे. परंतु माझी पत्नी त्या वेळीं माझें संतापणें सहन करून, स्वतःची चूक नसली तरी मान्य करून, माझा संताप थंड करते. वळवाच्या पावसाप्रमाणें असल्यामुळें माझा संताप कांहीं मिनिटांतच निघून गेल्यावर झाल्या प्रकाराबद्दल चर्चा करून माझें संतापणें निरर्थक होतें, हें मला पटवून देते. मी तिला विचारतों कीं हें त्या वेळीं कां सांगितलें नाहींस ? ती हंसत म्हणते " त्या वेळेला बोलायची सोय असते का ? " मला याप्रमाणें कुटुंब-सौख्य असून तें मी आनंदांत उपभोगीत आहें.

मला हल्लीं पांच कन्या आहेत. थोरली कन्या सौ. सुशीला ही सोलापूरचे प्रसिद्ध वकील दिवाणबहादूर एन्. सी. लिमये यांचे सर्वांत कनिष्ठ बंधू श्री. मुरलीधर चिंतामण लिमये यांना दिली असून ते माढे येथें वकिली करीत आहेत. माझी सुशीला फार भोळीभाबडी आहे. माझे जामात अत्यंत दिलदार व स्वाभिमानी आहेत. तीं दोघें एक दिलानें संसारांत निमग्न आहेत. त्यांना दोन मुलगे आहेत. त्या मुलांच्या लीला पहात पहात तासान्तास मी आनंदांत काढीत असतों. माझी सुशीला उत्तम गाते. एखादें नाटक अगर बोलपट पाहून आली कीं दोन तरी चाली घेऊन येते. अशी तिला बुद्धीची ईश्वरदत्त देणगी आहे. खादाड बापाची मुलगी असल्यान गृहकृत्यांतहि ती सुग्रण झाली आहे. दुसरी मुलगी शांता. आतां लग्नाची आहे. तिसरी लीला, चवथी कमल व एक तान्ही ( उषा—मैना ). जाणत्या सर्व मुली गाण्याच्या प्रेमी असून अत्यंत समाधानी व निकोप प्रकृतीच्या आहेत. माझीं सर्व मुलें मला प्राणापेक्षांहि प्यार आहेत आणि अशा संसाराच्या प्रेमळ वातावरणांत मी अत्यंत समाधानांत आणि आनंदांत कालक्रमणा करीत आहें.

## नशीबवान नाटकवाला

माझा आयुष्यक्रम आणि प्रेमळ असें सांसारिक जीवन पाहून मला लोक नशीबवान नाटकवाला असें •म्हणतात. मी मीठभाकरी हलाखी-शिवाय खात आहे हें पाहून कांहीं विघ्नसंतोषी लोकांच्या पोटांत पोटशूळ

उठून. "गंधर्वाला कर्जबाजारी ठेवून मजा करतो आहे" असेंहि म्हणायला कमी करीत नाहींत. वास्तविक गंधर्व मंडळी सोडल्यानंतर त्या वेळच्या अकारण व सकारण शत्रुत्व करणाऱ्यांनींहि माझ्यावर अप्रामाणिकपणाचा आरोप केलेला नाहीं. हीच माझ्या चोख व्यवहाराची कसोटी आहे.

## माझ्या स्वभावाचें दिग्दर्शन

माझ्या स्वभावांत मितव्ययीपणा आहे. माझी बरी स्थिती पाहून ज्यांच्या पोटांत कळ उठते त्यांनीं व गैरशिस्त खर्च करणारांनीं "चिक्कू" अशी उपाहासानें माझी चर्चा केलेली माझ्या कानावर आलेली आहे. मूर्खपणानें, गैरहिशोबीपणानें पैसे खर्च करणें ही जर उदारता असेल तर मी चिक्कू असण्यांतच मोठेपणा मानीन. माझ्यांत मितव्ययीपणा यायला मुख्य कारण हेंच कीं, ऐन तारुण्याच्या भरांत ज्या वेळीं हातांत पैसा खेळूं लागतो त्या वयांत मनुष्याच्या मनोवृत्ती उच्छृंखल होऊन त्याला निरनिराळे नाद व खर्चाचीं निरनिराळीं व्यसनें लागतात; परंतु वयाच्या पस्तीस वर्षांपर्यंत मला प्रपंचपूर्तीपेक्षां जास्त पैसाच मिळत नव्हता व मी मनानें पूर्ण प्रापंचिक असल्यामुळें हौसा, मौजा करण्याची सोयच नव्हती. पस्तीस वर्षांच्या वयाच्या वेळीं मनुष्याच्या मनाला, महत्त्वाकांक्षेला व ध्येयाला एक प्रकारचा स्थिरपणा येतो. उसळ्या मारणारे मनोविकार ताब्यांत राहतील असा बराचसा आत्मविश्वास आलेला असतो. त्यामुळें व परमेश्वराची कृपा व मातुश्रींचा धाक यामुळें मुबलक पैसे मिळूं लागल्यावर प्रिय पत्नीला दागिन्यांनीं नटविणें हेंच मनाच्या हौसेचें कृत्य डोळ्यासमोर राहिलें. आपली कमाई आपल्या प्रिय माणसांना अर्पण करणें यांत मनाचें मोठें समाधान आहे.

गंधर्व कंपनीशीं झालेला भागीदारीचा करार दहा वर्षांचा असल्यामुळें वयाच्या त्रेचाळीसाव्या वर्षीं आपण मोकळे झाल्यावर कुणापुढेंहि लाचारीनें जाण्याचा प्रसंग येऊं नये यासाठीं संग्रह करणें अवश्य आहे असें मनानें घेतलें आणि तसा संग्रह करण्याची प्रबल इच्छा होऊन शक्य झाला तो संग्रह मी केला आहे. ही मला झालेली सद्भावना, जर माझ्या दुसऱ्या नाट्यव्यवसायी बंधूंना झाली असती, तर "नाटकवाले" म्हणून

जे लोक हेटाळणीनें संबोधतात त्यांच्या नाकाचे शेंडे खालीं राहिले असते. माझे भागीदार बालगंधर्व आपल्या उधळया वृत्तीनें कर्जात राहिले. परंतु जनतेची मनोवृत्ती अशीच दिसत आहे कीं "बालगंधर्व भोळा भाबडा परंतु हा बोडस पहा. बालगंधर्व कर्जात पचतो आहे आणि बोडस सांगलीस स्वस्थ चैनींत बसला आहे." माझा असा उल्लेख करतांना हे शब्द-काढणारे लोक असा विचार करीत नाहींत कीं, बालगंधर्व कर्जबाजारी झाला यांत बोडसाचा काय दोष? गंधर्व कंपनीची भागीदारी होती तोंपर्यंत मिळालेला प्रत्येक पैसा हिशोबानें माझ्या भागीदारीच्या हिस्शानें आलेला आहे. प्रत्येक वांटणीपत्रकावर भागीदारांच्या रुजवातीच्या शेवटपर्यंत सह्या आहेत. मी भागीदार असतां माझ्या प्रापंचिक खर्चाचें योग्य बजेट ठरविलें होतें व बजेटा-बाहेर मासिक खर्च कारणाशिवाय जाऊं नये याबद्दल मी दक्ष असें. कारण हा भागीदारींत मिळालेला पैसा म्हणजे एक पूर आला आहे, पुन्हां लोंढा येईल कीं नाहीं या साशंक सावधगिरीनें मी थोडाफार संग्रह केला. नारायण-रावांना माझ्या दीडपट पैसे मिळत असून त्यांच्यापाशीं संग्रह झाला नाहीं हा माझा दोष का? परंतु जग हें दुतोंडें आहे. मी भागीदारींत झाला तो संग्रह केला. भागीदारींत त्रास होत आहे, व आपल्या खिशांत पडणाऱ्या पैशाची बेजबाबदारपणानें लूट चाललेली प्रत्यक्ष डोळ्यानीं पहात असतांना व तिचा प्रतिकार करण्याचें सामर्थ्य अंगीं असूनहि केवळ प्रतिकार करणें म्हणजे तंटा सुरू करणें हें मनांत घेऊन मीच भागी तोडली. नंतर कोण-त्याहि तऱ्हेनें हा धंद्याचा जुगार खेळायचा नाहीं असा मनाचा दृढ निश्चय केला व टिकवला.

माझी दातृत्वाची कल्पना जाहिरातीच्या लोकप्रियतेवर आधारलेली नाहीं. अडल्या भिडल्या सत्पात्र माणसाला शक्यतेनुसार मदत करणें; विशेषतः माझ्या नाट्यव्यवसायी बंधूंना अडचण पडली असतां वाटेल त्या वेळीं, त्यांच्या पूर्ण अपेक्षेप्रमाणें जरी नाहीं तरी माझ्या स्थितीप्रमाणें, मी मदत करीत आलों. मदत करतांना, परत पैसे येतील अशी अपेक्षा बाळगली नाहीं. परत केले तर दातृत्वाचा डौल आणून मी परत आलेले पैसे नाकारले नाहींत.



श्री. गणपतराव बोडस



त्यांची प्रथम पत्नी.



श्री. गणपतराव बोडस, त्यांच्या द्वितीय पत्नी व त्यांचा परिवार.

माझ्या स्वतःच्या सुखसोईच्या बाबतींत मी खर्चाची काटकसर करीत नाहीं. माझी सुस्थितीची कल्पना अशी आहे. सुग्रास जेवण व धड आणि स्थितीला योग्य असा कपडा. खोऱ्यानें पैसे मिळवीत असतां जो पोषाख मी ठेवला होता, तोच पोषाख अजूनहि राहिला आहे. राहणीची घडणच मी अशी आंखली होती कीं द्रव्याचे झरे आटल्यावरहि आपल्यावर दैन्याची कळा येऊं नये. गाडी मोटारीची हौस भागवून, पैशाचा ओघ कमी झाल्यावर ती वाहनें ठेवण्याचें सामर्थ्य नाहीं म्हणून कष्टी होण्यापेक्षां पंचवीस रुपये फेंकले असतां दोन दिवस मोटार उभी राहते व आपण तशी उभी करूं ही आपली शक्ति आहे यांतच समाधान आहे. शिवाय गॅरेज, ड्रायव्हर वगैरे जबाबदारी नाहीं. पेट्रोलची बाकी थकल्यामुळें पंपवाल्याचे तगादे नकोत. असे विचार ठरवून त्याप्रमाणें आचरणांत आणून माझें आयुष्य मी समाधानी केलें आहे.

मला जात्याच मित्रमंडळ निर्माण करण्याची कला साधली नाहीं. माझ्या विद्यार्थी दशेंतल्या कांहीं मित्रांची मैत्री आजतागायत मतभेदा-शिवाय टिकली आहे. पुढेंहि नाटक कंपनीच्या आयुष्यांत कांहीं मित्र झाले. त्यांपैकींहि थोडेच लोक मित्र हें नांव सार्थ होऊन टिकले आहेत. व हल्लींहि श्री. गणपतराव गोडबोले, बन्याबापू कमतनूरकरप्रभृति मित्र-मंडळांत मी सुखानें कालक्रमणा करीत आहें. मित्रांचा तांडा गोळा करा-यचा व आपल्या स्तुतिपाठकांचा संप्रदाय निर्माण करायचा प्रकार मला मनापासून आवडत नाहीं; त्यामुळें मी उर्मट व तुसडा आहे असा पुष्क-ळांचा समज होत आला आहे. परंतु प्रत्यक्ष परिचयानें तो त्यांचा समज निर्मूल असल्याचें त्यांनीं कबूल केलें आहे. याला कारण मला एकच दिसतें कीं माझ्या मुद्रेवरच तसा भाव दिसत असावा. कारण नसतांना हंसत, लीनता दाखवीत, भाषण करून ओव्हर ॲक्टिंग करणारीं कांहीं माणसें असतात त्यांतला मी नाहीं.

मला विविध विषयांवर विनोदी भाषण करणारीं, मित्रमंडळ बसलें असतां मशिदीसारखा गंभीर चेहरा न ठेवणारीं माणसें मनापासून आवडतात. वादविवादांत दोन देणें व दोन घेणें मला मनापासून आवडतें.

विशेष परिचयाचा मनुष्य आपल्याला न आवडणाऱ्या गोष्टी करीत आहे असें मला वाटल्यावर मी पूर्वीप्रमाणें तंटा न करितां त्याचा सहवास टाळतों. ढोंगी माणसाचा मला मनापासून तिरस्कार वाटतो. भांडणारा पुरवला. परंतु गोड बोलून गळा कापणारा नको. मला हांजी हांजीची चीड आहे. त्यामुळें मी कधींहि लांगूलचालन केलें नाहीं व करण्याचा प्रसंगहि आलेला नाहीं.

पेंचप्रसंगांत लाचारी न दाखवितां मी सुटून गेलों आहें. माझ्या स्वभावांतला एक मुख्य दोष असा आहे, कीं कोणाच्याहि परिणामकारक भावनायुक्त भाषणावर माझा एकदम विश्वास बसतो. आणि त्याचा ढोंगी-पणा उघडकीस येईपर्यंत मी त्याच्या गुणाची व योग्यतेची दुसऱ्याजवळ अवास्तव तारीफ करतों. त्यामुळें पुष्कळ वेळां माझी तोंडफोडहि झालेली आहे. हा दोष मागून माझ्या लक्षांत येतो.

एखादी गोष्ट करायची माझ्या मनांत आली, कीं लागलीच त्या गोष्टीचा मी एकदम पाठपुरावा करायच्या मार्गाला लागतों. परंतु ती गोष्ट होणें त्या क्षणीं शक्य नसेल तर वेळ टाळल्यानंतर माझ्या कल्पनाशक्तीचीं चक्रें फिरूं लागून मग त्यांतला ग्राह्यअग्राह्य भाग लक्षांत घेऊन माझें नुकसान मी टाळलें आहे. परंतु कुणाचीहि पहिली छाप माझ्यावर बसते हें मात्र सत्य आहे.

मी थोडासा डूक धरणारा आहें. दुसऱ्यांनीं केलेला अपमान मी विसरत नाहीं व योग्य काळीं त्याचें उसनें फेडल्याशिवाय रहात नाहीं. माझी चूक माझ्या लक्षांत आल्यावर मी प्रांजलपणें ती कबूल करतों. मुर्दा-डपणानें आपली चूक झाली हें कळल्यावरहि ती झाली नाहीं असें हटवादी-पणानें म्हणणें चांगलें नाहीं असें माझें ठाम मत ठरून गेलें आहे.

मी कोणालाहि आश्वासन देतांना प्रथम विचार करून मगच तें देतों. व दिल्यानंतर कोणत्याहि कारणानें, "तुमचा माझा गैरसमज झाल्या-मुळें मला शब्द पाळतां येत नाहीं अशा पळवाटा काढून मी कधींहि आश्वासनापासून परावृत्त झालों नाहीं.

नाइलाजानें मी थोडी सावकारी देवघेव केली आहे. परंतु कुळां-कडून जबर व्याज, अगर व्याजाचें व्याज, अगर हिशोबाची लटपट करून अन्यायानें पैसा कधींहि घेतला नाहीं. सुमारें दोन हजारांचे हुकूमनामे जप्ती करायची नाहीं या हळवेपणानें मुदतींतून घालविले आहेत. माझें ज्याच्याकडे येणें असेल तो माणूस दानतीचा असून त्याला वेळेवर देणें शक्य झालें नाहीं तर मी कधींहि कोर्टाचा अवलंब करून त्याला वसूली-दंडा दाखविला नाहीं. परंतु मुर्दाड माणसाचीं हाडें खिळखिळीं केल्या-शिवाय रहायचें नाहीं अशी माझी मनोवृत्ती आहे. प्रत्येक गोष्ट "जाऊं द्या" म्हणून सोडून देणें मला मनापासून आवडत नाहीं. एखाद्यानें मला मूर्ख बनवून माझ्या पैशाचा अपहार केलेला मला फार जाचक होतो. मग त्या पैशाच्या दुप्पट पैसे गेले तरी त्याच्याकडून पैसे काढण्याचा मी आटो-काट प्रयत्न करीन.

मी ज्या गांवांत रहातों त्या गांवांतील दुकानदारांना व घरमालकांना माझा पूर्ण विश्वास आहे. त्यामुळें ते होऊन माझ्याकडे कधींहि मागणी करीत नाहींत. कारण त्यांना पक्कें माहीत आहे कीं पैशाची सोय असल्यावर आपलें बिल एक मिनिट थांबणार नाहीं, आपल्या घरीं चालत येईल; आणि या माझ्या वागणुकीमुळें, माझ्या परोक्ष कुणी माझ्या शेतीच्या गांवीं चौकशी केली तर त्यांना असेच शब्द ऐकूं येतील कीं "बोडसाचा व्यव-हार सच्चा आहे" त्यामुळें ज्या संस्थानांत माझी शेती व व्यवहार आहे त्या संस्थानचे राजेसाहेब व सर्व अधिकारी मंडळ यांनाहि माझ्या चोख-पणाची खात्री पटलेली आहे असें माझ्याशीं त्यांच्या असलेल्या प्रेमळ वागणुकीवरून मी निःशंकपणें म्हणतों.

आमच्या मळे संस्थानचें राज्ययंत्र फार चांगलें आहे. प्रजेला कोण-चाहि त्रास नाहीं. शिवाय संस्थानच्या सांपत्तिक स्थितीप्रमाणें प्रजाजनांच्या सुखसोई आस्ते आस्ते होत आहेत, होतील. सरकारी फाळाहि अंशतः कमी केला आहे.

मी कंपनीचा चालक असतां माझ्या कडक शिस्तीमुळें नाटक कंपनींत सुखासक्त असलेला नटवर्ग माझ्यावर असंतुष्ट असे. तालमीच्या

वेळीं मी कधींहि एक मिनिट उशिरा आलों नाहीं व त्यामुळेंच उशीर करणाऱ्यांना मी चक्रावर धरीत असें. मी तालमी घेण्यांत, अगर रंग-भूमीवर काम करण्यांत कधींहि अंगचोरपणा अगर चालढकल केली नाहीं. कारण माझा असा दृढविश्वास आहे कीं, विद्येची अगर कलेची उपासना परमेश्वराच्या उपासनेसारखी कर्मठपणानें केली असतां त्या उपासनेचें फळ अथवा सिद्धि मिळालीच पाहिजे. त्या उपासनेप्रीत्यर्थ झालेले आपले परिश्रम ईश्वराच्या घरीं रुजूं होतात. त्याचप्रमाणें मी माझ्या सहकाऱ्यांचा कधींहि मत्सर केला नाहीं. अगर कुणाचीहि सुस्थिती ऐकून माझ्या पोटांत कधीं वायगोळा उठला नाहीं. त्यामुळेंच मी खाऊन पिऊन सुखी आणि समाधानी आहें.

नाटक कंपनीच्या व्यवसायांत असतां माझ्या भूमिकेच्या मननांत माझा दिवसांतून थोडा वेळ तरी मी खर्च करीं. मोठमोठ्यानें नकला म्हणून अभ्यासाचें प्रदर्शन करणें मला आवडत नव्हतें. जिभेला वळण लागण्यासाठीं गीतेचा पंधरावा अध्याय मी पूर्वी म्हणत असें. त्यामुळें वाणीला एक प्रकारचें तेज आणि अस्खलितपणा येतो.

आज सहा सात वर्षें मी नाटक मंडळींतील कुणी भेटला तर भावी काळांत नाटक कंपन्या कशा असाव्या, त्यांची घटना व नाटकें कशीं असावींत याबद्दल बोलत आलों आहें. परंतु जुन्या चाकोरींतून बाहेर पडायची बुद्धीच अजून कुणाला होत नाहीं. मात्र माझ्या कल्पनेप्रमाणें आचार्य अत्रे यांची नाटकें मला नवीन तऱ्हेचीं वाटलीं. रोजच्या व चालू जमान्यांतील पात्रें घेऊन समाजांतील दोषांचें विनोदी पद्धतीनें, गंभीर प्रसंगानें त्यांनीं उत्तम आविष्करण केलें आहे.

आतां नाटक कंपन्या भावी काळांत कशा असाव्या याबद्दलचे माझे वैयक्तिक विचार मांडीत आहें. अर्थात ते सर्वांना पसंत पडलेच पाहिजेत असें नाहीं. परंतु सुचला तो एक मार्ग दाखवित आहें.

सध्यांच्या एकंदर जगांतील वातावरणावरून, पूर्वीप्रमाणें एक मालक अगर जास्त भागीदारांची कंपनी यशस्वी होणार नाहीं. जगांत सर्वत्र समतेचें वारें खेळूं लागलें असल्यानें त्याचा नकळत प्रत्येक व्यक्तीवर व

धंद्यावर परिणाम होत आहे. पूर्वी नाटक कंपन्यांना सुबत्तेचा काळ होता म्हणून वाटेल तसे पगार देणें परवडत असे. परंतु सरासरी आणि कशी तरी नाटक कंपनी चालू करायची म्हणजे पगारी नोकर ठेवणें दिवसेंदिवस कठीण झाले आहे. म्हणून ती व्यवस्था मोडून खालीलप्रमाणें मांडणी करावी.

कंपनीचा मालक असा कुणी नसून सर्वच मंडळी भागीदार करावी. फक्त आचारी, पाणके, गडी अशा दर्जाचीं व डोअरकीपर्स वर्ग हा पगारी ठेवावा. काम करणारीं जीं माणसें असतील त्यांचे खर्च वजा जातां उत्पन्नावर टक्केवारी योग्यतेप्रमाणें व लायकीप्रमाणें ठरवावी. खर्च वजा जातां जी रक्कम राहील त्यांत नवीन नाटकाच्या सर्व तयारीसाठीं, प्रवास-खर्चासाठीं, जरूरीकरितां गंगाजळीसाठीं कांहीं प्रमाणांत रक्कम बाजूला ठेवावी. गंगाजळींतून जरूरीप्रमाणें रक्कम घेतल्यास, ती परत करण्याची वेळ येतांच, परत गंगाजळींत भरावी.

**भोजनखर्चाचें खातें**—भोजनखर्चाच्या व्यवस्थेसाठीं कुणीतरी कॉन्ट्रॅक्टर गांठावा. म्हणजे त्यालाहि धंदा होईल व याच धंद्यावर त्याची उपजीविका अवलंबून असल्यामुळें नासधूस होणार नाहीं. प्रत्येक माणशीं दोन वेळ चहा, दोन वेळ जेवण, नाटक प्रयोगाच्या दिवशीं चहा कॉफी वगैरे खर्चाचा अंदाज बांधून रक्कम द्यावी. आचारी, वाढपी, वगैरे सर्व कॉन्ट्रॅक्टरनें ठरवून ठेवावे. म्हणजे चालकांच्या मागची ही एक उपाधी कमी होईल.

विवाहितांना त्यांच्या कुटुंबांत बायकामुलें असतील त्याप्रमाणें खर्चा-साठीं मासिक रक्कम द्यावी व साल अखेर सर्व मिळकतींतून ( नफ्यांतून ) ती तसलमात म्हणून त्याच्या टक्केवारींमधून वजा घालून बाकीची टक्के-वारीची रक्कम देत जावी.

अविवाहितांना त्यांच्या लायकीप्रमाणें मासिक रक्कम खर्चासाठीं देऊन त्याचाहि हिशोब वर लिहिल्याप्रमाणें करावा.

कंपनींतील सर्व तऱ्हेचीं कामें श्रमविभागाच्या तत्त्वाप्रमाणें जबाबदार मंडळींनीं वांटून घ्यावीं. अगदीं जरूरीपेक्षां जास्त खर्च न होईल अशी खबरदारी घ्यावी.

हा मोठा, हा लहान, असा भेदभाव माजवूं नये व योग्यतेची जाणीव कुणी कुणाला देऊं नये. मिळवा आणि घ्या अशीच व्यवस्था हितपरिणामी होईल. प्रत्येकाला टक्केवारी ठरलेली असली म्हणजे आपली टक्केवारी वाढविण्याची प्रत्येकाला आंच लागेल. एखाद्याला शेंकडा १० टक्केवारी असेल तर ती वीस कशी होईल ही तळमळ उत्पन्न होईल.

जबाबदार मंडळींचें एक मंडळ तयार करून प्रत्येकाकडे एकेका खात्याची जबाबदारी टाकावी. या मंडळाचा मुख्य दरवर्षी अगर दर तीन वर्षांनीं बहुमतानें निवडावा. कुणीहि विशेष कारणाशिवाय एकमेकांच्या खात्यांत ढवळाढवळ करूं नये. त्यानें नसते तंटे उद्भवतात.

**नाटककारांना मुशाहिरा**—नवीन नाटक लिहून घेतल्यानंतर नाटककाराला ठराविक रक्कम द्यायची ठरली तर मासिक खर्चांतून सहज देतां येईल, अशा हप्त्यानें ठरवावी. नाटककाराला टक्केवारी कबूल असेल तर उत्तम. यशस्वी नाटकाला किती रक्कम मिळावी याचा अंदाज स्थितीच्या मानानें बांधून ती मर्यादा घालावी. म्हणजे यशस्वी नाटकाला जास्तींत जास्त किती रक्कम व अयशस्वी नाटककाराला कमींत कमी किती रक्कम ती स्पष्टपणें ठरवून टाकावी म्हणजे ग्रंथकार व नाटक कंपनी यांचा सलोखा राहील.

नाटक प्रयोग जास्तींत जास्त ३॥ अगर ४ तासांपेक्षां मोठा असूंच नये. फक्त उत्तम गाणाऱ्या पात्रालाच पदें घालावीं. पदांची संख्या ८ ते १० च्या वर असूं नये. पदांतल्या अक्षरांचे उच्चार स्पष्ट करून घेण्याची खबरदारी ग्रंथकारानें घेतली पाहिजे आणि ती खबरदारी त्याला घेतां येत नसेल तर त्यानें पद्यें करायचे श्रम न घेतां मूळ चीजाच म्हणायला सांगावें. कारण गाणाऱ्या पात्रांचे आवाज लहान, व त्यांत अस्पष्ट व चावीत शब्दोच्चार करायची लकब; त्यामुळें फक्त सूर ऐकूं येतात, शब्द कळत नाहींत.

गाणाऱ्या पात्रानें गाण्याचें वस्त्रगाळ चूर्ण करायचे दिवस आतां संपले आहेत असें मला वाटतें. पदाला सुरवात केल्याबरोबर बाकीच्या पात्रांना मागें मोकळें सोडून समोर उभे राहून, हातरुमालाचा चोळामोळा

करीत, अगर पदराला पीळ घालीत पदांचें दळण सुरू करून तानेला टाळी पडे तोंपर्यंत तानेच्या गिरक्या घेत, रसिकांचे हाल करण्यापेक्षां, चटका लागून, अहाहा, वाहवा, असा उद्गार निघेल असेंच चटकदार गोड व रसानुकूल गायन असावें. गद्यांतील रसाला पद्यानें उठाव आला पाहिजे नाहीं तर भयंकर रसहानी होते; व अरसिक प्रेक्षकांच्या मनोरंजनाच्या व वहावा मिळविण्याच्या हव्यासानें रसाचा आजपर्यंत गायकपात्रांनीं खून केल्यामुळें त्या नवरसांचा शाप नाटक कंपन्यांना बाधला आहे असें वाटूं लागतें. स्वयंवर नाटकासारखीं गायकीच्या चाली असलेलीं नाटकें रंगभूमीवर येऊं लागल्यामुळें संगीत नाटकें म्हणजे गाण्याचा जलसा, असा प्रकार होऊन गेला. त्यामुळें नाट्याकडे पूर्ण दुर्लक्ष झालें व आजची स्थिती आली.

नाटक मंडळ्यांचे चालक जुन्या चाकोरीला घट्ट धरून बसल्यानें, पैसे मिळत आहेत या बेफाम वृत्तीनें, बदलत्या काळाकडे व लोकांच्या अभिरुचीकडे त्यांनीं दुर्लक्ष केलें. बोलपट सुरू झाल्यावर त्रुटित गायन, प्रत्यक्ष देखावे, व सुंदर बायकांचें दर्शन यामुळें लोक जुन्या जमान्याला विटले व थोड्या पैशांत भरपूर करमणूक अडीच तासांच्या अवधींत मिळते आहे ती घ्यायला धांवले. नाटक कंपन्यांच्या अवनतीचें बोलपट हें मुख्य कारण नसून अनेक कारणांपैकीं तें एक मोठें कारण म्हणतां येईल. म्हणून आतां नाटक प्रयोग जनतेच्या अभिरुचीप्रमाणेंच केले पाहिजेत. जुनीं नाटकें संग्रहीं ठेवून, चार तासांच्या अवधींत करतां येतील अशी त्यांची छाटाछाटी, मूळ हेतूची गळचेपी न होईल अशा बेतानें करून मधून मधून गंमतीनें त्याचे प्रयोग अवश्य करावेत. त्यामुळें नटांना सर्व तऱ्हेच्या कामाचा सराव राहील. सर्वांगपरिपूर्ण नट तयार व्हायला, एकाच तऱ्हेचीं कामें नटांना न देतां निरनिराळ्या नाटकांत निरनिराळीं कामें बदलून द्यावीं म्हणजे नट वाकबगार होतील.

सिनेमा कंपन्याहि फारच अल्पावधींत ठराविक चाकोरीवर येऊन बसल्या आहेत. सिनेमा कंपनींतील नटी गातांना तिला चोळामोळा करायला जर एखादा कापडाचा पडदा, अगर वेली नसेल तर तिचें गायन

होतच नाहीं. पात्रांनीं उच्चाराला सुरवात करतांना "ऍं" असा रेंकण्यासारखा आवाज काढल्याशिवाय वाक्याला सुरवात व्हायचीच नाहीं व वाक्यांचे कारणाशिवाय वाटेल तसे तुकडे पाडून बोलायची पद्धतच पडली आहे. मराठी बोलपटांनीं बंगाली बोलपटांतील गाण्याची लकब उचलली असल्यामुळें इंग्रजी ट्यूनप्रमाणें या अभिनेत्री, बोलपटचंद्रिका, फारच विचित्र किंकाळ्या, व कांपरे सूर काढूं लागल्या आहेत. तेव्हां बोलपटांचा काळ लवकरच संपतो कीं काय अशी शंका येऊं लागली आहे. नाटकाच्या कथाभागाची विपुलता आहे व नाटक पहाणारा समाज बव्हंशी सुशिक्षित असतो. परंतु बोलपटाला अठरा पगड लोक येतात. त्या सर्वांचें मनोरंजन भारदस्त रीतीनें करणें दुरापास्त होईल असें वाटतें.

नाटक कंपनींत स्त्रियांनीं कामें करावींत अगर नाहींत? या प्रश्नाची आज पांच सात वर्षें चर्चा चाललेली आहे. बोलपटांच्या दर्शनानें स्त्रियांची कामें स्त्रियांनींच करणें चांगलें असें वाटूं लागलें आहे. परंतु कुलस्त्रिया व कुलकन्यकांनीं सिनेमा अगर नाटक मंडळींत जाऊं नये असेंच माझें मत आहे. गायिकांच्या वर्गांतील स्त्रियांनीं या धंद्यांत पडणें चांगलें. कुणाची तरी रखेली म्हणून रहाण्यापेक्षां हा धंदा खात्रीनें चांगला आहे. परंतु त्यांना या धंद्यांत किफायत होईल कीं नाहीं या कल्पनेनें त्या या धंद्यांत पडत नसाव्या. परंतु चांगल्या गायिका व देखण्या स्त्रिया नाटक कंपनींत शिरल्या तर नाटक कंपनींत त्यांना खात्रीनें मनासारखे पैसे मिळतील. असो. समाजव्यवस्थेच्या जास्त खोल पाण्यांत न शिरणें चांगलें.

## नाटक धंद्याचें भवितव्य

नाटक धंदा घसरणीला लागला तरी नाटकाची गोडी समाजांत चांगली उत्पन्न झाली आहे. नट, नटी, तयार होत आहेत. हें नाटकधंद्याच्या भवितव्याच्या दृष्टीनें शुभ चिन्हच आहे असें म्हणावयाला हरकत नाहीं.

परंतु नाटकधंद्याचा जुना जमाना यापुढें चालणार नाहीं. डोंबाऱ्यांच्या खेळाप्रमाणें, नाटक कंपनीचा एक मालक राहणें, बरोबर भटारखाने चालविणें, मालकानें आपल्या लहरीप्रमाणेंच धंदा चालविण्याचा

श्री. गणपतराव ब्रोडस यांचे जामात व कन्या.



श्री. मुरलीधर चिंतामण लिमये
वकील, मार्दे

सौ. सुशीलाबाई लिमये



श्री. ना. वि. कुलकर्णी



श्री. वामन श्रीधर पुरोहित, बी. ए.



श्री. रमाकांत यशवंत वेलदे

श्री. गणपतराव बोडस यांच्या " माझी भूमिका " या पुस्तकाच्या प्रसिद्धी-करणाचे पहिले कल्पक-श्री. ना. वि. कुलकर्णी व सक्रिय पुरस्कर्ते-श्री. वामन श्रीधर पुरोहित, बी. ए. व श्री. रमाकांत यशवंत वेलदे.

आग्रह धरणें, गाण्याचें दळण घालणारीं व लोकांना कंटाळा येईल एवढीं सातसात आठआठ तासांचीं नाटकें करणें, असें करून चालावयाचें नाहीं. सध्यांचा काल लोकशाहीचा आहे. धंदा करूं इच्छिणाऱ्यांनीं लोकशाहीचा पुरस्कार आपल्या धंद्यांतहि केला पाहिजे. याविषयीं मी आपले विचार वर मांडले आहेतच. ते सर्वच्या सर्वच अमलांत आणले गेले पाहिजेत असा माझा आग्रह नाहीं. स्थल, काल, प्रसंग ओळखून जरूरीपुरते फेरफार करून घ्यावयाला कोणतीहि हरकत नाहीं.

नाटकधंद्यापेक्षां सिनेमाच्या धंद्यांत आर्थिक प्राप्ति फार असते, असा समज असल्यानें नट किंवा नटी नाटकधंदा सोडून सिनेमाधंदा पत्करतात. परंतु सर्वांनाच त्या धंद्यांत पुष्कळ प्राप्ति होणें कसें शक्य आहे? आणि झाली तरी चैनीचे प्रकार वाढलेले, त्यांत मिळालेला पैसा खर्च होऊन अखेरीस संसाराच्या दृष्टीनें पुन्हां खंकच राहण्याची पाळी कितीजणांवर तरी नेहमींच आलेली दिसते.

सिनेमाच्या धंद्याप्रमाणें नाटकधंदाहि एका दृष्टीनें चैनी वाढविणारा आहे हें सत्य आहे; परंतु तरीसुद्धां सिनेमाच्या धंद्याच्या मानानें नाटकधंद्यांत चैनी चालवावयाला तरी पुष्कळच जागा कमी असते.

आतां नाटक धंदा करूं पाहणाऱ्यांनीं, त्यांतील नटनटींनीं आपण समाजांतले जबाबदार घटक आहोंत, इतर धंद्यांत अगर नोकरींत पन्नास रुपयांपासून पांचशें–हजार रुपये दरमहा मिळविणारे लोक आपल्या मिळकतीच्या मानानें कसे राहतात व आपला सुखाचा संसार कसा करतात, हें पाहून त्याप्रमाणें वागण्याचा प्रयत्न केला पाहिजे. म्हणजे नाटकधंदा ऊर्जितावस्थेला येण्यास कोणतीच हरकत नाहीं, असें मला अजूनहि वाटतें.

घरीं बसल्यापासून, माझ्याकडे जे नाटकाचे नादी लोक येतात, त्यांना मी नाटक धंदा चालविण्यासंबंधीं माझ्या वरीलप्रमाणें कल्पना 'गोष्टी सांगेन युक्तिच्या चार' या तत्वाप्रमाणें नेहमीं सांगत असतों. कोठें रुजतात, कोठें रुजत नाहींत. रुजल्या तरी त्यांचा परिपोष नीट न झाल्यानें मूळ धरत नाहींत, असें माझ्या अनुभवाला आलें आहे.

१९३२ पासून १९३९ या कालांत मी घरीं बसल्यापासून कृष्णा कोल्हापुरे यानें 'किर्लोस्कर कंपनी' काढून वर्ष दीड वर्ष चालविली. त्याला 'गैरसमज' व 'मंगलभुवन' हीं दोन नवीं चांगलीं नाटकें मिळालीं होतीं. नट-नटींचा त्याचा संचहि बरा होता. ही मंडळी १९३४ मध्यें सांगलीस आली असतां त्या मंडळीचे प्रयोग पाहिले. कंपनी चालविण्याची रीत पाहिली. मी त्यांना माझे विचार सांगितले. मालक-मॅनेजरांनीं माझ्या तोंडावर 'हो-हो' म्हटलें. परंतु वागण्याचें व मंडळींना वागविण्याचें आपलें जुनें धोरण सोडलें नाहीं. त्यामुळें ती मंडळी टिकली नाहीं.

आचार्य अत्रे यांचीं आधुनिक प्रकारचीं नाटकें करणारी बालमोहन संगीत मंडळी तग धरून आहे. त्यांचीं नाटकें नवीं असतात. संचहि साधारण बऱ्यापैकीं आहे. परंतु याहि कंपनीची जुन्या नाटक मंडळ्यांप्रमाणें धंद्याना घातुक असणारी एकाच ग्रंथकाराला धरून ठेवण्याची रीत आहे. वैचित्र्याच्या दृष्टीनें तें वैगुण्य आहे.

नाटकधंद्याच्या याच घसरगुंडीच्या काळांत नवीन नमुनेदार नाटक मंडळी काढण्याच्या प्रयत्नांत एक मोठा चांगला प्रयत्नहि झाला. आणि तो म्हणजे महाराष्ट्र नाटक मंडळीच्या परंपरेंतून प्रसिद्धीस आलेले केशवराव दाते यांनीं पार्श्वनाथ आळतेकर, बी. ए., के. नारायण काळे, बी. ए., एल्.एल्. बी., प्रधान, डॉ. रानडे, ठेंगडी या सुविद्य नटांना व जोत्स्ना भोळे, मिसेस वशिष्ठ, मिसेस वर्तक, मिसेस पुराणिक, मंगला रानडे अशा नटींना मिळवून नाट्यमन्वंतर संस्था स्थापून, आंधळ्याची शाळा, तक्षशीला, लपंडाव, उसना नवरा, बोवा, इत्यादि नाटकें-नाटिका यांचे प्रयोग केले. नाट्यमन्वंतरची सजावट पूर्णपणें आधुनिक पद्धतीची होती. नाटकेंहि टापटीपीचीं, व्यवस्थेशीर होत असत.

मालकापासून मॅनेजरापर्यंत सुशिक्षित मंडळी असून नाट्यमन्वंतरचा धंदा यशस्वी होण्यासारखा असूनहि ती संस्था टिकावू झाली नाहीं.

सिनेमाधंदा जोरांत आलेला पाहून व त्यांत स्त्रियांचीं कामें स्त्रिया करतात हें पाहून नाटक धंद्यांतहि स्त्रियाच पाहिजेत असें लोकांना वाटूं

लागलें. स्त्रियांच्या भूमिका पुरुष नटांनीं करण्यापेक्षां स्त्रियांनींच कराव्यात असें मध्यंतरीं माझेंहि मत झालें होतें.

नाट्यमन्वंतरची ' आंधळ्याची शाळा ' प्रयोग पाहिल्यावर माझें तेंच मत प्रथम दृढ झालें होतें. परंतु थोड्याच अवकाशांत तें मत बदललें.

ज्याच्या किंवा जिच्या अंगीं नाट्यगुण मुळांत आहे, तो मेहनतीनें वाढविण्याची ज्या नटनटींत चांगली चिकाटी आहे, त्यांनींच भूमिका कराव्यात. नुसती स्त्री म्हणून, ती केवळ देखणी व रंगभूमीवर धीटाईनें येते म्हणून, भागावयाचें नाहीं. शिवाय स्त्री आहे, स्वरूपानें चांगली आहे, रंगभूमीवर येण्याइतकी धीट आहे आणि तिच्यांत नाट्यगुण आहेत एवढें पाहूनहि चालणार नाहीं. धंद्यांत टिकून राहण्याची शक्ति तिच्यांत आहे कीं नाहीं हेंहि पाहिलेंच पाहिजे. आठवड्यांतून तीन चार वेळां एकसारखीं ५ तासपर्यंत कामें करण्याला स्त्रिया टिकतील असें मला वाटत नाहीं. शिवाय करवल्या, विहिणीप्रमाणें त्यांची मर्जी–मिजास चालवितां येणें तर अशक्यच होऊन बसणार! पूर्वीच्या नाटक धंद्यांतील स्त्रियांच्या भूमिका करणाऱ्या चांगल्या नटांना संभाळतां संभाळतां चालकांच्या नाकीं नऊ येत तर आतांच्या नटींना संभाळणें म्हणजे कसलें दिव्य असलें पाहिजे याचा नुसता विचारच केला पाहिजे.

नाट्यमन्वंतरची आंधळ्याची शाळा पाहून, हे व अशा प्रकारचे आणखी प्रयत्न झटपट होऊं लागले तर ते सिनेमाचें आलेलें नाटकधंद्यावरील संकट परतवूं शकतील, असें वाटतें न वाटतें इतक्यांत नाट्यमन्वंतर खलास झाली. ही संस्था मोडण्यास काय करणें झालीं तें मला कळलें नाहीं. त्या संस्थेंत प्रभावी नट म्हणून अगोदरच तयार झालेले केशवराव दातेच काय ते एक होते. बाकी मंडळी सुविद्य असली तरी होतकरू होती. स्त्रियांच्या भूमिकांकडे प्रेक्षक भूमिका म्हणून पाहण्यापेक्षां त्या स्त्रिया आहेत याच एका विशेष दृष्टीनें पाहून त्यांचें कौतुक होत असे, हें माझ्या दृष्टींतून सुटलें नव्हतें. नूतन संगीत विद्यालयानें काढलेल्या नाट्यशाखेच्या नाटकांत हिराबाई बडोदेकर व तिच्या बहिणी काम करीत; त्या वेळीं त्यांच्याकडे

पाहण्याची प्रेक्षकांची जी दृष्टि तींत आणि नाट्यमन्वंतरांतील स्त्रियांच्या भूमिका करणाऱ्या स्त्रियांकडे पाहाण्याच्या दृष्टींत मला कोणताच फरक दिसला नाहीं.

सुविद्य मंडळींतील सुशिक्षित भांडखोरपणा व स्त्रियांचा चंचल स्वभाव हींच कारणें नाट्यमन्वंतर लवकरच गडगड्यास कारणें झालीं असावींत असें मला वाटतें.

१९३२ पासून तोंडाला रंग लावून रंगभूमीवर येण्याच्या बाबतींत तत्त्वतः मी मनानेंच एक प्रकारचा संन्यास केला आहे. तरीहि दोन बोलपटांत आणि दोन वेळां रंगभूमीवर रंग लावावाच लागला. अपवादानें नियम सिद्ध होतो, त्याचप्रमाणें हें झालें असें म्हणतां येईल. आणखीहि एकादे वेळीं एकाद्या धर्मार्थ प्रयोगांत विनामोबदला काम करण्याचें मनांत आलें असतें, परंतु आतां एका पायानें अधु झाल्यानें व डॉक्टर यांनीं हा अधूपणा कायमचाच राहणार असें निदान केल्यानें रंगभूमीपासून मी कायमचाच दूर झालों आहें.

असें असलें तरी घरीं स्वस्थ बसावेंसें वाटत नाहीं. मुलीबाळींच्या आग्रहावरून मधून मधून बसल्या बसल्याच मी ज्या ज्या नाटकांत भूमिका केल्या, तीं तीं नाटकें, सर्व पात्रांच्या भाषणासुद्धां मुलींना म्हणून दाखवीत असतों.

माझ्याकडे कोणी शिकण्यास आलें किंवा कोणी बोलावलें तर शिकविण्यास, तालमी देण्यास मला आनंद वाटतो. परंतु दुर्दैवाची गोष्ट माझ्याकडे शिकण्याला कोणी येतच नाहीं. आजकाल शिकण्याकडे, शिकण्यासाठीं त्रास सोसण्याकडे कोणाची प्रवृत्ति आहे असें दिसतच नाहीं. माझ्या घरीं येऊन महिना दीड महिना कोणी शिकण्यासाठीं राहिले तर पदरचें जेवायला घालूनहि मी शिकवीन. शिकविण्यास कांहीं घ्यावयाचें नाहीं, असा माझा पहिल्यापासूनच संकल्प आहे. कोणीं तालीम देण्यास बोलावलें तर विनामूल्य अजूनहि जात असतों.

१९३२ ते १९३९ या अवधींत हौसेनें आपण होऊन शिकण्यास आले ते एक फक्त नाशिकच्या महाराष्ट्र नाट्यमंदिराचे सदस्य—वामनराव

पुरोहित, बी. ए. हे एकच होत. त्यांचा प्रपंच चालविण्याकरितां निराळा व्यवसाय असूनहि नाटकाच्या प्रेमामुळें व ध्येय बाळगून १९३७ मध्यें नाशिकपासून सांगलीस पांचशें मैलांचा प्रवास करीत मजकडे आले, याचाच मला जास्त आनंद झाला. आठ दिवसांच्या थोड्या मुदतींत 'अथेल्लो' मला त्यांना जेवढें शिकवितां आलें तेवढेंच शिकविलें.

१९३८ मध्यें डॉ. भडकमकर यांच्या प्रेरणेनें मुंबईच्या ग्रँट मेडिकल कॉलेजच्या विद्यार्थ्यांनीं आपल्या वार्षिक गॅदरिंगकरितां 'संशयकल्लोळ' नाटक बसवून देण्याकरितां पाचारण केलें. त्या वेळीं मी तालमी देण्यास गेलों होतों. त्यांनींच १९३९ मध्यें पुन्हां 'पुण्यप्रभाव' बसविण्यास आग्रहानें नेलें होतें. तेव्हांहि गेलोंच.

१९३९ मध्येंच सांगलीच्या विलिंग्डन कॉलेजमध्यें 'निशिकांताची नवरी' ही नाटिका बसविण्यास प्रेमानें बोलाविलें. तेंहि नाटक शिकविण्यास मी आनंदानें गेलों होतों.

ग्रँट मेडिकल कॉलेजच्या विद्यार्थ्यांनीं व विद्यार्थिनींनीं अभ्यासाचा बोजा डोक्यावर असतांना अगदीं थोडक्या वेळांत 'संशयकल्लोळ' शिकून इतकें सुंदर करून दाखविलें कीं कसलेल्या चांगल्या धंदेवाल्या कंपनीनें तें पाहून आश्चर्यानें तोंडांत बोटच घालावें ! त्यांचें 'पुण्यप्रभाव'हि चांगलें झालें. परंतु अशीं बोजड नाटकें थोड्या अवधींत, अभ्यास संभाळून, तितकीं बसण्यासारखीं नसतात हें खरें आहे.

१९३८ च्या आरंभीं ललितकलादर्श नाटक मंडळींतील गोविंद माशेलकर आणि भार्गव आचरेकर यांनीं आपल्या मालकीची 'ललितकला संवर्धक मंडळी' नुकतीच काढून बाल्यावस्थेंतच सांगलीस आणली होती. सामान नाहीं. कपडे नाहींत. नवीन नाटकेंहि नाहींत. भांडवलहि नाहीं. अशा स्थितींत स्वतःच्या गुणांच्या जोरावर त्या दोन होतकरू तरुणांनीं बिकट कालांत नाटक मंडळी काढल्याचें पाहून मला कौतुक वाटलें. भार्गव गाणारा, तरुण व होतकरू आहे. भांडवलाची, सामानसुमानाची आणि नव्या नाटकांची जुळवाजुळव होईपर्यंत जुनीं नाटकें करणें प्राप्तच. तींहि नीटनेटकीं, व्यवस्थेशीर बसविलीं, तरच त्याच्यावर कोणी भांडवलदार

मिळण्याचा संभव. त्यांच्या विनंतीवरून मी त्यांच्याकडे जुन्या तालमी देण्यास जाऊं लागलों. परंतु ४।८ दिवसांतच तालमी घेण्याकडे असावें तसें लक्ष नाहीं, असें आढळून आलें. सारा 'बनचुकी'चा प्रकार दिसूं लागला. मी जाण्याचें सोडून दिलें. सुशिक्षितांची एक तऱ्हा तर या अशिक्षितांची एक तऱ्हा !

यामुळें नाटक धंद्याचें भवितव्य काय हें अजमावतांच येत नाहीं, इतकें खरें. संशयकल्लोळच्या तालमी मी घेतल्यामुळें, त्या नाटकाचा प्रयोग ज्या वेळीं बालीवाला थिएटरांत ग्रँट मेडिकल कॉलेजच्या विद्यार्थ्यांनीं केला, त्या वेळीं माझा सन्मान करण्यांत आला. तेव्हां उत्तरादाखल बोलतांना मी म्हटलें होतें कीं, नाटकें शिकविण्याची मला इच्छा, तळमळ आणि कळकळ अतिशय आहे. ज्या धंद्यांत मी लहानाचा मोठा होऊन आजची सुस्थिति उपभोगीत आहे, त्या धंद्यासाठीं अखेरपर्यंत यथाशक्ति, यथामति कांहीं करावें अशी इतकी तीव्र इच्छा आहे कीं, मी आजारी असलों, अगदीं स्ट्रेचरवर मला घातलें असलें तरी, तशाहि स्थितींत नाटकाच्या तालमी देण्यास मला कोणी बोलावल्यास मी स्ट्रेचरवरून तसाच उठून तालमी घेण्यास मोठ्या आनंदानें जाईन !

आतां माझ्याजवळ जें कांहीं आहे तें एवढेंच. माझें उर्वरित आयुष्य तेवढ्यापुरतेंच आहे; व तेवढें करण्याचाच माझा सत्संकल्प आहे ! माझ्या हातून संकल्पाप्रमाणें काय व किती घडवावयाचें आहे तें एक नाट्यदेवतेलाच माहित ! मी काय सांगणार ?

———

# बाळकोबा नाटेकर

बाळकोबा नाटेकर यांचा वर्ण गोरापान. डोळे भिंवया उत्तम. नाक जरा गोबरें. गालावर एक मोठा तीळ ( मस ). शरीर ठेंगणें व जाडजूड. नाटेकर हे सबरंगी गाणारे होते. अत्यंत मिठास व मधुर आवाज. जणू गंधर्व. सुरेल, गवई गाणें आपल्या वडिलांपासून त्यांनीं पैदा केलें होतें असें म्हणत. लावणी, ठुंबरी, भजन, महारांच्या पद्धतीची लावणी, कर्नाटकी गाण्याची पद्धत, या सर्व पद्धती अत्यंत बुद्धिमान् असल्यामुळें त्यांनीं आत्मसात् केल्या होत्या. रसानुकूल चाली लावण्यांत त्यांचा हातखंडा होता. याची मूर्तिमंत साक्ष शाकुंतल नाटकांतील कण्वाच्या पदाला त्यांनीं लावलेल्या चाली देतील. चवथ्या अंकांतील "परक्याचें धन कन्या तें" या शेवटच्या साकीला त्यांनीं लावलेली चाल इतकी उत्तम आहे कीं त्यांच्या पद्धतीनें ती साकी म्हटल्यानंतर मनाला वियोगाची हुरहुर उत्पन्न झाल्याशिवाय राहाणारच नाहीं. शाकुंतलमध्यें बाळकोबांचें मुख्य काम कण्वाचें; परंतु त्या वेळीं पात्रांची खोगीरभरती करण्याचें व्यसन जुन्या चालकांना नसल्यामुळें पारिपार्श्वक, सारथी, दुसऱ्या अंकांत शिष्य, चवथ्या अंकांत कण्व, पांचव्या अंकांत कंचुकी, सहाव्या अंकांत कंचुकी, सातव्या अंकांत मालती, इतक्या भूमिका ते करीत. त्या वेळच्या नाटक मंडळयांत जे अहंमन्य नट असत त्यांना पारिपार्श्वकांत जाणें म्हणजे मानहानी वाटत असे. किर्लोस्कर कंपनीची परंपराच अशी होती कीं नांदीपासूनच प्रयोगांत गंभीर वातावरण उत्पन्न करायचें. म्हणून शक्य ती सुस्वर, आवाजदार व गायक मंडळीच नांदी-मध्यें असायची. प्रथम अण्णासाहेब व नंतर त्यांच्या पाठीमागें रामभाऊ कायम सूत्रधार होते. मोरोबा असे तोंपर्यंत मोरोबा शापसंभ्रममध्यें सूत्रधाराची भूमिका हौसेनें करीत असत. पारिपार्श्वक, बाळकोबा, नारायणबुव-मिरजकर, दडपे. भाऊरावहि पुरुष भूमिका करूं लागल्यावर सौभद्रांत रामराज्यवियोगांत, शारदेंत पारिपार्श्वकांत जात असत. परंतु त्यामुळें नांदी-लाच असा रंग भरे कीं काय सांगावें ! हा नांदीचा थाट किर्लोस्कर कंपनींत तरी आम्ही कंपनी सोडीपर्यंत बराचसा कायम राहिला होता; परंतु पुढें वाण्याच्या

दुकानांतल्याप्रमाणें माल मिळूं लागल्यामुळें नगाला नग ठेवण्याची प्रवृत्ति सुरू झाली. त्या ताज्या खरेदी केलेल्या नटाला पदें पाठ नसायचीं. आयत्या वेळीं त्याला तबक हातांत देऊन उभें करण्यांत येई. अब्रूदार माणूस असला तर त्याला त्याच्या नवीनपणाची जाणीव असल्यामुळें तो घाबरलेला, बांधून आणलेला दिसे. मुर्दाड आणि बेछूट असला तर तो बेफिकिरीनें उभा राही. पदाच्या चरणांतलीं शेवटचीं अक्षरें व त्याचा सूर काढायचा. बाकी नुसती वेडीवाकडी तोंडाची हालचाल. १८८८ सालीं बाळकोबांच्या नाकांत पिनस होऊन त्यांचा आवाज कमी झाला. परंतु त्यांनी लोकप्रियतेची पुण्याई अतिशय संपादन केली होती. त्यांच्या रंगभूमीवरच्या प्रवेशांत चोहों-कडे इतकें सामसूम होई कीं एकादा सूर फुकट जाईल अशी भीति जणूं प्रेक्षकांत उत्पन्न झाली कीं काय असें वाटे. १८८७।८८ च्या सुमारास कंपनी ग्वाल्हेर येथें गेली. तेथें अमीरखां म्हणून सतार वाजणारे आचार्य होते. त्यांच्याजवळ बाळकोबांनीं सतारीचें शिक्षण घेतलें. वीन उत्तम वाज-वीत असत. १८९० सालीं त्यांचा आवाज कमी झाला व अडीच नाटकांवर कंपनीला उत्पन्न कमी होऊं लागलें. तेव्हां बाळकोबांचा दोनशें रुपये पगार होता तो दीडशें रुपये झाला. १८८९ सालीं विक्रमोर्वशीय बसविलें. परंतु तेंहि यशदायी झालें नाहीं. १८९३ सालीं पुण्यास कंपनी येऊन शाप-संभ्रमाच्या तीन अंकांचा प्रयोग होऊन कंपनीनें विश्रांति घेतली. सुट्टीच्या काळानंतर प्रयोग सुरू व्हायच्या आठवड्यांत बाळकोबांनीं भाऊरावांना सांगितलें कीं मला आतां देत असलेला दीडशें रुपये पगार कायम द्याल याबद्दल लेखी करार करून द्या. भाऊरावांनीं बाळकोबाला पुष्कळ समजून सांगितलें कीं "आमच्याच मिळकतीची आम्हाला शाश्वती नाहीं. मग लेखी कसें देतां येईल? शिवाय तुमच्या आवाजाची स्थिति तुम्ही जाणतां आहांत. आमच्याबद्दल तुम्हाला अविश्वास कां वाटला? २०० चे दीडशें करण्याच्या वेळीं तुम्हाला विनंति केली व तुम्हांलाहि ती मान्य झाली. आज २।३ वर्षें तसेंच चाललें आहे ना?" परंतु बाळकोबांनीं लेखाशिवाय येणार नाहीं असें निर्वाणीनें सांगितलें. पहिला प्रयोग सौभद्र लागलेला. आयत्या वेळीं काय करायचें? तेव्हां त्यांनीं डॉ. गर्दे यांना मध्यस्थी घालून तुमच्या

मनाप्रमाणें करूं असें सांगून वेळ मारून नेली. पुण्याचे प्रयोग संपतांच " लेख लिहून देतां येत नाहीं. त्याशिवाय आपण येत नाहीं तर मर्जी तुमची. तुमचा आमचा संबंध तुटला." अशा रीतीनें बाळकोबांचा संबंध तुटला.

## त्र्यंबक नारायण साठे

त्र्यंबकराव साठे हे खोपोलीजवळील खालापूर येथें रहाणारे. तलाठ्याची नोकरी करीत होते. विठोबा आप्पा गुळवे यांचा त्यांच्यावर एक हुषार व हिशेबी मुलगा म्हणून प्रेम होतें. किर्लोस्कर कंपनीच्या व्यवस्थापकाच्या जागेवर एक हिशोबी, चाणाक्ष व रुबाबदार असा माणूस पाहिजे होता. तेव्हां गुळवे यांनीं साठ्यांचें नांव अण्णासाहेबांना सांगितलें, तें त्यांना पटून त्यांची सेक्रेटरी म्हणून नेमणूक केली. ते अत्यंत हुषार, हिशोबी व व्यवहारी होते. किर्लोस्कर कंपनींतील सर्व लोक इभ्रतदार तेव्हां ती कंपनीची इभ्रत वाढीला लावणें हेंच आपलें कर्तव्य आहे अशा समजुतीनें त्यांनीं आपला रुबाब ठेवला होता. हा मनुष्य मोठा सुशिक्षित असावा अशीच प्रथम दर्शनी कोणाचीहि समजूत व्हावी. खरोखरी त्यांना इंग्रजीचा गंधहि नव्हता. साठे यांनीं जमाखर्चाची जी पद्धत लावून ठेवली ती किर्लोस्कर कंपनींत सुमारें १९१०-११ सालापर्यंत कशीबशी होती. त्यांनीं आपल्या वृत्तींत नाटकीपणा आणला नव्हता. गांवोगांवच्या प्रतिष्ठित लोकांशीं स्नेह करून तो त्यांनीं आमरण ठेवला होता. पत्रव्यवहाराच्या कामीं ते अत्यंत दक्ष असत व प्रत्येक गोष्ट चोख व सुटसुटीत करायची त्यांस संवय असे. श्री. दादासाहेब खापर्डे प्रभृति त्यांच्या समकालीन मंडळींशीं कंपनी-संबंधानें झालेला स्नेह कायम ठेवून पत्रव्यवहारहि व्यवस्थेशीर ठेवला होता. १९०० सालीं ते मिरजेहून जमखंडी संस्थानांत मामलेदार म्हणून गेले. १९०५ सालीं माझें प्रथम लग्न त्यांच्या मेव्हणीच्या मुलीशीं झालें तेव्हां माझी त्यांनीं देवलमास्तरांजवळ चौकशी केली. त्या वेळीं देवलमास्तरांनीं माझें भाकीत साठे यांस सांगितलें. " तो फार चांगला असून पुढें खरो-खरी योग्यतेला चढेल. डोळे झांकून मुलगी द्या." मास्तरांचें ऐकून त्यांनीं मी महिना फक्त २५ रु. मिळविणारा असूनहि माझें लग्न निश्चित करून अमलांत आणलें. तेव्हां माझा त्यांचा आप्तसंबंध आला. साठे आपल्या

हिशोबीपणाच्या करडेपणानें प्रत्येकाशीं बोलत. त्यामुळें एखाद्या वेळीं त्यांच्या भाषणाचा राग येऊन त्यांच्याबरोबर त्यांच्या परिचित व आप्त मंडळीचाहि खटका उडत असे. परंतु ती वेळ गेल्यावर मिळतें घेण्याची त्यांची प्रवृत्ति असे. सन १९११ सालीं जमखंडी संस्थानांतून सेवानिवृत्त होऊन त्यांनीं पेन्शन घेतलें. नंतर थोडे दिवस देवलांच्या सर्कसबरोबर गेले. पुढें कुंदगोळच्या जमिनदाराचे कारभारी म्हणून जमखंडीकरांच्या शिफारशीनें एक वर्ष त्यांची नेमणूक झाली. ती नोकरीहि जमणार नाहीं असें पाहून ते परत आले. नंतर १९१३ सालीं गंधर्व कंपनींत मॅनेजर म्हणून आले. तेथें कांहीं दिवस काम केल्यानंतर दहिवडचे घाटगे राजे यांच्या इष्टेटीचे मॅनेजर म्हणून सुमारें १६ वर्षें होते. पुढें वार्धक्यामुळें त्यांनीं राजीनामा दिला, व नंतर आपल्या कर्त्या ३ मुलांसह सुखानें काल-क्रमणा करीत सन १९३४ सालीं हृदयक्रिया बंद पडून ते कालवश झाले. थोडक्यांत त्यांचें वर्णन असें कीं ते उत्तम हिशोबी, पूर्ण व्यवहारी, फार धोरणी, उत्तम संसारी आणि अत्यंत जागरूक. त्यांचे दोन मुलगे डॉक्टर असून एक पुणें म्युनिसिपालिटींत नोकर आहेत. त्यांनीं आपला प्रपंच खरोखरी नेटका आणि यशस्वी केला. याला त्यांचा प्रत्येक गोष्टींतला धोरणीपणा, व्यवस्थितपणा व मुलांशीं प्रेमळ वागणूक, वेळीं कठोरपणा हींच कारणीभूत आहेत. त्यांचें मोडी व बालबोध अक्षर छापील कित्त्या-सारखें होतें. रोजनिशी नेमानें लिहिण्याचा त्यांचा क्रम सुमारें ५० वर्षें तरी असावा.

## रामभाऊ किंजवडेकर

किर्लोस्कर कंपनी, कंपनी अशी स्थापन १८८४ सालीं झाली. त्याच सुमारास रामभाऊ गोवे प्रांतांतील सांखळी गांवाहून उदरनिर्वाहा-करितां देशावर आले. त्यांचें संस्कृत अध्ययन बऱ्यापैकीं होतें. ते तंबोऱ्या-वर पुराण सांगत असत. हे उंच, किडकिडीत व काळेसांवळे होते. आवाज चढा. परंतु त्यांत गोडीपेक्षां कर्कशपणा होता, असें म्हणत. रामभाऊ फिरत फिरत पनवेल मुक्कामीं स्थापनेच्या अगोदर किर्लोस्कर कंपनींत दाखल झाले. कै. अण्णासाहेबांनीं त्यांचा आवाज पाहून त्यांना ठेवून

घेतलें. त्यांना बाजारहाट करायचें काम अण्णासाहेबांनीं दिलें होतें. सौभद्र, शाकुंतलमध्यें बारीक सारीक कामें करीत. पुढें अण्णासाहेबांनीं नागपूर वऱ्हाडकडे कंपनी फिरवून १८८५ सालीं सप्टेंबर आक्टोबरच्या सुमारास पुण्यास आणली. त्या फिरतीमध्यें कंपनींतील प्रमुख नट बाळकोबा नाटेकर हे कंपनीबरोबर गेले नाहींत. स्वभावधर्मात कृष्णराव गोरे व बाळकोबा यांचें बरेंच साम्य आहे असें म्हणत. आपल्याशिवाय कंपनी चालूं शकणार नाहीं असा स्वतःसंबंधीं कयास बांधून नेहमीं कांहींतरी खुसपट काढून कंपनीला घोळांत घालायचें असा बाळकोबांचा क्रम असे. त्यामुळें बाळकोबांची कामें रामभाऊकडून बसवून घेऊन त्या फिरतींत बाळकोबांची फिकीर केली नाहीं. या फिरतीला मुंबईपासून सुरवात झाली त्या वेळीं बाळकोबांच्या कामांपैकीं नारदाचें काम सुप्रसिद्ध गायनाचार्य कै. भास्करबुवा बखले यांनीं लहान १३।१४ वर्षांचे असतांना केलें व कण्वाचें काम भाऊराव कोल्हटकरांनीं करून शकुंतलेचें भास्करबुवांनीं केलें होतें. पुण्यापर्यंत रामभाऊ निभावून आले. परंतु पुण्यास आल्यावर पहिला खेळ सौभद्र ठरला. त्या वेळीं रामभाऊंना पुण्याच्या प्रेक्षकांसमोर बाळकोबांचें काम करायला भीति वाटूं लागली. त्यांनीं अण्णासाहेबांना सांगितलें कीं “ माझ्या पोटांत भीतीचा गोळा उठला आहे. माझ्याच्यानें पुण्यास निभावणार नाहीं. ” एकंदर रागरंग पाहून अण्णासाहेबांनीं रात्रौ नाटकाच्या सुरवातीच्या वेळेस मनाशीं विचार केला व ताडबडतोब तांगा करून ते बाळकोबांच्या घरीं गेले व त्यांच्या मागणीच्या रुपयांऐवजीं रुपये देईतों हडप म्हणून हातांतील २४ तोळ्यांचें सिंहमुखी कडें त्यांच्या मातोश्रींना देऊन बाळकोबांना प्रयोगाच्या सुरवातीला घेऊन आले. नंतर दिवाळीच्या अगोदर कंपनीला सुट्टी देऊन अण्णासाहेब आपल्या जन्मस्थानीं गुर्ले होसूर येथें गेले व तेथेंच दिवंगत झाले. पुढें कंपनीची पुनर्घटना होऊन अण्णासाहेबांच्या जागीं काम करायला रामभाऊंची योजना करून नवीन व्यवस्थेंत रामभाऊंना तीन आण्याचे भागीदार करण्यांत आलें. १८८९ सालीं रामभाऊंना अर्धांग वायु झाला. त्यामुळें त्यांच्या आवाजांतहि दोष उत्पन्न झाला. या कारणानें त्यांच्या भागीबद्दल वरचेवर मोरोबांच्या मनांत वादळ उत्पन्न होई, व निरुपयोगी माणसाला उगीच असा भाग कां द्यायचा ? दुसरा माणूस आणून यांना

पेनशनींत काढावें अशा वाटाघाटी केव्हां केव्हां होत. परंतु भाऊराव नेहमीं म्हणत " मोरोबा, कंपनी हें बहुभाग्य आहे. कोणाच्या पायगुणानें आपण हे दिवस उपभोगतों आहोंत कुणाला ठाऊक ! उद्यां तुम्ही अगर मी व्यंगाधीन झालों तर तुम्हां आम्हांला काय वाटेल याचा विचार करा." त्यामुळें हें वादळ शांत होई. परंतु रामभाऊंच्या नशिबाचा जोर इतका विलक्षण कीं अण्णासाहेबांच्या मृत्यूनंतर कंपनींत २।३ घडामोडी झाल्या परंतु रामभाऊ आपल्या स्थानीं अढळ राहिले. अण्णासाहेबांनीं प्रथम कंपनीची रचना केली त्यांत भागीदारीचें प्रमाण असें असावें असें ऐकलें. अण्णासाहेब सहा आणे, मोरोबा सव्वा चार आणे, भाऊराव चार आणे, रिझर्व फंड एक आणा, गुड कॉन्डक्ट फंड पाऊण आणा. नंतर अण्णासाहेबांच्या मृत्यूनंतर मोरोबा साडेचार आणे, भाऊराव साडेचार आणे, रामभाऊ तीन आणे, कै. वहिनीबाई किर्लोस्कर ( पेनशनादाखल ) अडीच आणे, रिझर्व फंड एक आणा, गुड कॉन्डक्ट फंड अर्धा आणा. पुढें मोरोबा कार्यनिवृत्त झाल्यावर भाऊराव साडेसहा आणे, रामभाऊ साडेतीन आणे, मोरोबा एक आणा (पेनशन), वहिनीबाई किर्लोस्कर अडीच आणे, रिझर्व फंड दीड आणा, गुड कॉडक्ट फंड एक आणा.

म्हणजे येनकेन प्रकारेण रामभाऊ भागीदार म्हणून अढळ राहिले. भाऊरावांच्या मृत्यूच्या अगोदर ग्वाल्हेर मुक्कामीं दोघां भागीदारांचें मोठें भांडण होऊन तेथून रामभाऊंना समजावून इंदूरपर्यंत आणून रामभाऊंच्या इच्छेनुरूप भाऊरावांनीं त्यांना भागीदारींतून मोकळें करण्याचें ठरविलें. रामभाऊ ग्वाल्हेर येथें परत निघून गेले. पुनः पुण्यास परत आले तों भाऊराव आजारी पडले हें पाहून रामभाऊ म्हणाले; " मी कुठें सोडून जातों आहे, मी कंपनी चालवितों." आणि त्यांचा बदललेला पवित्रा पाहून आपण बरे होणार कीं नाहीं याबद्दल साशंक होऊन भाऊरावांनीं राम-भाऊंच्या अंगावर कंपनीची भागी आपल्यापुरती सुमारें दोन हजारावर तोडून घेऊन ते पैसे बडोदें येथें स्कॉलरशिप ठेवण्यासाठीं त्यांचा ट्रस्ट करून ठेवले. झालें. फिरून रामभाऊ एकच मालक झाले. रामभाऊंच्या नेतृत्वाखालीं कंपनी गेल्यामुळें मंडळी नाराज होती. पण नेटदार माणूसच कंपनींत नव्हता. नंतर १९०२ सालीं ठरलेल्या कराराप्रमाणें जोगळेकरांचा

मालकींत प्रवेश झाला. पण रामभाऊंची भागी अर्ध्या आण्यानें वाढून त्यांची चार आणे भागी झाली. १९११ सालीं जोगळेकरांच्या मृत्यूनंतर रामभाऊंनीं २२०० रुपये घेऊन आपली भागी जोगळेकरांच्या कुटुंबास विकली.

रामभाऊ स्वभावानें बरे होते. परंतु खुनशी असत. कंपनींत सकाळीं ९ वाजल्यापासून सायंकाळीं ५ वाजेपर्यंत मालकाच्या गादीवर उत्सवमूर्ती-सारखे बसून असत. स्नान व जेवणाला उठतील तेवढेच. पान तंबाकूचें तबक सज्ज केलेलें समोर असे. सारखी तंबाखू खात असत. तालमी सुरू नसल्या म्हणजे पत्त्यांचा डाव सुरूं असे. त्यांत पत्ते खेळत. मुलाबाळांची खाण्यापिण्याची आबाळ होऊं नये म्हणून ते दक्ष असत. नाटकांत काम १९०६ सालापर्यंत त्यांनीं कधीं तरी व केव्हां तरी केलें. भाऊरावांच्या मृत्यूनंतर त्यांनीं रंगभूमीवरचें काम जवळ जवळ सोडलेंच होतें. १९०६ सालापासून त्यांनीं रंगभूमी अजिबात वर्ज्य केली. पुढें पुण्यास राहून १९११।१२ सालापर्यंत त्यांनीं दिवस काढले व १९२३ सालीं कोल्हापूर मुक्कामीं ते मरण पावले. यांनीं कर्तबगारी अंगीं नसतां अव्याहत २६ वर्षें मालकीचा उपभोग घेतला.

## शंकरराव मुजुमदार

शंकरराव मुजुमदार हे प्रथम पौराणिक कंपनींत होते. नंतर पुण्यास इंग्रजी शिक्षण घेत होते. पुण्यास कै. माधवराव नामजोशी वगैरे मंडळी त्यांच्यावर प्रेम करणारी होती. त्यांच्याच प्रोत्साहनानें शंकररावांनीं अभ्यास चालू ठेवला होता. १८८० सालीं कै. अण्णासाहेबांना संगीत शाकुंतलमध्यें शकुंतलेच्या पात्राची उणीव पडली ती सौंदर्यसंपन्न शंकररावांनीं भरून काढली. पहिलीं २।३ वर्षें कंपनीला धंदेवाईक स्वरूप प्राप्त झालें नव्हतें. परंतु १८८४।८५ सालीं किर्लोस्कर कंपनीची धंदे-वाईक रीतीनें स्थापना झाल्यावर कंपनीला सेक्रेटरी नेमायचा होता. त्या जागेवर शंकररावांचा डोळा होता. ते पहिल्यापासून कंपनींत व थोडें कारणापुरतें इंग्रजी शिक्षण घेतलेले. त्यामुळें ती जागा आपल्यास मिळावी अशी शंकररावांची प्रबल इच्छा असणें साहजिक होतें. परंतु ती जागा

त्यांना न मिळतां विठोबा खंडाप्पा गुळवे यांच्या खात्रीच्या त्र्यंबक नारायण साठे या गृहस्थास दिली गेली. शंकररावांना त्या जागेवर न नेमायला खरें कारण काय असेल तें कै. अण्णासाहेबांना माहीत कीं शंकररावांना माहीत. परंतु पुढच्या उभयतांच्या चरित्रक्रमावरून, कर्तबगारीवरून एका मोठ्या कंपनीची सर्व व्यवस्था हिशोबी व हुषार मनुष्याच्या हातीं असावी असें अण्णासाहेबांस वाटलें असावें व साठे हे उत्तम हिशोबी व आप्पासाहेब गुळवे यांच्या खात्रीचे (आप्पासाहेब हे किर्लोस्कर कंपनीच्या घटनेच्या वेळीं भांडवल पुरविणारे होते.) म्हणून साठे यांची नेमणूक झाली असावी असें वाटतें. मात्र या प्रकारानें शंकररावांना आपल्या हक्काची पायमल्ली झाली व दुसराच मनुष्य पुढें सरकला म्हणून कंपनीबद्दल अनादर उत्पन्न झाला. पुढें त्यांनीं जवळ जवळ कंपनीचा संबंध तोडला. फक्त अण्णासाहेब दिवंगत होण्यापूर्वी कैकेयीचें काम पदें गाळून करण्याचा त्यांनीं शंकररावांना आग्रह केला. त्या वेळीं देवलमास्तर व शंकरराव यांचा स्नेह होता व देवलमास्तरांचीहि अशीच इच्छा होती कीं शंकररावांनीं आतां कंपनींत नटाचें काम करूं नये. पण अण्णासाहेबांच्या आग्रहामुळें शंकररावांनीं कैकेयीचें काम केलें. त्या प्रयोगांत शंकररावांनीं तिसऱ्या अंकांत एक उत्कृष्ट अभिनय केला असें निरनिराळ्या लोकांकडून कळलें होतें; तो असा:

तिसऱ्या अंकांत अण्णासाहेब दशरथाच्या भूमिकेंत मूर्च्छित पडलेल्या कैकेयीची समजूत करीत असतां दासी येतात. त्या वेळीं "खबरदार, रान्डानो, फाजीलपणा कराल तर" हें वाक्य म्हणायच्या वेळीं आवेशानें उठून एका दासीच्या तोंडांत खरोखरी इतकी सणसणून मारली कीं तो आवाज ऐकून तीन मजल्यांतून खडखडावून टाळी पडली. तीच रंगभूमीवरची शंकररावांची कै. अण्णासाहेबांची शेवटची भूमिका असें सांगतात. पुढें अण्णासाहेब स्वर्गवासी झाल्यावर कंपनीची पुनर्घटना झाली. तेव्हांपासून शंकररावांचा आणि किर्लोस्कर कंपनीचा सुमारें ७।८ वर्षें संबंध तुटला. पुढें १८९० सालीं त्र्यंबकराव साठे मिरजेस म्युनिसिपल सेक्रेटरी झाले. त्यांनींहि कंपनी सोडली.

१८९३ ते १९०० या सात वर्षांत शंकरराव कंपनीचे पुनः सेक्रेटरी झाले. शंकरराव सेक्रेटरीच्या जागेवर रुबाबदार दिसत व लोकहि प्रथम प्रथम पूर्वीच्या पद्धतीप्रमाणें एक स्त्रीभूमिका करणारा या हेटाळणीनें पहात असले तरी शंकररावांनीं १।२ वर्षांतच लोकांवर पूर्ण छाप बसविली होती. मुख्य धोरणाच्या वगैरे गोष्टी व पैशांचा विनियोग सर्व भाऊरावांच्याच धोरणानें पूर्वापार होत असे. त्यामुळें शंकररावांना ठराविक कार्यक्रमापलीकडे स्वयंसिद्ध अधिकार भाऊराव हयात असेपर्यंत नव्हताच. पुढें भाऊरावांनीं आपला संबंध सोडल्यावर रामभाऊंच्या कारकीर्दींत शंकररावांना सर्वाधिकार प्राप्त झाला.

## काशीनाथ वासुदेव परचुरे

हे गृहस्थ वांई येथील रहाणारे असून मोठे टापटिपीचे होते. कंपनींत यायच्या अगोदर पंत १८८० सालीं झालेल्या खानेसुमारींत नोकरीस होते. यांचें मराठी शिक्षण ५।६ इयत्तांपर्यंत झालें असावें. घराणें भिक्षुकीचें. १८८१।८२ सालीं मोरोबा यांना कंपनींत घेऊन आले. प्रथम हे कंपनींत सामान्य कामें करीत. नंतर गोपाळराव दाते करीत असलेल्या भूमिका—शाकुंतलांत विदूषक, सौभद्रांत वक्रतुंड इत्यादि भूमिका करूं लागले. हे अगदीं तरुण असल्यापासून म्हाताऱ्याच्या नकला करीत असत. ते काम करूं लागले म्हणजे जख्ख म्हातारा माणूसच आपल्या समोर उभा आहे असा भास उत्पन्न करीत. त्यानंतर मृच्छकटिकमध्यें मैत्रेय, वीरतनयांत फत्तेसिंग, शारदेंत भद्रेश्वर दिक्षीत वगैरे भूमिका ते उत्तम करीत. त्यांच्या भूमिकेंत बुद्धिमत्तेची चमक नसे. परंतु तालमींत आपलें जें काम बसलें असेल तें यथातथ्य, मनोभावानें, न कंटाळतां करणें हा दुर्मिळ गुण त्यांच्या अंगांत होता. आपल्यांत बुद्धीची चमक नाहीं ही त्यांना पूर्ण जाणीव होती. त्यामुळें नवीन भूमिका आली कीं त्याच्या पाठांतराला यानीं सुरवात करायची.नक्कल लिहून घेऊन रोज पहाटे चार वाजतां उठून घोकंपट्टी चालायची. नक्कल लिहून झाल्यावर ती नीट तपासून मगच पाठ करीत. नकलेंत चुकीचा शब्द लिहिला असला तरी अर्थाकडे नजर देण्याची प्रवृत्तीच नसल्यामुळें जसा लिहिला असेल तसाच पाठ करायचा. त्यामुळें फार गंमत होत असे.

विक्रमोर्वशीयांत विदूषकाचें एक वाक्य असें आहे कीं " मग ती तुला मुळींच दुर्मिळ नाहीं " प्रत्येक प्रयोगाच्या दिवशीं आपली सर्व नक्कल सर्वांच्या अगोदर रंगून बसून म्हणायची अशी त्यांची संवय असे. त्याप्रमाणें विक्रमोर्वशीयांत दुसऱ्या अंकांतील वर लिहिलेलें वाक्य ५।५० वेळां बरोबर घोकून ठेवावें. वाक्य जवळ जवळ येऊं लागलें कीं ते कावरे बावरे होत व वाक्य उच्चारायला सुरवात केली कीं " मग ती तुला " इतकें म्हणून ते थोडे थांबत. असा त्यांचा घोटाळा उडे. रंगभूमीवर काम करतांना शेजारच्या पात्रानें आपल्या वाक्याच्या शेवटचे शब्द अगदीं पुस्तकांतलेच जर म्हटले तरच पंतांचें ठीक जमायचें. जर कां कानामात्रेचा फरक झाला तर पंतांचें बस्तान बिनसून जाऊन त्यांचें वाक्य गडगडलेंच. मी एकदां सौभद्रांत कृष्णाच्या भूमिकेंत दुसऱ्या अंकांत एक वाक्य म्हटलें " असं झालं अं ? बरं नंतर ? " या ऐवजीं शेवटचा शब्द " बरं पुढें " असा म्हटला. झालें ! पंतांनीं वाक्य म्हणायचें त्याचा आरंभ " नंतर " शब्दानें होता आणि मी म्हटलें, " पुढें." झालें. पंतांचा पारा चढला. त्यांना पुढचें वाक्य आठवेना. कसा तरी प्रवेश संपला. मी आंत येतांच शिव्यांचा भडिमार सुरू झाला. मी पुष्कळ समजुतीनें सांगितलें कीं " पंत, ' नंतर ' आणि ' पुढें ' या दोन्ही शब्दांचा अर्थ एकच आहे. तेव्हां माझें चुकलें नाहीं." परतु त्यांचा ठराविक सवाल " तूं नंतरच्याऐवजीं पुढें कां म्हटलेंस ? त्यामुळें माझा घोटाळा झाला." तसेंच पंताना विकृत उच्चाराचे व कांहीं बरोबर असे इंग्रजी शब्द उच्चारायची संवय असे. त्यामुळेंहि घोटाळे उडालेले आहेत. एकदां ते गुप्तमंजूषमध्यें वाक्य बोलले. त्यांत एक इंग्रजी शब्द त्यांच्या तोंडांतून उच्चारला गेला. तो असा, " विलासा, उद्यां तुला उत्तर द्यायला **परमिशन** आहे ." झालें. थिएटरमध्यें हंशा झाला. रंगभूमीवरच्या पात्रांना गांभीर्य टिकविणें अशक्य होऊन तींहि हंसूं लागलीं. पंत गोरेमोरे होऊन लाल डोळ्यांनीं पात्रांकडे पाहून संताप दर्शवूं लागले. परंतु तो संताप पहातो कोण ? त्या दिवशीं कोणाला शिव्या द्यायची सोयच नव्हती. हे जरी गमतीचे प्रकार होते तरी पंत आपली भूमिका अत्यंत मनोभावानें करीत.

त्यांचा स्वभाव चौकस, व्यवहारी आणि व्यवहाराला चोख असा होता. मी त्यांना फार आवडत असें. माझ्यावर त्यांचा अतिशय लोभ होता. माझ्या भूमिकेवर ते खूष असत. पहांटे पांच वाजल्यापासून स्वतःची दिनचर्या घड्याळाप्रमाणें ते चालवीत असत. पूर्ण संसारी होते. मनाचे हळवे होते. शिक्षणाचा संस्कार नसल्यामुळें एखाद्या वेळीं उगीच संतापत. परंतु वेळ गेल्यावर समजुतीनें सांगून त्यांची चूक लक्षांत आणून दिली कीं म्हणत माझी पित्तप्रकृति असल्यामुळें असें होतें. स्वभावानें सरळ होते. आपला संसार, आपली मिळकत, आपल्या भूमिका चोख करणें हेंच त्यांचें जीवनसर्वस्व होतें. त्यांना दोन चिरंजीव आहेत. एक गणेश काशीनाथ ऊर्फ दादा, दुसरा वासुदेव काशीनाथ ऊर्फ बळवंतराव परचुरे. एकंदरींत पंत म्हणजे नमुनेदार गृहस्थ म्हणायला हरकत नाहीं. आदा पाहून खर्च करीत. सन १९१४ सालीं ते मिरज मुक्कामीं दिवंगत झाले.

## चिंतोबा गुरव

हे शरीरानें किडकिडीत, बांधा ठेंगणा, रंग काळासांवळा, आवाज गोडीला अगदीं सामान्य परंतु सुरेल; गवई ढंग गाण्यांत यावा ही प्रबल इच्छा. वाणी मेहेनतीनें अगदीं अस्खलित जरी नाहीं तरी ठीक केलेली. कै. देवलांच्या शिक्षणानें शापसंभ्रममधील महाश्वेतेचें काम निर्दोष बसलेलें, त्यात बुद्धि खर्च करून मौज आणलेली. भाऊरावांच्या जोडीला काम करीत असतांना रंग आवाज वगैरे कांहींहि ईश्वरदत्त अनुकूलता नसतांना चितोबांनीं आपल्या महाश्वेतेच्या कामाची छाप शेवटपर्यंत उत्तम ठेवली होती. ते स्त्रीचे अभिनय थोडे थिल्लर करीत. बारीक पहाणारालाच ते अभिनय कुलीन स्त्रीच्या पद्धतीचे नसून कलावंतिणीच्या धर्तीवर आहेत असें वाटे. परंतु प्रेक्षकवर्ग चिंतोबांच्या अभिनयाचें खरोखरी कौतुक करीत. सौभद्रांत रुक्मिणीचें काम, वीरतनयांत शुंभसेन, रामराज्यवियोगांत कैकेयी हीं सर्वच कामें चांगलीं करीत; चिंतोबा काळे असून रंगरचना इतकी उत्तम करीत कीं दिवसा जर ते कुणाच्या दृष्टीस पडले नसते तर त्यांच्या शरीराचा वर्ण काळा आहे असें कोणीहि म्हटलें नसतें. त्यांनीं सर्व केस राखलेले असल्यामुळें त्या रंगरचनेला ठाकठीकपणा दिसे. भूमिकेला योग्य अशी

रंगरचना, वेषभूषा, अभिनय वगैरे सर्व ठाकठीक करीत. यांना लहानपणीं शिक्षणाचा मराठी ३।४ इयत्तेपलीकडे संस्कार न झाल्यामुळें व पुढें नाटक मंडळींतहि वाचन वगैरेचा नाद नसल्यामुळें, नाटकें नव्या पद्धतीचीं, प्रेक्षकांचा नाटक पहाण्याचा दृष्टिकोन नवीन, या नव्या काळाबरोबर आपणहि त्यांत वहात जायला पाहिजे याची जाणीव न राहिल्यामुळें "माझें आहे तें पुरे आहे" अशा वृत्तींत राहून त्यांनीं गवई गाण्यावरच आपलें सर्व लक्ष केंद्रित केलें. नव्या पिढीच्या माणसासमोर हळूहळूं अदृश्य होऊन सन १९०७ सालापासून जवळ जवळ ते पूर्ण अदृश्यच झाले. कै. देवलमास्तरांचा ज्या वेळीं कंपनींत मुक्काम नसे त्या वेळीं माझ्यासारख्या नवशिक्या मुलांच्या नकला म्हणून घेणें, पदें सांगणें वगैरे कामावर जुजबी तालीममास्तर ते होते. चिंतोबांच्या स्वभावांतलें विशेष हें असें कीं शक्य तितकी दुसऱ्यावर छाप बसवायची. लहान वयांत त्यांनीं जास्त पोक्तपणाचा आव आणून, आमच्याकडून "अकालीं वार्धक्य आलेला तरुण" अशी पदवी मिळविली होती. आम्ही नेहमीं विनोदानें असें म्हणत असूं कीं "चिंतोबांना इतर माणसांप्रमाणें बाल्य, तारुण्य, वृद्धावस्था या तीन अवस्था नाहींतच. त्यांचें बाल्य आम्ही पाहिलेंच नाहीं; परंतु ऐन तारुण्यांत २०।२२ वर्षांच्या वयाला त्यांनीं एकदम पोक्तपणांत उडी मारली म्हणून त्यांना अवस्था दोनच, एक बाल्य व दुसरी वृद्धावस्था. पोक्तपणाच्या आवरणाखालीं त्यांनीं तारुण्य दडपून टाकलें. चितोबांना विनाकारण लब्धप्रतिष्ठितपणा आवडत नसे. त्यामुळें ते एखाद्या वेळीं सडेतोड बोलत. त्याचा शंकररावांना राग येई. व्यवहाराला अत्यंत चोख. स्नेह्यासोबत्यांना, आप्त माणसांना त्यांच्या आपत्कालीं शक्त्यनुसार उपयोगी पडण्याची त्यांना आवड आहे. १९१६ सालीं त्यांनीं किर्लोस्कर कंपनी सोडली. त्या वेळीं त्यांनीं कंपनीची केलेली सेवा लक्षांत घेऊन शंकररावांनीं त्यांच्या सन्मानार्थ प्रयोग करून तें उत्पन्न त्यांना देऊन त्यांचा बहुमान करायला पाहिजे होता. यांत त्यांच्या पदराला खार लागत नव्हती. निव्वळ अंगमेहेनतीनें चिंतोबासारख्या नटाचा बहुमान करायला कसूर करून त्यांनीं मनाचा कमीपणा दाखविला असें वाटतें. कंपनी सोडल्यापासून चिंतोबा, पैदा केलेल्या गवई गाण्यावर

गाण्याच्या तालमी देऊन आयुष्य मानानें काढीत आहेत. कशीहि स्थिति असली तरी त्यांनीं दैन्य दाखवून आर्थिक मदतीची याचना कोणापाशींहि केली नाहीं. भेट झाली आणि " चिंतोबा, कसें काय आहे " विचारलें कीं " आनंद आहे. कांहीं कमी नाहीं " हें त्यांचें ठराविक उत्तर येतें. त्यांचीं दोन्ही कुटुंबें वारल्यानंतर एकुलत्या एका मुलग्याची लहानपणापासून आई व बाप या दोन्ही नात्यानें जोपासना करून मॅट्रिकपर्यंत शिक्षण दिलें. नंतर त्याची पुढें शिकण्याची इच्छा नाहीं असें पाहून त्यांनीं त्याला गायनाचें शिक्षण देऊन उद्योगाला लावला आहे. अशाहि परिस्थितींत त्यांनीं मुलाचें लग्न करून विस्कटलेलें घर पुन्हां उभें केलें हें खरोखरी त्यांना भूषणावह आहे.

## कृष्णराव गोरे

याचें वय माझ्यापेक्षां तीन वर्षांनीं जास्त आहे. परंतु तीन वर्षांचा फरक, हा कांहीं ते मागच्या पिढींतील असें म्हणण्याइतका जास्त नाहीं. गोरे यांचा आवाज अत्यंत मधुर, जव्हारीदार, खणखणीत. दम्याचा त्रास नसला म्हणजे अजूनहि आहे. गोरे यांचें गाणें किर्लोस्करी वळणावर म्हणजे संगीत वळणावर आहे. जरी ते, रागदारी गाऊं शकतों असा आव आणतात, तरी त्यांतली गायकी संगीत वळणाची आहे हें उघड उघड दिसतें. वाणी उत्तम अस्खलित आहे. ती इतकी कीं एकायला नमुनेदार वाणी म्हणून बोट दाखवावें. शरीर पोंग आलेलें, गालाचीं हाडें केव्हांहि बुजलीं गेलीं नाहींत, वर्ण गोरापान, नाक गरुड चोंचीसारखें बाकदार, डोळे मोठे पाणीदार, परंतु रंगभूमीवर त्यांनीं त्या डोळ्यांचा कधींहि अभिनयांत यथायोग्य उपयोग केला नाहीं.

गोरे त्या वेळीं सौभद्रांत कुसुमावती, शाकुंतलांत प्रियंवदा, राम· राज्यवियोगांत शंबूक, विक्रमोर्वशीयमध्यें उर्वशी, मृच्छकटिकमध्यें वसंतसेना अशा भूमिका करीत. त्या वेळीं त्यांचा स्त्रीवेष वयाच्या कोवळेपणामुळें बरा—नाजुक दिसे. गाण्यांत एक मजेदार फिरकी असे. परंतु तान मारतांना किंचित् थेतरेपणा येई. त्यामुळें आली एकादी तान तर अशी सफाईदार चमकदार व दाणेदार येई, कीं ऐकणारानें वाः वाहवा!! म्हणावें. परंतु

घसरली कीं कुणीकडे भडकेल आणि बेसूर होईल याचा नेम नसे. हा थेतरेपणा बरीच मेहेनत झाल्यावर प्रौढ वयांत बराचसा कमी झाला. गोरे यांना भूमिकेबाबत धारणाशक्ति जवळ जवळ नव्हती म्हटलें तरी चालेल. आणि देवलमास्तरांनीं जेवढें बसवून घेतलें तेवढेंच ठाकठीक करण्यापलीकडे बुद्धीचा उपयोग करून आपल्या कामांत सफाई आणि सौन्दर्य आणण्याचा त्यांनीं कधींच प्रयत्न केला नाहीं. देवलमास्तरांसारख्या अलौकिक नाट्यशिक्षकाचें शिक्षण मिळून सांगितल्याबरहुकूम काम करायचे असेंच त्यांचें काम होत असे. स्वतःची बुद्धिमत्ता कुठेंहि दिसायची नाहीं. असे नट म्हणजे पुण्यास छापील गणपती मिळतात तसे. गाण्याशिवाय विशेषेंकरून आवाजाची फेंक व अस्खलित वाणी या ईश्वरी देणगीशिवाय त्यांच्या भूमिकेंत कोणताहि दुसरा गुण कधींहि दिसला नाहीं.

ते १८९२ सालीं किर्लोस्कर कंपनींत आले. १९०४ सालीं त्यांनीं किर्लोस्कर कंपनी सोडून स्वदेशहितचिंतक नाटक मंडळींत आसन ठोकलें. १९१२ सालीं स्वदेशहितचिंतक नाटक मंडळी मोडल्यावर १९१२ सालीं डिसेंबरमध्यें पुन्हा किर्लोस्कर कंपनींत आले. १९२० सालीं किर्लोस्कर कंपनी सोडल्यावर १९२१ सालीं त्यांनीं सहकारी मिळवून लोकसेवक नाटक मंडळी काढली. १९२२ सालीं त्या कंपनीचें विसर्जन होऊन १९२२।२३ सालीं यशवंत कंपनींत गेले. त्या कंपनीनंतर हिराबाई बडोदेकर यांच्या कंपनींत १९३३ सालापर्यंत होते. नंतर एक दोन सिनेमा कंपन्यांत काम करून सध्यां ते वांईस आहेत. आतां त्यांचें वय सुमारें ६१ वर्षांचें असावें. आपण मोठे विख्यात नट म्हणून आपल्यास लोकांनीं मोठेपणा द्यावा ही त्यांची प्रबळ इच्छा आहे. परंतु त्याबरोबर दुसऱ्यांच्याहि गुणाबद्दल आदर दाखविला पाहिजे असें त्यांच्या हातून होत नाहीं. म्हणून त्यांच्या इच्छेप्रमाणें लोक त्यांना मानीत नाहींत.

## नानासाहेब जोगळेकर

नानासाहेब जोगळेकर हे मॅट्रिक्युलेशनची परीक्षा पास झाल्यानंतर लोकमान्य टिळकांच्या लॉ क्लासमध्यें होते. ते शरीरानें उंचे पुरे, धिप्पाड, रंग गोरा, मिशा थोड्या, नाक गोबरें, परंतु रंगभूमीवर एकंदरींत रुबाब-

दार दिसत. आवाज गोड व पल्लेदार होता. तान फार चमकदार स्वच्छ दाणेदार नव्हती, तरीहि चांगली होती. वाणी अस्खलित, बुद्धिहि तीव्र होती. मेहेनत करून पदें बसविण्याची त्यांना संवय होती.

भाऊरावांसारख्या लोकोत्तर मनुष्याच्या जागेवर काम करायला आपण आलों आहोंत आणि किर्लोस्कर कंपनीचा पूर्वापार लौकिक कायम ठेवण्याची जबाबदारी आपल्याकडे सोंपविलेली आहे याबद्दलची पूर्ण जाणीव त्यांना होती.

नाटकाच्या तालमींना हजर राहण्यांत त्यांची बहुतकरून फारशी हयगय नसे. परंतु जुन्या नाटकाच्या तालमी सुरू असल्या म्हणजे आपल्या पत्रलेखनाचें कार्य ते करीत. त्यामुळें तशा तालमींना हजर नसत. तरीहि त्यांनीं एखाद्या दिवशीं पत्रें लिहायला काढलीं नाहींत म्हणजे "आज टपाल नाहीं वाटतें" असें मी विचारलें म्हणजे ते चिडत असत. अशा खेळीमेळीच्या स्वरूपांत त्यांच्या आमच्यांत नेहमीं रहस्य चाले.

जोगळेकर बैठे खेळ चांगले खेळत. स्वभाव प्रेमळ आणि मन-मिळाऊ होता. जरीकांठी उपरणें व मोठ्या कांठाचा जरीचा रुमाल हीं त्यांच्या आवडीचीं असत. खाण्यापिण्यांत त्यांचा विशेष चोखंदळपणा नव्हता.

एखादे वेळीं जोगळेकरांना कोणी जरासें फुगविलें कीं त्यांना मालकी ऐटीनें वागावेंसें वाटे. परंतु तें सोंग त्यांना फार वेळ टिकवितां येत नसे.

त्यांचें माझ्यावर अत्यंत प्रेम होतें. त्यांच्याप्रमाणेंच त्यांच्या कुटुंबा-नेंहि आपल्या स्वतःच्या बंधूपेक्षां जास्त प्रेमानें मला वागविलें आहे.

भाऊरावांच्या पश्चात् जोगळेकरांसारखा खंदा वीर मिळाला म्हणू-नच किर्लोस्कर कंपनीची पूर्व परंपरा कायम राहिली असें विधान केल्यास तें मुळींच अतिशयोक्तीचें होणार नाहीं.

सौभद्रांत जोगळेकर अर्जुन होत. त्या नाटकांतील "मी कुमार तीहि कुमारी" "कांते फार तुला;" पांचव्या अंकांत "वदनीं धर्म जलाला" "माझ्यासाठीं तीनें" हीं जोगळेकरांचीं पदें उत्तम होत असत.

मूकनायक नाटकाच्या तिसऱ्या अंकांतील पहिला प्रवेश चालूं असतां जोगळेकर आणि नारायणराव यांचीं पदें एकावर एक इतकीं रंगत कीं तो प्रवेश म्हणजे सुंदर गायनाची मेजवानीच वाटे.

प्रेमशोधनमधील मालकंस तर जोगळेकरांचा हातखंडा असे. परंतु या सर्वांपेक्षांहि जोगळेकर नट, संगीत नट, पूर्ण यशस्वी नायक, असे जर चमकले असतील तर ते मानापमान नाटकांतील धैर्यधराच्या भूमिकेंत. जोगळेकरांच्यानंतर आजपर्यंतच्या २७ वर्षांत रंगभूमीवर अनेक धैर्यधर आले आणि गेले. परंतु खरा धैर्यधर म्हणजे एकटे एक जोगळेकरच होत. ज्यांनीं ज्यांनीं जोगळेकरांचें धैर्यधराचें काम पाहिलें असेल तेच याची साक्ष देतील.

आपली कर्तबगारी शंकररावांमुळें दबली आहे याची जाणीव मृत्यूच्या अगोदर त्यांना झाली होती. परंतु ही जाणीव व्हायला आणि जोगळेकरांच्या आयुष्याचा ग्रंथ आटपायला एकच गांठ पडली.

## नारायण सदाशिव दडपे

यांचा आवाज अतिशय गोड, मोठा, स्वरूप उत्तम. शरीराचा बांधा तालीम करून बांधेसूद केलेला, वर्ण गोरा, वाणी अस्खलित, गाणें साधारण ठराविक सांचाचें, तान मुरकी वगैरे अगदीं सामान्यतः; परंतु कै. देवलमास्तरांच्या अभिनयशिक्षणानें, थिएटरमधील रंगपटावरचा माणूस, परंतु त्या वेळीं चांगला नट म्हणून चमकूं लागला व पुरुष पार्टांत यांचें रेखीव काम नव्या पिढींत उत्तम होई व यांच्या कामाबद्दल माझ्या मनांत आदर उत्पन्न होऊन असें रेखीव काम आपलें व्हावें अशी इच्छा होई.

## ब. ल. पेठे

पेठे, नाटक कंपनींत आलेल्या सुविद्य मंडळींत गोविंदराव टेंबे यांच्याप्रमाणें इंग्रजी शिकलेले; वाचनाचा त्यांना उत्तम नाद. स्वभावतः खर्चिक. खिशांत पैसा असला तर अडल्यानडलेल्याला किंचित्‌हि विचार न करितां पैसे देण्याची त्यांची प्रवृत्ति. स्नेह्यांसाठीं जवळ असलेले पैसे संपे तोंपर्यंत खर्च करण्यास कमी न करणारे. तसेंच स्वतःजवळ पैसा नसला

तर तितक्याच आपुलकीनें दुसऱ्याजवळ मागणारेहि; परंतु कांहीं मुर्दाड लोक पैसे परत करण्याची गोष्टच जशी विसरतात त्या जातींतील पेठे नव्हेत.

पेठे जसे प्रेमळ तसेच प्रेमळपणा जाऊन बिथरण्याचाहि स्वभावांतला दोष तितकाच मोठा.

पेठे हे सुशिक्षित म्हणजे इंग्रजी लिहिणारे व बोलणारे असे नाटक कंपनींत गेलेले पहिलेच गृहस्थ. यामुळें समाजांतील कै. काशिनाथपंत छत्रे, ठाण्याचे ठोसर वकील, पुण्यांतले एल्. जे. आपटे अशांसारखी मोठी मंडळी पेठे यांची चहाती असत.

अभिनयासंबंधीं बोलणें निघालें म्हणजे पेठे तात्यासाहेब ठोसरांच्या अभिनयपटुत्वाचें वर्णन करीत आणि त्यांच्या हाताखालीं आपण तयार झालों ही माहिती देत. हें पुष्कळांनीं ऐकिलें असेलच.

स्त्रीविषयक भानगडी अगर लफडीं यांपासून पेठे अलिप्त, सोंवळे राहिले हा त्यांच्यांतील दाखविण्यासारखा मोठाच सद्‌गुण होय.

पेठे वाशिमकर संगीत मंडळीमध्यें होते. त्या कंपनींत अभिनयाला अस्पृश्य समजून इतर कोणी त्याला शिवत नसत. तेथें अभिनयाचें चुकीचें का होईना पण हे स्मरण ठेवीत, हें अगदीं खरें आहे.

रंगभूमीवर पेठे यांनीं जो कांहीं लौकिक मिळविला तो फक्त एका आपल्या सणसणीत आवाजाच्या जोरावर. यापेक्षां शरीरसौष्ठव, सहजसुंदर अशी अस्खलित वाणी, सौंदर्य, तालबद्धता, या सर्व गोष्टींचा पेठे यांच्या ठिकाणीं पूर्ण अभाव असे.

वाशिमकरांतून पेठे किर्लोस्कर कंपनींत प्रथम जेव्हां आले तेव्हां माझेच स्नेही झाले. परंतु पुढें अकारण शत्रूहि बनले.

सौभद्र नाटकांत नारदाचें आणि कृष्णाचें काम करीत. नारदाचें काम करतांना " लग्नाला जातों मी द्वारकापुरा " या पदाला सुरवात झाली म्हणजे ते ' लग्नाला ' हा शब्द उच्चारतांना असा कठोर आवाज काढीत कीं, ऐकणाराला वाटे जणूं कांहीं अर्जुनावर चिडून नारद सांगत आहे, " अरे लेका, गाढवा अर्जुना, मी लग्नाला द्वारकेला जातों आहें आणि मूर्खासारखा तूं मला प्रश्न करतोस कीं, मुनिवर्य कुठें निघालांत ? "

तसेंच शारदेंतील श्रीमंतांचें काम पेठे करीत असत. ते त्या भूमिकेंत बोलतांना व गातांनाहि आपला आवाज इतका कांपरा काढीत आणि शरीर इतकें कांपवींत कीं पहाणाऱ्याला पेठे आतां कदाचित् कोलमडून पडतात कीं काय असें वाटे. ही त्यांच्या कामाची तऱ्हा फक्त पहिल्या अंकांतच दिसे. दुसऱ्या अंकापासून कांहीं नाहीं. परतुं असें असूनहि कांहीं दिवस पेठे यांनीं दुनियेला झुलविलें यांत शंका नाहीं.

पेठे एखाद्याचे स्नेही झाले कीं त्याचेच ते वैरी केव्हां होतील याचा नेम नाहीं. एखाद्यासमोर एखाद्याची निंदा करतांना ज्याची ती निंदा असेल त्याची प्रथम तारीफ करून पुढें निंदेच्या ज्या जखमा करावयाच्या त्याची मलमपट्टी आगाऊ तयार ठेवण्यांत पेठे यांजकडून कधींहि चूक व्हावयाची नाहीं.

कोणाच्या भजनीं लागायला पेठे यांना कारण लागत नसे. ज्याच्या भजनीं पेठे लागतील तो मनुष्य कोणत्या सद्गुणांनीं मंडित आहे हें सांगतांना ते लोकांना असें भासवितील कीं त्या सद्गुणाचा पत्ता खुद्द त्या मनुष्यालाहि असणार नाहीं. एखादा मासा आपल्या गळाला लागावा अशी पेठे यांना इच्छा झाली कीं त्यांनीं पुढीलप्रमाणें प्रयोगाला लागावेंच—

कवि असला आणि त्याची कविता कानांवर पडली कीं मध्येंच वायु झाल्याप्रमाणें आहा: हा: ! वाहावा ! असे नुसतेंच म्हणून पेठे यांनीं मान डुलविलीच. एखाद्या देशभक्तासमोर नम्रवृत्तीनें वांकून बोलतील. बालगंधर्व अगर मास्तर दीनानाथ यांसारखा एखादा गायक नट गातांना ऐकलें म्हणजे ज्या ठिकाणीं प्रेक्षक निर्विकार राहतील त्याच जागीं नेमके पेठे एकदम ओहो हो हो हो असे उद्गारून ताडकन उठून उभे रहातील आणि सर्वांचें चित्त आपल्याकडे ओढून घेतील.

एखाद्यापुढें नम्रवृत्तीनें विद्यार्थीपणाचा आव आणून बसतील पण त्याचीच पाठीमागें निंदा करण्यांत पेठे कोणाला आपला हात धरूं देणार नाहींत. एखाद्याला खुलवून वेडापिसा बनविणें हा पेठ्यांच्या हातचा मळ आहे.

ज्याच्या भजनीं पेठे लागतील त्याची वाटेल ती व पडेल ती कामगिरी करण्यांत पेठे यांना कसलाहि कमीपणा वाटायचा नाहीं. ते मनाचे

इळवे असे वाटतात, कारण एखाद्या प्रसंगाचें वर्णन करतांना ते मध्येंच केव्हां गहिंवरतील याचा नेम नाहीं.

लावालावी करण्याचा गुण पेठे यांच्या ठिकाणीं आहे असा आरोप त्यांच्यावर लोक करीत. या त्यांच्यावरील आरोपाच्या प्रसिद्धीमुळें राम गणेश गडकरी यांनीं केलेली कोटी माझ्या स्मरणांत आहे. ती पुढील-प्रमाणें आहेः—महायुद्धासंबंधीं बोलत असतां गडकरी म्हणाले कीं जर्म-नांना चिरडून टाकण्यासाठीं इंग्रज सरकार रिक्रूट भरतीची आणि लढा-ईची इतकी तयारी कां करतें कळत नाहीं. जर्मनी व आस्ट्रिया यांच्या सरहद्दीवर पेठे यांना उभें केलें कीं त्या दोघांची गट्टी तुटायला काय वेळ आहे !

एकंदरींत पेठे हे गाण्यांत जसे बे–लय व बेताल तसाच त्यांचा स्वभावधर्म व आयुष्यक्रमहि बेताल झाला आणि त्यामुळेंच ते हुशार, तरतरीत व बुद्धिमान असूनसुद्धां त्यांना आपल्या पुष्कळ स्नेह्यांना अंतरावें लागलें. वयोमानाप्रमाणें स्वभावाचें सुंभ जळलें असलें तरी त्याचा वक्र पीळ मधून मधून आपलें अस्तित्व दाखवितो त्याला बिचारे पेठे तरी काय करणार ?

## केशव विठ्ठल भोसले

१८९५ मध्यें किर्लोस्कर कंपनींत मी गेलों त्या वेळीं स्वदेशहित-चिंतक नाटक मंडळी ठाणें, कल्याण येथें राहून आडवारीं मधून मधून मुंबईस प्रयोग करीत असे. त्या वेळीं केशव हा मुलगा सुमारें ५।६ वर्षांचा असेल. राजाराम या एका गद्य नाटकांत लहान शाहूचें काम करतांना केशवला मी पाहिलें होतें.

मृच्छकटिक नाटक स्वदेशहितचिंतक नाटक मंडळी करीत असे. त्या नाटकांत शकाराच्या 'चेटाचें' काम केशवला देत असत. औचि-त्याच्या दृष्टीनें ती चूकच होती. परंतु लावणीच्या चालीवरील पदें केशव सुरेल म्हणतो, याचसाठीं लहान मुलाच्या कौतुकानें केशवला तें काम देत असत. शकाराचें काम करणारे प्रधान या नांवाचे गृहस्थ तर केशवला मध्येंच चटकन् उचलून घेत!

पुढें १९०१ मध्यें केशवनें संस्कृत शाकुंतलमध्यें प्रियंवदेची भूमिका केलेली मी पाहिली. चुणचुणीतपणा, हुशारी, सुरेलपणा हे गुण केशवच्या अंगीं नैसर्गिकच होते.

१९०२ मध्यें मुंबईस शारदा नाटकांतील केशवनें केलेली शारदेची भूमिका मी पाहिली. तेव्हां केशव सुमारें बारा वर्षांचा असेल. केशवच्या "मूर्तिमंत भीति उभी" या पदाचा जयजयकार मुंबईभर चालला होता. त्या वर्षींच केशवनें मुंबई काबीज केली.

किर्लोस्कर कंपनीला सुट्टी होती. मला स्वदेशहितचिंतकच्या जनुभाऊंनीं कंपनींत ५।६ दिवस राहून घेतलें होतें.

१९०३ सालीं स्वदेशहितचिंतक व किर्लोस्कर या दोनहि कंपन्या मुंबईस एके ठिकाणीं असतांना त्या कंपनींत वरचेवर जाण्याचा परिपाठ होता. राजाराम सोहनी याच्याकडे मी जात असें. गेलों कीं केशवनें मला लाडिकपणें म्हणावें "बोडसमामा, मला भाऊरावांच्या शापसंभ्रममधील पदांच्या चाली ऐकवा" मीहि त्याचें म्हणणें पूर्ण करून त्याला पदांच्या चाली ऐकवाव्या.

केशवला बाहेरच्या माणसाचा वारा जास्त वेळ लागूं नये म्हणून त्या वेळीं कंपनीचा कडेकोट बंदोबस्त असे. पंधरा वीस मिनिटांपेक्षां केशव जास्त वेळ बसला कीं त्याला जनुमामा बोलावतात असा निरोप येई आणि त्याला जावें लागे.

येईल त्याला मामा बनविण्याची रीत स्वदेशहितचिंतक मंडळींतच मी प्रथम पाहिली. या मामा शब्दाची माहिती मी विचारली तेव्हां केशवनेंच एकदां स्वतःची झालेली गंमत मला सांगितली ती अशी:—

कोणाहि वडील मनुष्याला—मग तो कोणीहि असो—मामा म्हणायचें अशी केशवच्या लहानपणींच त्याला संथा देण्यांत आली होती. एक दिवस एका गांवीं स्वदेशहितचिंतकचा मुक्काम संपण्याच्या वेळीं कंपनीकडे खुशाली मागण्याकरितां महिनाभर श्रांत झालेला भंगी आला. त्याच्या दृष्टीस प्रथम केशवच पडला. त्यानें मालकाला कळवायला केशवला सांगितलें. तेव्हां दिलेल्या संथेची केशवला चांगलीच संवय झाल्यामुळें त्यानें जनुभाऊकडे जाऊन कळविलें "जनूमामा, बाहेर भंगीमामा आला आहे!"

बाकी त्यानंतर केशवरावांच्या कंपनींत पुष्कळच मामा उत्पन्न झाले. वरेरकरांना मामा ही पदवी प्रथम स्वदेशहितचिंतक नाटक मंडळी-पासूनच प्राप्त झाली.

१९०७ सालीं आक्टोबरमध्यें केशवनें स्वदेशहितचिंतक मंडळी सोडली. त्याच्याबरोबर बरीच मंडळी निघाली. १९०८ च्या जानेवारींत हुबळीस ललितकलादर्श नाटक मंडळी केशवनें स्थापन केली. भांडवल नव्हतें. केशवचा आवाज फुटल्यामुळें कसब असूनहि आवाजांतील चमक गेलेली होती. त्यामुळें केशवला आर्थिक मदत करायला पुढें कोणी सरसावलें नाहीं. तरी मंडळींत चांगली एकी होती. पगार देण्याची शक्ति नसल्यानें केशवनें पेटीवाल्यासह ८।१० मंडळींस मालक बनवून पगाराचें बंड न वाढे असा अगोदरच बंदोबस्त केला. मंडळींना जेवायला ताटें नव्हतीं. चहा प्यायला कपबशा नव्हत्या. द्रोणांतून माणसें चहा पीत. पेटी तबला मेहेरबानीनें कोणाचा तरी मिळविलेला. परंतु अशाहि विपन्न स्थितींत प्रत्येकानें आपुलकीच्या भावनेनें आणि उत्साहानें टिकाव धरला होता.

असें असूनहि केशवरावानें पुढें थोड्याच वर्षांत केवळ आपल्या पराक्रमाच्या जोरावर आपली ललितकलादर्श मंडळी वैभवाच्या शिखरावर नेऊन दाखविली. कष्टानें, चिकाटीनें आणि ध्येयनिष्ठेनें नाटक धंद्यांत यशस्वी म्हणून अभिमानानें कोणीहि बोट दाखवावें असें केशवराव भोसले यांच्याकडेच.

## दत्तोबा हल्याळकर

हे १८९०।९१ च्या सुमारास गोव्यास कळंगुटकर कंपनींत आले. त्याच्या अगोदर दत्तोपंत तिनईकर नांवाच्या गृहस्थांनीं एक कंपनी काढली होती, तींत दत्तोबा हल्याळहून पळून गेले होते. नंतर ती कंपनी मोडल्या-वर कळंगुटकर कंपनींत गेले. त्या कंपनींत गोपाळराव मराठे, दत्तोबा हल्याळकर, रामचंद्र बळवंत साठे, माधवराव केळकर, वासुदेवराव पटवर्धन वगैरे पात्रें होतीं. ती कंपनी मोडल्यावर साठे यांनीं गोवा संगीत मंडळी काढली त्यांत दत्तोबा होते. गोवा संगीत मंडळींत असतांना दत्तोबा एकदां कर्नाटकांत किर्लोस्कर कंपनीचें नाटक पहायला आले होते. कंपनींत दत्तो-

याचें गाणेंहि झालें होतें. भाऊरावांना पात्र लायक वाटलें होतें. परंतु ज्या कंपनींत दत्तोबा होते त्या आकर्षणांतून दत्तोबा सुटूं शकले नाहींत. दत्तोबांच्या मनांत भाऊरावांच्याबद्दल पूज्य बुद्धि होती व गाण्यापासून प्रत्येक गोष्टींत भाऊरावांचें अनुकरण करायचें ध्येय त्यांनीं डोळ्यांसमोर टेवलें होतें. दत्तोबा उंच गोरे असून त्यांची शरीरप्रकृतिहि सुदृढ होती. अगदीं अशिक्षित. चेहऱ्यावरचे सर्व भाग नीटनेटके असून डोळे मात्र बारीक होते. स्त्रीभूमिका जरी उंच दिसे तरी गोंडसपणामुळें खपून जात होती. आवाज मोठा खणखणीत. भाऊरावांच्या म्हणून मेहेनतीनें बसविलेल्या कांहीं ताना सफाईनें येत असत. भाषा साधारण अशुद्ध. गाण्यांतल्या शब्दांचे उच्चार चावीत चावीत करण्याची खोड असे. स्वभाव भोळा. डावपेंच नाहींत. निव्वळ शिपाईगडी. एखाद्याला मारायचें मनांत आलें कीं ताबडतोब कृतींत यायचें. परिणामाची क्षितीच नाहीं. नेहमीं भोंवतालीं संस्कृतिशून्य लोकांचा गराडा. एखाद्यानें म्हटलें कीं "दत्तोबा, तुमच्यांत आणि भाऊरावांत काय अंतर आहे? ते ज्या सुरांत पदें म्हणतात त्या सुरांत तुम्हीहि म्हणतां." परंतु त्या सुरांत पदें म्हणतांना भाऊरावांना कष्ट होत नसत. आणि दत्तोबांच्या आवाजाच्या चिरफळ्या होत. चेहरा बिघडे. परंतु फुगवलें म्हणजे फुटबॉलसारखी फुगायची वृत्ति होती. एखाद्यानें म्हटलें, "दत्तोबा, भाऊराव म्हणजे अलौकिक नाहीं बरें!" त्यावर दत्तोबा लागलीच "यांत काय संशय? त्यांची योग्यता कोणालाच यायची नाहीं." असें ताबडतोब म्हणत. असा भोळाभाबडा माणूस होता. कंपनींत भाऊरावांकडे आले म्हणजे भाऊराव त्यांना प्रेमानें वागवीत व दत्तोबाहि भाऊरावांबरोबर अतिशय अदबीनें वागत. भाऊरावांच्या मृत्यूनंतर दत्तोबांना पुण्याच्या लोकांनीं सवाई भाऊराव बनविलें. सवाई माधवरावानंतर कोणालाहि सवाई बनविणें हें पुण्याच्या लोकांचें एक वेड आहे. त्यानंतर बालगंधर्व पुढें आल्यावर सवाई गंधर्व, तरुण गंधर्व वगैरे गंधर्वांची वीण झाली आहेच.

## बाबू जोशी

देखणा, गोंडस, गाणें अगदीं सूर सोटा. परंतु यांची सद्दी देखणेपणामुळें अशी आली होती, कीं त्याच्या नादीं लागून त्याच्याभोंवतीं आंबटशोकी

लोकांचा गराडा असे. कांहीं कांहीं लोक त्याच्या रंगभूमीवरच्या भूमिकेच्या सौंदर्यानें इतके वेडे झाले होते कीं बाबूनें रंगभूमीवर घातलेली वेणी नाटकांतील इसमांनीं विकायची आणि या आंबटशोकी लोकांनीं पडेल ती किंमत देऊन विकत घ्यायची आणि तिच्या स्पर्शानें व अवघ्राणानें आनंद मानून घ्यायचा, अशा कांहीं और मजा होता. बाबूरावांनीं पुढें नाट्यकला सोडली, त्यांनीं व दत्तोपंत खाडिलकरांनीं परमानंद कंपनी काढली. दत्तोपंत खाडिलकरहि पुढें वारले. नंतर बाबूरावांनीं विरक्तपणानें रामदासी दीक्षा घेऊन दाढी जटा, कौपीन, उत्तरीय अशा वेषांत तीर्थयात्रा करीत, कीर्तनें करीत कालक्रमणा सुरूं ठेवली आहे. कीर्तनांत वाणीचा अस्खलितपणा व रसाळपणा यामुळें त्यांच्या कीर्तनांत रंग येतो.

## गोपाळराव मराठे

यांची उंची स्त्रीपात्राला न शोभेशी होती. वर्ण निमगोरा, नाक साधारण नकटेंच, शरीर सर्व सारखें भरलेलें, परंतु ढिला स्थूलपणा त्यांत नव्हता. डोक्यास सर्व केस राखून बायकासारखे वाढविलेले. असें त्यांचें स्वरूप होतें. गोपाळरावांचा आवाज चढा होता; परंतु मऊ. गोडी बरी होती. आवाजाला जव्हारी नसून कुद होता. गाणें अगदीं किर्लोस्करी संगीताच्या धर्तीचें. काम जबाबदारी ओळखून व रेखीव करीत असत. रंगरचना अत्यंत टापटिपीची. वेषभूषाहि व्यवस्थेशीर. त्यामुळें गोपाळराव जें काम करीत तें प्रेक्षकांस आवडत असे. त्यांच्या नीटनेटकेपणामुळें त्यांचा वेष जरी ते उंचे पुरे होते तरी वेढब दिसत नसे; आणि सर्व कामें अत्यंत ठीकठाक करीत. त्यामुळें त्या वेळीं प्रेक्षकांत गोपाळरावांच्या कामाची छाप असे. पुढें गोपाळराव क्वचित् पुरुषपार्टहि करूं लागले होते; परंतु ते अळणी होत असत.

## सितारामपंत बापट

पौराणिक नाटकांतील विदूषकी वळणावर काम होई. पदरचे शब्द घालून हास्यरस उत्पन्न करण्याची त्यांना लहर येई, आणि त्यामुळें एखादा शब्द बदलला तर शोभून जाई व एकादे वेळीं अनौचित्य दिसे. परंतु पात्र लोकप्रिय झालें होतें.

# शंकरराव पाटकर

शंकरराव हे मिलिटरी डिपार्टमेंटमध्यें नोकर होते. पुष्कळ वर्षे पुण्यासच राहिल्यामुळें ते पुण्याचेच समजले जात. आर्योद्धारकनंतर त्यांनीं कुठेंहि रंगभूमीवर काम केलें नाहीं. परंतु पुण्याच्या कॉलेजमध्यें वगैरे नाटकें झालीं म्हणजे ते शिकवायला जात. आर्योद्धारकमध्यें स्वतः ते अथेल्लोंत अयागोचें काम उत्तम करीत असत असें त्यांच्या समकालीन लोकांकडून ऐकलें होतें. नाट्यकलाप्रवर्तक मंडळीस सन १८९६ ते सुमारें १९०३ पर्यंत त्यांनीं नाट्यशिक्षण दिलें होतें. त्यांची शिक्षणपद्धति आमचे येथें आल्यावर दृष्टीस पडली.

